# HISTORY OF INDIA,

## The Hindu and Mahomedan Periods.

BY

THE HON. MOUNTSTUART ELPHINSTONE,

TRANSLATED INTO MARÁTHÍ

BY

VISHVANÁTH NÁRÁYAN MANDLIK.

Tulpule Wada
Nava Vishnu Chowk, Poona 2

---

## INTRODUCTION.

---

REGISTERED UNDER ACT. XX. OF 1847.

---

BOMBAY:

PRINTED AT GANPAT KRISHNÁJI'S PRESS.

1862.

*The Right of Translation is reserved.*



क • पैनप १०२१

# हिंदुस्थानाचा इतिहास.



(हिंदु व मुसलमान राजांचें वर्णन)

नामदार मौंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन् यांचा

मूळ ग्रंथावरून

विश्वनाथ नारायण मंडलिक

यांणीं

मराठींत केला.

## उपोद्घात.

हा ग्रंथ इ० स० १८४७ चा आक्ट २० प्रमाणें रजिस्टर

केला आहे.

मुम्बईत.

गणपत कृष्णाजी यांचा छापखान्यांत छापला.

शा० श० १७८३.

इ० स० १८६२.

(यावरून भाषान्तर करण्याचा

हक्कहि मालकानें आपणाकडे

ठेविला आहे.)

TO

**MAJOR GENERAL G. LeGRAND JACOB, C. B.**

H. M. BOMBAY ARMY,

LATE POLITICAL COMMISSIONER IN THE SOUTHERN

MARÁTHÁ COUNTRY,

& & &

**This Volume**

IS INSCRIBED

IN ADMIRATION OF HIS DISINTERESTED EFFORTS TO ADVANCE THE WELFARE OF THE NATIVES OF THIS COUNTRY, AND IN HUMBLE TOKEN OF PROFOUND GRATITUDE AND ESTEEM,

BY

THE TRANSLATOR.

182270

मेहेरबान मेजर जनराल जी. लिग्राण्ड जेकब

साहेब बहादुर, सी. बी.,

निसबत महाराणीची मुम्बई खात्याची फौज,

दक्षिणमहाराष्ट्रदेशचे माजी पोलिटिकाल कमिशनर,

" " "

यांस,

साहेब मवसूफ यांणीं एतद्देशीयलोककल्याणार्थ जे निरपेक्ष

श्रम घेतले ते पाहून सानन्दाश्चर्य भरित

होऊन,

भाषान्तरकर्त्ता, याणें,

अत्यन्त कृतज्ञता व सत्कारपूर्वक, हा ग्रन्थ नजर केला

असे.

B4

The Educational Department having extended its assistance to the publication of this part of Elphinstone's India, a translation of the first three books is now laid before the indulgent public in the form of an Introduction, instead of a Supplement promised last year. The Maráthí reading public have now an opportunity of studying an impartial account of the institutions of their country by one of the most philosophical and gifted minds of Europe.

Elphinstone's History of India may safely be said to be the most philosophic history of this country that has yet been written:—his dispassionate view of the religion and social system of the Hindus, his researches into the antiquity and pretensions of their philosophy, his inquiry into the domains of their history, science, and literature, and his deep knowledge of their landed tenures and of the numerous and complicated relations between the governors and the governed, remain, for their general moderation and soundness, without a parallel to the present day; and India could not be blessed with a more valuable legacy than a further instalment of his observations on the progress of this nation in its religious, social, and political career since the fall of the Mogul Empire.

Great as were the talents of Elphinstone, and greater as were his opportunities than those of most European authors, he did not, when speaking of the attainments and discoveries of ancient Hindus, hesitate to record his conclusions as follows:—

"On these subjects, however, as on all connected with "the learning of the Bramins, the decisions of the most learned "can only be considered as opinions *on the facts at present*



"*before us*; and they must all be regarded as open to question until our increased acquaintance with Sanscrit literature shall qualify us to pronounce a final judgment."

Instead of this diffident and catholic spirit, a tone of dogmatism unfortunately prevails amongst the majority of later writers on India. The amount of information on Indian subjects collected or translated into the Western languages is however so small, when compared with the vast but unexplored mines in almost every department of Sanscrit literature, that every subject is likely to occupy an inquirer for a long period of hard, tiresome, and, sometimes, fruitless research. For this work, native scholars have undoubtedly far greater facilities than the European to whom alone we are indebted for all information about ancient India that we, as yet, possess. The former have not the advantages of a European classical education, but the translator hopes, they will avail themselves of the peculiar opportunities incidental to their position, and zealously follow in the track of their learned and persevering brethren of the West.

*Bombay, January* 1862.

# प्रस्तावना.

एल्फिन्स्टन्कृत हिंदुस्थानाचा इतिहासाचा हा भाग छापण्यासहि विद्याखात्याकडून साहाय्य मिळाल्यावरून, त्या ग्रंथाचा पहिल्या तीन खण्डांचें भाषान्तर करून उपोद्घातरूपानें वाचणारांपुढें सादर केलें आहे. या देशांतील धर्म, कायदे, चाली, इत्यादिकांविषयीं युरोपांतील एका बुद्धिमान् व विचारी पुरुषाचा निःपक्षपाती अभिप्राय कसा होता हें समजण्याची संधि मराठी वाचणारांस आतां प्राप्त झाली आहे.

हिंदुस्थानाचे जे सर्व इतिहास लिहिले आहेत, त्यांत एल्फिन्स्टन्कृत हा फार गहन विचाराचा आहे. हिंदूंचा धर्म, त्यांचा रीतिभाती, त्यांचीं तत्त्वदर्शनें, त्यांचे इतिहास, त्यांची शास्त्रविद्या व व्युत्पत्तिविद्या, त्यांचा जमीनीचा धाऱ्याचा शिस्ती, आणि ते लोक व त्यांचे राजे यांचे परस्परांशीं संबंध; या प्रकरणांविषयीं त्याचे विचार, शोध, व गहन ज्ञान, हीं आजदिवस पावेतों अप्रतिम आहेत; आणि मोगलराज्याचा नाश झाल्यापासून सांप्रत कालपर्यन्त, हिंदूंची सुधारणाप्रदेशांत जी गति झाली तिजविषयीं या पुरुषाचे विचार कसे होते ते जर समजतील, तर त्यांहून दुसरी अधिक मोलवान् मत्ता या देशास मिळण्याजोगी कांहींच नाहीं असें समजलें पाहिजे.

आतां एल्फिन्स्टन साहेब हा मोठा बुद्धिमान् होता, आणि बहुतेक दुसऱ्या युरोपियन ग्रंथकारांहून यास अधिक अनुकूलता होती, तरी, प्राचीन काळचा हिंदूंचा शोधांविषयीं व त्यांचा निपुणतेविषयीं जेथें त्याणें आपला अभिप्राय दिला आहे, तेथें खालीं लिहिल्याप्रमाणें सांगितलें आहे:—

"या विषयांप्रकरणीं, आणि साधारणरीत्या ब्राम्हणांचा

सर्व विद्येप्रकरणीं, साम्प्रतचे अति मोठ्या विद्वानांनीहि जे निर्णय केले आहेत, ते, जा गोष्टी वस्तुतः त्यांसमोर आल्या त्यांवरुन त्यांणीं मानलेले अभिप्राय आहेत; ते केवळ निश्चयात्मकच आहेत असें समजावयाचें नाहीं; आणि आम्हास संस्कृत विद्येची विशेष माहिती होऊन त्या त्या विषयांचा शेवटचा निर्णय करण्याजोगी आम्हांमध्यें योग्यता येई पर्यन्त, वरील सर्व अभिप्राय वादग्रस्त आहेत असें समजलें पाहिजे. ”

असें असून, हिंदुस्थानसंबंधीं अलीकडील ग्रंथकारांची वाणी अशी साशङ्क व समदृष्टिक नाहीं. आतां या देशाविषयीं जी माहिती युरोपियन भाषामध्यें भाषान्तरांचा द्वारें अथवा इतर साधनांनीं मिळविली आहे, ती फार थोडी आहे, आणि त्याच विषयांबाबद संस्कृतांत अद्यापि मोठीं कोठारें भरलेलीं आहेत, त्यामुळें प्रत्येक प्रकरणाचा शोधास पुष्कळ काल व फार श्रम लागतील, व इतकें करूनहि समयीं व्यर्थ जाईल. या कृत्यास युरोपस्थांपेक्षां एतद्देशीय विद्वानांस अधिक सवड आहे, असें असून हिंदुस्थानाविषयीं प्राचीन काळचा जो इतिहास अद्यापपर्यन्त उपलब्ध आहे, तो सर्व युरोपस्थांनीं जमविला आहे. आतां एतद्देशीय लोकांस ग्रीक व लाटिन भाषा अवगत नसल्ये, परंतु त्यांस युरोपस्थांपेक्षां दुसरी अनुकूलता विशेष असल्ये, म्हणून तीचा उपयोग करून आमचे लोक पश्चिमेकडील विद्वान् व निग्रही भाईबंदांचा शोधकमार्गास तत्परतेनें अनुसरतील अशी भाषान्तरकर्त्यांची आशा आहे.

मुक्काम मुम्बई, जान्युआरि १८६२.

B4

# हिंदुस्थानाचा इतिहास.



## उपोद्घात.

### हिंदुलोकांचें वर्णन.

### खण्ड पहिलें.

### मनुस्मृति हा ग्रंथ झाला त्या वेळची हिंदुलोकांची स्थिति.



### प्रकरण पहिलें.



### प्रकरण दुसरें.

### राजधर्म.



### प्रकरण तिसरें.

### न्यायप्रकरण.

## (१) फौजदारी प्रकरण.

## (२) दिवाणी प्रकरण.



## प्रकरण चौथें.

### धर्मांविषयीं.



## प्रकरण पांचवें.

### लोकांचा रीतिभाती व त्यांची स्थिति.



## खण्डदुसरें.

## प्रकरण पहिलें.

### जातीमध्यें फेरफार.



## प्रकरण दुसरें.

### राज्यरीतींत फेरफार.



## प्रकरण तिसरें.

### कायद्यामधील फेरफार.

## प्रकरण चौथें.

### धर्माची साम्प्रतची स्थिति.



### बौद्ध व जैन यांचे धर्म.



## प्रकरण पांचवें.

### तत्त्वविद्येची साम्प्रतची स्थिति.



### उत्तरमीमांसा म्हणजे वेदान्तदर्शन.

# खण्ड तिसरें.

## हिंदुलोकांची अर्वाचीन काळची स्थिति पुढें चालू.

### प्रकरण पहिलें.

#### ज्योतिष आणि गणितविद्या.



### प्रकरण दुसरें.



### प्रकरण तिसरें.

## प्रकरण चौथें.



## प्रकरण पांचवें.



## प्रकरण सहावें.



## प्रकरण सातवें.



## प्रकरण आठवें.

## प्रकरण नववें.



## प्रकरण दहावें.



## प्रकरण अकरावें.
### रीतिभाती व स्वभाव.

## पुरवणी.

पृष्ठ.

# हिंदुस्थानाचा इतिहास.

## हिंदुलोकांचें वर्णन.

## खंड पहिलें.

### मनुस्मृति हा ग्रंथ झाला त्या वेळची हिंदु लोकांची स्थिति.

*या प्रकरणाविषयीं साधारण विचार.*

अतिशय रानट लोकांमध्येंहि त्यांचा पूर्वजांचा कृत्यांचा कांहीं तरी हकीकती नाहींत असें क्वचितच असतें; असें असून हिंदुलोक इतके सुधारलेले असून त्यांमध्यें इतिहासाचा स्वरूपाजवळजवळ तरी येणारा असा ग्रंथ नाहीं, ही गोष्ट पाहून सहजच आश्चर्य वाटतें.[1]

त्यांचा चरित्रांचा कथांचे कोठें तुकडे तुकडे शेष राहिले आहेत, त्यांत इतकें पोकळ भारूड मिसळून गेलें आहे; व कल्पित आणि अकटोविकट अशा कालमानानें तो इतिहास

---

१ काश्मीर देशाची एक संस्कृत बखर आहे, परंतु वरील बोलण्यास अपवाद आणण्याजोगी ती नाहीं. कारण जरी तींत पूर्वींचा इतिहासपर ग्रंथांविषयीं उल्लेख आहेत, तरी तो देश मुसलमानांनीं घेतल्यावर शंभरांहून अधिक वर्षांनीं तिचा आरंभ आहे; आतां जरी कदाचित् ती प्राचीन असती, तरी तिजविषयीं विशेष मनांत आणायाजोगें नाहीं; कारण हिंदुस्थानाचा अगदीं सरहद्दीवरील एका लहानशा कोंपऱ्यांतील देशाची ती हकीकत आहे; आणि (त्या इतिहासांतच लिहिलें आहे त्यावरून असें दिसतें कीं) तेथील लोकांस परदेशस्थांचा रीतिभाती फार दिवस लागूं लागल्या होत्या; व त्यांचा किंवा इतर हिंदूंनीं कधींहि घेतला नाहीं.

इतका अस्ताव्यस्त होऊन गेला आहे, कीं त्यापासून भरवसा ठेवण्याजोगें, एकसारखा संबंध लागून जुळलेलें वर्तमान काढण्याची कांहीं आशा राहिली नाहीं. ग्रीसदेशाचा सिकंदर बादशाह हिंदुस्थानांत स्वारी करून आला, त्यापूर्वीचा एकाहि प्रसिद्ध बिनेची तारीख मुकरर सांगवत नाहीं, आणि एथील लोकांचा हकीकतीचें सलग जुळण्याजोगें वर्तमान मुसलमानांनीं हा देश घेतल्यानंतरचें सांगतां येतें, परंतु पूर्वींचें नाहीं.

याप्रमाणें प्राचीन काळचा हिंदूंचा इतिहासाचा जरी विलक्षण तोटा आहे; तरी त्यांचे कायदे, रीतिभाती, व धर्म, यांविषयीं हकीकतींची कांहीं उणीव नाहीं. आतां जर त्यांचा मागील कृत्यांची हकीकत असती, तर पूर्वोक्त तीन गोष्टींची आपणास माहिती व्हावी हा तिचा मुख्य उपयोग होता. तस्मात् प्राचीन काळीं त्यांची स्थिति कशी होती याचा आपल्याचानें जर निश्चय करवेल, व पुढें फेरफार काय झाले तें लक्षांत आणवेल, तर त्यांचा इतिहासाचा जो मूळ आवश्यक भाग त्यांतून आपल्या हातून कांहीं विशेष जाईल असें नाहीं.

हिंदुलोकांमध्यें वेद म्हणून एक सूक्तांचा व पद्यकथांचा समूह आहे. त्यावरून त्यांचा धर्माचें कांहीं धोरण निघतें; व शास्त्रांमध्यें आणि तत्वविचारामध्यें त्यांची किती निपुणता होती हेंहि कांहींसें कळून येतें. ख्रिस्ती शकापूर्वीं चौदाव्या शतकांत वेदांची जुळणी होऊन वरील सूक्तें इत्यादि एकत्र करून त्यांस सांप्रतचें रूप प्राप्त झालें असें अनुमान करितात. परंतु हिंदुलोकांचा स्थितीचें पुरें असें वर्णन प्रथम मनुस्मृति म्हणून त्यांचा धर्मशास्त्राचा ग्रंथ आहे त्यांत सांपडतें. हा ग्रंथ ख्रिस्ती शकापूर्वीं नवव्या शतकांत झाला असावा असें संभवतें; यास्तव हिंदुस्थानाचा सर्व इतिहासाचा आरंभ मनुसंहितेपासून धरिला पाहिजे.

वरील ग्रंथाचा कर्त्ता मनु म्हणून कल्पिला, तर त्या कृन मनूचा काळचा लोकांविषयीं यथार्थ ज्ञान प्राप्त होण्यास आपणास अशी दृष्टि पोंचविली पाहिजे, कीं धर्मशास्त्राचे नियम हे सर्व एका काळींच बांधलेले नसतात. कारण त्यांत अति प्राचीन व अगदीं रानट असेहि कांहीं कायदे असतात, व ते अतिशय सुधारणूकेचा वेळीं जे चांगले फेरफार करून ठरविलेले नियम त्यांत मिसळलेले असतात. यास उदाहरणः— ब्लाकूस्टोन नामक इंग्रेज शास्त्रवेत्त्यानें जो ग्रंथ केला आहे, त्यांत पुष्कळ कायदे आहेत त्यांवरून लोकांची स्थिति फार सुधारलेली होती असें दिसतें; परंतु जादूविषयीं व लढाईचा पैजांविषयीं जे नियम आहेत त्यांवरून हा ग्रंथ लिहिला त्या काळापर्यंत असा रानटपणा चालत होता असें सिद्ध होत नाहीं.

जरी सर्व मनुस्मृति एककालीन असली, तथापि तिजवरून लोकांची वास्तविक स्थिति समजणार नाहीं; कारण तिजमध्यें अमुक रीतीनें आचरण करावें याविषयीं ज्या आज्ञा केल्या आहेत त्या, ज्या उच्च स्थितीस लोकांनीं यावें असें त्या शास्त्रकाराचा मनांत होतें, ती स्थिति लक्षांत आणून लिहिल्या आहेत; व जे निषेध केले आहेत, ते, जे अतिशय मोठे दोष घडून येण्याजोगी कल्पना करूं शकवली ते मनांत आणून, त्यांविषयीं नियम बांधिले आहेत. यास्तव मनूचा वेळीं लोकांचा कल कसा होता, हें मनुस्मृतीचा साधारण कलावरून समजलें पाहिजे, आणि त्यांतूनहि आपले विचार किंचित् साळढाळ पाडिले पाहिजेत; म्हणजे आपणास लोकांचा स्थितीची अटकळ करितां येईल. ग्रंथकार त्या स्मृतीविषयीं जसें नेहमीं वर्णन करितात, तीच परिभाषा मी धरिली आहे. आतां हा ग्रंथ धर्मशास्त्राविषयीं निर्विवाद प्रमाण असें जरी पूर्वीपासून मानित असत, तरी कोणी एका राजाचा संमतानें त्याचा राज्यांतील कारभार चालविण्याकरितां

या स्मृतीची रचना केली असेल असें माझानें ह्मणवत नाहीं. हिंदूंचा रीतीप्रमाणें पूर्ण लोकसत्ताक राज्य कसें असावें, याविषयीं आपला अभिप्राय कळविण्याकरितां कोणी विद्वान् पुरुषानें हा ग्रंथ केला असावा असें दिसतें. जर ही कल्पना धरिली, तर जशी एकाद्या कायद्याचा पुस्तकावरून लोकांची स्थिति दिसून येत्ये, तशी मनुस्मृतीवरून दिसून येईल; कारण त्या वेळीं लोकांमध्यें जे नियम होते ते तींत असून, लोकांची उत्कृष्ट स्थिति कशी असावी याविषयीं जे त्या ग्रंथकाराचे अभिप्राय त्यांप्रमाणें नियम चालविण्याकरितां जे त्या वेळीं कांहीं फेरफार केले असतील, ते, जा वेळीं या स्मृतीची रचना झाली, त्या वेळीं जीं लोकांचीं मतें होतीं, त्यांवरून बांधलेले असावे. याप्रमाणें पूर्वींचे विचार सांगितले. आतां मनूमध्यें जें वर्तमान लिहिलें आहे, तें संक्षेपें करून सांगतों, आणि नंतर, साम्प्रत काळीं जा स्थितींत हिंदु आहेत तसें त्यांचें वर्णन करितों. त्या दोन्हीं स्वरूपांची तुलना केल्यानें, मध्यें जो काळ गेला त्यांत काय फेरफार झाले, ते दिसून येतील, व युनानी लोकांनीं जा हकीकती लिहून ठेविल्या आहेत, त्यांवरून या लोकांचें स्थित्यंतर होत असतां अमुक काळीं त्यांची कशी स्थिति होती, ती दिसून येईल.

---

# प्रकरण पहिलें.

## लोकांचे विभाग व त्यांचे धंदे.

मनुस्मृतीमध्यें जें लोकांचें वर्णन आहे त्यांत चार वर्ण सांगितले आहेत. हीं त्या वेळचा लोकांची गोष्ट प्रथम लक्षांत येत्ये. त्या चार जाति येणेंप्रमाणें:— ब्राह्मण, क्षत्रिय,

वैश्य, शूद्र. त्यांमध्यें ब्राह्मणांची अतिशय मोठी पदवी व पवित्रता, आणि शूद्रांस समजून उमजून दिलेलें नीचत्व हीं पाहून विस्मय वाटतो.

यांतून पहिल्या तीन वर्णांची जरी बरोबरी नाहीं, तरी ते एका मर्यादेंत आहेत: कांहीं पवित्र नित्यानित्य क्रियांस या सर्व स्मृतींत विलक्षण महत्व दिलेलें आहे; त्या क्रिया करण्यास या तिन्ही पहिल्या वर्णांचे लोक अधिकारी होतात. चौथ्या वर्णांचे व अतिशूद्र हे उंच वर्णांचा कामांस जेथें उपयोगीं पडण्याजोगे आहेत, तेथें मात्र त्यांचें वर्णन केलें आहे; त्याशिवाय त्या ग्रंथांत त्यांविषयीं विचार केलेला नाहीं.

ब्राह्मण.

सर्व सृष्ट पदार्थांमध्यें ब्राह्मण मुख्य होय. जग व त्यांतील सर्व पदार्थ हे त्याचे आहेत, आणि त्याचा कृपेनें इतर मानवांचें जीवित चालतें.[१] ब्राह्मण हा आपल्या शापानें सेना, हत्ती, घोडे, यांसुद्धां राजाचा नाश करून टाकूं शकेल[२]; दुसरे लोक व लोकपाल व देव व मनुष्य उत्पन्न करूं शकेल[३]; राजापेक्षां ब्राह्मणास विशेष मान द्यावा[४]. ब्राह्मणाचा जीवास व शरीरास जे दुःख देतील त्यांस या जगांत अतिशय शासनें सांगितलीं आहेत, आणि पुढील जगांत पुष्कळ शिक्षा होण्याची धास्ती घातली आहे.[५] अति घोर पापें केलीं तरीहि ब्राह्मणास देहान्त शासन नाहीं.[६] त्याणें इतर वर्णांचे अपराध केले असतां त्यांविषयीं फार सौम्य दृष्टीनें वागावें असें लिहिलें आहे.[७]

(१) अध्याय १, श्लोक ९६, १००, १०१.
(२) अ० ९ श्लो० ३१३.
(३) अ० ९ श्लो० ३१५.
(४) अ० २ श्लो० १३९.
(५) अ० ९ श्लो० २३२, व अ० ८ श्लो० २८१—२८३.
(६) अ० ११ श्लो० २०५-२०८, व अ० ४ श्लो० १५५-१५९.
(७) अ० ८ श्लो० ३८०.
(८) अ० ८ श्लो० २७६, ३७८ व ३७९.

असें असून कोणी त्याचा अपराध केला असतां त्याहून द्संपट निष्ठुरतेनें त्याचें शासन करावें असें सांगितलें आहे.[९]

आतां स्थूल दृष्टीनें पाहूं गेलें असतां, असें दिसतें कीं ब्राह्मण आपला धर्मसंबंधीं अभिमान पुरवून तृप्त झाले, आणि ऐहिक संपत्ति अथवा सत्ता यांचा अभिलाष करण्याचा त्यांचा हेतु नव्हता; कारण त्यांस कालक्रमण करण्याचा जो मार्ग सांगितला आहे, त्यांत श्रम घेऊन अभ्यास करावा, व तसेंच विरक्त व एकान्त असावें असें आहे.

ब्राह्मणानें आपल्या आयुष्याचा पहिला चतुर्थांश अभ्यासांत घालवावा,[१०] आणि त्या अवधींत आपला काळ उपोषणादि देहदंडनामध्यें व गुरुसेवेमध्यें तो घालवावा. त्याणें वेदाभ्यासाकडे एकसारखें लक्ष द्यावें, आणि इतर ऐहिक अभ्यासांमध्यें अगदीं वेळ घालवूं नये. त्याणें आपल्या गुरूची एकनिष्ठेनें आज्ञा पाळावी; तसेंच त्याचा कुटुंबाशीं फार विनयानें व भीतीनें वर्तावें. त्याणें आपल्या गुरूकरितां पुष्कळ प्रकारचीं चाकरपेशाचीं कामें करावीं; होमाकरितां काष्ठें, व इतर सामग्री, व तसेंच आपल्या नित्यकर्माकरितां पाणी, हीं आणावीं. त्याणें घरोघर भिक्षा मागून आपली सर्व उपजीविका चालवावी.[११]

ब्राह्मणानें आपल्या आयुष्याचा दुसऱ्या चतुर्थांशामध्यें आपली स्त्री व कुटुंब यांजबराबर वास करावा, आणि आपलीं स्वकर्में आचरावीं; तीं संक्षेपानें सहा अशीं सांगितलीं आहेत. यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान, आणि प्रतिग्रह.

---

(९) अ० ८ श्लो० २७२, २८३, ३२५, ३७७, व अ० ११ श्लो० २०५ व २०६.

(१०) अ० २ श्लो० १७५-२१०.

(११) साम्प्रत प्रतिज्ञापूर्वक अभ्यास करणारे ( ब्रह्मचारी ) मात्र हे नियम पाळित असतील तर असतील.

या सर्वांत अध्यापन ह्मणजे दुसऱ्यास शिकविणें हें कर्म अतिशय वरिष्ठ असें सांगितलें आहे.[१२] दुसऱ्या धर्मांमधील उपाध्याय हे देवालयामध्यें पूजेस असतात त्यामुळें त्यांचा जातीस मान मिळतो तसें या धर्मांत नाहीं, ही एक चमत्कारिक गोष्ट आहे. जर देवपूजेच्या व याजनाच्या कोणी ब्राह्मण धंदाच करील, तर तो नीचत्व पावेल, असें त्या ग्रंथांत वर्णन आहे.[१३] नीच जातीचे, दुष्ट, व अयोग्य, अशा लोकांपासून प्रतिग्रह घेऊं नये, असा फार निषेध केला आहे.[१४] दान देणारे योग्य असले तरी त्यांपासून पुष्कळ प्रतिग्रह करूं नये, आणि कारणाशिवाय दान घेण्याची संवय पाडूं नये.[१५] जर नेहमींचा उपजीविकेच्या मार्ग नाहींसा झाला, तर केवळ प्राणरक्षणार्थ शेतांतले दाणे टिपावे, किंवा भिक्षा मागावी, किंवा कृषिकर्म करावें, किंवा उपाय नाहीं तर व्यापार करावा; परंतु कसाहि प्रसंग आला तरी त्याणें चाकरी करूं नये. ब्राह्मणानें उगाच मनोरंजनार्थ बोलत बसूं नये; गाणें, वाजिवणें, नाचणें व द्यूत खेळणें हीं वर्ज करावीं; व तसेंच गांभीर्य व मनाची स्थिरता यांस जीं जीं कामें प्रतिकूल असतील तीं तीं सोडावीं.[१६] सर्व विषयसुखांविषयीं आसक्ति सोडावी; आणि वेदाभ्यासाचा आड येणाऱ्या अशा संपत्तीपासून दूर राहवें.[१७] तशीच ऐहिक मानप्रतिष्ठा ही विषासारखी मानून वर्ज करावी.[१८] इतकेंहि असून

(१२) अ० १० श्लो० ७५,७६ व ८५.

(१३) अ० ३ श्लो० १८०, व अ० ५ श्लो० २०५. साम्प्रतहि याविषयीं लोकांचा कल पुरा असाच आहे.

(१४) अ० ४ श्लो० ८४; अ० १० श्लो० १०९ — १११, व अ० ११ श्लो० १९४—१९७.

(१५) अ० ४ श्लो० १८६.

(१६) अ० ४ श्लो० ६३ व ६४.

(१७) अ० ४ श्लो० १६ व १७.

(१८) अ० २ श्लो० १६२.

ब्राह्मणानें उपोषणें करूं नये, व दुसरे विनाकारण देहदंड करूं नये, असें सांगितलें आहे.[१९] ब्राह्मणानें मर्यादेनें राहवें, व आपलें आयुष्य धर्मशास्त्रांत सांगितलेल्या अभ्यासांत व नित्य नैमित्तिक कर्मांत घालवावें, एवढेंच काय तें ब्राह्मणाचें काम आहे. ब्राह्मणांचा वेष कसा असावा याविषयींहि मनुस्मृतींत सूक्ष्म रीतीनें वर्णन केलें आहे. त्याप्रमाणें तो ग्रंथ पाहिला असतां, शान्त आणि पवित्र, निर्मळ आणि टापटिपीचा, श्मश्रु करविलेला, इंद्रियजित, शुभ्र वस्त्रें परिधान केलेला, ज्याचें अंग शुचिर्भूत, हातांत वेदाचें पुस्तक व वेणुदंड, आणि कर्णांत तेजस्वी कनककुंडलें धारण केलेला,[२०] असें ब्राह्मणाचें स्वरूप सहज आपल्या मनांत येईल; आणि साम्प्रत पुष्कळ विद्वान् ब्राह्मणहि असेच आहेत. वेदाभ्यास करून, पुत्र उत्पत्ति करून व नियमित यज्ञयागादि क्रिया करून तिन्ही ऋणें फेडल्यावर ब्राह्मणानें गृहस्थाश्रमांत असतांहि सर्व कारभार आपल्या पुत्रावर सोंपून मध्यस्थासारिखें घरामध्यें राहवें.[२१]

ब्राह्मणानें आपल्या आयुष्याचा तिसरा भाग विरक्तासारखा अरण्यांत घालवावा. वल्कलें, किंवा कृष्णाजिन परिधान करून, केश व नखें वाढूं देऊन, व नुसत्या जमीनीवर निजून अग्नि व गृह यांशिवाय असावें, व अगदीं मौन धरून फलमूलांवर निर्वाह करून राहवें. शिवाय त्यास पुष्कळ कठीण देहदंड केले पाहिजेत. ते असेः— अतिशय मोठ्या पावसामध्यें उघडें उभें राहिलें पाहिजे, हिंवाळ्यांत ओलीं वस्त्रें पांघरून राहिलें पाहिजे, आणि अतिशय कठीण उन्हाळ्यांत पंचाग्निसाधन केलें पाहिजे.[२२] या आश्रमांत

(१९) अ० ४ श्लो० ३४.
(२०) अ० ४ श्लो० ३४ व ३५.
(२१) अ० ४ श्लो० २५७.
(२२) अ० ६ श्लो० १२९.

त्याणें सर्व होमादिक क्रिया मन लावून केल्या पाहिजेत,[२३] आणि धर्मसंबंधी जे सांगितलेले विधि आणि संस्कार ते करण्याचा हा आपला मुख्य काळ आहे असें समजलें पाहिजे.

ब्राह्मणास आपल्या आयुष्याचा शेवटचा चतुर्थांशामध्यें तिसऱ्या चतुर्थांशाप्रमाणेंच बहुतकरून एकान्तांत व विचारांत असलें पाहिजे. या आश्रमांत सर्व विधि व बाह्य संस्कार यांपासून ब्राह्मण मुक्त असतो; पुढें आत्मानात्मविचार करणें हा त्याचा उद्योग होय. त्यास पुढें देहदंड नाहींत. त्याचा वेष साधारण ब्राह्मणांचा जवळजवळच असतो, आणि अद्यापिहि जरी त्यास उपोषणादि करावीं लागतात, तथापि पूर्वीप्रमाणें तीं इतकीं कठीण नसतात. यापुढें त्याणें मुद्दाम शरीरास क्लेश करून घेऊं नयेत; परंतु बुद्धि स्थिर करण्याचा उद्योग करून परमात्म्याविषयीं विचार करित त्या आनन्दांत निमग्न असावें. या प्रमाणें शेवटीं जसा एकादा पक्षी झाडाचा डाहळीवरून आपल्या इच्छेनें उडून जातो, तसा ब्राह्मण हा देहाचा त्याग करितो.[२४]

यावरून पाहतां ब्राह्मणाचा पूर्वीचा तीन चतुर्थांश आयुष्यांत तो जगापासून अगदीं निराळा राहिलेला असे, व बाकी राहिलेल्या चतुर्थांशांत त्याचा सर्व वेळ नित्यनैमित्तिक कर्मांत, व वेदाभ्यासांत जात असे; आणि इतकेंहि असून त्याशिवाय संपत्ति अथवा सुख यांचा त्याणें उपभोग करूं नये, व लोभाचा पाठीस लागूं नये असे स्पष्ट नियम लावून दिलेले होते. तथापि पुढें मनुस्मृति पाहूं गेलें असतां, ते नियम ब्राह्मणांचा पूर्वीचा स्थितीवरून केलेले होते, व त्यांप्रमाणें आचरण करावें असें जरी त्या वेळीं मानित

(२३) वर अग्नीशिवाय राहवें असें सांगितलें आहे तें बनांत गेल्यापासून सहा महिन्यांनंतर असें समजावें. भा० क०

(२४) अ० ६ श्लो० ३३ पासून शेवटपर्यंत.

असत, तरी अधिकार व लक्ष्मी यांचा लोभानें त्या नियमां-वर ब्राह्मणांनीं पाणी सोडलें होतें, असें स्पष्ट दिसतें.

दुसरें मनुस्मृतींत असें सांगितलें आहे,[२५] कीं राजानें अति विश्वासु मंत्री ब्राह्मण ठेवावा; आणि दंडनीति, न्याय व इतर सर्व विद्या या त्याणें ब्राह्मणांपासून शिकाव्यो.[२६] स्वतः राजाचा हातांत जो इनसाफाचा अधिकार असेल तो खेरीज करून, बाकी सर्व अधिकार ब्राह्मणांचा हातांत ठेविलेला आहे.[२७] क्षत्रिय व वैश्य या दोन वर्णांस वेदपठनाचा अधिकार नाहींसा नाहीं;[२८] परंतु त्याचा अर्थ समजणें तो (त्यांस) ब्राह्मणांचाच मुखांतून समजला पाहिजे.

तसाच धर्मशास्त्राचा अर्थ ब्राह्मणांनींच सांगावा असा स्पष्ट नियम लावून दिलेला आहे, आणि या जातीचा लोकांचा हातीं कायदे करण्याचा केवळ अधिकार असे, हें मनुस्मृतीवरूनच दिसून येतें.[२९]

जसा ब्राह्मणांचा सत्तेस धर्मशास्त्राचा आश्रय आहे, तसेच त्यांचा मालमत्तेचा रक्षणाविषयींहि नियम केलेले आहेत. सर्व सद्गुणी पुरुषांनीं ब्राह्मणांस उदार हस्तांनीं धर्म करावा, हें त्यांस अवश्य लावून दिलें आहे;[३०] व त्यांतूनहि राजानें धर्म करावा हा त्याचा मुख्य धर्म असें सांगितलें आहे.[३१] यज्ञादि क्रिया, व धर्मसंबंधीं सर्व संस्कार, यांत ब्राह्मणांस भोजन व दक्षिणा हीं दिलीं पाहिजेत,[३२] व जी दक्षिणा देणें ती सर्वदा मोकळ्या हातानें दिली पाहिजे.

---

(२५) अ० ७ श्लो० ५८.

(२६) अ० ७ श्लो० ४३.

(२७) अ० ८ श्लो० १,९,१०, ११,६०.

(२८) अ० १० श्लो० १.

(२९) अ० १२ श्लो० १०८ वागाईत ११३.

(३०) अ० ११ श्लो० १ तागाईत. ६, व अ० ४ श्लो० २२६ ता० २३५

(३१) अ० ७ श्लो० ८३ ता० ८६.

(३२) अ० ३ श्लो० १२३ ता० १४६ व मुख्यत्वें १३८ व १४३.

कारण "ब्राह्मणांस अल्प दक्षिणा देऊन यज्ञ केला असतां, तेणेंकरून यज्ञकर्त्यांचीं ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें, व परलोक-सुख, कीर्ति, प्रजा, पशु, व जीवहि, हीं सर्व नष्ट होतात."[३३] पुष्कळ प्रायश्चित्तें मोठाले दंड दिल्यानें होतात; परंतु त्या सर्व दंडांचें द्रव्य ब्राह्मणांस मिळतें.[३४] जर कोणी ब्राह्मणास ठेवणें सांपडलें, तर तें त्याणें सर्व ठेवावें; परंतु दुसऱ्या वर्णाचास सांपडलें तर तें राजानें घ्यावें, व त्यांतून त्याणें निमें ब्राह्मणांस द्यावें.[३५] इतर वर्णांचा लोकांतून कोणाचा निर्वंश झाला असतां त्याची मालमत्ता राजानें घ्यावी; परंतु ब्राह्मणांची त्यांणीं आपसांत वांटून घ्यावी.[३६] विद्वान् ब्राह्मणावर कोणताहि कर नसावा, आणि जर त्यास आपत्ति पडली तर त्याचें पोषण राजानें करावें.[३७]

ब्राह्मणाचें सोनें चोरलें असतां त्याचें शासन विलक्षण आहे; तें स्वतः राजानें केलें पाहिजे व बहुतकरून त्यापासून चोराचा प्राणान्त होईल असें तें आहे.[३८] त्यांचा मालमत्तेचें संरक्षण व्हावें म्हणून कोणी तिचा बिघाड केला असतां त्यास पुष्कळ शाप दिलेले आहेत. ब्राह्मणांचा गुरांस इजा देणाराचा अर्धा पाय कापून टाकावा अशी शिक्षा सांगितली आहे.[३९]

क्षत्रियांविषयीं.

क्षत्रिय वर्णाची ब्राह्मणाशीं तर साम्यता नाहींच नाहीं; तथापि त्यांस या ग्रंथांत बराच मान दिलेला आहे. क्षत्रियांशिवाय ब्राह्मणांचा ऊर्जितकाळ होणार नाहीं, व ब्राह्मणांशिवाय क्षत्रियांचा

---

(३३) अ० ११ श्लो० ३९,४०.

(३४) अ० ११ श्लो० ११७ व १२८ ता० १३९.

(३५) अ० ८ श्लो० ३७ व ३८.

(३६) अ० ९ श्लो० १८८।१८९.

(३७) अ० ७ श्लो० १३३।१३४.

(३८) अ० ८ श्लो० ३१४-३१६, व अ० ११ श्लो० १०१.

(३९) अ० ८ श्लो० ३२५.

ऊर्जितकाळ होणार नाहीं; व या दोन्ही वर्णांचा इहलोकीं व परलोकीं जो उत्कर्ष व्हावयाचा, तो त्यांची मनापासून एकी झाली असतां होईल, असें सांगितलें आहे.[४०]

फौजदारी कायद्यांमध्यें इतर सर्व वर्णांपेक्षां ब्राह्मणांचें पारडें वर आहे; तसेंच क्षत्रिय व वैश्य या दोन वर्णांचें तारतम्य पाहिलें असतां, त्या दोहोंमध्यें (ब्राह्मणांपेक्षां कांहीं कमी परंतु तितकेंच) क्षत्रियांचें वर्चस्व आहे.[४१] राजे हे बहुधा या वर्णांतील असत, व तसेच बहुधा त्यांचे साधारण प्रधानहि असत.[४२] लष्करचें व लष्करी तुकड्यांचें आधिपत्य, सारांश सर्व लष्करी धंदा, आणि वास्तविक पाहूं गेलें असतां, सर्व अम्मलाचा जागा हे त्यांचे जन्माचे हक्क होत. हा धर्मशास्त्राचा ग्रंथ स्वतः ब्राह्मणांनीं रचला असून, त्यांत कायद्याचा अर्थ करणें एवढें मात्र काम आपणाकडे ठेविलें आहे, शिवाय अम्मल बजाविण्याचा कामांत हात घालण्याची परवानगी त्यांस कोठेंहि दिली नाहीं, ही गोष्ट खरोखर लक्षांत ठेवण्याजोगी चमत्कारिक आहे. प्रजेचें रक्षण करणें, दान देणें, यज्ञ करणें, वेदाध्ययन करणें, आणि विषयत्याग करणें, हे क्षत्रियांचे धर्म सांगितले आहेत.[४३]

वैश्यांची पदवी उंच नाहीं. कारण परस्थ आला असतां त्याचें आदरातिथ्य करावें अशी जेथें
वैश्यांविषयीं.
ब्राह्मणास आज्ञा केली आहे, तेथें वैश्यावरहि कृपाकरून आपल्या चाकरांबराबर त्यास जेवूं घालावें असें सांगितलें आहे.[४४] दान, यजन, व वेदाध्ययन हीं तीन कर्में वैश्यांस असून, शिवाय त्यांणीं गुरें राखावीं, व्यापार करावा, व्याजबट्टा करावा, व शेतकी करावी, हीं कर्में त्यांस सांगितलीं आहेत.[४५]

---

(४०) अ० ९ श्लो० ३२२.
(४१) अ० ८ श्लो० २६७।२६८.
(४२) अ० ७ श्लो० ५४.
(४३) अ० १ श्लो० ८९.
(४४) अ० ३ श्लो० ११२.
(४५) अ० १ श्लो० ९०.

आतां इतर वर्णांपेक्षां वैश्यास व्यावहारिक ज्ञान विशेष असलें पाहिजे; कारण गुरें पाळण्याचा साधनांची माहिती व सर्व जिन्नसांची, व सर्व प्रकारचा जमीनींची पुरी वाकबगारी, हीं पाहिजेत. शिवाय इतर देशांत काय उत्पन्न होतें, व तेथें कोणत्या वस्तूंचा खप आहे, हें, तशाच नानाप्रकारचा लोकांचा भाषा, व दुसरें जें क्रयविक्रयाचा धंद्यास लागतें तें, या सर्वांची त्यास माहिती पाहिजे.[४६]

शूद्रांविषयीं.

इतर वर्णांची सेवा करावी असा शूद्रांचा धर्म थोडक्यांत वर्णन केला आहे;[४७] परंतु ब्राह्मणाची सेवा करावी, हा त्यांचा मुख्य धर्म, असें पुष्कळ ठिकाणीं विशेष स्पष्टतेनें सांगितलें आहे.[४८] तशांतहि जर ब्राह्मणाची चाकरी मिळत नाहीं, आणि उपजीविकेची आपत्ति पडली, तर क्षत्रियाची सेवा करावी, आणि तीहि चाकरी न मिळे, तर सधन वैश्याचें दास्यत्व करावें, अशी शूद्रांस मोकळीक दिलेली आहे.[४९] आपत्तिकाळीं प्रत्येक वर्णाचा लोकांनीं, आपणाहून कनिष्ठ वर्णाचे जे उद्योग, ते करून उदरनिर्वाह करावा, परंतु वरिष्ठ वर्णाचांवर नजर करूं नये, असा साधारण नियम आहे. शूद्राहून नीच असा वर्ण नाहीं, परंतु त्यास जर दुसरे उद्योग न मिळत, तर त्याणें हस्तकौशल्येंकरून आपलें पोट भरावें: त्यांतहि नकशीचें सुतारकाम, दगडकाम, चित्रें काढणें, व लिहिणें, हीं मुख्यत्वेंकरून करावीं.[५०]

शूद्रानें, मंत्र वर्ज करून, यज्ञयागादि केले असतां चिंता नाहीं;[५१] परंतु त्याकडून ब्राह्मणानें यजन करविलें असतां,

(४६) अ० ९ श्लो० ३२९-३३२.
(४७) अ० १ श्लो० ९१.
(४८) अ० ९ श्लो० ३३४.
(४९) अ० १० श्लो० १२१.
(५०) अ० १० श्लो० ९९।१००.
(५१) अ० १० श्लो० १२७।१२८.

तो ब्राह्मण अपराधी होतो, व त्यास त्याबद्दल प्रायश्चित्त घेतलें पाहिजे.[५२] शूद्र जवळ असतां ब्राह्मणानें स्वतःहि वेदाध्ययन करूं नये.[५३] जर कोणी ब्राह्मण त्यास धर्म शिकवील, अथवा पापाचें प्रायश्चित्त घेण्याचा मार्ग त्यास सांगेल, तर तो 'असंवृत्त' नामें नरकांत जाईल.

शूद्रास ऐहिक उपदेशहि करूं नये असें सांगितलें आहे.[५४] ब्राह्मणानें शूद्रापासून दान घेणें हा दोष आहे, याविषयीं जितका वारंवार व कठीण शब्दांनीं निषेध केला आहे, तितका दुसऱ्या कोणत्याहि दोषाविषयीं नाहीं. तें दान परत केल्याशिवाय प्रायश्चित्तानेंहि त्या दोषांतून मुक्त होत नाहीं असें सांगितलें आहे.[५५] जर कोणी ब्राह्मण उपाशीं मरत असला, तर त्याणें शूद्रापासून कोरडें अन्न घ्यावें; परंतु त्याणें सिद्ध केलेलीं पक्वान्नें कधींहि खाऊं नये. आपल्या धन्याचें राहिलेलें उच्छिष्ट, अथवा त्याचा एथील राहिलेलें धान्याचें चिंबपोल हीं खाऊन शूद्रानें असावें, व त्याचीं जीर्ण वस्त्रें शूद्रानें घ्यावीं.[५६]

शूद्रास जरी शक्ति असली, तरी त्याणें धनसंचय करूं नये; कारण तसें झालें असतां त्यास गर्व होऊन तो ब्राह्मणांस पीडा देईल.[५७]

जर शूद्रानें उंच वर्णाचा पुरुषास शिव्या दिल्या, तर त्याची जिव्हा कापून टाकावी.[५८] जर तो ब्राह्मणाबरोबर एका बैठकीवर बसला, तर त्याचा शरीराचा दोषी भाग (ह्मणजे कुला) कापून टाकावा, (अथवा त्याचा कुल्यावर डाग देऊन त्यास देशपार करावा).[५९] जर तो

(५२) अ० १० श्लो० १०९।११०।१११; व अ० ११ श्लो० ४२।४३.
(५३) अ० ४ श्लो० ९९.
(५४) अ० ४ श्लो० ८०।८१.
(५५) अ० ११ श्लो० १९४, १९७, व अ० १० श्लो० १११.
(५६) अ० १० श्लो० १२५.
(५७) अ० १० श्लो० १२९.
(५८) अ० ८ श्लो० २७०.
(५९) अ० ८ श्लो० २८१.

ब्राह्मणास धर्मोपदेश करूं लागेल, तर त्याचा तोंडांत व कानांत तापलेलें तेल ओतावें.[६०]

हे थोडेसे मनुस्मृतींतील नियमांचे नमूने सांगितले; हे जसे उपहासास्पद आहेत, तसेच क्रूरहि आहेत, व हे दुसऱ्या वर्णांस अनुकूल असून शूद्रांस प्रतिकूल आहेत.

शूद्राचें ( नामकरण करत्ये वेळीं ) जें नाव ठेवणें तें निंदावाचक असावें, असें सांगितलें आहे;[६१] आणि माजर, बेडूक, कुत्रा, पाल, व दुसरीं कांहीं जनावरें यांस मारिलें असतां जें प्रायश्चित्त सांगितलें आहे, तेंच शूद्राची हत्या केली असतां प्रायश्चित्त करावयास सांगितलें आहे.[६२]

आतां याप्रमाणें शूद्रांची नीच स्थिति होती हें जरी ग्रंथावरून चांगल्या रीतीनें स्पष्ट होतें, तरी त्या वेळीं लोकांत त्यांची स्थिति कशी होती हें इतकें स्पष्टपणीं समजत नाहीं. शूद्र हे दास असें या ग्रंथांत सर्वत्र सांगितलें आहे, आणि जरी शूद्रास धन्यानें आपल्या दास्यत्वापासून मुक्त केलें, तरी तो दास्यत्वांतून सुटत नाहीं असें म्हटलें आहे. कारण असें सांगितलें आहे, कीं "जी स्थिति त्यास जन्मतः प्राप्त झाली तिजपासून त्यास कोण सोडवूं शकेल?"[६३]

इतकेंहि असून प्रत्येक शूद्र अमुक मनुष्याचा दास आहे असें सांगितलें नाहीं. कारण त्यास इच्छेस येईल त्याचा चाकरीस राहण्यास, व स्वतांसाठीं धंदे करण्यास मोकळीक आहे, असें पूर्वींच पाहण्यांत आलें आहे; आणि हे लोक सरकारचे तरी गुलाम होते असें मानण्यास कांहीं आधार नाहीं. तशांतहि इतर देशांत जाण्याविषयीं जी द्विजांस अटक आहे, तिची शूद्रांस मोकळीक आहे;[६४]

(६०) अ० ८ श्लो० २७२.
(६१) अ० २ श्लो० ३१.
(६२) अ० ११ श्लो० १३१। १३२.
(६३) अ० ८ श्लो० ४१४.
(६४) अ० २ श्लो० २४.

यावरून त्यांजकडून चाकरी घेण्याविषयींचा पुरा हक्क कोणासहि होता असें त्या वेळीं समजत असत असें नाहीं.

गुलामांस मालमत्तेचा स्वामित्वाचा हक्क नाहीं;[65] परंतु शूद्रांस आहे असें पुष्कळ ठिकाणीं गृहीत आहे.[66] शूद्राचा धन्यापासून त्याचें शरीररक्षण व्हावें म्हणूनहि नियम बांधिलेले आहेत; व त्यांस शासन करणें झालें तर त्याचीहि शास्त्रानें यत्ता बांधून दिली आहे, त्याप्रमाणें केलें पाहिजे; जाप्रमाणें शूद्रांस शासन करावयाचें, तोच नियम स्त्रिया, मुलें, विद्यार्थी, व लहान भाऊ यांस लागू आहे.[67]

त्या वेळीं कांहीं शूद्र गुलाम होते, ही गोष्ट निर्विवाद आहे; परंतु दुसऱ्या वर्णांचे लोकहि त्या स्थितीस येण्यास पात्र असत असेंहि मानण्यास सर्व प्रकारें आधार आहे.

या सर्व कारणांस्तव प्राचीन काळचा युनानी वगैरे कांहीं लोकसत्ताक राज्यांतील सरकारी गुलामांपेक्षां शूद्रांची स्थिति पुष्कळ चांगली होती. त्यांतहि ख्रिस्ती शकाचा पांचव्या शतकापासून पंध्राव्या शतकापर्यंत युरोपखंडांत 'विलेन' म्हणून जे शेती लोक असत, त्यांतून अथवा दुसरे जे सर्व चाकरी करणारे वर्ण आपणास माहित आहेत त्यांतून कोणत्याहूनहि, यांची स्थिति चांगली होती.

मिश्र जाति.

आतां जरी वर्णांचा मर्यादा स्पष्ट दाखविलेल्या होत्या, तथापि त्यांचा संकर न होण्याचा उपायांवर अलीकडचा काळाप्रमाणें त्या वेळीं इतकें लक्ष देत नसत, असें दिसतें. याविषयीं जो नियम बांधिला आहे, तो उंच वर्णांचा स्त्रियांचा मान राखण्याचा अभिमानानें केला आहे, असें दिसतें; आपल्या वंशांतील प्रजेत संकर न व्हावा यावरच केवळ दृष्टि दिली आहे असें दिसत नाहीं.

(६५) अ० ८ श्लो० ४१६. एक उदाहरण सांपडतें.

(६६) अ० ९ श्लो० १५७ यांत

(६७) अ० ८ श्लो० २९९।३००.

पहिल्या तीन वर्णांचा पुरुषांस आपणाहून कोणत्याहि कनिष्ठ वर्णाचा स्त्रीशीं लग्न करण्यास सदर परवानगी आहे;[६८] परंतु त्यांणीं त्या स्त्रीस आपली पट्टस्त्री करूं नये.[६९] उंच वर्णांचा स्त्रीशीं लग्न करण्यास अगदीं मोकळीक दिली नाहीं, आणि अशा स्त्रियांशीं व्यभिचार केला असतां त्याचा निषेधार्थ अति तीक्ष्ण शासनें सांगितलीं आहेत.[७०] अशा संबंधांपासून जी सृष्टि होईल तिची आईबापांहून अति नीच वर्णांत गणती होत्ये.[७१] ब्राह्मणापासून क्षत्रियस्त्रीस पुत्र झाला असतां त्याचा वर्ण आई व बाप यांचा मधील गणला जातो;[७२] आणि अशा संबंधापासून झालेल्या मुली जर सात पिढ्यांपर्यंत ब्राह्मणांचा कुळांत दिल्या, तर त्या आपली प्रजा पूर्ववत् ब्राह्मणवर्णाचा शुद्ध दशेस आणितात;[७३] परंतु शूद्रापासून ब्राह्मणस्त्रीचा ठिकाणीं जर पुत्र झाला तर तो चांडाळ, सर्व मनुष्यांमध्यें अधम[७४] होतो; आणि उंच वर्णांचा स्त्रीशीं त्याचा संबंध झाला असतां, त्यापासून जी संतति उत्पन्न होत्ये ती चांडाळाहूनहि नीच होय.[७५]

मनूचा वेळींहि चारी वर्णांचे लोक एके ठिकाणीं जेवित असत असें दिसत नाहीं, आणि त्या ग्रंथांत ब्राह्मणास आपल्या वर्णाचा लोकांबरावर यथेच्छ खाण्यापिण्याचा समारंभ करण्याविषयीं सांगितलें आहे; परंतु जर कोणी क्षत्रिय पाहुणा आला, तर ब्राह्मण जेवल्यावर मागाहून त्याकारितां अन्न सिद्ध करावें असें सांगितलें आहे: हें त्यांचें

(६८) अ० २ श्लो० २३८—२४०, आणि अ० ३ श्लो० १३.

(६९) अ० ३ श्लो० १४-१९.

(७०) अ० ८ श्लो० ३६६ व ३७४—३७७.

(७१) अ० १० श्लो० ११-१९.

(७२) अ० १० श्लो० ६.

(७३) अ० १० श्लो० ६४.

(७४) अ० १० श्लो० १२.

(७५) अ० १० श्लो० २९।३०. नीच वर्णांतील स्त्रियांशीं लग्नें करणें साम्प्रत वर्ज केलें आहे.

हात राखून आदरातिथ्य आहे.[७६] तेव्हां या दोहोंची तुलना करून पाहिली असतां चमत्कारिक दिसण्ये. असें असतांहि शूद्र खेरीज करून दुसऱ्या वर्णाचा लोकांबराबर जेऊं नये, अथवा त्यांणीं सिद्ध केलेलें अन्न खाऊं नये, असा मनुस्मृतींत कांहीं प्रतिबंध नाहीं; असें असून साम्प्रत तसें चाललें असतां, ज्ञातिभ्रष्ट होण्यास तें मोठें कारण होतें. जरी शूद्राबरोबर, किंवा त्याचा हातचें खाल्लें, तरी सात दिवस जवांचें पाणि प्यालें असतां त्या दोषाचें प्रायश्चित्त होत असे.[७७]

त्या वेळीं कांहीं दोषामुळें, अथवा दोषपरिहारार्थ सांगितलेलीं प्रायश्चित्तें न केल्यामुळें, बहुधा लोक ज्ञातिभ्रष्ट होत असत.

या चारी वर्णांमध्यें कारीगर लोकांस कोठें जागा ठेविली नाहीं, ही गोष्ट विलक्षण आहे. दुसरा धंदा मिळेनासा झाला, म्हणजे शूद्रांस शिल्पव्यापार करण्याची मोकळीक दिली आहे, हें खरें; परंतु तो धंदा कोणाचा असा नियम सांगितलेला नाहीं. मनुस्मृतीचा दहाव्या अध्यायांत जे धंदे लावून दिले आहेत त्यांवरून हल्लींप्रमाणेंच कारीगर लोक हे संकरजातींमधून होत असत असें दिसतें. यावरून असा तर्क बांधण्यास जागा होत्ये, कीं जा वेळीं हा जातिभेद उत्पन्न झाला त्या वेळीं प्रत्येक कसबाचें काम करण्यास निराळे कारीगर लागण्याजोगी त्या कसबांची स्थिति नव्हती; आणि ते चार वर्ण झाल्यापासून मनुस्मृतीची रचना होईपर्यंत पुष्कळ पिढ्या होऊन कारीगरपणाचे जे लोकोपयोगी धंदे ते करणाऱ्या दुसऱ्या मिश्र जाति झाल्या होत्या.

---

(७६) अ० ३ श्लो० ११०—११३.

(७७) अ० ११ श्लो० १५३.

# प्रकरण दुसरें.

## राजधर्म.

वर सांगितल्याप्रमाणें हिंदुलोकांची स्थिति होती; अशा लोकांत स्वेच्छाचारी राजाची सत्ता असे. राजाविषयीं. राजधर्माविषयीं मनुस्मृतींत जो अध्याय आहे त्याचा आरंभीं, राजाची दुर्निवार शक्ति, त्याची कीर्ति, व त्याचें किंबहुना देवासारिखें स्वरूप, हीं वर्णन करण्याकरितां ग्रंथकारानें मोठे अचाट काव्यालंकार केले आहेत.[1]

त्या वेळीं राजावर कोणी मनुष्याचा कायदेशीर दाब नव्हता. एका स्थळीं, राजास अमुक शिक्षा होईल अशी भीति दाखविली आहे,[2] आणि दुसऱ्या ठिकाणीं राजा दंडास पात्र होईल असें सांगितलें आहे;[3] तथापि या शिक्षा अमलांत आणण्यास कांहीं साधनें ठेविलेलीं नाहींत; आणि त्या वेळीं राजांचा सचिवांचा सभांस अथवा त्यांचा लश्करी सरदारांस जी कांहीं सत्ता राजा आपल्या इच्छेनें देईल ती मात्र असे, तीशिवाय दुसरी कांहीं कायदेसूद सत्ता त्यांकडे नव्हती. असें असतांहि ईश्वरप्रणीत म्हणून जा शास्त्राची प्रवृत्ति झाली होती, त्या शास्त्राची आज्ञा राजास मान्य करणें अवश्य होती; आणि त्याजवळ व त्याचा प्रजांजवळ ब्राह्मणांचें जें वजन असे, तेंहि स्मृतींतील आज्ञांप्रमाणें राजास वर्तविण्यास सबळ कारण असे.

स्वसत्ताक राजांस लोकांत फितूर व बंड होण्याची भीति असल्ये, त्यामुळें ते कांहीं मर्यादेनें राहतात; तसे हेहि

---

(१) अ० ७ श्लो० १—१३.
(२) अ० ७ श्लो० २७—२९.
(३) अ० ८ श्लो० ३३६.

राजे राहत असतील.[४]

लोकांचा व्रात्यपणास आवरण घालणें, व दुराचारी लोकांस शासन करणें, हा राज्यस्थापनेचा हेतु आहे, असें सांगितलें आहे.

" जेव्हां राज्याचे रक्षक निद्रित असतात, तेव्हां दंड ( म्हणजे अपराधांचा शिक्षेचें भय ) हा जागृत असतो."

" जर अपराधी लोकांस राजा शिक्षा न करील, तर लोक जसें मत्स्यांस मारून शूलावर भाजून खातात, तसे बलवान् दुर्बलांस मारतील."

" कोणाचें कोणत्याहि वस्तूमध्यें स्वामित्व राहणार नाहीं; नीच उच्चांस उलटून पाडितील.[५] "

स्वराज्यांत न्यायानें वर्तणें, शत्रूंस तीक्ष्णतेनें दंड करणें, मित्रांशीं निष्कपटतेनें वर्तणें, आणि ब्राह्मणांशीं क्षमाशीलतेनें वागणें, हे राजाचे साधारण धर्म होत, असें सांगितलें आहे.[६] त्याणें ब्राह्मणांची सेवा नम्रतेनें करावी, आणि त्यांपासून विनय व गांभीर्य हीं शिकावीं, व त्यांजवळच नीतिशास्त्र, राजधर्म, तर्कशास्त्र, व आत्मविद्या, यांचा अभ्यास करावा; आणि शेतकी, व्यापार आणि दुसऱ्या व्यावहारिक कला या इतर लोकांपासून संपादन कराव्या, असें सांगितलें आहे.[७]

त्याणें कामवासना जिरवावी, क्रोध आवरावा, आणि

---

(४) खिस्ती शकाचा आरंभाचा सुमारास " मृच्छकटी " ह्मणून एक प्रकरण आहे, त्यांत एका गौळ्यानें राजास पदच्युत केल्याचें वर्णन आहे; व " उत्तररामचरित्र " ह्मणून एका नाटकांत राम नामें जो मोठा राजा, त्यास आपल्या प्रजेचा अपवादामुळें आपल्या आवडत्या राणीस देशपार करून टाकणें आलें असें वर्णन आहे. ( प्रकरण ह्मणून एक नाटकाचा प्रकार आहे, त्यांत कल्पित कथा असत्ये. भा० क० )

(५) अ० ७ श्लो० १७—२६.

(६) अ० ७ श्लो० ३२.

(७) अ० ७ श्लो० ४३.

आळस जिंकून टाकावा.

राजानें सात सचीव अथवा मंत्री नेमावे, ( हे क्षत्रिय असत असें दिसतें, ) आणि शिवाय त्या सर्वाहून मोठ्या पदवीवर एक मोठा ब्राह्मण नेमावा, आणि त्यावर पूर्ण विश्वास ठेवावा. तसेंच त्याणें दुसरे अम्मलदार नेमावे; त्यांत दूत म्हणून एक सर्वांहून प्रख्यात असा कामगार असे, तो त्या वेळच्या सुमंत म्हणजे परराज्यसंबंधीं काम पाहणारा असावा, असें दिसतें. इतर कामदारांप्रमाणें हाहि कामदार उत्तम कुलांतला असावा; आणि मोठा बुद्धिमान्, दक्ष, व दीर्घदृष्टि असावा; तसाच प्रामाणिक, लोकप्रिय, व्यवहारचतुर, देशकाल जाणणारा, देखणा, शूर, आणि वक्ता, असा असावा.

राज्यकारभार चालविण्याची रीति.

सेनापतीनें फौजेचा बंदोबस्त स्वतः ठेवावा; लोकांस जें प्रत्यक्ष शासन करावयाचें तें न्यायाधीशीकडील अम्मलदारांनीं करावें; द्रव्य आणि देश यांचा बंदोबस्त राजानें करावा. तह ( म्ह० संधि ) आणि लढाई ( म्ह० विग्रह ) हीं दूतानें करावीं. (८) या सर्व खात्यांवर राजानें निःसंशय दरखोरी राखावी; परंतु जेव्हां या लोकांचा कारभार पाहण्याचा त्यास कंटाळा येईल, तेव्हां त्याणें एका सद्गुणी प्रधानावर तो कारभार सोंपून द्यावा. (९)

त्याचा राज्याचा आंतील कारभार, एकग्रामाधिपति, दशग्रामाधिपति, शतग्रामाधिपति, व सहस्रग्रामाधिपति, अशा अनुक्रमाचा अम्मलदारांनीं करावा.

हे सर्व राजानें नेमावे, आणि प्रत्येकानें आपल्या ताब्यांतील गुन्हे व बखेडे आपल्या जवळचा प्रत्यक्ष वरिष्ठास जाहीर करावे.

एकग्रामाधिपतीनें आपल्या गांवचा लोकांपासून जे धनधान्यादि गांवसंबंधीं हक्क ते घेऊन त्यांवर वृत्ति चालवावी;

---

(८) अ० ७ श्लो० ५७—६९. | (९) अ० ७ श्लो० १४१.

दशग्रामाधिपतीस त्याचा वृत्तीकरितां सहा सहा बैलांचा दोन नांगरांची जमीन द्यावी; शतग्रामाधिपतीस एक लहान गांव द्यावा; आणि सहस्रग्रामाधिपतीस एक मध्यम पुर म्हणजे मोठा गांव द्यावा."[१०]

या सर्व अधिकाऱ्यांवर मोठ्या पदवीचे व मोठ्या अधिकाराचे असे तपासनीस नेमावे; आणि प्रत्येक मोठ्या शहरांत व नगरांत त्यांतून एक एक असावा, आणि प्रान्तांतील अधिकारी हे लबाड्या करण्यास स्वभावतः प्रवृत्त होतात, (असें म्हणणें आहे,) त्या बंद करणें हें काम या तपासनिसांचें आहे."[११]

याशिवाय देशाचे लश्करी विभागहि करावे; त्यांतून प्रत्येक विभागांत पसंतीस आलेला असा एक अम्मलदार फौज देऊन ठेवावा;[१२] त्याची हद्द कोणी तरी दिवाणी अम्मलदाराचा हद्दीबराबरच असे असें नाहीं.

जमाबंदी.

सर्व तऱ्हेचीं धान्यें, व शेतकीपासून होणारें जें दुसरें उत्पन्न, त्याचा एक भाग; व्यापारावर कर, हलके व्यापारी व दुकानदार यांवर अगदीं हलकी वार्षिकी पट्टी, आणि हस्तकौशल्यानें उपजीविका चालविणाऱ्या अशा शिल्पि आदिकरून लोकांपासून महिन्यांतून एक दिवस वेठ, एवढी राजाची जमाबंदी असे.[१३]

व्यापारी लोकांचा मालास मूळ किम्मत पडली असेल ती व मुशाफरीचा खर्च झाला असेल तो व त्यांचा नक्की फायदा, याचा विचार करून त्यांपासून कर घ्यावा, असें सांगितलें आहे.

(१०) यांतून प्रथमचास कांहीं ऐनजिनशी हक्क मिळत होते; तेच अद्यापि हि गांवांकडील (पाटील वगैरे) लोकांस मिळतात. दुसऱ्या लोकांस जी जमीन सांगितली आहे, तींतील उत्पन्नावर जो राजभाग म्हणजे जमाबंदी मिळावयाची, तीच त्यांस मिळत असे.

(११) अ० ७ श्लो० ११९—१२३.

(१२) अ० ७ श्लो० ११४.

(१३) अ० ७ श्लो० १३७।१३८.

खालीं लिहिल्याप्रमाणें कर घेण्याचीं मानें ठराविलेलीं होतीं:—

पशु, रत्नें, सोनें, व रुपें, यांपासून मूळ भांडवलाशिवाय वर्षाची जितकी कमाई झाली असेल, तिचा एक पन्नासांश घ्यावा; तो, लढाईचा वेळीं, एक विसांशापर्यंत वाढवावा.

"जमीनीचा मकदूर व ती कामाविण्यास जी मेहनत लागत असेल त्या मानानें," तींतील धान्याचा द्वादशांश, अष्टमांश, किंवा षष्ठांश घ्यावा.[१४] हाहि कर अडचणीचा वेळीं एक चतुर्थांशपर्यंत वाढवावा. सर्व राज्यांतील जमाबंदींत हें जमीनीचें उत्पन्न हमेशा अतिमोठें असावें, असें दिसतें.

झाडें, मांस, मध, सुवासिक पदार्थ, व शिवाय दुसरे स्वाभाविक उत्पन्न होणारे व कृत्रिमी पदार्थ, यांची जी एका वर्षांत नक्की वाढ झाली असेल तिचा एक षष्ठांश घ्यावा.[१५]

सर्व विक्रयावर जो फायदा होईल, त्या फायद्याचा एक विसांश राजानें घ्यावा.[१६] कोणाचा निर्वंश झाला असतां तो बेतनमाल राजाचा; तसाच जा मालाचा धनी जाहीरात दिल्यापासून तीन वर्षांत हजीर न होईल, तोहि राजाचा;[१७] कांहीं खाणी राजाचा खासगत असत; त्यांशिवाय जमीनीमध्यें कोणासहि जें जवाहीर सांपडेल त्यांतील निमें राजाचें.[१८] तसेच कांहीं जातींचे जिन्नस सर्वांपूर्वी राजानें विकत घ्यावे, इतरांनीं घेऊं नये, असा त्यास अधिकार होता असें दिसतें.[१९]

---

(१४) वरील अवतरण चिन्हांमध्यें जे शब्द घातले आहेत, ते कुल्लूकभट्ट म्हणून जो प्राचीन काळीं टीकाकार झाला, त्याणें अधिक घातले आहेत.

(१५) अ० ७ श्लो० १२७-१३२.
(१६) अ० ८ श्लो० ३९८.
(१७) अ० ८ श्लो० ३०.
(१८) अ० ८ श्लो० ३९.
(१९) अ० ८ श्लो० ३९९.

राजास वर सांगितलेले हक्क असत; व शिवाय जमीनीचें केवळ स्वत्व राजाकडे असे, असें मनुस्मृतीमध्यें मानिलेलें होतें. त्या ग्रंथांत एक लेख आहे ( अ०८ श्लो० ३९) त्यांत राजा हा भूमीचा अधिपति, असें लिहिलें आहे; व दुसरा एक लेख आहे ( अ०८ श्लो० २४३ ) त्यांत जमीनवाल्यानें जर आपली जमीन पेरली नाहीं, तर तो त्याविषयीं राजास जबाबदार होईल अशी आज्ञा आहे, असें अनुमान करितात. या दोहों लेखांवरून वरील मतास पुष्टीकरण येतें.

वरील मताचा रद्दीविषयीं असें म्हणणें आहे, कीं पहिल्या लेखाप्रमाणेंच दुसरा एक लेख आहे ( अ० ७ श्लो० ७ ); त्यांत राजा हा " वरुण ( म्हणजे उदकाचा राजा ) आणि महेन्द्र ( म्हणजे मेघमंडलाचा राजा )" आहे असें त्याचें वर्णन केलें आहे. या लेखानें वर सांगितलेला पहिला लेख दुर्बल होतो.

दुसरा लेख हा मूळींच शुद्ध नाहीं, अशी त्याची रद्दी दाखवितात; परंतु जरी त्याविषयीं वाद नसता, तरी त्यावरून जमीनीचा मालकानें ढिलाई केली असतां राजाचा राजभाग जाऊं नये म्हणून तो नियम ठरविला असावा. " जो मनुष्य जमीनींतील जंगल तोडील तो त्या जमीनीचा मालक." अथवा कुल्लूकभट्ट या टीकाकाराचा अभिप्रायाप्रमाणें "जाणें ती बेणून शेत केलें" त्याची ती, असें आहे. (अ० ९ श्लो० ४४. ) हें वाक्य राजाचा हक्काचा विरुद्ध आणितात; परंतु वर सांगितल्याप्रमाणें राजाचा भाग एक षष्ठांश, व अति झाला तर एक चतुर्थांश, अशी यत्ता लाविलेली आहे, त्यावरून बाकी राहिलेल्या पांच षष्ठांशांचा अथवा तीन चतुर्थांशांचा दुसरा कोणी मालक असावा, व त्या सर्व मालाचे हे दोन भागीदार झाले, त्यांतून दुसऱ्याचें उघड रीतीनें त्या

मालांत विशेष हित (अथवा स्वत्व) असे, हें उघड आहे.[२०]

जमीनीमधील लोकांचा स्वत्वाविषयीं पुष्कळ ठिकाणीं लिहिण्याची आवश्यकता असून, त्याविषयीं मनुस्मृतीमध्यें अगदींच थोडा उल्लेख केला आहे, ही गोष्ट चमत्कारिक आहे. शेतांचा सीमांविषयीं एका ठिकाणीं लिहिलें आहे, त्यांत या स्वामित्वाविषयीं प्रत्यक्ष लेख आहे (अ० ८ श्लो० २६२—२६५); आणि दुसऱ्या ठिकाणीं (अ० ९ श्लो० ४९ व ५२—५४) एका मनुष्याचें बीं दुसऱ्या मनुष्याचा जमीनींत पेरलें अशी कल्पना करून, एका पूर्वपक्षाचें उदाहरण दिलें आहे; तसेंच (अ० ४ श्लो० २३०।२३३ यांत) लोकांस जमीन दान देण्याचा अधिकार आहे असें सांगितलें आहे; आतां या वर लिहिलेल्या लेखांतून शेवटचा दोन लेखांचा संबंध गांवाकडे किंवा राजाकडेहि लागेल.

मिळकतीचा वांटणीचा प्रकरणांत, व गहाणाचे नियम सांगितले आहेत त्यांत, व तसेच लोकांचा मालमत्तेचें वर्णन करितांना, आणि देशपार केलेल्या मनुष्यांचा चीजवस्तेची व्यवस्था लावतांना, दुसऱ्या मालाचें वर्णन केलें आहे, परंतु जमीनीविषयीं उल्लेख कोठेंहि नाहीं.

प्रथम जो लेख लिहिलेला आहे, (अ०८ श्लो०२६२-२६५) तो जर नसता, तर हल्लीं हिंदुस्थानांत जशी पुष्कळ ठिकाणीं वहिवाट आहे, त्याप्रमाणेंच त्या वेळीं सर्व जमीन गांवकरी लोकांकडेसच सामयिक असे, असा आपण सिद्धान्त ठरविला असता. आतां कदाचित् त्या वेळीं बहुधा असाच साधारण नियम असेल; परंतु कांहीं लोकांस गांवाकडून जमिनी मिळून, अथवा राजाकडून राजभाग मिळून त्यांजवळ स्वतांची स्थावर मिळकत झाली असेल.

---

(२०) याविषयीं इतर ग्रंथांतहि प्रमाणें आहेत.

राजदरबाराविषयी.

राजानें आपल्या देशाचा सुपीक प्रान्तांत राजधानी वसवावी, परंतु जेथें जाण्यास मार्ग फार अडचणीचा अशा जाग्याचा संनिध ती असावी, आणि बाहेरून परचक्र आलें असतां त्याचा तेथें निर्वाह चालूं नये अशी असावी. पुष्कळ लश्कर व सर्व प्रकारची सामग्री हीं त्याणें आपल्या किल्ल्यांत सर्वकाळ ठेवावीं. त्या किल्ल्याचा मध्यभागीं आपला वाडा बांधावा; तोहि चांगला लढाऊ असावा, आणि त्याचें काम सुंदर व लखलखीत असावें, व त्यासभोंवार पाणी व वृक्ष असावे.

नंतर उत्तम कुलांतील व रूपवान् अशी राणी करावी आणि एक पुरोहित नेमावा.[२१]

राजानें रात्रीचा शेवटचा प्रहरीं उठावें, आणि होमादि क्रिया करून आपल्या शुभ सभेमध्यें दरबार भरावें, आणि तेथें सर्व प्रजांस गोड बोलून व त्यांवर कृपादृष्टि करून आपआपल्या ठिकाणीं जाऊं द्यावें. हें केल्यानंतर त्याणें एकाद्या डोंगरावर, अथवा गच्चीवर, अथवा बागांतील गुप्त मंडपांत अथवा अरण्यांत, अथवा जेथें कोणी ऐकणारे नसतील अशा एकान्त स्थलीं आपल्या मंत्र्यांची सभा भरावी, आणि त्या सभेंतून स्त्रिया व बोलके पक्षी हीं तजविजीनें दूर काढून लावावीं. नंतर त्याणें क्षत्रियांस योग्य असा व्यायाम करून, व स्नान करून, अंतःपुरांत भोजन करावें, आणि आपल्या घरची व्यवस्था, कामदारांचा नेमणूकीचा विचार, व जो दुसरा सरकारी कारभार अगदीं स्वतः करण्याचा असेल तो करण्याकडे हा वेळ व मध्यरात्रीचा वेळ खर्चावा.[२२]

भोजनानंतर कांहीं वेळपर्यंत मनास विश्रान्ति देणाऱ्या अशा गोष्टी कराव्या; नंतर आपल्या लश्कराची तपासणी करावी; आणि सूर्यास्तीं संध्या करून, मग आपल्या हेरांनीं

(२१) अ० ७ श्लो० ६९—७८. (२२) अ० ७ श्लो० १४५-१५१.

जीं वर्तमानें बाहेरून आणिलीं असतील तीं ऐकून घ्यावीं. शेवटीं आपल्या मंदिराचा अति गुप्त महालांत जाऊन संध्याकाळचें भोजन करावें, आणि नंतर कांहीं वेळपर्यंत सुस्वर वाद्यें श्रवण करून निजावयास जावें.[२३]

विचार करून पाहिली असतां वरील स्थिति योग्य व आनंदकारक आहे; परंतु एशियाखंडांतील राजेलोकांस भीतीमुळें जा सावधगिऱ्या ठेवाव्या लागतात, त्यांहींकरून त्यांचा आनंदास जसें कांहीं विरजणच पडतें, तशा सावधगिऱ्यांविषयीं वरील स्थितीचा वर्णनांत जे उल्लेख आले आहेत, त्यांहींकरून त्या सर्व स्थितीचें मनोहर स्वरूप बिघडतें. त्याचा स्वयंपाक विश्वासू मनुष्यांनींच केला पाहिजे, आणि त्या पदार्थांबराबर त्याणें विषनाशक पदार्थ खाल्ले पाहिजेत. जेव्हां तो आपल्या हेरांचीं वर्तमानें ऐकत असेल, तेव्हां त्याणें हत्यारबंद असावें; आपल्या दासी हत्यारें लपवून ठेवितील म्हणून त्यांचेहि झाडे घ्यावे, आणि घरांत किंवा बाहेर कोठेंहि राजा असला तथापि त्याणें आपले शत्रु कांहीं फितूरें करतील त्यांविषयीं सर्वकाळ सावध असावें.

आतां राज्य करण्याविषयीं जे नियम सांगितले आहेत, त्यांत परराज्यसंबंधीं व लढाईसंबंधीं पुष्कळ आहेत. त्या नियमांवरून कितक्या प्राचीन काळींहि हिंदुस्थानांत पुष्कळ लहानमोठीं स्वतंत्र राज्यें होऊन देशाचे भाग झाले होते, अशीं स्पष्ट प्रमाणें सांपडतात; आणि शिवाय, या देशांतील लोक सुधारलेले व स्वभावानें गरीब असे होते, अशींहि पुष्कळ चिन्हें त्यांतून बाहेर पडतात. या कारणांस्तव हे नियम मोठे शोधून पाहण्याजोगे आहेत. राजानें दक्षतेनें व तयारीनिशीं राहून आपणास स्वास्थ्य प्राप्त होई अशी तजवीज ठेवावी; परंतु

राज्यसंबंधी व्यवस्था.

(२३) अ० ७ श्लो० २१६-२२५.

सर्व प्रसंगीं कपटाशिवाय वर्तावें, कधींहि कापट्यानें चालूं नये.[२४] शत्रूस चार उपायांनीं जिंकावा. ते उपायः—दान, भेद, साम, आणि दंड. यांतून ज्ञाते पुरुष शेवटचे दोन उपाय पसंद करितात.[२५] आपले अति जवळचे शेजारी राजे व त्यांचे मित्र, हे आपले स्वाभाविक शत्रु असें राजानें मानावें; जे राजे त्यांचा पलीकडील असतील, ते मित्र असें मानावें; आणि त्यांचा पलीकडील जे असतील, ते सर्व उदासीन असें समजावें.[२६] कठीण प्रसंग आला असतां जा साधारण उपायांची योजना सांगितली आहे, त्यांत आपणापेक्षां बलिष्ठ राजाचा आश्रय पाहवा, असें पुष्कळ वेळा म्हटलें आहे; ही गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.[२७]

आतां असा आश्रय केला असतां त्या आश्रयदात्या राजास अनन्य भावें शरण गेलें पाहिजे असें दिसतें; आणि असा आश्रय करण्याविषयीं जेथें शेवटचा उल्लेख आहे, त्यांत असें लिहिलें आहे, कीं जर असा आश्रय केल्यापासून आपलें अकल्याण आहे असें राजास वाटेल, तर, जरी अगदीं शेवटची वेळ आली आणि आपण तर दुर्बळ आहे, तरीहि निःशंक एकट्यानेंच तडाक्यानें लढाई मारावी.[२८]

परराज्यसंबंधीं व्यवस्थेमध्यें व लढाईमध्यें हेरांचें मोठें माहात्म्य वर्णिलें आहे. या कामांत कोणत्या प्रकारचे पुरुष योजावे त्याविषयीं सूक्ष्म रीतीनें सांगितलें आहे. अशा कामास जे लोक पूर्वीं योजित असत, त्यांच सारखे सांप्रतहि हिंदुस्थानांत कांहीं लोक योजित असतात. त्या कामांस जे लोक लावावे असें सांगितलें आहे, त्यांचीं नावें:— १. चपळ व कपटी असे तरुण पुरुष; २. भ्रष्ट संन्याशी;

---

(२४) अ० ७ श्लो० १०३।१०४.
(२५) अ० ७ श्लो० १०९.
(२६) अ० ७ श्लो० १५८.
(२७) अ० ७ श्लो० १६०.
(२८) अ०७ श्लो० १७५।१७६.

३. विपत्तीनें पीडित शेतकरी; ४. धुळीस मिळालेले व्यापारी; आणि ५. ढोंगी साधु.[२९]

लढाईविषयीं जे नियम सांगितले आहेत, ते साधे आहेत, आणि ते ब्राह्मणांनीं ठरविलेले असल्यामुळें, साम्प्रत लढाई करण्यांत जें कौशल्य प्रत्यक्ष दृष्टीस पडून कित्येक प्रसंगीं हिंदुलोक प्रख्यातीस आलेले आहेत, त्या कौशल्याचें स्वरूप त्या नियमांत कांहीं बाहेर पडत नाहीं.

लढाईविषयीं.

युद्धप्रसंग करण्याविषयीं जो बेत सांगितला आहे, तो ग्रीसदेशांतील पूर्वीचा लोकसत्ताक राज्यांचा, अथवा रोम एथील अवेलीचा कारकीर्दीतील बेतासारखा दिसतो; आणि जे प्रदेश हल्लीं हिंदुस्थानांत आहेत त्यांहून फार लहान प्रदेशांचा उपयोगीं तो पडला असावा असें दिसतें.

जेव्हां उन्हाळ्चीं व पावसाळ्चीं पिकें तयार झालीं असतील, तेव्हां राजानें स्वारी करून जावें; ती समोर शत्रूचा राजधानीवर चढाई करावी, असें एका ठिकाणीं वर्णन आहे. दुसऱ्या ठिकाणीं असें सांगितलें आहे, कीं जर एका किल्ल्यांत १०० तिरंदाज असले, तर ते दहा हजार शत्रूंची बराबरी करतील, यावरून त्या काळीं संरक्षण करण्याचा विद्येपेक्षां हल्ला करण्याची विद्या कमी होती; म्हणून अशा वेळीं कोणी शत्रु वेढा देऊन बसेल अशी शंकाच घ्यावयास नको. परंतु जर कोणी याचा आड न आला, तर याणें शत्रूचा मुलुक उध्वस्त करावा, आणि त्याचा सरदारांबरोबर फितूरीचा मसलती कराव्या, आणि या प्रकारें शेवटीं, जांत आपला फायदा होईल[३०] अशा रीतीनें तो शत्रु आपल्या बरोबर युद्ध करील असा त्यास उद्युक्त करावा; अथवा सामोपचारानें त्यास बेतावर आणावा.

(२९) अ० ७ श्लो० १५४. | (३०) अ० ७ श्लो० १८१-१९७.

त्या वेळचा लष्करांत घोडेस्वार व पायदळ असे; आणि दोहीं पक्षांचा लोकांजवळ धनुष्यबाण व ढालतरवार, हीं बहुधा असत. लढाईंत हत्तींचा पुष्कळ उपयोग करीत; आणि त्या वेळींहि लष्करांत रथांचें मान बरेंच असे, असें दिसतें.

कोणत्या रीतीनें कूच करावें, व लढाई करावी, याविषयीं थोडक्यांत पुष्कळ पध्दती दाखवून दिलेल्या आहेत. जे लोक नवीन ठेवणें, ते उत्तरहिंदुस्थानाचा वरील भागांतील ठेवावे, असा राजास उपदेश केलेला आहे, आणि साम्प्रतहि त्याच देशांत उत्तम लढाऊ लोक सांपडतात. राजानें स्वतः शूर कर्में करून आपल्या लष्करास चांगला कित्ता दाखवावा, आणि जेव्हां लष्कर लढाईस उभें राहील, तेव्हां शौर्योत्साहक अल्पसंभाषणांनीं आपल्या लोकांस उत्तेजित करावें, असें सांगितलें आहे.

"जी लूट ज्याणें मिळविली असेल, ती त्या मिळविणाराची; परंतु जेव्हां कोणी एकल्यानेंच मिळविली नसेल तेव्हां ती सर्व लष्करास वांटून द्यावी."[३१]

लढाईविषयीं जे नियम सांगितले आहेत ते सन्मान्य आणि दयाभूत आहेत. विषयुक्त व दुष्टबुध्दीनें कांटे काढलेले, असे बाण, व अग्नीचे बाण, हे सर्व वर्ज करावे, असें सांगितलें आहे. अमुक स्थळीं शत्रु असला असतां तेथें त्यास कधींहि मारूं नये, असें सांगितलें आहे. कोणी मनुष्य शस्त्ररहित असेल, अथवा घायाळ झाला असेल, अथवा ज्याचीं शस्त्रें मोडलीं असतील, व जो जीवदान मागत असेल, आणि "मी तुझा बंदीवान् झालों" असें जो म्हणत असेल, त्या सर्वांस केव्हांहि मारूं नये. यांशिवाय दुसरेहि प्रतिबंध केले आहेत, ते यांहूनहि उदार बुध्दीनें केले आहेत. अश्वारूढ किंवा रथारूढ पुरुषानें

(३१) अ० ७ श्लो० ९६।९७.

पदाति पुरुषास मारूं नये; तसेंच जो थकून बसलेला असेल, अथवा जो निजेल, अथवा जो पळेल, अथवा जो दुसऱ्या मनुष्याबरोबर युद्ध करित असेल, त्यासहि मारण्याची आज्ञा दिलेली नाहीं.[32]

जिंकून घेतलेल्या देशाची व्यवस्थाहि तशीच उदारपणाचा रीतींनीं केली आहे. कोणी राजानें एक देश घेतला म्हणजे प्रथम लागलीच दंवडी पिटून सर्वांस अभय द्यावें. त्या देशांतील धर्म व शास्त्रें ( म्ह० कायदे ) हीं तशींच राखून त्यांस मान द्यावा, आणि कांहीं वेळ जाऊन त्या नवीन घेतलेल्या देशांतील लोक भरवसा ठेवण्याजोगे झाले असें समजलें, म्हणजे तेथील जुन्या राजवंशांतील एक पुरुष गादीवर बसवावा, आणि त्याणें त्या राज्याचा कारभार जिंकून घेणाऱ्या राजाचा तंत्रानें चालवावा.[33]

राजाचा घरचाकरांचा पगाराविषयीं बराच बारीक शोध करून ठराव केला आहे;[34] असें असून, या ग्रंथांत सर्व लश्कराचा रोजमुऱ्याविषयीं, अथवा त्या लोकांनीं आपला चरितार्थ कोणत्या रीतींनें चालवावा याविषयीं, एक अक्षरहि सांगितलेलें नाहीं. अर्वाचीन काळचा हिंदुलोकांचा चालीवरून त्या वेळचाहि लश्करचा सरदारांस मुलुक तोडून देऊन त्यावर त्यांचा फौजेचा निर्वाह होत होता असें जर आपण अनुमान केलें, तर जा वेळीं मनुस्मृति झाली, त्या वेळीं त्या सरदारांचेंहि बरेंच मान असतें; मग अर्थातच देशाचा आंतील व्यवस्थेची व्याख्या करतांना अशा सरदारांचा मंडळाविषयीं कांहींच उल्लेख आला नसता ही गोष्ट असंभाव्य आहे; कारण अशा लोकांनीं राजाकडे कसें यावें, व कशी चाकरी करावी, याची शिस्त बांधण्याविषयीं,

(३२) अ० ७ श्लो० ९०-९३.
(३३) अ० ७ श्लो० २०१-२०२.
(३४) अ० ७ श्लो० १२६.

आणि राजानें त्यांस जा जमीनी दिल्या, त्यांवर कांहीं तरी राजसत्ता राखण्याविषयीं, असे जरी त्या वेळीं नियम ठरलेले नसते, तरी त्या लोकांविषयीं कांहीं तरी लेख असता. दक्षिणहिंदुस्थानांत कांहीं लहान संस्थानें आहेत, त्यांस मुसलमानांचा फारसा उपसर्ग लागलेला नाहीं; तेथील शिबंदीचा लोकांस अद्यापि मत्येकाचा निर्वाहार्थ जमीनी तोडून दिल्या आहेत, त्याप्रमाणेंच पूर्वींहि लश्करचा रोजमुरा देत असत, हें संभवतें; आणि दिवाणी व मुल्की सरदारांस तैनातीबद्दल अशाच जमीनी देत असत, त्यावरून वरील मतास कांहींसें पाठबळ मिळतें.[३५] राजा मेला असतां त्या वेळीं राज्याचे विभाग न होतां तें एका पुत्रास मिळत असे, असें एका लेखावरून समजतें; आणि बहुतकरून (हिंदूंचा नियमाप्रमाणें) जो मुलगा बापास फार योग्य दिसेल त्यासच तें मिळत असेल, असें दिसतें.

---

# प्रकरण तिसरें.

## न्यायप्रकरण.

साधारण नियम.

ब्राह्मण व दुसरे मंत्री यांचा साहाय्यानें राजानें स्वतः न्याय करावा;[१] अथवा एका ब्राह्मणाचा मदतीस दुसरे तीन ब्राह्मण देऊन, त्यावर तें काम सोंपावें.[२] फौजदारी इनसाफाविषयीं कांहीं निराळी रीति लावून ठेविली आहे असें नाहीं; परंतु याविषयीं जे कायदे आहेत त्यांचा साधारण कलावरून असें धोरण बांधतां येतें, कीं दिवाणी कज्जाचा चौकशीपेक्षां

(३५) अ० ७. श्लो० ११९. याविषयीं पूर्वींच उल्लेख आला आहे.

(१) अ० ८ श्लो० १२.

(२) अ० ८ श्लो० ९।११

फौजदारी इनसाफाचा प्रकरणांत राजानें विशेष मन घालावें, असा धर्मशास्त्राचा उद्देश होता.

प्रान्तांतील न्यायाचा व्यवस्थेविषयीं या ग्रंथांत कांहीं लिहिलेलें नाहीं; त्यावरून, जीं शहरें राजाचा राहण्याचा ठिकाणापासून दूर असत, तेथील इनसाफाचा कोडतांत राजाचा त्या ठिकाणचा कारभारी राजाचा स्थानीं इनसाफास बसत असेल, असें कदाचित् अनुमान करितां येईल.[३]

इनसाफाचा वेळीं जें कर्ज प्रतिवादी कबूल करील त्यावर त्याणें शेंकडा पांच टक्के दंड राजास द्यावा, आणि जें त्याणें नाकबूल करून त्यावर शाबीद होईल त्यावर शेंकडा दहा टक्के द्यावा.[४] हें उत्पन्न बहुधा प्रत्यक्ष न्यायाधीशांसच मिळत असे, आणि तेणेंकरून ब्राह्मणांनीं दुसऱ्यापासून मुशाहिरा घेऊन चाकरी करूं नये असा जो नियम, तो मोडल्याशिवाय त्यांस त्यांचा मेहनतीचें फळ प्राप्त होई, असें संभवतें.

(३) दुसऱ्या ग्रंथांमध्यें या प्रकरणीं हिंदुलोकांचा पूर्वीचा चालीविषयीं जें लिहिलें आहे, त्यावरून वरील गोष्टीचा बराबर निर्णय होत नाहीं; कारण त्या ग्रंथांवरून असें दिसून येतें, कीं राजा, देशाचा निरनिराळ्या भागांत, न्यायाधीश नेमून पाठवित असे. त्या न्यायाधीशांस पंचाइती नेमण्याविषयीं अधिकार दिलेला होता; त्या पंचाइती तीन प्रकारचा होत्याः— पहिली सगेलोकांची, दुसरी त्याच धंद्यांतील लोकांची; आणि तिसरी गांवकरी लोकांची. यांतून पहिलीनें इनसाफ केला असतां त्यावर दुसरीकडे अपील होत असे; व दुसरीचा ठरावावर तिसरीकडे होत असे; व तिन्हींचा ठरावावर त्या त्या प्रान्ताचा कोडतांत अपीलें होत. व त्यांवर राजधानींतील मुख्य कोडतांत, व त्यावर राजाकडे खुद त्याचा कोडतांत होत असत. खुद राजाचा कोडतांत कांहीं न्यायाधीश नेमलेले असत, व त्यांचबराबर राजाचे मंत्री व त्याचा पुरोहित हे बसत; त्या वेळीं राजास समजूत देऊन त्याचें चित्त मार्गास लावणें हें पुरोहिताचें काम असे. आतां वरील सर्व लोकांनीं राजास इनसाफाविषयीं समजूत द्यावी इतका मात्र त्यांचा अधिकार होता; परंतु इनसाफ करणें तो राजाचा हातांत होता. ही शिस्त केव्हां भरपूर चालत होती, तो काळ बराबर सांगितलेला नाहीं.

(४) अ० ८ श्लो० १३९.

कज्जाची चौकशी करित्ये वेळीं पक्षकार व त्यांचे साक्षी यांची मुखचर्या, व त्यांचे हावभाव, व त्यांचा बोलण्याचा रीति, हीं राजानें अथवा न्यायाधीशानें मन लावून पाहवीं.

देशांदेशांतील जागजागचा वहिवाटी, कितीएक जातींचे विलक्षण ठराव, व कुटुंबांतील चाली, व व्यापारी लोकांचा वहिवाटी, यांवर त्याणें लक्ष द्यावें; आणि पूर्वींचा न्यायाधीशांनीं ठरविलेलीं मतें हीं जेव्हां वरील गोष्टींशीं विरुद्ध न येत असतील, तेव्हां त्या मतांप्रमाणें त्याणें चालावें.

राजानें अथवा त्याचा अम्मलदारांनीं तंट्यांस उत्तेजन देऊं नये; परंतु जो कज्जा शिस्तवार त्यांसमोर येईल तो पाहण्यास त्यांणीं सुस्तीहि करूं नये.[५]

जो राजा आपल्या प्रजांपासून आपला राजभाग घेतो, आणि त्याबद्दल त्यांचें योग्य रीतीनें रक्षण करित नाहीं, त्यास अधमाहून अधम असा मानावा.[६]

जे रागावलेले वादिप्रतिवादी, आणि तसेच वृध्द व रोगग्रस्त लोक, राजापुढें येतील, त्यांणीं कर्कश भाषण केलें असतां तें राजानें सहन करावें.[७]

धर्मशास्त्रांत निपुण अशा पुरुषांचें मत घेतल्याशिवाय राजानें आपल्या स्वतांचाच अभिप्रायानें कज्जे चुकवूं नये, असें राजास सावध राहण्यास सांगितलें आहे.[८] तसेंच जा कामाचा एकदां धर्मशास्त्राप्रमाणें निर्णय झाला, त्या कामांत पुनः बखेडा घालण्याविषयीं राजास स्पष्ट रीतीनें मना केलें आहे.[९] कज्जांची चौकशी करत्ये वेळीं राजानें लोकरूढीस अनुसरून असावें.

(५) अ० ८ श्लो० ४१—४६.
(६) अ० ८ श्लो० ३०७.
(७) अ० ८ श्लो० ३१२.
(८) अ० ८ श्लो० ३९०.
(९) अ० ९ श्लो० २३३.

## (१) फौजदारी प्रकरण.

मनुस्मृतींतील फौजदारी कायद्यासंबंधीं नियम फार रानवट आहेत, आणि हें प्रकरण व धर्मसंबंधीं प्रायश्चित्तें, या दोहोंवरून पूर्वींचा हिंदुलोकांचा स्थितीविषयीं वाचणारांचा मनांत फार वाईट ग्रह उत्पन्न होतो, तसा मनुस्मृतीचा दुसऱ्या कोणत्याहि भागापासून होत नाहीं.

फौजदारी कायदा.

आतां धर्मसंबंधीं भोळ्या भावाचा योगानें, अथवा जात्यभिमानाचा योगानें, हा कायदा कोठें कडक असेल तर असो, परंतु साधारण रीतीनें तसा नाहीं. कांहीं ठिकाणीं जा शिक्षा सांगितल्या आहेत त्या फार सक्त आहेत, परंतु दुसऱ्या ठिकाणीं जा सांगितल्या आहेत त्या अतिशय सहल आहेत. सर्व एशियाखंडांतील कायद्यांप्रमाणें अवयवच्छेदनहि त्या शिक्षांमध्यें आहे; (ती बहुधा हात कापण्याची शिक्षा आहे). जे लोक ब्राह्मणाचा अपराध करितील, त्यांस जीवंत भाजून टाकावें, ही एक शिक्षा सांगितली आहे; परंतु साक्षी अथवा कैदी, या कोणासहि (कबूल करण्याकरितां) शरीरास क्लेश द्यावे असें या स्मृतींत कोठेंहि सांगितलें नाहीं; ही, या कायद्यांमध्यें व दुसऱ्या बहुतेक देशांचा जुन्या कायद्यांमध्यें वर्णन करण्याजोगी तफावत आहे. असें असतांहि, मनुस्मृतीचा या शाखेमध्यें जे, ढिलेपणा, गोंधळ, व अज्ञाणीपणा, हे भरले आहेत, त्यांवरून हा कायदा फार प्राचीन काळचा बहिवाटीवरून ठराविलेला असावा असें सिद्ध होतें; आणि जा वेळीं मनुस्मृति हा ग्रंथ झाला, त्या वेळीं तोच कायदा ग्रंथकारांनीं ग्रहण केला, यावरून त्या वेळचीहि स्थिति सुधारलेली नव्हती असें दिसतें. आतां जसा हिंदुदेशांत अर्वाचीन काळीं प्रचार पडला आहे त्याप्रमाणें,

(१०) अ० ८ श्लो० ४५.

सदसद्विचारबुद्धीस विशेष अनुसरून जशी राजांचा मनास येईल तशी नवी पद्धति निघून वरील कायद्याचे कांहीं भाग, त्या वेळींहि, रद्द पडले नसतील, असें संभवत नाहींसें नाहीं; दुसरें, धर्म व ब्राह्मणजाती यांस अनुकूल असे जे क्रूर कायदे या स्मृतींत आहेत, ते जरी त्या ब्राह्मण स्मृतिकारानें आपल्या विचाराप्रमाणें हिंदूंचा उत्कृष्ट पूर्ण फौजदारी कायदा असें समजून घातले असतील, तरी त्यांप्रमाणें कोणीहि क्षत्रिय राजा कधींहि वर्तला नसेल, असें संभवतें.[11]

पाहूं जातां, मनुस्मृतींतील शिक्षा मूळीं सगळ्याच कठीण आहेत असें नाहीं, परंतु पुष्कळ ठिकाणीं गुन्ह्याचा स्वरूपाप्रमाणें माफक नाहींत. तसेंच पुष्कळ ठिकाणीं त्या शिक्षा स्पष्ट सांगितलेल्या नाहींत, व अर्थास विरोध येण्याजोग्याहि सांगितल्या आहेत, यामुळें गुन्हेगाराची गति काय होईल याचा अगदींच निश्चय होत नाहीं.

वर सांगितलेले दोन्ही दोष पुढील उदाहरणांत स्पष्ट दिसतातः— ब्राह्मणास मारणें, मद्य पिणें, ब्राह्मणाचें सुवर्ण चोरणें, आणि गुरुपत्नीगमन करणें, हे सर्व अपराध एका सदरांत आणून त्यांस एकच शिक्षा सांगितली आहे.[12] ती शिक्षा, कपाळावर डाग द्यावा, स्वदेश पार करावा, व सर्व लोकांनीं त्यास आपल्या मंडळांतून काढून टाकावा, अशी

(११) मृच्छकटी ह्मणून हिंदूंचें सर्वांहून जुनें नाटक आहे, व त्याची रचना सुमारें ख्रिस्ती शकाचा आरंभास झाली आहे. त्यांत ब्राह्मणांचा अकटोविकट मान कोठेंहि दृष्टीस पडत नाहीं. त्यांत एका ब्राह्मणावर खुनाचा गुन्हा शाबीद झाल्यावरून त्यास ठार मारून टाकावा अशी राजानें शिक्षा ठरविली होती. पुढें बंड झालें व तें तडीस गेलें, आणि तो राजा पदच्युत झाला, व तो ब्राह्मण निरपराधी असेंहि शाबीद झालें; तथापि त्या राजानें याप्रमाणें मनुस्मृतीची उघड अवगणना केली हा दोष त्यावर आणलेला नाहीं.

(१२) अ० ९ श्लो० २३५.

सांगितली आहे; परंतु जर पूर्वी त्या दोषाबद्दल प्रायश्चित्त घे-तलें असेल,[१३] तर डाग न देतां जो त्या गुन्ह्याबद्दल अतिशय दंड सांगितला असेल तो घ्यावा; आणि हा नियम सर्व वर्णांस लागू, असें सांगितलें आहे.[१४] परंतु पुढें लागलेंच ह्मटलें आहे कीं प्रायश्चित्त झाल्यावर, जर हे गुन्हे ब्राह्मणानें केले असतील, तर त्यास मध्यम दंड करावा, आणि कसाहि अपराध असला तरी त्याची मालमत्ता घेऊं नये, व कुटुंबापासूनहि त्यास वेगळा करूं नये. असें असून अन्य वर्णांतील गुन्हेगारांनीं जरी प्रायश्चित्त केलें असलें, तरी, जर त्यांणीं पूर्वींपासून संकल्प करून गुन्हा केला असेल, तर त्यांस मृत्यूची शिक्षा द्यावी.[१५]

व्यभिचार, व व्यभिचारेच्छा दाखविणारीं अशीं जीं प्रत्यक्ष कृत्यें ह्मटलीं आहेत तीं, यांस जा शिक्षा सांगितल्या आहेत, त्या, वर सांगितल्याहूनहि, अगदीं विलग आहेत. यात्रेचा ठिकाणीं, अथवा अरण्यांत, अथवा जेथें दोन नद्यांचा संगम होत असेल तेथें, परस्त्रीशीं बोलणें, तिला पुष्पें व सुगंधी पदार्थ पाठविणें, तिचा पोशाकास अथवा अलंकारांस स्पर्श करणें, आणि तिजबरोबर एका मंचकावर बसणें, हीं सर्व व्यभिचाराभिलाषी कृत्यें आहेत,[१६] असें म्हटलें आहे. असें असतांहि हे गुन्हे करणारास, त्याचें शरीर पाहून लोकांस त्रास येईल असें अवयवच्छेदन करून, प्रवासास पाठवावा एवढी शिक्षा सांगितली आहे.[१७]

प्रत्यक्ष व्यभिचार केल्यास प्रथम कांहीं कसर न ठेवितां असें सांगितलें आहे, कीं त्या व्यभिचारिणी स्त्रीस कुत्र्यांकडून

(१३) अ० ९ श्लो० २३७.
(१४) अ० ९ श्लो० २४०.
(१५) अ० ९ श्लो० २४१-२४२.
(१६) अ० ८ श्लो० ३५६ व ३५७.
(१७) अ० ८ श्लो० ३५२.

खावववावी, आणि त्या व्यभिचारी पुरुषास लोखंडाच्या बिछाना करून त्यावर भाजून टाकावीं;[१८] परंतु पुढें जीं वाक्यें आलीं आहेत त्यांवरून असें दिसतें, कीं जर दुसरा विशेष गुन्हा न करितां व्यभिचार केला असेल, तर पांचशांपासून हजार पणपर्यंत दंड करावा.[१९] हा दंड ज्या स्त्रीशीं व्यभिचार केला असेल तिचा उच्चत्वाप्रमाणें अधिक होतो. जर एक ब्राह्मणाची स्त्री उत्तम गुणांची चांगली रक्षिलेली असेल, आणि तिशीं क्षत्रियहि व्यभिचार करील, तर त्यास मुकें गवत अथवा काळ्या यांच्या अग्नि पेटवून जीवंत भाजून टाकावा.[२०] याप्रमाणें हे उघड विरोध आहेत. असें होण्याचें कारण असें दिसतें, कीं या स्मृतिकारानें निरनिराळ्या वेळचे नियम, अथवा निरनिराळ्या आधारांवरून सांपडलेले नियम एका ठिकाणीं घातले; परंतु त्यांचा परस्परांशीं संबंध कसा आहे त्याविषयीं विचार केला नाहीं.

खुनाचा गुन्ह्यास अमुक शासन असें प्रत्यक्ष कोठेंहि सांगितलें नाहीं. एका वाक्यावरून[२१] असें दिसून येतें कीं खून करणें, व घरें जाळणें, व मारामारीसमेत दरवडा घालणें, या तिन्ही गुन्ह्यांस देहान्त शासन सांगितलें आहे; आणि दुसऱ्या ठिकाणीं ज्या हलक्या शिक्षा लिहिल्या आहेत, त्या, जे गुन्हे समजूनउमजून पूर्वीं संकल्प करून केले नसतील त्यांस लागू आहेत. आतां अमूक प्रकारचा पुरुषाचा खून केला असतां त्या गुन्हेगारास देहान्त शासन करावें असें पुढें सांगितलें आहे;[२२] त्यावरून इतर साधारण खुनाचा गुन्ह्यांस शिक्षा काय द्यावी याचा संशय राहतो.

---

(१८) अ० ८ श्लो० ३७१ व ३७२.

(१९) अ० ८ श्लो० ३७६ व ३८२—३८५.

(२०) अ० ८ श्लो० ३७७.

(२१) अ० ८ श्लो० ३४४—३४७.

(२२) अ० ९ श्लो० २३२.

जर चोरी हलकी असेल, तर तिला दंडाची शिक्षा आहे; जर मोठ्या रकमेची असेल, तर चोराचा हात कापून टाकावा, आणि जर चोरीचा मालासुद्धां चोर सांपडला, तर त्यास देहान्त शासन करावें.[२३]

चोरीचा माल घेणारे, व चोरांस आश्रय देणारे, हे चोरांप्रमाणें शिक्षेस पात्र आहेत, असें सांगितलें आहे.[२४]

हलक्या चोरीचा गुन्ह्यांत जर एक ब्राह्मण गुन्हेगार असेल, व एक शूद्र गुन्हेगार असेल, तर त्या ब्राह्मणास निदान शूद्राहून आठपट जास्त दंड करावा, असें सांगितलें आहे, ही गोष्ट चमत्कारिक आहे; व या गुन्ह्यासंबंधीं दंडाचें मान सर्व वर्णांमध्यें वरील रीतीनें व प्रमाणानेंच बदलतें.[२५] साधारण मनुष्यानें गुन्हा केला असतां त्यास जो दंड होईल, तोच गुन्हा राजानें केला असतां त्यापासून हजारपट अधिक दंड घ्यावा.[२६]

चोरीचा कामांत जा अवयवाचें मुख्य काम लागत असे, तो कापून टाकित असत असें दिसतें. जर जबरदस्तीसमेत चोरी असली तर तिचें पारिपत्य देहान्त शासनानें होत असे, आणि जे कोणी चोरांस आश्रय देतील, अथवा त्यांस अन्न व दुसरी सामग्री पुरवितील, त्यांस मृत्यूची शिक्षा द्यावी, असें सांगितलें होतें.

राजाज्ञापत्रें खोटीं बनावणें, राजाचा अमात्यांत फूट पाडणें, राजाचा शत्रूंस मिळणें, स्त्रिया, ब्राह्मण, अथवा बाल यांस ठार मारणें, हे सर्व गुन्हे एका सदराखालीं घालून, त्यांस देहान्त शासनाची शिक्षा ठरविली आहे.[२७]

जे पुरुष उघड रीतीनें राजाचा अधिकारास आड

---

(२३) अ० ९ श्लो० २७०.
(२४) अ० ९ श्लो० २७८.
(२५) अ० ८ श्लो० ३३७ व ३३८.
(२६) अ० ८ श्लो० ३३६.
(२७) अ० ९ श्लो० २३२.

घेतील, अथवा त्याचा जामदारखाना व आयुधागार लुटती-ल, अथवा त्याचे हत्ती, घोडे, किंवा रथ चोरून नेतील; त-सेच जे चोरी करण्याकरितां देवळ फोडितील; ते सर्व देहान्त शासनास पात्र होत, असें सांगितलें आहे.[२८]

पिशवी कापून चोरी करणाराचीं, पहिल्या अपराधास बोटें कापावीं, दुसऱ्या अपराधास हात कापावा, तिसऱ्या अपराधास शिरच्छेद करावा.[२९]

ब्राह्मण खेरीज करून बाकी वर्णाचा लोकांनीं खोटी साक्ष दिली असतां, त्यांस दंडून देशपार करावें, व ब्राह्मणानें दिली असतां त्यास देशपार मात्र करावा.[३०]

कोणी चोर, शहर लुटण्याचा, अथवा नदीचें धरण फोडण्याचा, अथवा राजरस्त्यावर जमातीची चोरी कर-ण्याचा यत्न करित असतील, आणि त्यांस हटविण्याकरितां जे लोक मदत न करितील, त्यांसहि देशपार करावें असें सां-गितलें आहे.[३१]

जर राजाचे पाहरेकरी चोरांस अटकाव न करितील अथवा त्यांस न पकडतील, तर त्यांस चोरांप्रमाणें शिक्षा द्यावी.[३२]

जुवा खेळणारे व जुवा खेळण्याचा जागा चाळगणारे हे देहदंडास पात्र आहेत.[३३]

दुसऱ्या बहुतेक गुन्ह्यांस दंडाचा शिक्षा आहेत, परंतु केव्हां केव्हां दुसऱ्या शिक्षाहि त्यांबदल सांगितल्या आहेत.

हजार पणांवर, अथवा दोन शें पन्नास पणांहून कमी, असा कोणताहि दंड असूं नये.[३४]

दुसऱ्याची अब्रू खराब केली असतां, त्यास दंडाचीच

(२८) अ० ९ श्लो० २८०.
(२९) अ० ९ श्लो० २७७.
(३०) अ० ८ श्लो० १२०—१२३.
(३१) अ० ९ श्लो० २७४.
(३२) अ० ९ श्लो० २७२.
(३३) अ० ९ श्लो० २२४.
(३४) अ० ८ श्लो० १३८.

182272

शिक्षा आहे; परंतु तो अपराध शूद्रानें केला असतां, फटके मारण्यास तो पात्र होतो. जरी ब्राह्मणानें शूद्राची बेअब्रू केली, तरी त्यासहि दंड आहे; ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे.[३५]

अपशब्द बोलले असतां त्याबद्दल जा शिक्षा सांगितल्या आहेत, त्यांतहि जातीचा संबंधानें वर सांगितल्याहूनहि कमजास्ती शिक्षा आहेत; तथापि याहि कायद्याचा शाखेमध्यें कांहींसे सुधारलेल्या मताचे लेश दिसतात. ते असेः—जर लंगडेपणा, आंधळेपणा, अथवा दुसरें कांहीं स्वाभाविक व्यंग, याकरितां कोणी मनुष्य आपल्या शेजाऱ्याची निर्भर्त्सना करितील, आणि ते ह्मणत असतील त्या गोष्टी जरी खऱ्या असतील, तरी ते थोड्याशा दंडास पात्र आहेत.[३६]

जर सजातीय लोकांमध्यें मारामार झाली, आणि रक्त निघालें, तर त्याचा शासनार्थ शंभर पण दंड करावा; जर घाय झाला असेल, तर याहून जास्त दंड करावा, आणि जर हाड मोडलें असेल, तर देशपार करावा.[३७] निरनिराळ्या वर्णाचा लोकांमध्यें तंटा झाला असतां निरनिराळ्या जातींचा लोकांस जा शिक्षा सांगितल्या आहेत, त्यांत जा अतिशय तफावती आहेत त्यांविषयीं पूर्वीच वर्णन केलें आहे.[३८]

जेथें आपला धर्म चालविण्यास कोणी बळजोरीनें अटकाव करील, तेथें, अथवा जेथें कोणी कांहीं लोकांवर अन्यायानें घाला घातला असेल त्यांचें साहाय्य करित असतां, स्वरक्षणार्थ लढून दुसऱ्यास इजा केली असतां, त्याविषयीं यथास्थित व्यवस्था सांगितली आहे.[३९]

(३५) अ० ८ श्लो २६७-२७७.
(३६) अ० ८ श्लो० २७४.
(३७) अ० ८ श्लो० २८४.
(३८) पृष्ठ ५ पाह.
(३९) अ० ८ श्लो० ३४८ इत्यादि.

फार झपाट्यानें किंवा लक्ष न पोंचवून गाडी हांकली असतां त्याबद्दल जे दंड सांगितले आहेत, ते, मनुष्याचें मरण आणि अति नीच जनावराचें मरण यांत जशी तफावत आहे, तशा तफावतीचे आहेत.[४०]

जे कोणी घाण टाकून राजमार्ग खराब करितील, त्यांणीं तो मळ काढून टाकावा, आणि शिवाय थोडासा दंड द्यावा.[४१]

जे प्रधान, लोकांचा कामांत, लांचा घेतील, त्यांची जिनगी राजानें जप्त करावी.[४२]

जे वैद्य अथवा शस्त्रवैद्य आपल्या नाकसबीपणानें आपल्या रोग्यांस इजा करितील तर तो अपराध; कुंपण अथवा गडगे मोडणें; आणि मातीच्या मूर्ति फोडणें; चांगल्या जिनसांत खराब जिन्नस मिसळणें, व गिराहिकांजवळ दुसऱ्या ठकबाजा चालवणें; हे सर्व गुन्हे एका मापांत घालून त्यांस २५० पासून ५०० पर्यंत पण दंड सांगितला आहे.[४३] असें असतां, वाईट धान्य असून चांगलें ह्मणून विकलें, तर त्यास कठीण देहदंड सांगितला आहे;[४४] आणि सोनारानें लबाडी केली असतां, त्याचे वस्त्रांनीं तुकडे तुकडे पाडून टाकावे अशी आज्ञा केली आहे: या शेवटच्या गोष्टींत तर गुन्ह्याचा स्वरूपांचा भेदाची मर्यादा फारच उल्लंघन केली आहे, असें दिसतें.[४५]

दुसऱ्या धर्मशास्त्रकारांनीं जा कांहीं दोषांविषयीं सांगितलें नाहीं, त्या दोषांचा लहान मोठ्या स्वरूपांकडे लक्ष न देतां छांदिष्टपणानें या स्मृतींत त्यांबद्दल शिक्षा सांगितल्या आहेत. यास उदाहरणः— जर कोणी आपलीं आईबापें,

---

(४०) अ० ८ श्लो० २९०-२९८.
(४१) अ० ९ श्लो० २८२ व २८३.
(४२) अ० ९ श्लो० २३१.
(४३) अ० ९ श्लो० २८४—२८७.
(४४) अ० ९ श्लो० २९१.
(४५) अ० ९ श्लो० २९२.

मुलगा, अथवा बायको, यांस टाकून दिलीं, तर त्यास १०० पण दंड करावा, आणि आपल्या जवळच्या शेजान्यास कांहीं प्रसंगीं जेवावयास न बोलाविलें, तर एक माष ( म्हणजे मासा ) सोनें[अ] दंड द्यावा असें सांगितले आहे.[४६]

मुलूकाचा आंतील बंदोबस्ताचे नियम त्रासदायक व मनमानेल तसे केलेले आहेत. राजानें गस्तीकरितां लोक व जागच्याजागीं पाहरा करणारे लोक ठेवावे; त्यांतून कांहीं जाहीर व कांहीं गुप्त असावे. शिवाय राजानें पुष्कळ हेर बाळगावे; त्यांणीं चोरांत मिसळून जेथें ते पाशांत सांपडतील, अशा ठिकाणीं त्यांस न्यावें. जेव्हां चांगले उपाय फुकट जातील, तेव्हां राजानें चोरांस पकडून त्यांचा सग्यांसुद्धां त्यांस ठार मारावें: प्राचीन[ब] टीकाकार कुल्लूकभट्ट असें लिहितो, कीं " त्यांचा गुन्हा शाबीद झाल्यावर, आणि त्यांचे सगे त्यांत सामील होते असे ठरल्यावर " मग मारावें; हें लिहिणें मूळग्रंथाहून पुष्कळ सुधारलेलें आहे यांत संशय नाहीं, परंतु अशा लेखास मूळ आधार कांहीं नाहीं.[४७]

जुगारी लोक, नर्तक ( म्हणजे प्रसिद्ध नाचणारे ) गवय्ये, वेदाची निर्भर्त्सना करणारे, उघड पाखंडी, आपआपल्या वर्णाचीं कर्मे करित नाहींत ते लोक, आणि मद्य विकणारे,[क] या सर्वांस तत्क्षणीं शहरांतून हांकून लावावें, असें सांगितलें आहे.[४८]

---

( ४६ ) अ० ७ श्लो० ३८९ व ३९२.

( अ ) इंग्रजींत रुपें असें लिहिलें आहे, परंतु मूळांत सोनें असें आहे. भा० क०

( ब ) मेधातिथि व गोविंदराज हे कुल्लूकभट्टाहून फार प्राचीन टीकाकार आहेत. कुल्लूकाहून अर्वाचीन मनुस्मृतीवर टीकाकार आढळांत येत नाहीं. भा० क०

( क ) मद्य पिणारा असें कुल्लूकाचा संस्कृत टीकेंत आहे. भा० क०

( ४७ ) अ० ९ श्लो० २५२—२६९.

( ४८ ) अ० ९ श्लो० २२५.

## (२) दिवाणी प्रकरण.

दिवाणी कायदा.

दिवाणी शाखेकडील कायदे फौजदारी कायद्यांहून पुष्कळ चांगले आहेत, आणि एरवींहि पाहूं गेलें असतां बरेच सदसद्विचारबुद्धीस योग्य वाटण्याजोगे, व पुष्कळ विचार करून केलेले असे आहेत; असे कायदे इतक्या प्राचीन काळीं असावे, असें आपल्याचानें अनुमान करवलें नसतें.

कज्जा चालविण्याची रीति.

ज्या कज्जांत वादीची नुकसानभरपाई व्हावयाची, व ज्यांत प्रतिवादीवर एकतर्फा[४९] निवाडा व्हावयाचा, अशा कज्जांचे प्रकार प्रथम सांगितले आहेत, आणि नंतर जर कज्जा पुढें इनसाफास आला तर कशी वहिवाट करावी, त्याविषयीं नियम सांगितले आहेत.

साक्षीस कचेरीचा मध्यभागीं उभें करून पक्षकारांसमक्ष त्यांस प्रश्न करावे. त्यापूर्वी न्यायाधीशानें त्यांस ग्रंथांत सांगितलेल्या रीतीनें उपदेश करावा, आणि खोटी साक्ष दिली असतां अति मोठें पाप आहे, आणि त्याबद्दल परलोकीं शासन होईल याविषयीं त्यांस अति कठीण शब्दांनीं सावध करावें[५०] जर साक्षी नसले, तर न्यायाधीशानें पक्षकारांचा प्रतिज्ञा कबूल कराव्या.[५१]

पुराव्याविषयीं कायदा.

मनुस्मृतींतील पुराव्याचा कायदा, हा पुष्कळ प्रकारांनीं इंग्लंडांतील पुराव्याचा कायद्याप्रमाणें आहे; कोणत्याहि कज्जांत ज्या लोकांचा कांहीं पैक्याचा संबंध असेल, अथवा जे अगदीं गैरअब्रूदार लोक असतील, अथवा जे हाताखालचे चाकर अथवा

(४९) अ० ८ श्लो० ५२—५७.
(५०) अ० ८ श्लो० ७९—१०१.
(५१) अ० ८ श्लो० १०९.

कोणी मित्र असतील, या सर्व लोकांस साक्षीस घेऊं नये, असें प्रथम सांगितलें आहे, आणि दुसऱ्यांसहि कांहीं हलक्या कारणांस्तव नालायक ठरविले आहेत; परंतु जर दुसऱ्या रीतीचा पुरावा न मिळेल, तर बहुधा सर्व तऱ्हेचा लोकांचे इकरार घ्यावे, आणि न्यायाधीशानें त्यांचा नालायकीचा कारणांचा विचार करून त्यांची बळकटी योग्य वाटेल तशी धरावी.[५२]

हे नियम इतर प्रकारें चांगल्या बुध्धीनें केलेले असून त्यांस दोन अपवादांनीं डाग लाविला आहे. त्या अपवादांवर जितकें युरोपखंडांतील लोकांचें लक्ष लागलें आहे, तितकें या नियमांवरहि लागलें नाहीं. त्यांतील एक अपवाद हा:— कोणत्याहि वर्णाचा मनुष्य, जाणें आपणास देहान्त शासनास पात्र केलें असेल,[५३] त्याचा जीवाचें रक्षण करण्याकरितां जो कोणी खोटी साक्ष देईल, त्याची स्वर्गप्राप्ति नाहींशी होणार नाहीं. आतां जरी त्या साक्षी देणारानें प्रायश्चित्त करावें असें सांगितलें आहे, तरी एकंदराखालीं त्याणें स्तुत्य कृत्य केलें असें वर्णिलें आहे.[५४]

दुसरा अपवाद इनसाफांतील पुराव्यास लागत नाहीं; परंतु त्यांत असें लिहिलें आहे, कीं स्त्रीशीं संभोगहेतुक मैत्री करितांना, अथवा गाईनें जेथें गवत किंवा फळें खाल्ल्याची गोष्ट चालली असेल तींत, अथवा ब्राह्मणाचें संरक्षण करण्याकरितां वचन दिलें असेल त्या वेळीं, शपथ मोडल्याचें फारसें पातक धरिलें नाहीं.[५५]

---

(५२) अ० ८ श्लो० ६१—७२.

(५३) प्राचीन टीकाकार कुल्लूकभट्ट याणें देहान्त शासन या शब्दांचा पुढें "दुर्लक्षामुळें अथवा चुकीमुळें" (अपराध झाला असल्यास) अशीं अक्षरें घातलीं आहेत; त्यावरून असें सिध्ध होतें, कीं टीकाकाराचाच वेळीं मूळग्रंथांतील वाक्य लोकांचा सदसद्विचारबुध्धीस मिळेनासें झालें होतें.

(५४) अ० ८ श्लो० १०३ व १०४.

(५५) अ० ८ श्लो० ११२.

या वाक्यांवरून असें सिद्ध करितात, कीं हिंदुशास्त्रांत खोटी शपथ करण्यास मन्यक्ष परवानगी दिली आहे; आणि हिंदुस्थानांतील सर्व धर्मांचा लोकांत खोटी साक्ष देण्याचा जो फार मचार आहे, तो याच कारणामुळें आहे, असें म्हणतात. असें असतां इतर अपराधांचा निषेधांविषयीं या स्मृतींत जितकें सांगितलें आहे, त्याहून खोट्या पुराव्याचा निषेधाविषयीं पुष्कळ सांगितलें आहे, आणि युरोपखंडांमधील कधींहि झालेल्या धर्माचा अथवा कायद्याचा कोणत्याहि पुस्तकांत जितक्या भयंकर शब्दांनीं या अपराधाचा निषेध केला आहे, तसाच याहि ग्रंथांत आहे.[५६]

कज्जा चालविण्याची रीति पुढें चालू.

जर कोणी मतिवादी समजून उमजून खोटी तकरार सांगेल, तर तो भारी दंडास पात्र होईल. हा नियम विचारयुक्त केलेला दिसतो; परंतु तोच नियम ताणून पुढें असें ठरविलें आहे, कीं जो वादी आपलें मागणें करण्यास उशीर लावील त्यास फटके मारावे; हा वेडगळपणा आहे.[५७] कोणी दिव्य करण्याचें बोलणें घातल्यास तें या शास्त्रानें मान्य केलें

(५६) "खोट्या शपथेचा दोषांत जा सर्व गुन्हांचा समावेश होतो, ते सर्व नीट लक्षांत आणून, तूं सर्व सत्य असेल तें बराबर सांग". अ० ८ श्लो० १०१

"ब्रह्मवध करणारा, तसेच स्त्रीबालघाती, मित्रद्रोही, व कृतघ्न, या सर्वांकरितां जे नरक सांगितले आहेत, ते सर्व खोटी साक्ष देणाऱ्या शायद्यांचा कपाळीं लावून दिलेले आहेत". अ० ८ श्लो० ८९.

" जो पुरुष खोटी साक्ष देतो तो नग्न हजामत केलेला, क्षुधाक्रान्त, व तृषाक्रान्त, व अंध झालेला, अशा स्थितींत शत्रूचा दाराशीं भिक्षा मागावयास जाईल."—" जो दुष्ट पापी इनसाफसंबंधीं चौकशींत एकाहि प्रश्नाचें उत्तर खोटें देतो, तो पापी निबिड अंधारामध्यें खालीं डोकें वर पाय होऊन नरकांत पडेल".— अ० ८ श्लो० ९३ । ९४. याप्रमाणें सांगितलें आहे.

(५७) अ० ८ श्लो० ५८ व ५९.

आहे, व ही गोष्ट अशा भोळसर लोकांमध्यें चालू असावी, हें सहजच आपल्या लक्षांत येईल.[५८]

इनसाफाचा कामांत खालीं लिहिल्याप्रमाणें अठरा व्यवहारमार्गप्रकरणें सांगितलीं आहेत, म्हणजे जे तंटे उत्पन्न व्हावयाचे त्यांचा या अठरा प्रकरणांत समावेश केला आहेः— १ लें, उपजीविकेकरितां उसनवारीचें कर्ज; २ रें, अमानती व उपभोग करण्याकरितां दिलेल्या ठेवी; ३ रें, स्वामित्व नसून केलेला विक्रय; ४ थें, सरकतीचे व्यापार; ५ वें, दिलेलें मजुरा घेणें; ६ वें, वेतन किंवा भाडें न देणें; ७ वें, कराराप्रमाणें न वर्तणें; ८ वें, क्रयविक्रय रद्द करणें; ९ वें, धनी व चाकर यांमधील तंटे; १० वें, सीमेविषयीं वाद; ११ वें व १२ वें, मारामारी करणें व दुरुत्तरें बोलणें; १३ वें, हलकी चोरी; १४ वें, दरवडा व दुसरीं जबरीचीं कृत्यें; १५ वें, व्यभिचार; १६ वें, स्त्रीपुरुषांचा तंटा व त्यांचे परस्परांचे धर्म; १७ वें, वडीलार्जितद्रव्यविभागाचे नियम; १८ वें, फांशांनीं व जीवंत वस्तूंचा डाव लावून जुगार खेळणें: याप्रमाणें हीं अठरा प्रकरणें आहेत.[५९] यांवरून त्या वेळीं लोकांची स्थिति बरीच सुधारलेली होती असें अनुमान होतें. ही विभाग करण्याची रीति चांगल्या अकलेची व स्पष्ट अशी नव्हती असें नाहीं; परंतु तींत दिवाणी व फौजदारी कज्जांची मिसळ केली आहे, एवढें व्यंग आहे.

वर सांगितलेल्या प्रकरणांतून कित्येकांचें पूर्ण व खातरी होण्याजोग्या रीतीनें वर्णन केलेलें आहे. असें असून दुसऱ्या कित्येकांविषयीं जे नियम सांगितले आहेत ते थोडे थोडे आहेत, व त्यांवरून असें दिसतें, कीं ज्या व्यवहारांविषयीं ते नियम सांगितले आहेत ते व्यवहार त्या वेळीं साध्या स्थितींतच होते, फारसे वाढलेले नव्हते. आतां मी

(५८) अ० ८ श्लो० ११४—११६.

(५९) अ० ८ श्लो० ४—७.

प्रत्येक सदरांतील जा अतिशय ध्यानांत ठेवण्याजोग्या गोष्टी त्यांतील थोड्याथोड्या मात्र सांगतों.

कर्जाविषयीं. आपली फिर्याद कोडतांत आणण्यापूर्वी धनकोनें आपल्या हातून जो उपाय होईल तो करावा; आणि कांहीं यत्ता लावून दिली आहे तेथपर्यंत रिणकोवर जुलूमहि करावा.[६०]

हा कायदा अद्यापि कित्येक हिंदुराज्यांमध्यें इतक्या सक्तीनें चालत आहे, कीं धनको हा आपल्या रिणकोकडे आपलें जें द्रव्य यावयाचें तें त्याकडून बळजोरीनें बाहेर काढवावें, ह्मणून त्यास त्याचाच घरांत कोंडून ठेवितो; कांहीं काळपर्यंत उपाशीं व उन्हामध्यें तापत असाहि ठेवितो.

पैक्याचा व्याजाविषयीं. दर माह दर शेंकडा दोन टक्के प्रमाणें ब्राह्मणास, व त्यानंतर दर चढता, तो शूद्रास दर माह पांच टक्केपर्यंत, असा व्याजाचा दर आहे. जेव्हां कांहीं गहाण असेल, तेव्हां व्याज निमें कमी होतें, आणि जर त्या गहाणाचा वहिवाटीपासून धनकोचा फायदा होत असेल, तर रकमेस व्याज नाहींसें होतें.[६१]

गलबत गहाण घेऊन दर्यामध्यें सफर करण्याकरितां पैका व्याजीं देण्याविषयीं, व जमीनीवरील तशाच जोखमी व्यापाराचा कामास पैका व्याजीं देण्याविषयीं नियम सांगितले आहेत; व मुद्दलाहून व्याज जास्ती वाढूं नये ह्मणून दुसरे कांहीं नियम सांगितले आहेत.[६२]

करारनाम्यांविषयीं. या प्रकरणांत करारनाम्याविषयीं व तसेंच हजरजामिनगतीविषयीं, व पैक्याचा देवघेवाविषयीं, नाना प्रकारचे नियम सांगितले आहेत.

दगलबाजीनें केलेले करारनामे, व तसेंच बेकायदा

(६०) अ० ८ श्लो० ४८-५०.
(६१) अ० ८ श्लो० १४०—१४३.
(६२) अ० ८ श्लो० १५१, १५६, १५७.

कामें करण्याविषयीं केलेले करारनामे, हे चालावयाचे नाहींत, असें ह्मटलें आहे; आपला धनी परागंदा असतां त्याचा कुटुंबाचा पोषणार्थ त्याचा गुलामानेंहि करारनामा केला असला, तरी तो धन्यावर लागू होतो.[६३]

स्वामित्वाशिवाय विक्रय.

जो पुरुष जा वस्तूचा धनी नाहीं, त्याणें ती विकली असतां ती विकरी रद्द आहे; ह्मणजे त्या विकरीमुळें घेणाराचा वारसा चालावयाचा नाहीं; परंतु जर ती त्याणें पुष्कळ लोकांचा देखत खुल्या बाजारांत घेतली असेल, आणि आपणास जाणें ती विकली त्या विकणारास जर तो आणून हजर करील, तर ती विकरी लागू होईल; नाहीं तर त्या वस्तूचा मूळचा मालकानें त्या विकत घेणारानें दिलेल्या किमतीचें अर्ध त्यास देऊन आपला माल घ्यावा.[६४]

जर व्यापारी आपल्या वचनास मागें जाईल, तर त्यास दंड करावा; आणि जर तें वचन शपथेवर दिलेलें असेल, तर त्यास देशपार करावा.[६५]

कांहीं विक्रिताचा देवघेव झाल्यापासून दहा दिवसांचा आंत देणारा किंवा घेणारा यांतून कोणीहि तो मोडला असतां चालेल, परंतु पुढें चालणार नाहीं.[६६]

धनी व चाकर यांजमधील कज्जे.

धनी व चाकर यांसंबंधीं जे कज्जे सांगितले आहेत, ते बहुतकरून सर्व धनगरांविषयीं व त्यांवर गुरांमकरणीं जीं जोखमें असतात त्यांविषयीं आहेत.[६७]

---

(६३) अ० ८ श्लो० १५८—१६७.

(६४) अ० ८ श्लो० १९७—२०२.

(६५) अ० ८ श्लो० २१९ इत्यादि.

(६६) अ० ८ श्लो० २२२.

(६७) अ० ८ श्लो० २२९—२३४.

नद्यांसारिख्या स्वाभाविक सृष्ट पदार्थांनीं, अथवा वृक्ष लावून, अथवा तळीं खणून व त्यांचा बाजूस देवळें बांधून, अशा प्रकारें गांवांचा सीमांचा खुणा करून ठेवाव्या; अथवा ढांक्या वगैरे जमीनीवर दुसऱ्या उघड्या निशाण्या करून अथवा जमीनींत गाडले- ल्या गुप्त खुणांनीं त्या हद्दी बांधून ठेवाव्या. जेथें तंटे पडती- ल, तेथें सर्व पक्षकारांचा समोर साक्षींचा डोक्यांवर मृत्तिका ठेवून, गळ्यांत लाल फुलांचा माळा घालून, व रक्त वस्त्रें प- रिधान करवून, त्यांचा जबान्या शपथेवर घ्याव्या; जर पु- राव्यानें त्या गोष्टीचा निर्णय न होई, तर राजानें एकंदर त- पास करून आपल्या सत्तेनें हद्द ठरवून द्यावी.

सीमांविषयीं तंटे.

खासगी शेतांचा हद्दींविषयींहि याच प्रकारें चालावें.[६८]

स्त्रीपुरुषांविषयीं जे नियम सांगितले आहेत, ते क्षुल्लक गोष्टींनीं पूर्ण भरलेले आहेत. आतां प्रथम कांहीं लग्नसंबंधीं नियमांविषयीं थोडी हकीकत लिहून वरील नियमांतील मुख्य मुख्य सांगेन.

स्त्रीपुरुषांमधील संबंधाविषयीं.

सहा प्रकारचीं लग्नें सशास्त्र मानिलीं आहेत; त्यांतून चार मात्र ब्राह्मणांस उक्त आहेत. त्या चोहोंत कांहीं सू- क्ष्म भेद असोत; परंतु मुलीची किंमत घेतल्याशिवाय बापानें तिचें लग्न करावें, असा निग्रह त्या चारहि प्रकारांत आहे. बाकी राहिलेले दोन प्रकार हे क्षत्रियांस मात्र सांगितले आहेत; परंतु जरी ती यत्ना सांगितली असली, तरीहि ते पु- ष्कळ सढीळ नजरेचे आहेत. जेव्हां लढाईत जय झाल्या- वर कोणी क्षत्रिय एका स्त्रियेस पळवून नेऊन तिचा खुशी- विरुन्ध तिशीं लग्न करितो, तो एक प्रकार; आणि दुसरा, जेव्हां मुळींच कोणत्याहि समंत्र विधीशिवाय उभयतांचा खुशीनें विवाह होतो, तो प्रकार. बाकी राहिलेल्या दोन प्रकारचीं लग्नें करण्याविषयीं निषेध केला आहे:— त्यांतील

(६८) अ० ८ श्लो० २४५—२६५.

प्रथम प्रकार:— जेव्हां बाप मुलीबद्दल द्रव्य घेतो, तो,[६९] आणि मद्यपानापासून उन्मत्त होऊन, अथवा दुसऱ्या कारणामुळें लग्नाचा ठरावास वास्तविक रीतीनें कबूलपणा दाखविण्याची जेव्हां भाव्यविवाहिनी स्त्रीस शक्ती नसत्ये, तेव्हां तिशीं लग्न करणें, तो दुसरा प्रकार.[७०]

मुलीचें लग्न आठव्या वर्षीं किंवा त्याहूनहि पूर्वीं करावें, आणि ती उपवर झाल्यावर जर तीन वर्षांचा आंत तिचें लग्न केलें नाहीं, तर तिला स्वयंवर करण्यास मोकळीक आहे.[७१]

पुरुषांनीं आपणाहून नीच वर्णांतील स्त्रियांशीं लग्न केलें असतां चालेल, परंतु आपणाहून उच्च वर्णांतील स्त्रियांशीं लग्न कधींहि करूं नये.[७२] कोणीहि पुरुषानें आईबापांकडील समजलेल्या संबंधाचा सहा पिढ्यांचा आंत लग्न करूं नये, अथवा जी स्त्री सगोत्र असेल तिशीं लग्न करूं नये; कारण एक गोत्रावरून असें दिसून येतें कीं तीहि आपल्या कुळांतीलच आहे.[७३]

सवर्ण स्त्रीपुरुषांचें लग्न, हातांत हात घालून, होतें; परंतु क्षत्रिय जातीची स्त्री ब्राह्मणाशीं लग्न करित असल्यास, ती हातांत बाण धरित्ये ( त्यास नवऱ्यानें स्पर्श करावा ); वैश्य स्त्री असल्यास, ती हातांत चाबूक धरित्ये ( त्यास नवऱ्यानें स्पर्श करावा ); आणि शूद्रीनें ( नवऱ्याचा ) वस्त्राचा दशा धराव्या.[७४]

---

( ६९ ) या प्रकरणाविषयीं सर्व स्मृतींमध्यें चमत्कारिक रीतीची घालमेल आहे; ती अशी, कीं मुलीचा बापानें द्रव्य घेणें हें त्या मुलीस विकणें असें आहे, अशी त्या गोष्टीची निर्भर्त्सना करून साधारण अभिप्राय लिहिला आहे. असें असून कित्येक ठिकाणीं अशा रीतीनें घेतलेल्या द्रव्याची व्यवस्था कशी करावी , आणि अशा द्रव्यापासून कोणत्या प्रकारचे हक्क उत्पन्न होतात, त्यांविषयीं कायद्याचा इतर बाबदींप्रमाणें पाण्डित्य केलें आहे.

( ७० ) अ० ३ श्लो० ०२०-३४.
( ७१ ) अ० ९ श्लो० ८८-९३.
( ७२ ) अ० ३ श्लो० १२-१९.
( ७३ ) अ० ३ श्लो० ५.
( ७४ ) अ० ३ श्लो० ४४.

आतां सवर्णाचें लग्न करावें, असें या स्मृतिकाराचें विशेष सांगणें आहे; निदान पहिलें लग्न तरी याप्रमाणें करावें. ब्राह्मणाचें शूद्रीशीं लग्न करणें हें चांगलें नाहीं, असें सांगितलें आहे; आणि प्रथम स्त्री तर शूद्री करूंच नये असा साफ निषेध केला आहे.[७४अ]

एकदां लग्न झालें ह्मणजे तें फिरावयाचें नाहीं; आणि स्त्रीपुरुषांनीं परस्परांशीं खरेपणानें वागलें पाहिजे, असें सांगितलें आहे.[७५]

नवऱ्यानें दुसरी स्त्री करण्याविषयीं जे पुढें थोडे प्रकार सांगितले आहेत, त्यांवरून असें अनुमान होतें, कीं हे प्रकार खेरीज करून त्याणें एकच बायको करावी. कोणी पुरुषाची बायको मेल्यास त्याणें पुनः लग्न करावें; परंतु विधवांच्या पुनर्विवाह करण्याविषयीं उत्तेजन दिलेलें नाहीं, व शूद्रजाति खेरीज करून बाकीचांस त्याचा निषेधच सांगितला आहे.

जी स्त्री आठ वर्षेंपर्यंत वांझ राहिली असेल तिला, अथवा, जिला अकरा वर्षांत मुलगा झाला नसेल तिला, अधिविन्न[ड] करून दुसरी स्त्री करावी.[७६] हें वाक्य लिहिलें आहे, तथापि कुटुंबामध्यें जी उच्च पदवी ती प्रथमविवाहित स्त्रीसच असत्ये असें दिसतें.[७७]

मद्यपी व दुराचारी स्त्रिया, व तशाच ज्या आपल्या नवऱ्यांशीं द्वेष करितात त्या, व ज्या उधळ्या असतात त्या, यांस माजी पाडाव्या.[७८]

जी स्त्री आपल्या नवऱ्याचें घर सोडून जाईल, अथवा

(७४अ) अ० ३ श्लो० १२-१७. हें मूळांत नाहीं. मा० क०

(७५) अ० ९ श्लो० ४६, ४७, १०१, १०२.

(ड) म्हणजे ती असतां दुसरी स्त्री करावी. मा० क०

(७६) अ० ९ श्लो० ८१.

(७७) अ० ९ श्लो० १२२.

(७८) अ० ९ श्लो० ८०.

कारणाशिवाय एक वर्षपर्यंत त्याची अनास्था करील, तिला नवऱ्यानें मुळींच टाकून द्यावी.[७९]

जर कोणी पुरुष प्रवासास जात असेल, तर त्याणें आपल्या स्त्रीची अन्नपाण्याची तजवीज करून ठेवून जावें.[८०]

आपला नवरा प्रवासास गेला असेल, तर, जर तो धर्मार्थ गेला असला, तर बायकोनें त्याची ८ वर्षें वाट पाहवी; जर विद्या किंवा कीर्ति मिळविण्याकरितां गेला असेल, तर सहा वर्षें; आणि मौजेनें गेला असेल, तर तीन वर्षें मात्र वाट पाहवी.[८१]

जर कोणी पुरुष निसंतान होऊन मरेल, अथवा जीवंत असून त्यास प्रजा होण्याची आशा राहिली नसेल, तरीहि त्याचा बंधूकडून त्याचा स्त्रीचा ठायीं प्रजा उत्पन्न करण्याची चाल खराब आहे, असें सांगितलें आहे. फकत शूद्र जातींत तसें झाल्यास, अथवा गर्भाधानापूर्वी जा विधवेचा पति मेला असेल तिजविषयीं तसें झाल्यास, निषेध सांगितला नाहीं.[८२]

कोणी पुरुषाचे औरस पुत्र, व त्यांचे पुत्र, आणि ते

---

(७९) अ० ९ श्लो० ७७-७९. | (८०) अ० ९ श्लो० ७४.

८१ अ० ९ श्लो० ७६. कुल्लूकभट्टानें आपल्या टीकेंत असें लिहिलें आहे, कीं इतक्या मुदती झाल्यानंतर "तिणें त्याचा मागून जावें;" परंतु स्मृतिकाराचा अर्थ बहुधा त्या मुदतीनंतर तिणें दुसरें लग्न करावें असा दिसतो. या स्मृतींत विधवांचा पुनर्विवाहाविषयीं व दुसऱ्या प्रकरणीं विरोध आहेत, त्यांवरून असें अनुमान करितां येतें, कीं हा कायदा, निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या ठिकाणीं, निरनिराळ्या पद्धतीचा होता; अथवा त्या ग्रंथकाराचा अभिप्राय, आणि त्या वेळचा लोकांची वर्तणूक हीं एकमेकांस मिळत नव्हतीं. अर्वाचीन काळीं अशा लग्नाविरुद्ध लोकांचें मत आहे, आणि त्याचप्रमाणें कुल्लूकभट्टाचा वेळींहि पुष्कळ अंशीं असावें.

(८२) अ० ९ श्लो० ५९-७०.

दायभाग. नसल्यास त्याची वंशवृद्धि करण्यास त्याचा मुलींचे पुत्र, हे त्याचे स्वाभाविक वारीस होत.[८३]

पूर्वी सांगितल्या प्रचाराप्रमाणें[८४] जेव्हां कोणी पुरुषाची वांचण्याची आशा सुटली असेल, आणि त्या वेळीं त्याचा जवळचा सग्यापासून त्याचा स्त्रीस पुत्र होईल, त्यासहि मुलाप्रमाणेंच वारशाचा हक्क आहे.[८५] हा प्रचार खोडसाळ सबब स्मृतिकारांनीं पसंद केला नाहीं; तथापि जेथें अशी गोष्ट झाली असेल तेथें कायद्याचा दृष्टीनें तो नाकबूल केला आहे असें नाहीं.

वर सांगितलेल्या रीतीची संतति नसेल, तर दत्तपुत्र जिंदगीस वारिस होतो. मूळचा बापाचा मालमत्तेवर दत्तपुत्राचा कांहीं वारसा राहत नाहीं, आणि जरी दत्तविधानानंतर दत्तक घेणाऱ्या बापास औरस पुत्र झाले, तरीहि तो सहाव्या हिशाचा मालक होतो.[८६]

वर सांगितलेले वारीस नसतील, तर पुढें दहा प्रकारचे पुत्र सांगितले आहेत; अशा पुत्रांची हिंदूंनींच कल्पना करावी; दुसऱ्या लोकांचानें कधींहि झाली नसती. कारण हिंदुलोकांमध्यें इतर बहुतेक गोष्टींहून उत्तरकार्य करण्याकरितां वंशज असावा या गोष्टीचें माहात्म्य विशेष आहे. जेव्हां कोणी पुरुष प्रवासास गेला असेल आणि त्याचा मागें त्याचा स्त्रीस मुलगा होईल व तो कोणापासून झाला हें समजणार नाहीं, तर असा मुलगा; तसाच लग्नाचा वेळीं

(८३) अ० ९ श्लो० १०४१३३. | (८४) अ० ९ श्लो० ५९ इत्यादि.

(८५) अ० ९ श्लो० १४५. हा जो वारशाचा कबूलपणा सांगितला, तो शूद्रस्त्रीचा पुत्रासच मात्र लागू करावयाचा असावा, कारण अशाकांचा ग्रंथीं "दीरापासून सुतोत्पत्ति," करणें हें धर्मशास्त्रप्रमाणें असे. परंतु याप्रमाणें मूळग्रंथास उल्लेख नाहीं, आणि या सर्व प्रकरणाविषयीं या स्मृतिकाराची वाणी परस्परविरुद्ध आहे. साम्प्रत हा प्रचार मूळींच सर्व वर्णांस मना केलेला आहे.

(८६) अ० ८ श्लो० १४१, १४२, १६८, १६९.

नवऱ्यास न समजतां स्त्री गरोदर असून होईल तो मुलगा, हे दोन्ही वरील दहांत गणले जातात. कोणाचा मुलीस विवाहसंस्काराव्यतिरिक्त कोणी पुरुषापासून पुत्र होऊन पुढें त्या पुरुषाशीं तिचें लग्न होईल तर तो पूर्वींचा झालेला पुत्र; तसेंच नवऱ्यास टाकून गेलेल्या स्त्रीचा ठायीं, अथवा विधवेचा ठायीं परपुरुषानें उत्पादित पुत्र, हे सर्व वरील दहांत येतात; आणि शूद्रस्त्रीपासून जे पुत्र होतात ते या दहांत शेवटचे गणले जातात.[८७] हे व दुसरे मिळून एकंदर दहा, हे धर्मशास्त्राचा कल्पनेनें पुत्र असे मानिले आहेत; परंतु स्वतः स्मृतिकारच अशा पुत्रसंबंधाविषयीं तिरस्कारानें वर्णन करितो, आणि त्यांचा हातून चांगली उत्तरक्रिया होईल ह्मणून ते साधनीभूत आहेत, तथापिहि त्यांस फार हलके मानिले आहेत.[८८]

स्वतांचे मुलगे नसले, तर भावाचे मुलगे ( वारशास ) लागू होतात, कारण त्यांस पुत्रांप्रमाणें मानिले आहेत; आणि जर त्यांची इच्छा असेल, तर इतर सर्वांस सोडून त्यांसच त्याचा चुलत्यानें दत्तक घेतलें पाहिजे.[८९] मुलगे, नातू, दत्तक मुलगे, व पुतण्ये, इतकेहि नसल्यास बाप व आई हीं वारीस होतात; त्यांमागून भाऊ, आजे, व आजी; नंतर दुसरे सापिंडांतील दायाद, आणि ते नसल्यास गुरु, स्वाध्यायी, अथवा शिष्य; आणि इतकेहि नसले, ( आणि मरणारा ब्राह्मण जातीचा असेल ) तर सर्व ब्राह्मण वारीस होतात आणि जर मयत दुसऱ्या वर्णांतील असेल, तर त्याचा वारसा राजाकडेस जातो.[९१]

( ८७ ) अ० ९ श्लो० १५९—१६१, व १६७—१८०. साम्प्रतचा हिंदूशास्त्राप्रमाणें कोणी पुरुषाचे औरस पुत्र व दत्त पुत्र यांसेरीज बाकीचे वर सांगितलेले सर्व पुत्र हे नामंजूर धरिले आहेत.

( ८८ ) अ० ९ श्लो० १६१.

( ८९ ) अ० ९ श्लो० १८२.

( ९० ) अ० ९ श्लो० १८५ व २१७.

( ९१ ) अ० ९ श्लो० १८६-१८९. उत्तरक्रिया करण्यावर वारसा लागू

बापानें जीवंतपणीं आपली दौलत आपल्या मुलांस वांटून द्यावी; ती मनःपूत वांटावी, किंवा नियमित प्रमाणानें वांटावी हें कांहीं सांगितलें नाहीं, आणि मृत्युपत्र करण्याचा अधिकार बापास आहे असा कोठेंहि उल्लेख नाहीं.[९२]

बाप मेल्यानंतर मुलांनीं सर्व मालमत्ता एकत्र ठेवून सामइक राहवें, अथवा सांगितलेल्या नियमांप्रमाणें जिंदगीचे विभाग करावे. जर ते एकत्र राहिले, तर वडील भावानें सर्व जिंदगीचा धनीपणा घ्यावा, आणि बाकीचा भावांनीं जसे पूर्वी ते बापाचा अधिकारांत होते, तसें वागावें; आणि जेथें भाऊ अशा रीतीप्रमाणें वेगळे झाले नसतील, तेथें त्या सर्वांची कमाई सामइक भांडवल वाढवित्ये.[९३]

जर मुलगे वेगळे झाले, तर बारावा हिसा वडील मुलाकरितां वेगळा काढावा, ऐशावा हिसा अगदीं लहान

---

आहे, यावरून कांहीं विलक्षण नियम उत्पन्न होतात. पहिल्या प्रतीची उत्तरक्रिया ही, बाप, आजा, व पणजा या तिघांची मात्र होत्ये; यामुळें जे तिन्ही पिढ्यांचा क्रिया करण्यास अधिकारी असतात, ते बारशास प्रथम लागू होतात; नंतर दोन पिढ्यांची क्रिया करणारे, नंतर एका पिढीची क्रिया करणारे, हे लागू होतात. जे मूळींच तिन्ही पिढ्यांस लागू होत नाहींत त्यांस सोडून दिले आहेत. या नियमाप्रमाणें जर कोणी एकाचा निपणतू असेल, तर त्यास सोडून जो कोणी त्याचा पासून तीन पिढ्यांचा आंतला कोणत्याहि दुसऱ्या कुळांतील जवळचा दायाद असेल त्यास बारशाचा हक्क मिळतो. पहिल्या प्रकारची ह्मणजे तिन्ही पुरुषांची क्रिया करणाऱ्या लोकांनंतर, दुसऱ्या प्रकारची ह्मणजे दोन पुरुषांची क्रिया करणारे पुष्कल लोक बारशास लागू होतात.

(९२) अ० ९ श्लो० १०४. वर जो जिंदगी वांटण्याचा अधिकार सांगितला त्यास कुल्लूकभट्टाचा टीकेचा मात्र आधार आहे.

(९३) अ० ९ श्लो० १०३-१०५. या नियमास कांहीं अपवाद आहेत; परंतु हा नियम अद्यापि इतका जारी आहे, कीं अलीकडचा काळांत जो पुरुष पेशव्यांचा दिवाणगीरीचा पायरीस चढला त्याणें जी अपार जिंदगी संपादन केली, ती मिळविण्यास बहुधा अगदींच ज्यांचें साहाय्य नव्हतें अशाहि त्या दिवाणाचा गरीब दायादांस त्याचा मिळकतीचा बारशास लागू केलें होतें.

मुलाकरितां वेगळा काढावा, आणि मधल्या मुलांकरितां एक एक चाळीसांश वेगळा काढावा; आणि बाकी राहिलेल्या जिंदगीचे समभाग करून सर्वांनीं घ्यावे. अविवाहित कन्यांस त्यांचा भावांनीं पोसावें; त्यांस बापाचा मिळकतींतून हिसा मिळावयाचा नाहीं,[९४] परंतु आईचा मिळकतीचा मात्र भावांचा बराबरीनें हिसा मिळेल.[९५]

वर जी मुलांची बरोबरी सांगितली ही एका आईपासून, किंवा सवर्ण आईपासून उत्पन्न झालेल्या भावांची आहे; परंतु तसें नसेल, तर ब्राह्मण वर्णाचा स्त्रियेचा मुलास चार हिसे; क्षत्रिय स्त्रियेचा मुलास, तीन; वैश्य स्त्रीचा मुलास, दोन; आणि शूद्रीचा मुलास, एक; याप्रमाणें मिळत.[९६]

आतां वर सांगितलेल्या हिशांपैकीं एक हिसा म्हणजे सर्व मिळकतीचा दहावा भाग, हा शूद्रस्त्रीपासून झालेल्या मुलास महत्तम दायभाग मिळावयाचा; मग जरी त्या पुरुषास दुसरे मुलगे नसले, तरी त्यास जास्त मिळावयाचा नाहीं.

नपुंसक, ज्ञातिभ्रष्ट, जन्मापासून मुके, बहिरे किंवा आंधळे; तसेच ज्यांचे हस्तपादादि अवयव गेले असतील ते, अथवा जे वेडे किंवा मूर्ख असतील ते; इतके सर्व पुरुष वारशास लागू नाहींत; परंतु त्यांस जिंदगीचा वारसांनीं पोसलें पाहिजे. तथापि जर या वारशास लागू न केलेल्या लोकांचे मुलगे असतील, तर ते वारशास लागू होतील.[९७]

---

(९४) अ० ९ श्लो० ११२ -- ११८.

(९५) अ० ९ श्लो० १९२.

(९६) अ० ९ श्लो० १५१ - १५५. या सर्व ग्रंथांतील अशा प्रकारचा नियमांमध्यें असें सांगितलें आहे, कीं मुलगे व इतर सांगितलेले दायाद, यांतून जे विद्वान् व पुण्यवान् असतील त्यांस पहिल्यानें द्यावें. अशा सांगण्यामुळें पुष्कळ गोंधळ झाला आहे; कारण हे गुण त्यांमध्यें आहेत कीं नाहींत, याचा निर्णय कोणी करावा, हें सांगितलेलें नाहीं.

(९७) अ० ९ श्लो० २०१ - २०३.

# प्रकरण चौथें.

## धर्माविषयीं.

मनुस्मृतीमध्यें वेदांतील धर्म प्रतिपादित आहे, आणि त्या आद्य ग्रंथाविषयीं या स्मृतीचा प्रत्येक पृष्ठांत उल्लेख आहेत.

वेदांविषयीं.

वेद चार आहेत; परंतु पुष्कळ विद्वान् हिंदुलोक चौथा वेद कबूल करित नाहींत, ह्मणून त्यांची संख्या तीन आहे. प्रत्येक वेदाचे दोन अथवा किंबहुना तीन भाग आहेत. प्रथम[1] भागांत मंत्ररूप सूक्तें व अर्थवाद सूक्तें आहेत. दुसऱ्या[2] भागांत धर्मसंबंधीं कामें करण्याचा आज्ञा, व ईश्वरविद्येचें विवेचन आहे.[3] ईश्वरविद्येविषयीं कांहीं विवरण निरनिराळ्या लहान लहान ग्रंथांत आहे. हें विवरण केव्हां केव्हां वर लिहिलेल्या दुसऱ्या भागांत घातलें आहे, व कोठें कोठें या सर्व लहान लहान ग्रंथांचा निरनिराळा समूह करून वेदाचा तिसरा भाग केला आहे.[4]

प्रत्येक वेदांत जे धर्म आचरण्याविषयीं सांगितले आहेत, ते धर्म कोणत्या वेळीं आचरावे तो काळ सिद्ध करण्याकरितां काळाची व्यवस्था कशी करावी हें समजण्यासाठीं प्रत्येक वेदांत एक लहानसा ग्रंथ आहे.[5]

वेद हे एकेकट्या पुरुषांनीं केलेले नाहींत. प्रत्येक वेद पुष्कळ ग्रंथकारांनीं निर्माण केला आहे; त्यांचीं नावें त्यांचा त्यांचा लेखांत आहेत; तीं सर्व लेखांत नसल्यास

(१) यास मंत्र ह्मणतात.

(२) यास ब्राह्मण ह्मणतात.

(३) कोठें कोठें ब्राह्मणांत उपनिषद्भाग आला आहे तो हा. भा० क०.

(४) त्यांस उपनिषदें ह्मणतात.

(५) त्यास वेदाङ्गज्योतिष असें ह्मणतात. भा० क०.

निदान पक्षीं जीं वेदांत मंत्ररूप सूक्तें, व अर्थवादसूक्तें आहेत त्यांत तरी आहेत, व हिंदुलोकांचा मताप्रमाणें त्या त्या ऋषींला या सूक्तांची स्फूर्ति ईश्वरी प्रेरणेनें वेगळी वेगळी झाली. हीं सूक्तें बहुधा निरनिराळ्या काळीं लिहिलेलीं असावीं, परंतु ख्रिस्ताचा पूर्वी चौदाव्या शतकांत हीं सूक्तें एकत्र करून हल्लींची स्थिति त्यांस प्राप्त झाली.[६]

वेद हे अगदीं जुन्या रीतीचा संस्कृत भाषेंत लिहिलेले आहेत; ती हल्लींचा भाषेहून फार भिन्न आहे, त्यामुळें ब्राह्मणांमध्येंहि जे विशेष विद्वान् आहेत, तेवढे मात्र वेद समजतात. वेदाचा थोड्याशा भागाचा मात्र साम्प्रत यूरोपीयन भाषांत तर्जुमा झाला आहे.[७] आतां त्यांत जो मजकूर आहे त्याचा सारांश कोलब्रुकसाहेबानें काढला आहे, त्यावरून त्यांतील मतांचा साधारण कल कसा आहे हें जरी स्पष्ट रीतीनें समजतें, ( व हा सारांश ज्यानें काढला, त्याचा सारासारबुद्धीवर व खरेपणावर पूर्ण विश्वास ठेवण्याजोगा तो होता, ) तथापि त्यांत काय तपशील लिहिला आहे त्याविषयीं आपल्याचानें सिद्धान्त करून सांगवत नाहीं, अथवा अर्वाचीन काळचे हिंदुलोक ज्या धर्मावर विश्वास ठेवितात, त्या धर्माचें जगड्व्याळ ज्या कथांचें व मतांचें बनलेलें आहे, त्यांतून अमुक भागाविषयीं वेदाचा कोणत्याहि भागांत कसाहि उल्लेख नाहीं, असें आपल्याचानें खचित सांगवत नाहीं.

एकेश्वरमत.

ईश्वर एक आहे हें वेदांचें मुख्य मत आहे. "वास्तविक पहातां केवळ एक ईश्वर आहे; तोच परमात्मा; जगत्पालक; सर्व ब्रह्माण्ड हें त्याचें कृत्य आहे." अशीं वाक्यें वेदांत वारंवार आलीं आहेत.

( ६ ) या पुस्तकाची पुरवणी अंक पहिला पाहू.

( ७ ) एल्फिन्स्टन् साहेबानें हा ग्रंथ लिहिल्यावर अलीकडे पुष्कळ वेदांचीं भाषान्तरें झालीं आहेत. भा० क०

( ८ ) प्रोफेसर विल्सन् याणें उत्क्रान्तरणाभिधाननगरींत व्याख्यान

परमेश्वरानें जे प्राणी उत्पन्न केले आहेत, त्यांत कांहीं मनुष्याहून श्रेष्ठ आहेत; त्यांचें पूजन करावें, आणि स्तुतीचा द्वारानें त्यांचा आश्रय व कृपा हीं संपादन करावीं. त्यांतून, वेदांत पंचतत्त्वांचा देवता, नक्षत्रें, व ग्रह, यांचा उल्लेख विशेषेंकरून सर्वांहून जास्त आहे; परंतु मानसशक्ति व सद्गुण यांस नावें देऊन केलेल्या सरस्वतीसारख्या देवता याहि आल्या आहेत. ब्रह्मा, विष्णु आणि शिव, हीं जीं ईश्वराचीं तीन मुख्य रूपें; व त्याचे जे दुसरे गुण व दुसऱ्या शक्ति, जांस नांवें ठेवून देवता केल्या आहेत; त्या व तसेच हिंदूंचे जे देवभारूड त्यांतील बहुतेक दुसरे देव, यांचा उल्लेख वेदांत आहे, अथवा निदानपक्ष त्यांचा निर्देश तरी केलेला आहे; परंतु देव असे मानलेले वीर यांची पूजा करावी असें या मतांत कोठेंहि नाहीं.

ब्रह्मा, विष्णु, व शिव यांचीं नावें कोठें कोठें क्वचित् आलीं आहेत; त्यांचें वेदांत विशेष माहात्म्य आहे असें नाहीं; व त्यांची विशेषेंकरून भक्ति करावी असाहि (वेदांमध्यें) कोठें निर्देश केला नाहीं, व त्यांचे अवतार व्हावयाचे आहेत अशी सूचना करणारा लेख, कोलब्रुकसाहेबाचा कोठेंहि आढळांत आला नाहीं.[१]

देत असतां, पूर्वीं एका विद्वान् ब्राह्मणानें ईश्वराचें स्वरूप वेदांमध्यें कसें दाखविलें आहे तें सरविलियम् जोन्स यास कसें सांगितलें होतें, त्याविषयीं त्याणें तेथें असें वर्णन केलें आहे, कीं:— "पूर्णसत्य; पूर्णानन्द; अद्वितीय; नित्य; केवल; वाणीस अवर्णनीय व बुद्धीस अग्राह्य; सर्वव्यापक; सर्वांतर्गत; अनन्त; निजानन्दांत निमग्न; देशकालमर्यादातीत; चरणरहित असून शीघ्रगामी; हस्तरहित असून सर्वजगद्धारक; चक्षुरहित असून सर्वदृक्; कर्णरहित असून सर्वश्रोता; त्यास दुसरा बुद्धीमान् प्रेरक नसून, सर्वज्ञ; कारणातीत असून सर्वकारणांचें आदिकारण; सर्वनियन्ता; सर्वशक्तिमान्; सर्व वस्तूंचा धाता, त्राता, व रूपान्तरकर्ता; असा जो एक परमात्मा, तो तो आहे."

(१) याविषयीं मंत्ररामायण व मंत्रभागवत, असे दोन संस्कृत ग्रंथ आढळांत येतात. भा० क०

त्या वेळीं मूर्ति मूळींच नव्हत्या आणि पूजार्ह वस्तूं-चा दृश्य प्रतिमाहि नव्हत्या असें दिसतें.

सर्व मनुस्मृतीमध्यें केवलेश्वर मताचेंच प्रतिपादन आहे, आणि त्या ग्रंथाचा शेवटीं असें सांगितलें आहे, कीं उपनिषदांनीं सांगितलेल्या "एका परमेश्वराचें वास्तविक ज्ञान प्राप्तकरून घेणें, हा" सर्व धर्मांमधील "मुख्य धर्म आहे."[१०]

मनुस्मृतींतील धर्म.

मनूनें (वेदांनीं सांगितलेल्या) ईश्वराचा एकत्वाची कल्पना कायम ठेविली आहे; परंतु ईश्वराचा स्वभावाविषयीं व कर्तीविषयीं जीं त्याचीं मतें आहेत तीं वेदांतील मूळमतांचें शुद्ध स्वरूप सोडून मलिन झालीं आहेत.

सृष्टि कशी उत्पन्न झाली याविषयीं मनूनें जें वर्णन केलें आहे, त्यांत (वरील कलमांत सांगितलेला) त्याचा मताचा मलिनपणा विशेषेंकरून स्पष्ट झाला आहे. ईश्वर हा "या ब्रह्माण्डाचें उपादान कारण आहे, व तोच कर्त्ता आहे; जगद्रूप नाशिवंत घट करणारा तो कुलाल (कुंभार) आहे; व जा मृत्तिकेमधून तो घट केला तीहि तोच आहे," या अर्थाचीं वाक्यें वेदांत आहेत; परंतु यांचा अर्थ सांगण्याविषयीं जे उत्कृष्ट कुशल आहेत, त्यांचा अभिप्राय असा आहे, कीं हे लेख अक्षरशः समजावयाचे नाहींत; सर्व वस्तूंची उत्पत्ति एकाच आदिकारणापासून आहे एवढाच सिद्धान्त करणें, हा या वाक्यांचा उद्देश आहे. सर्व सृष्ट भूतांतील तत्त्व व त्यांचें रूप, हीं, जो स्वतःसिद्ध जगाचें आदिकारण, त्याचा इच्छामात्रेंकरून झालीं आहेत असें दाखविण्याकडे वेदांचा साधारण कल आहे.

सृष्टि.

आतां मनुस्मृतीमध्यें जरी विशेष स्पष्ट उल्लेख नाहीं, तरी हें सर्व ब्रह्माण्ड स्रष्ट्याचा सत्त्वानें झालें आहे, अशा विचारांकडे त्या ग्रंथाचा कल दिसतो; आणि प्रकृति ही ईश्वरी

(१०) अ० १२ श्लो० ८५.

तत्त्वाचा एक भाग असून तिला अनाद्यंत अस्तित्व आहे, असा या स्मृतींत संदिग्ध विचार आहेसें दिसतें. "त्यानंतर स्वतः अव्यक्त असून पंचमहाभूतें व दुसऱ्या शक्ति यांहींकरून हें जग व्यक्त करणारा, असा जो स्वयंभू भगवान्, तो अक्षयी तेजानें अंधकार निवारण करित होत्साता प्रकाशमान् होता झाला."[११]

"आपल्या ईश्वरी तत्त्वापासून नानाविध प्रजा उत्पन्न करण्याची त्यास इच्छा होऊन त्याणें विचारमात्रें करून उदक उत्पन्न केलें, आणि त्यांत उत्तम प्रकारचें बीज आरोपण केलें."[१२]

या बीजापासून ब्रह्माण्ड उत्पन्न झालें, त्यांत ब्रह्मदेवाचा रूपानें ईश्वर स्वतः जन्मास आला.[१३]

याच प्रमाणें आरोपित दैविक साधनांनीं ईश्वरानें ब्रह्मदेवाचा स्वरूपानें स्वर्ग आणि पृथ्वी व मनुष्यजीवात्मा हीं केलीं; आणि सर्व सृष्टांस भिन्न भिन्न नावें ठेवून निरनिराळे धंदे लावून दिले.

त्याच प्रमाणें स्रष्ट्यानें "ईश्वरी गुण व शुद्ध आत्मे यांसहित असे देव" व अतिशय सूक्ष्मरूपी असे साध्यगण[१४] उत्पन्न केले.[१५]

ही सर्व सृष्टि नियमित काळपर्यंत मात्र राहत्ये; तो काळ संपला, ह्मणजे हींतून ईश्वरी तेज निघून जातें. ब्रह्मदेव परमात्म्याचा तेजांत अन्तर्धान पावतो, आणि ही सर्व ब्रह्माण्डरचना नाहींशी होऊन जात्ये.[१६]

याप्रमाणें अकटोविकट काळानंतर पुनः पुनः सृष्टीचे प्रलय व उत्पत्ति, हीं होत असतात.[१७]

---

(११) अ० १ श्लो० ६.

(१२) अ० १ श्लो० ८. या दोनी टीपा मूळांत चुकल्या आहेत. भा० क०

(१३) अ० १ श्लो० ९. भा० क०.

(१४) साध्य ह्मणून एक देवयोनी वर्णिलेली आहे. भा० क०

(१५) अ० १ श्लो० ८-२२.

(१६) अ० १ श्लो० ५१-५७.

(१७) अ० १ श्लो० ५, ११, ७४.

याहून कमी पदवीचा जा देवता आहेत, त्या पंचमहातत्त्वांचा दर्शक आहेत; जसें आकाशाचें दैवत, इन्द्र; तेजाचें दैवत अग्नि; उदकाचें दैवत वरुण; पृथ्वीचें दैवत, पृथिवी; खस्थ गणांचीं दैवतें, सूर्य, चन्द्र, बृहस्पति, व दुसरे ग्रह. त्याचप्रमाणें मानसिक विचारांवर नावांचा आरोप करून त्यांची गणना देवांत केली आहे. उदाहरण, धर्म ह्मणजे न्यायाची देवता आणि धन्वन्तरी ह्मणजे वैद्यकाची देवता.[१८] जा रामकृष्णादि वीरांचा वेदांत उल्लेख नसून, जे साम्मत हिंदूंचा देवतार्चनांत एवढ्या मोठ्या महत्त्वास आले आहेत, त्यांचा या ग्रंथांत कोठेंहि उल्लेख नाहीं: जा देवतांचे हे अवतार ह्मणून सांगितलें आहे, त्यांविषयींहि कोठें लेख नाहीं. बलदेवाचें नाव पुष्कळ वेळा आलें आहे, परंतु विष्णु व शिव यांचें कोठेंहि नाहीं.[१९] ईश्वराचा या तीन स्वरूपांची वैदिकी देवतांमध्यें मोठी ख्याति नाहीं;[२०] आणि त्यांचा गुह्य त्रिगुणात्मकत्त्वाविषयीं मनूंत कांहीं सूचना नाहीं, व बहुधा वेदांतहि नाहीं. तेथें असें वर्णन केलें आहे, कीं अग्नि, इन्द्र, व सूर्य, या तीन देवतांतून एका देवतेचा रूपांत सर्व देव येऊं शकतात.

याहून कमी पदवीचा देवता.

गणदेवता ह्मणून देवांहून एक अगदीं पृथक, आहेत त्यांची सृष्टिक्रमाचा वर्णनांत देवांत गणना न करितां जीवांत केली आहे. यांत चांगल्या व वाईट असे दोन भेद आहेत. "यक्ष, रक्ष, पिशाच, गंधर्व, अप्सरा, असुर, नाग, सर्प, सुपर्ण (म्ह० गरुड,) आणि यांहून निराळे असे पितृगण," (याप्रमाणें उत्पन्न केले आहेत.)[२१]

गण.

आतां मनुष्याविषयीं वर्णन करितों. मनुष्यास दोन

---

(१८) अ० ९ श्लो० ३०३—३११ व इतर ठिकाणीं.

(१९) विष्णूचें नाव आहे; अ० १ श्लो० १० पाह. भा० क०.

(२०) या तीनाही देवांचा विशेष महिम्याचें वर्णन वेदांत आहे. भा०क०.

(२१) अ० १ श्लो० ३७.

मनुष्य. अन्तर्गत आत्मे असतात; एकास जीवात्मा ह्मणतात; त्यापासून शरीराचें चलनवलन होतें; आणि दुसऱ्यास सदसद्विचारक्षम आत्मा ह्मणतात; तो, मनुष्याचा देहांतील कामक्रोधादि विकार, आणि सद्गुणदुर्गुण, यांचें स्थान आहे. या दोनहि आत्म्यांचें अस्तित्व जरी परस्परांपासून निराळें आहे, तरी जें ईश्वरी तेज सर्व प्राणिमात्रांत पसरलेलें आहे, त्याशीं यांचा संबंध आहे.[२२]

मनुष्याचा पापाचें प्रायश्चित्त त्याचा जीवात्म्यास पडतें. त्याचा अपराधांप्रमाणें त्यास यातना भोगाव्या लागतात, आणि नंतर त्यास मनुष्ययोनींत किंवा इतर जीवयोनींत, किंवा झाडांमध्येंहि जन्म प्राप्त होतो. तो असा कीं जितकें पाप विशेष असतें तितकी नीच योनि प्राप्त होत्ये. शेवटीं दुःख सोसून व दंड भोगून निर्दोष झाला, ह्मणजे तो जीवात्मा (परमात्मा व भूतात्मा हे) जे आपले शुद्ध सोबती[२३] त्यांशीं पुनः आऊन मिळतो, आणि पुनः संसाराचा राहटीस लागतो; मग त्यापासून त्यास कदाचित् मोक्षहि प्राप्त होतो.

ईश्वरानें मनुष्यास उत्पन्न केलें, तेव्हांच त्याणें त्यास अहंकार "ह्मणजे आंतील प्रेरक" देऊन ठेविला आहे;[२४] आणि धर्म, अधर्म; सुख, दुःख; इत्यादि परस्परविरुद्ध धर्मांचीं जीं द्वंद्वें त्यांमध्यें अगदीं स्पष्ट भेद करून ठेविला आहे.[२५]

नंतर यज्ञ करावा अशी जी मुळीं आज्ञा केली आहे, ती नीट व्हावा ह्मणून वेद उत्पन्न केले. याप्रमाणें मनूंत वर्णन आहे. वर सांगितलें आहे त्याहून आणखीं या स्मृतींतील तत्त्वविचारप्रकरणाविषयीं विशेष विस्तार करण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

या ग्रंथांत व्यवहाराचा प्रवृत्तीकरितां धर्माचे दोन

---

(२२) अ० १ श्लो० १४ व १५, आणि अ० १२ श्लो० १२-१४, २४ इत्यादि.

(२३) अ० १२ श्लो० १६-२२.

(२४) अ० २१ श्लो० १४.

(२५) अ० १ श्लो० २६.

भाग केले आहेत: एक कर्मकाण्ड, व एक विचारकाण्ड अशीं दोन आहेत.

हिंदूंचा धर्मशास्त्रांत बहुतेक कर्मकाण्ड भरलेलें आहे; परंतु त्यांत विचारकाण्डाचा भाग अगदींच नाहींसा नाहीं.

कर्मकाण्ड.

स्त्री गरोदर असतां व बाळंत झाल्यावर, आणि पुढें पुष्कळ प्रसंगीं धर्मसंबंधीं संस्कार करावयाचे सांगितले आहेत, त्यांतील मुख्य चूडाकर्म (म्ह० शेंडी राखणें) हा संस्कार पहिल्या किंवा तिसऱ्या वर्षीं करावयाचा आहे;[२६] परंतु सर्व संस्कारांत मोठा संस्कार उपनयन, म्हणजे यज्ञोपवीत धारण करविणें, हा आहे. हा संस्कार, ब्राह्मण असल्यास, सोळा वर्षां पलीकडे ठेवूं नये, आणि वैश्य असल्यास २४ वर्षां पलीकडे ठेवूं नये.[२७] या मोठ्या संस्कारास दुसरा जन्म असें म्हणतात, आणि हा संस्कार पहिल्या तीन वर्णांचा मात्र होतो म्हणून त्यांस द्विज असें नाव मिळतें, व याच नावानें या सर्व स्मृतीमध्यें त्या तिन्ही वर्णांची व्याख्या केली आहे. जा पुरुषास यज्ञोपवीत देतात, त्यास त्या वेळीं, ओम्, म्हणून जो गुढार्थ शब्द आहे तो, व गायत्री, म्हणून वेदांत जें अति पवित्र वाक्य आहे तें, हीं दोन्ही शिकवितात. हें वाक्य भक्त्यर्थ किंवा प्रायश्चित्तार्थ पठन करावें असें या स्मृतींत असंख्य ठिकाणीं सांगितलें आहे; आणि हें पठन करणें, व प्राणिमात्रावर उपकार करणें, एवढें जर मनुष्य करील, तर त्यास धर्मसंबंधीं दुसऱ्या कोणत्याहि संस्काराचा साहाय्याशिवाय मोक्ष प्राप्त होईल.[२८] हें गुह्य वाक्य आतां ब्राह्मणांजवळ मात्र आहे, आणि तें समजणें हें साम्प्रत कठीण आहे; तथापि कित्येक विद्वान् युरोपीयन लोकांनीं त्याचा चांगला शोध लाविला आहे. त्याचें कोलब्रूक साहेबानें भाषान्तर केलें आहे; तें असें:—

(२६) अ० २ श्लो० २६-३५.
(२७) अ० २ श्लो० ३६-४०.
(२८) अ० २ श्लो० ७४-८७.

"जगन्नियन्त्या ईश्वराचा स्तुत्य तेजाचें आपण ध्यान करूं या; तें आपल्या बुद्धि मार्गास लावो."

हें वाक्य कोठें कोठें सविस्तर सांगितलें आहे, त्यावरून असें स्पष्ट दिसतें, कीं त्या वाक्यांत तेज म्हणून जो शब्द घातला आहे, त्याचा अर्थ परमात्मा आहे; परंतु सूर्य असाहि त्याचा अर्थ होऊं शकेल.

या वाक्याची विशेष पवित्रता कोणत्या कारणास्तव आहे तें समजणें हें सोपें काम नाहीं; परंतु जा वेळीं लोक नवग्रहांतील सूर्याची पूजा करित असत, त्या वेळीं जे कोणी दीक्षा घेत असतील, त्यांस ईश्वराचा वास्तविक स्वरूपाविषयींचें जें गुह्य ज्ञान, तें या मंत्रानें त्या वेळीं सांगत असतील; परंतु त्या मंत्राची भाषा द्व्यर्थ आहे.[२९]

प्रत्येक ब्राह्मणानें प्रत्यहीं स्नान केलें पाहिजे; प्रातःकाळीं सूर्योदयापूर्वी व सायंकाळीं सूर्यास्तीं, कोठें तरी जेथें लोकांचा संचार नाहीं तेथें शुद्धोदकाजवळ बसून संध्या केली पाहिजे,[३०] आणि प्रत्यहीं पंचमहायज्ञ केले पाहिजेत. ते येणेंप्रमाणें,— वेदाभ्यास, तर्पण, वैश्वदेव, सजीव प्राण्यांस अन्न देणें, आणि अतिथींचें आदरातिथ्य.[३१] वर सांगितल्याप्रमाणें[३२] बहुधा सर्व द्विजांनीं केलें पाहिजे.

तूप व सोमवल्लीचा रस यांचें हवन करून देवांचें आराधन करित असत. तीं कर्मै करत्ये वेळीं प्रत्येक देवाचें नाव घेऊन हवन करीत. या ग्रंथांत मूर्त्तीविषयीं उल्लेख आहे,

(२९) या वाक्यावर पुष्कळ टीका आहेत, आणि याचा अर्थाविषयीं मतभेद आहे. विद्यागुरू विल्सन् याणे "हिंदूंचें अलंकारशास्त्र" ह्मणून इंग्रेजी ग्रंथ केला आहे; त्यांतील एका टिपेंत या वाक्याचा अर्थ केला आहे, तो असा :-- "आपण त्या ईश्वरी सूर्याचा श्रेष्ठतम शोभेचें ध्यान करावें, (मग) तें तेज आपल्या बुद्धि प्रकाशित करो." राजा राममोहनराय याणें शब्दशः भाषान्तर केलें आहे, तें असें:— "जो तेजस्वी सूर्य आमचा बुद्धीस प्रेरणा करितो, त्याचा श्रेष्ठतम तत्त्वाचें आह्मी ध्यान करितों."

(३०) अ० २ श्लो० १०१-१०४.

(३१) अ० ३ श्लो० ६९।७०

(३२) या शब्दाचें तात्पर्य समजत नाहीं. भा० क०.

आणि त्यांस मान द्यावा[33] असें एका ठिकाणीं सांगितलें आहे; परंतु त्यांची पूजा करणें, याविषयीं जेथें जेथें उल्लेख आला आहे, तेथें तेथें आपली नापसंती दर्शविली आहे. तसेंच त्यांस सुगंधी द्रव्यें व पुष्पें वाहण्याचा जो हल्लीं पाठ पडला आहे, त्याचा कोठेंहि उल्लेख नाहीं. जें हवन करावयाचें असेल तें ब्राह्मणांनीं आपल्या गृहाग्नींत करावें, आणि दुसरीं जीं कर्में सांगितलीं, तींहि त्यांणीं आपल्या घरांत करावीं.[34]

वर सांगितलेल्या पांच कर्मांमधील दुसरीं बहुतेक कर्में लवकर होतात; परंतु वेदाध्ययन करणें हें मोठें भारी काम आहे. वेद हे मन स्थिर करून आणि मर्यादेनें बसून, स्पष्ट वर्णोच्चार करून म्हटले पाहिजेत. पुष्कळ प्रकारचे अपशकुन झाले असतां, अनध्याय होतो; व तसेंच जा पुष्कळ गोष्टी झाल्या असतां मनांत गलबल होऊन तें वेदाभ्यास करण्यास अयोग्य होतें, तशा प्रसंगींहि वेदपठन बंद केलें पाहिजे. उदाहरणः— वारा, पाऊस, विजेचा गडगडाट, भूकंप, पतनतारे, ग्रहणें, कोल्ह्याचें ओरडणें, व दुसऱ्या पुष्कळ गोष्टी, या पहिल्या प्रकारांतील अडचणी होत; व जेथें वाजंत्रें वाजत असतील, अथवा बाण झणाणत असतील, अथवा जेव्हां एकाद्या शहरावर चोर येऊन पडले असतील, अथवा जेथें कांहीं विलक्षण चमत्कार घडून आल्यामुळें लोकांस भीति उत्पन्न झाली असेल; या सर्व प्रसंगीं जो वेदपठनाचा निषेध केला आहे, तो उघड दुसऱ्या कारणामुळें आहे.[35]

वरील कर्मांपैकीं पाहुण्यांचें आदरातिथ्य करण्याविषयीं जें शेवटचें कृत्य सांगितलें आहे, त्याविषयीं सविस्तर वर्णन केलें आहे; त्यांत दुसऱ्याचा सत्कार, व आपलें इंद्रियदमन हीं कशीं करावीं याविषयीं आज्ञा सांगितल्या आहेत: त्या मोठ्या मनोरंजक झाल्या असत्या, परंतु ब्राह्मणांनीं

(३३) अ० ४ श्लो० १३०.
(३४) अ० ३ श्लो० ८२ इत्यादि.
(३५) अ० ४ श्लो० ९९-१२६.

आपल्या वर्णांतील लोकांचा पाहुणचार कसा करावा एवढ्याच विषयीं त्यांत लिहिलें आहे, यामुळें त्या नियमांवर विशेष प्रीति बसत नाहीं.[३६]

नेहेमींचा तर्पणाशिवाय, मेलेल्या पूर्वजांचीं श्राद्धें प्रत्येक पुरुषास दर महिन्यास करावीं लागतात. "दोन डोंगरांचा मधील खोंडे, जे स्वाभाविकच स्वच्छ असतात तेथें, अथवा नदीचा कांठीं व दुसऱ्या एकान्त जाग्यांत" हीं श्राद्धें करावीं. तेथें श्राद्ध करणारानें कांहीं हवन करावें, आणि पुष्कळ विधि करून भात व तूप यांचे पिंड करून ठेवावे, आणि पितरांनीं घेऊन त्यांचा स्वीकार करावा म्हणून त्यांची प्रार्थना करावी.

नंतर त्याणें थोड्या ब्राह्मणांस जेवूं घालावें, परंतु ते त्याचे नेहमींचे मित्र अथवा पाहुणे नसावे. त्यांची त्याणें मोठ्या सन्मानानें सेवा करावी आणि त्यांणींहि न बोलतां भोजन करावें.

"याप्रकारें निमंत्रण केलेल्या ब्राह्मणांजवळ पितर निःसंशय आलेले असतात, आणि त्यांसभोंवते शुद्ध आत्म्यांचा रूपानें फिरत असतात; आणि जेव्हां ते बसतात, तेव्हां हेहि त्यांचा बाजूस बसतात.[३७]"

जा लोकांनीं गैर अब्रूनें किंवा कांहीं पापाचरण करून आपलें आयुष्य घालविलें असेल, अथवा जांणीं अशास्त्र आत्महत्या केली असेल, त्यांचें उत्तरकार्य करूं नये.[३८] ही एक गोष्ट झाली, परंतु कोणी मनुष्य पतित झाला असतां त्याचा कुटुंबानें त्यास सोडून देऊन तो जीवंत असतांच त्याचें विधिपूर्वक उत्तरकार्य करावें असें सांगितलें आहे; तो मोठा चमत्कारिक असा मानावयाजोगा संस्कार आहे; पुढें जर त्या पतितास पश्चात्ताप होऊन तो प्रायश्चित्त घेईल, तर त्याणें दुसरा एक विधि केला असतां, तो पुनः आपल्या

(३६) अ० ३ श्लो० ९९-११८.
(३७) अ० ३ श्लो० १८९.
(३८) अ० ५ श्लो० ८९.

कुटुंबांत येऊं शकेल, व पूर्वीप्रमाणें आपले ज्ञातिधर्म आचरूं शकेल.[३९]

द्विजांस खाण्यास वर्ज असे सांगितलेले असंख्य पदार्थ आहेत, त्यांतून कांहीं कशाकरितां वर्ज करावयास सांगितले त्याचें कारण उघड आहे. उदाहरणः— मांस खाणारे पक्षी, दाराजवळ राहणारीं डुकरें, व जा दुसऱ्या जनावरांचें बाहेरील स्वरूप, अथवा जांची उपजीविका करण्याची चाल त्रासदायक, हीं कां न खावीं याचें कारण उघड आहे; परंतु कोंबडा, कवकं,[४०] गाजर अथवा कांदा, यांतून कोणताहि पदार्थ खाल्ला असतां मनुष्य ज्ञातिभ्रष्ट होतो;[४१] असें असून श्वाविध, साळू, घोरपड, व कांसव, हीं खाण्यास प्रत्यवाय नाहीं असें स्पष्ट सांगितलें आहे. यावरून जे पदार्थ निषिध्ध केले आहेत, त्यांची यत्ता मनःकल्पित आहे. पारधी, अथवा अप्रमाणिक मनुष्य, अथवा सोनार, अथवा वेताचें काम करणारा ( बुरूड, ) अथवा रजक अथवा रंगारी, यांचें अन्न ब्राह्मणानें खाऊं नये; खाल्ल्यास त्याबद्दल कठीण शिक्षा सांगितल्या आहेत. आतां, पारध्याचा व्यापार क्रूर, त्यामुळें ब्राह्मणांचा दृष्टीनें अप्रमाणिक मनुष्यांशीं त्याचें साम्य होऊ; परंतु जे दुसरे वरील मनःकल्पित निषेध सांगितले आहेत, त्यांत वैद्याचाहि निषेध केला आहे,[४२] आणि या विद्वान् व परोपकारी लोकांचा धंद्याची गणना जे दुसरे अतिशय खराब धंदे त्यांबरोबर हमेशा केली आहे, हें पाहून आश्चर्य वाटतें.

या ग्रंथांत पुष्कळ प्रकारचें मांस खाण्यास ब्राह्मणांस परवानगी दिली आहे,[४३] आणि कांहीं मोठ्या समारंभांचा प्रसंगीं गोमांसहि भक्षण करावें असें मुद्दाम सांगितलें आहे;

---

(३९) अ० ११ श्लो० १८२-१८७.

(४०) जास अळंबें ह्मणतात- भा० क०.

(४१) अ० ५ श्लो० १८।१९.

(४२) अ० ४ श्लो० २१२.

(४३) अ० ५ श्लो० २२-३६.

हें पाहून आह्मास विशेष चमत्कार वाटतो.[४४]

ब्राह्मणांनीं यज्ञाशिवाय मांसभक्षण करूंनये असें सांगितलें आहे खरें; परंतु या प्रकारचे यज्ञ हे नित्यकर्मांतले आहेत, हें वर पाहण्यांत आलें आहे. शिवाय, भात, भाकरी, व यांसारखेच निर्दोष असे दुसरे पुष्कळ पदार्थ हेहि (यज्ञाशिवाय) खाऊं नये, असा त्याप्रमाणेंच प्रतिबंध लावून दिला आहे.[४५]

आतां प्राण्यांवर दया करावी अशी जेथें तेथें मोठ्या सक्तीनें आज्ञा केली आहे, आणि मांसभक्षण न केलें असतां प्राण्यांस क्लेश कमी होतात, ह्मणून तसें करणें हें फार स्तुत्य आहे, असें सांगितलें आहे. आतां या गोष्टी खऱ्या, परंतु या कारणास्तव मांसभक्षण करूं नये असा बुद्धिवाद जरी सांगितला आहे,[४६] तरी मांसभक्षाविषयीं साफ प्रतिबंध, अथवा तो भक्ष अशुद्ध अशी सूचनाहि कोठें आढळत नाहीं. असें असून पुष्कळ ठिकाणीं मांसभक्षण हें सशास्त्र आहे, असें मुद्दाम सांगितलें आहे.[४७]

गोमांसभक्षण करण्याविषयीं जी वर सांगितल्याप्रमाणें परवानगी दिली आहे, ती फारच विलक्षण दिसत्ये; कारण जशी गाय हल्लीं पवित्र मानतात तशी त्या काळींहि मानित असत असें दिसतें. एका गाईचा जीव रक्षण केला असतां, ब्रह्महत्येचें प्रायश्चित्त होतें असें मानित असत,[४८] आणि एक गोवध झाला असतां प्रायश्चित्तार्थ तीन महिने तप

(४४) अ० ५ श्लो० ४१।४२.
(४५) अ० ५ श्लो० ७.
(४६) अ० ५ श्लो० ४३-५६.
(४७) अ० ५ श्लो० ३० "जो सशास्त्र भक्षण करितो, त्याणें, शास्त्राप्रमाणें भक्षावयास योग्य अशा प्राण्यांचें मांस जरी प्रतिदिवशीं खाल्लें, तरी त्यास दोष लागत नाहीं; कारण जे प्राणी भक्षिले जातात, व त्यांस जे भक्षितात, त्या दोघांसहि सारखेंच ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे; असें सांगितलें आहे.
(४८) अ० ११ श्लो० ८०.

करून गाईचा एका कळपाची सेवा करावी लागत असे.[४९]

खाण्यापिण्याविषयींचा वर सांगितलेल्या प्रतिबंधाशिवाय नेहेमींचा अगदीं सामान्य व्यापारांसंबंधींहि पुष्कळ अति सूक्ष्म नियम ब्राह्मणांस लावून दिले आहेत, त्यांतून कोणत्या एकाचें उल्लंघन केलें असतां पाप केलें असें समजावें.

मनुस्मृतीचा एका अध्यायाचा अर्धाहून अधिक इतका ग्रंथ शुध्दता कशी ठेवावी, याविषयींचा नियमांनीं भरलेला आहे.

कोणी संबंधी मरण पावला असतां मनुष्यास आशौच येतें. हें एक आशौचाचें अगदीं साधारण कारण झालें; परंतु मरणारा हा जर अगदीं जवळचा संबंधी असला, तर ब्राह्मणास दहा दिवस आणि शूद्रास एक महिना आशौच येतें.

वर सांगितल्याप्रमाणेंच असंख्य प्रकारचे करार व दुसऱ्या गोष्टी यांणींहि पुरुष अशुचि होतो; मग त्यास शुध्द करण्यास स्नान व दुसऱ्या क्रिया कराव्या लागतात. त्यांचें भारूड वर्णन करावयास लांबट आहे, ह्मणून सांगत नाहीं.[५०] या नियमांस कांहीं अपवाद सांगितले आहेत, त्यांवरून जांणीं हे नियम केले ते चांगले बुध्दिमान् होते असें दिसतें; कारण या प्रकारचे ग्रंथकार असे नियम करतील अशी अटकळ आपल्याचानें करवली नसती. उदाहरणः— राजास कधींच आशौच यावयाचें नाहीं,[अ] व अशी कामाची हरकत जा लोकांस नसावी असें राजाचा मनांत येईल त्यांसहि अशुचित्व येत नाहीं. लढाईत मेलेल्या शिपायाचा दायादांस सुतक नाहीं, आणि तो शिपायी आपली चाकरी बजावित असतां जर मरण पावला, तर त्याणें अति उत्तम

(४९) अ० ११ श्लो० १०९-११७.

(५०) अ० ५ श्लो० ५७- शेवटपर्यंत.

(अ) राजा काम करित असतां शुध्द असतो, असें मूळांत आहे. भा० क०.

यज्ञ केला असें होतें, आणि तो सर्व दोषांपासून मुक्त होतो."[५१] उत्तम रीतीनें द्रव्यसंपादन करणें, अपकारांची क्षमा करणें, दान, व तप, या चोहों गुणांनीं जसा मनुष्य शुद्ध होतो, तसा दुसऱ्या कोणत्याहि शुध्द वस्तूंनीं शुध्द होत नाहीं."[५२]

हिंदुलोकांचें प्रायश्चित्तकाण्ड हें त्यांचा कर्मकाण्डाचा व विचारकाण्डाचा मध्यें आहेत. लोकांनीं अपराध न करावे ह्मणून दहशत घालण्याकरितां हीं प्रायश्चित्तें आहेत, व धर्मसंबंधीं प्रवृत्ति मोडिली असतां त्याबद्दल शिक्षा करण्याकरितांहि प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत, परंतु त्यांची योजना हमेशा अनियमित, आणि मनास वाटेल तशी केली आहे, यामुळें लोकांचा कल्याणाविषयीं त्यांचा जसा उपयोग व्हावा तसा होत नाहीं.

सुरापान हें पहिल्या प्रतीचा दोषांत गणलें आहे; असें असून बिचाऱ्या निरुपद्रवी प्राण्यांची हिंसा करण्याकरितां यज्ञ करणें हें तिसऱ्या प्रतीचा दोषांत धरिलें आहे.

जें प्रायश्चित्त कांहीं खऱ्याखुऱ्या अपराधांस सांगितलें आहे, तेंच ब्राह्मणास पीडा देणें व "वास घेण्यास अयोग्य अशा पदार्थांचा वास घेणें" या दोहोंसहि सांगितलें आहे.[५३]

कांहीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत, तीं करणाराचा इच्छेनुरूप करावयाचीं आहेत; तींच जर जोरावारीचीं असतीं, तर तीं अतिशय क्रूरशिक्षारूप झालीं असतीं. जरी तीं प्रायश्चित्तें करणें हें करणाराचा मर्जीवर आहे, तरी तीं फार असंबद्ध आहेत, त्यामुळें, दोषी हे, इहलोकीं बहिष्कार व परलोकीं शिक्षा हीं टाळण्याकरितांहि, तीं प्रायश्चित्तें करित नाहींत. यास दृष्टान्तः— मातृगमन, व गुरुपत्नी, भगिनी, लहान कुमारी अथवा अतिशूद्री यांशीं गमन, हीं केलीं असतां,

(५१) अ० ५ श्लो० ९३-९८.
(५२) अ० ५ श्लो० १०६।१०७.
(५३) अ० ११ श्लो० ५५-६८.

त्या पुरुषास लोखंडाचा बिछान्यावर घालून भाजून टाकावा अथवा एक स्त्रीची धातूची प्रतिमा तप्त करून याकडून तिला आलिंगन करवून मारून टाकावा, हें प्रायश्चित्त सांगितलें आहे.[५४] मद्यपान केलें असतां कढकढित गोमुत्र पिऊन मरून जावें हें प्रायश्चित्त आहे.[५५]

इतर जीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत तीं बहुतेक द्रव्यदंड व उपोषणादि व्रतें, यांणीं करावयाचीं आहेत. दंडाबद्दल ब्राह्मणांस गुरें दान द्यावीं असें बहुधा हमेशा सांगितलें आहे; एक बैल व, १००० गाई एवढेहि कांहीं मोठे दंड सांगितले आहेत.

हीं प्रायश्चित्तें ह्मणजे शिक्षा, याहि अपराधांचा प्रमाणानें नाहींत, विलक्षण आहेत. ब्राह्मणानें सर्प मारिला असतां एक कुदळ[ब] द्यावा, आणि कोणी नपुंसकास मारिल्यास एक पेंढ्याचें ओझें द्यावें, असें सांगितलें आहे.

आपल्या वरिष्ठास "हूं !" तूं !" असे शब्द बोललें असतां, अथवा ब्राह्मणास वादांत जिंकिला असतां थोडें प्रायश्चित्त सांगितलें आहे. जीवजंतु मारणें, आणि झाडें किंवा गवत निरर्थक कापणें यासहि प्रायश्चित्त आहे. कारण झाडांसहि स्पर्शज्ञान आहे असा त्या ग्रंथकाराचा समज आहे.[५६]

प्रायश्चित्ताविषयीं एक वाक्य सांगितलें आहे, तें पुष्कळ रीतींनीं विलक्षण आहे. तें असें:— " जो ब्राह्मण सर्व " ऋग्वेद ध्यानांत ठेवील, त्याणें जरी त्रैलोक्यांतील लोकां" चे प्राण घेतले, आणि अति नीचाकडीलहि अन्न भक्षण

(५४) अ० ११ श्लो० १०४, १०५ व १७१.

(५५) अ० ११ श्लो० ९२.

(५६) अ० ११ श्लो० १२५ पासून शेवटपावेतों.

(ब) मूळग्रंथास "तीक्ष्णाग्रलोहदंड" असें आहे व त्याचा अर्थ कुदळ असा होत नाहीं. भा० क०.

" केलें, तरी तो सर्व पापापासून मुक्त होईल."[५७]

फौजदारी कायद्यामध्यें जीं कांहीं प्रायश्चित्तें व जा कांहीं शिक्षा सांगितल्या आहेत, त्यांतून जा कांहीं भ्रष्टते-संबंधीं आहेत, त्यांवरून त्या वेळचा लोकांचा रीति फार खराब होऊन गेल्या होत्या, अथवा स्मृतिकाराचाच मनांत विशेष मालिन्य होतें, असें दिसतें;[५८] परंतु विचार करून पाहतां युरोपखंडांतील कांहीं दोषादोषविवेक्यांप्रमाणेंच बहुधा या ग्रंथकारानें आपल्या बुध्धीचा उलटसुलट उपयोग करून तींतून हीं प्रायश्चित्तें वगैरे उत्पन्न केलीं असावीं असें दिसतें.

दुसरे कांहीं नियम यांहून आनंदजनक आहेत, त्यांवरून ब्राह्मणांमध्येंहि धर्मभोळेपणाचा विशेष जोर चालत होता असा आमचा मनावर ग्रह होत नाहीं. यास दृष्टान्तः— जर कोणी मनुष्य परमार्थासाठींहि आपलें द्रव्य धर्म करील, आणि आपल्या कुटुंबास आपत्तींत ठेवील, तर त्यास मरणानंतर दुःख भोगावें लागेल.[५९] जा पुरुषानें प्रायश्चित्त घेतलें असेल तो, शास्त्राप्रमाणें, लोकांशीं व्यवहार करण्यास पात्र होतो खरा, परंतु जांचे दोष मूळींच फार अधम असतील, त्यांचें वारेंहि सर्वांनीं घेऊं नये, असें ह्मटलें आहे; आणि शरणागतास मारणें व उपकार करणारास अपकार करणें, या दोन कर्मांची त्या महापराधांत गणना आहे.[६०]

नीतिसंबंधीं परिणाम.

आतां पाहूं गेलें असतां मनूचा धर्मापासून नीतिसंबंधीं परिणाम साधारण रीतीनें चांगला होतो. धर्म व अधर्म यांचा मधील मूळ आवश्यक भिन्नता, ही पूर्वीं सांगितल्याप्रमाणें आरंभींच स्पष्ट रीतीनें

(५७) अ० ११ श्लो० २६५. जो वेदवित् असेल तो मूळींच अपराध करणार नाहीं अशा आशयानें हें लिहिलें असावें. भा० क०.

(५८) अ० ११ श्लो० १७१-१७९, इ०.

(५९) अ० ११ श्लो० ९ व १०. इंग्रेजींत अ० ९ आहे ती चुकी आहे. भा० क०.

(६०) अ० ११ श्लो० १९० व १९१.

दाखविली आहे, आणि तो भेद चांगल्या रीतीनें बहुधा सर्वत्र राखला आहे. खोट्या साक्षीविषयींचीं वर सांगितलेलीं प्रसिद्ध वाक्यें, व यज्ञार्थ दुसऱ्याची मालमत्ता जबरीनें चोरून आणण्याविषयीं जे एक दोन लेख आहेत ते;[६१] आणि अपराधी लोकांचा पत्ता लावून त्यांस पकडण्याविषयीं साधनें योजण्याची जी राजास कांहीं सैल दोरी सोडली आहे[६२] ती, या गोष्टी मात्र या ग्रंथाचा चांगलेपणास अपवाद आणणाऱ्या आहेत; यांशिवाय दुसऱ्या मला आठवत नाहींत.

आतां न्याय, सत्य, व सद्गुण, यांचें पालन करण्याविषयींहि पुष्कळ आज्ञा केल्या आहेत, आणि दुष्ट वर्तणूकेपासून इहलोकीं व परलोकीं होणारे जे वाईट परिणाम, तेहि पुष्कळ सांगितले आहेत. जो मनुष्य खरा आहे, त्यास जरी दरिद्रानें पीडलें तरी त्याणें खिन्न होऊं नये; कारण "अधार्मिक मनुष्यास कांहीं सुख होत नाहीं, व जाणें खोटी साक्ष देऊन संपत्ति मिळविली असेल त्यासहि होत नाहीं."[६३]

नीतिसंबंधीं जीं कर्तव्यें आहेत, तीं[६४] अनुष्ठानादि धर्मसंबंधीं कर्त्तव्यांहून[६५] श्रेष्ठ आहेत, असें एका ठिकाणीं स्पष्ट सांगितलें आहे.[६६] धर्मसंबंधीं कांहीं पापें झालीं असतां, त्यांस जशा पुढील स्थितींत अमुक शिक्षा व्हावयाचा म्हणून सांगितल्या आहेत, त्याचप्रमाणें जा अपराधांपासून लोकराहटींत बखेडे होतात त्यांसहि तशाच सांगितल्या आहेत.

---

(६१) अ० ११ श्लो० ११-१९.

(६२) अ० ९ श्लो० २५६—२६९.

(६३) अ० ४ श्लो० १७०—१७९.

(६४) त्यांस यम ह्मणतात भा० क०.

(६५) त्यांस नियम ह्मणतात. भा० क०.

(६६) अ० ४ श्लो० २०४.

या विषयप्रकरणींच एक मत आहे, त्यापासून इतका तारीफ करण्याजोगा परिणाम होत नाहीं; कारण त्यांत असें सांगितलें आहे, कीं जांस त्यांचा अपराधांचें सरकारापासून योग्य शासन मिळतें, ते शुद्ध होऊन स्वर्गास जातात, आणि जांणीं पुण्य केलें असेल त्यांप्रमाणेंच ते शुद्ध होतात.[६७]

आतां या प्रकरणीं शेवटचें सांगणें इतकें आहे, कीं साम्प्रत कल्पित देवांचा उदाहरणांनीं, व कांहीं पंथांतील लोकांचा धर्मसंबंधीं क्रियांत व्यभिचाराची मोकळीक दिली आहे तशा मोकळिकेनें, जसा शास्त्रप्रणीत नीतीचा बिघाड होतो, तसा वर सांगितलेल्या धर्मशास्त्रानें जी नीति सांगितली आहे तिचा बिघाड पूर्वी होत नसे.

पूर्वी निरनिराळ्या ठिकाणीं पुष्कळ वाक्यांचा उल्लेख आला आहे, त्यावरून या स्मृतींत उदार बुद्धीचीं वाक्यें व गंभीर विचार नाहींतसे नाहींत असें दाखविण्यांत आलें आहे. परंतु ब्राह्मणांचा नीतीचा साधारण परिणाम कोणास उपद्रव न लावितां राहवें असा आहे, उद्योगपुरःसर दुसऱ्याचें बरें करावें असा नाहीं; आणि चित्ताची स्वस्थता राहवी व सज्ञान माण्यास इजा अथवा अपाय होऊं देऊं नयेत, हे त्यांचा नीतीचे मुख्य उद्देश आहेत.

---

# प्रकरण पांचवें.

## लोकांचा रीतिभाती व त्यांची स्थिति.

स्त्रियांची स्थिति.

कोणत्याहि लोकांचा रीतिभातींचा शोध करूं लागलें, ह्मणजे त्यांचा स्त्रियांची स्थिति कशी होती या गोष्टीकडे आपलें लक्ष प्रथम जातें. आतां मनुस्मृतीचा वेळीं हिंदूंचा स्त्रियांची स्थिति कशी

---

(६७) अ० ८ श्लो० ३१८. पूर्वीचें पुण्य असल्यास स्वर्गास जातात असें कुल्लूकभट्टानें सांगितलें आहे भा० क०.

होती हें त्या ग्रंथांतील लग्नसंबंधीं नियमांवरून समजतां येईल, आणि दुसऱ्या कानू व ग्रंथकाराचे आशय यांमध्यें स्त्रीजातीविषयीं त्या लोकांचे अभिप्राय कसे होते हें साहजिकच कळून येत आहे; त्यावरूनहि आपल्यास अनुमान बांधितां येईल.

लग्नसंबंधीं जे नियम वर सांगितले आहेत, त्यांवरून जरी तो काल आडाणी होता अशीं लक्षणें स्पष्ट दिसतात, तथापि एकंदराखालीं ते नियम स्त्रियांस प्रतिकूल नाहींत; बाकी दुसऱ्या गोष्टींत त्यांची स्थिति कशी असावी तिजविषयीं त्या कायद्याचा स्वरूपावरून आपण जशी अटकळ करितों, तशी ती होती असें दिसतें.

स्त्रीनें आपल्या पतीचा अगदीं आज्ञेंत असावें व त्याची अव्यभिचारि भक्ति करावी; पतीनें तिला शास्त्रोक्त प्रतिबंध लावून देऊन वागवावें, परंतु निरुपद्रवी, व सशास्त्र अशा क्रीडेविषयीं तिला मोकळीक द्यावी.[1] जेव्हां पति नाहींसा होईल, तेव्हां तिणें आपल्या सग्या पुरुषांतून कोणाचा तरी तंत्रानें असावें.[2] हा स्त्रीचा वर्तणूकेचा प्रकार झाला. आतां तिचा नवरा, व तिचे दुसरे संबंधी पुरुष यांस स्त्रियांचा सन्मान करण्याविषयीं कडकडीत आज्ञा केली आहे. त्या प्रकरणीं जीं वाक्यें सांगितलीं आहेत, तीं अशीं— "जेथें स्त्रियांचा अपमान होत आहे तेथें धर्मसंबंधीं सर्व क्रिया निष्फल होतात"— "जा घरांतील स्त्रियांस दुःख भोगावें लागतें त्या कुटुंबाचा लवकरच समूळ नाश होतो;"— परंतु "जेथें भार्या आपल्या भर्त्याशीं संतुष्ट आहे, आणि जेथें भर्ता भार्येशीं संतुष्ट आहे त्या कुलामध्यें कल्याण हें निश्चयेंकरून नित्य वास करील." पतीनें स्त्रीचे लाड किती करावे हेंहि कांहीं गोष्टींविषयीं सांगितलें आहे; त्या गोष्टी धर्मशास्त्रामध्यें घातल्या हें विलक्षण दिसतें. त्यांत एक अशी आज्ञा दिली आहे, कीं स्त्रीस "सणावारीं व उत्साहाचा दिवशीं

(१) अ० ९ श्लो० २ इत्यादि. | (२) अ० ५ श्लो० १४७, इ०.

अलंकार, वस्त्रें, व उत्तम अन्नें हीं सर्वकाळ पुरवित असावीं."[3]

विधवांचेंहि रक्षण करण्याविषयीं या धर्मशास्त्रानें चांगलें लक्ष पुरविलें आहे. त्यांचा संबंधी पुरुषांनीं त्यांचा मालमत्तेंत हात घालूं नये असा निक्षून निषेध केला आहे. ( अ० ३ श्लो० ५२. ) विधवा, व एकाकी राहणाऱ्या स्त्रिया, यांचा पालनकर्त्ता राजा असें सांगितलें आहे, आणि जे त्यांचे संबंधी त्यांची जिनगी खाऊं लागतील त्यांस चोरांप्रमाणें शिक्षा करावी अशी राजास आज्ञा केली आहे. ( अ० ८ श्लो० २८।२९ ).

ब्राह्मणांशिवाय दुसऱ्या लोकांचा गृहस्थितीविषयीं विशेष सांगितलें नाहीं, आणि ब्राह्मणांस तरी जे नियम सांगितले आहेत, ते विरक्ततेविषयीं आहेत; परंतु त्यांत कांहीं क्षुल्लकहि आहेत. यास उदाहरणः— ब्राह्मणानें आपल्या बायकोबरोबर जेऊं नये, व ती जेवित असतां व जांभई देत असतां, व अव्यवस्थित बसली असतां, व आपल्या डोळ्यांस काजळ लावित असतां व दुसऱ्या किती एक अशाच प्रसंगीं, तिजकडे पाहूं नये.[4]

सर्व वर्णांमध्यें " अर्थसंग्रह व व्यय, शरीरशुध्दि, व भ्रतारसेवा आदिकरून स्त्रियांचा धर्म, स्वयंपाक करणें, आणि घरांतील चीजवस्तेचा तपास ठेवणें " हीं कामें स्त्रियांस सांगावीं.

दुसरें असें सांगितलें आहे, कीं " घरामध्यें कोंडून ठेविलेल्या व दक्ष आप्तपुरुषांचा नजरेखालीं राहणाऱ्या अशाहि स्त्रिया सुरक्षित नाहींत; जांस त्यांचीं मनें रक्षण करितात त्याच स्त्रिया वास्तविक रीतीनें सुरक्षित आहेत. "

या ग्रंथांत सतीविषयीं एक अक्षरहि सांगितलें नाहीं:

---

( ३ ) अ० ३ श्लो० ५५ - ६१.
( ४ ) अ० ४ श्लो० ४३ इ०.
( ५ ) अ० ९ श्लो० ११ । १२.

उलटें ब्राह्मणांचा विधवांनीं पुण्यशीळ, विरक्त, व पवित्र असें राहून आयुष्य घालवावें अशी आज्ञा केली आहे. त्यावरून, त्यांणीं आपल्या नवऱ्याबरोबर आपणास जाळून घ्यावें, हें त्या ग्रंथकाराचा मनांतहि आलें नव्हतें, हें उघड आहे.

जर कोणी ब्राह्मणतापसी असाध्य रोगानें पीडित असेल, तर त्याणें ईशानदिशेस जावें आणि पाण्याशिवाय कांहीं भक्षण करूं नये, आणि मरून शरीर पडेपर्यंत तसेंच राहवें;(७) तसेंच राजानें आपला अन्तकाल समीप आला असें पाहून सशास्त्र दंड घेऊन जी संपत्ति आपण मिळविली असेल, ती ब्राह्मणांस दान करावी, व आपलें राज्य आपल्या मुलांचा हवालीं करावें, आणि आपण लढाईत मरून जावें, अथवा जर त्या वेळीं लढाई नसेल तर उपोषणें करून प्राण सोडावा.(८) इतक्या आत्महत्या करण्याविषयीं मात्र या स्मृतींत मोकळीक दिली आहे.

रीतिभाती.

त्या काळचा रीतिभातींविषयीं आपल्यास आणखी विशेष माहिती सांपडूं शकत नाहीं. तरुण ब्राह्मणांस जें कठीण ब्रह्मचर्य लावून दिलें होतें त्याप्रमाणें ते एका नाडीवर राहतील याविषयीं शास्त्रकाराचा मनांत वास्तविक बेभरवसा झाला होता असें दिसतें; शरीरद्वारा सेवा करण्याविषयीं व आपल्या गुरूचा दुसऱ्या जवळचा आप्तांचें वंदन करण्याविषयीं जेथें विद्यार्थ्यास सांगितलें आहे, तेथें, जर गुरूपत्नी तरुण असेल तर तिचे चरण वंदूं नयेत, असें सांगितलें आहे. स्त्रियांचा संगतींत असतां त्याणें सर्वकाळ सावध असावें, आणि जा स्त्रिया त्यास अति पूज्य अशांचाहि समागम एकान्त स्थलीं झाला असतां फार

---

(६) अ० ५ श्लो० १५६-१५८.

(७) अ० ६ श्लो० ३१.

(८) अ० ९ श्लो० ३२३. कोलब्रूकसाहेब सांगतो कीं, सती जाण्याचा पाठ सप्रमाण आहे; आणि कन्नूलोक हे याप्रमाणें चालत अशी प्राचीन काळचे लोक कथा सांगतात. त्या प्रचाराचा उल्लेख या स्मृतींत नाहीं, ही गोष्ट चमत्कारिक आहे.

सावधगीरीनें राहवें असें सांगितलें आहे.[९]

मनुस्मृतींत जा व्यसनांविषयीं राजास सावध केलें आहे, त्यांवरून त्या वेळीं कोणत्या व्यसनांत लोक निमग्न असत, हें कांहींसें समजून येईल. ( अ० ७ श्लो० ४७.) शिकार करणें, जुवा खेळणें, दिवसास निजणें, अतिशय स्त्रीभोग घेणें, मद्यपान करणें, गाणें, वाजिवणें, नाचणें, आणि निरर्थक प्रवास करणें, हीं, राजास जा व्यसनांविषयीं सावध केला आहे, त्यांत आहेत. चोर, धुतारे, भविष्य सांगणारे, व दुसरे ढोंगी, हे चवाळ्यांचा जाग्यांवर दडी देऊन राहत असतात असें सांगितलें आहे, त्यावरूनहि त्या वेळचा रीतिभातींविषयीं कांहीं माहिती मिळत्ये. त्या चवाळ्याचा जागा येणेंप्रमाणें:— तळीं, रोटीखाने, वेश्यांचीं घरें, पिठे, जिनसापानसांचीं दुकानें, जेथें चार रस्ते मिळतात तीं ठिकाणें, मोठे व प्रख्यात वृक्ष, लोकांचा सभा, व जाहीर तमाशे. सर्व वर्णांचा लोकांनीं परस्परांस रामराम कसे करावे, व परस्परांचें आगतस्वागत कसें करावें याविषयीं सूक्ष्म नियम सांगितले आहेत.

आईबापांस[१०] व वयस्क लोकांस पुष्कळ मान द्यावा असें सांगितलें आहे; तसाच विद्वत्ता व सदाचरण, आणि संपत्ति व पदवी, यांसहि द्यावा असें ह्मटलें आहे. "जो पुरुष चाकांचा गाडींत बसला असेल त्यास, अथवा जाचें वय ९० वर्षांवर असेल त्यास, अथवा जो रोगग्रस्त असेल त्यास, अथवा जाचा पाठीवर ओझें असेल त्यास, व स्त्रीस, व ( कांहीं ठिकाणीं ) ब्राह्मणास व राजास, व नवऱ्या मुलास; इतक्यांस रस्त्यांत वाट द्यावी, असें सांगितलें आहे."[११]

या स्मृतींत परंपरागत आचारास जो मान द्यावयास सांगितला आहे, त्याचें या ग्रंथांत जें माहात्म्य सांगितलें आहे, त्याप्रमाणें त्या माहात्म्यास योग्य असें त्या आचाराचें

(९) अ० २ श्लो० २११-२१५.
(१०) अ० २ श्लो० २२५-२३७.
(११) अ० २ श्लो० १३०-१३८.

कोणत्या स्थली वर्णन करावें तें मला बराबर सुचत नाहीं. परंपरागत आचार हा शास्त्राचाहि पलीकडे आहे, आणि तो सर्व तपाचें मूळ आहे, असें मनुस्मृतींत वर्णन आहे.[12] परंपरागत आचार हाच आज दिवस पावेतों हिंदूंचा लोकरीतीचा जीवमाण आहे; आणि त्यांचा सर्व रीतिभाती वगैरे जा कायम राहिल्या आहेत त्याचें प्रत्यक्ष कारण हाच आहे. या सर्व स्मृतीमध्यें विद्येस मोठा मान दिला आहे, आणि ती संपादन करावी असा सर्व वर्णास उपदेश केला आहे. वेद व त्यांवरील भाष्यें व दुसरे कांहीं थोडे ग्रंथ एवढेच शिकण्याविषयीं विद्यार्थ्यांस सांगितलें आहे खरें; परंतु त्याच ग्रंथांतून ईश्वरी विद्या, न्यायशास्त्र, नीतिशास्त्र, व पदार्थविज्ञानशास्त्र, हीं त्यांणीं शिकावीं असें सांगितलें आहे;[13] आणि प्रत्येक वेदास जीं अंगें आहेत, त्यांतून या सर्व विषयांचें व्याख्यान केलें आहे, हें आपणास माहित आहेच; तसेंच, प्रत्येक वेदाबराबर शुद्ध ज्योतिषशास्त्रसंबंधीं विवरणाचा एक उपग्रंथ आहे, आणि विद्येचा पूर्वोक्त शाखांत प्राचीन काळींच ब्राह्मण उत्कृष्ट झाले होते, त्यावरून जा वेळीं या स्मृतीची रचना झाली, त्या वेळींहि या विद्यांत त्यांची गति पुष्कळ झाली असावी, असें संभवतें.

त्या वेळचा कला साध्या स्थितींत होत्या तथापि लोक त्यांमध्यें अगदीं आडाणी होते असें नाहीं. सोनें, रत्नें, रेशमी कपडे, व अलंकार, हे सर्व कुटुंबांत असत असें वर्णन आहे.[14] हत्ती, घोडे, व गाड्या, हीं लोकांचीं फिरावयाचीं साधारण वाहनें असत, आणि बैल, उंट, व गाडे, यांणीं हमेशा जिन्नस वाहत असत. बाग, उपवनामध्यें मौजेकरितां बांधलेल्या जागा, व गच्चा, यांविषयींहि उल्लेख आलेला आहे; आणि श्रीमान् लोकांनीं

कलाकुशलता.

(१२) अ० १ श्लो० १०८-११०.
(१३) अ० १२ श्लो० ९८ व १०५ व १०६.
(१४) अ० ५ श्लो० १११। ११२; अ० ७ श्लो० १३०.

लोकोपकारार्थ तळीं बांधण्याचा, व झाडांची लावणी करण्याचा जो पाठ अद्यापि चालू आहे, त्याविषयीं प्रथम आज्ञा या ग्रंथांत केली आहे असें वाटतें. [१५] नगरांविषयीं फारसा कोठें उल्लेख नाहीं, आणि शेतीभातीचा मोठ्या गावांतील लोकांस जा कायदाकानूची, व अम्मलदारलोकांची जरूर लागावयाची, त्यांहून विशेष कायदे व अम्मलदार हेहि या ग्रंथांत आढळत नाहीं. जेवढ्या राजधान्या तेवढ्याच काय त्या मोठ्या नगऱ्या होत्या, असें संभवतें.

जा धंद्यांविषयीं उल्लेख आला आहे, त्यांवरून सुधारलेल्या लोकांस जा वस्तूंची आवश्यकता असत्ये त्या सर्व त्या वेळीं होत्या, परंतु फारच उत्तम स्थितीस आलेल्या लोकांस जा सर्व पाहिजेत त्या नव्हत्या, असें दिसतें. रत्नें व सोन्याचे दागिने हे साधारण होते; तथापि या जिन्नसांचें फार नाजूक काम करणारे असे जे नकशीचें काम करणारे वगैरे कारीगर, यांविषयीं कोठें उल्लेख नाहीं. चित्रें काढणें व लिहिणें या कला जितक्या पुढें वाढल्या तितक्या पायरीस त्या वेळीं त्या बहुधा आल्या नसतील; कारण आपत्तीचा काळीं शूद्रांस करावयास योग्य असे जे व्यापार सांगितले आहेत, त्यांत या दोन कळा आहेत.

पैक्याविषयीं वारंवार उल्लेख आला आहे; परंतु त्याची किम्मत वजनानें करीत, अथवा टंकसाळेंत नाणें पाडून ठरावित असत, तें दिसून येत नाहीं. त्या वेळीं पण ह्मणून नाण्याचा देवघेव असे. साम्प्रत कितीएक कवड्या एकत्र झाल्या असतां त्यांस हें नाव देत असतात: [१६] अति हलक्या

---

(१५) अ० ४ श्लो० २२६. | (१६) वराटका ह्मणजे कवडी.

२० वराटका = १ काकिणी = १ दमडी.

४ काकिणी = १ पण = १ पैसा.

१६ पण = १ द्रम्म = १ पावला.

१६ द्रम्म = निष्क = ४ रुपये. भा० क०.

तांब्याचा नाण्याचा खुर्दा करण्यास कवड्या वापरितात

त्या वेळीं जीं नाना प्रकारचीं धान्यें असत त्यांचें, व मसाल्याचे जिन्नस, सुगंधी पदार्थ व दुसऱ्या उत्पन्न होणाऱ्या वस्तु, यांचें जा प्रकारें वर्णन केलें आहे, त्यावरून हा देश उत्तम पिकास आलेला होता असें सिद्ध होतें, आणि ही सगळी स्मृति पाहिली असतां त्या वेळचे लोक निष्काळजी असून त्यांची भरभराट होती असें दिसतें. त्या ग्रंथांत कांहीं गोष्टी सांगितल्या आहेत जांवरून त्या काळीं राज्याची अव्यवस्था होती असें दिसतें. त्या गोष्टी अद्यापि अगदीं कमी झाल्या नाहींत, परंतु साम्प्रत त्यांपासून लोकांस विशेष उपद्रव होत नाहीं: हें दुरून पाहणारास शक्यहि दिसावयाचें नाहीं. असें असून या ग्रंथांत आपत्तिकाळाविषयींचे जे उल्लेख वारंवार आले आहेत, त्यांवरून असा संशय घेण्यास जागा होत्ये, कीं साम्प्रतहि, जे दुष्काळ पडून हिंदुस्थानांतील लोकांचा केव्हां केव्हां संहार करितात, ते, प्राचीन काळीं, याहूनहि लवकर लवकर पडत असत.

एशियाखंडांतील बहुतेक देशांत कांहीं लोकांचा जाति जशा अद्यापि उपलाणू फिरत्या आहेत, तशा त्या वेळीं हिंदुस्थानांत होत्या, असा कांहीं पत्ता सांपडत नाहीं.

साधारण विचार.

प्राचीन काळचा सर्व लोकांमध्यें मिश्रदेशचे लोक हे पुष्कळ रीतींनीं हिंदूंचा सारखे होते असें दिसतें; परंतु मिश्रदेशांतील लोकांविषयीं जी माहिती आपणास आहे ती फार थोडी आहे, त्यामुळें त्यांशीं तुलना करून दुसऱ्या लोकांविषयीं कांहीं विशेष खुलासा होईल असें दिसत नाहीं.

जेव्हां मनुस्मृतीची रचना झाली त्या वेळाजवळजवळचा सुमारें होमर नामक युनानी कवी नांदत होता. त्याणें युनानी लोकांचें वर्णन केलें आहे; त्या लोकांशीं हिंदूंची तुलना करणें हें पूर्वोक्त तुलना करण्याहून सोपें आहे. त्याप्रमाणें तुलना करून पाहिली असतां, हुशारी, धैर्य, व सफाई,

यांमध्यें हिंदु हे त्या शूर युनानीलोकांहून कमी होते; तथापि दोन्ही लोकांचे कायदे व राज्यरीति, दोन्ही देशांतील कला कौशल्यांची स्थिति, सर्व लोकांमध्यें स्वस्थता असावी अशी बुद्धि, आणि कायद्यांप्रमाणें वागणूक, इतक्या गोष्टींविषयीं जर दोघांची तुलना केली, तर पूर्वेकडील (ह्मणजे हिंदु) लोक हे विशेष सुधारलेले होते असें स्पष्ट दिसतें. हिंदूंच्या आंतील शिस्ती युनानीलोकांचा इतक्या रानट नव्हत्या; तशीच ते आपल्या शत्रूंशीं जी वर्तणूक करीत, ती विशेष सदय असे; त्यांची साधारण विद्वत्ता युनानीलोकांहून फारच मोठी होती; आणि ईश्वराचा अस्तित्वाविषयीं व प्रकृतीविषयीं जें ज्ञान त्यांस प्राप्त झालें होतें, त्याचा प्रकाश आथेन्स शहराचा भरभराटीमध्यें जे प्रचंड बुद्धिमान् होऊन गेले त्यांसहि धुंधरट धुंधरटच दिसला होता. आतां पाहूं गेलें असतां, ग्रीक लोकांचा व्यवहार पुष्कळ देशांतील लोकांशीं खुला असल्यामुळें, ते जरा विशेष सभाचतुर झाले होते, आणि त्यांणीं जें जें ज्ञान जा जा लोकांपासून प्राचीनकाळीं संपादन केलें, तें तें लिहून ठेविलें आहे. इकडे हिंदूंची सुधारणा ही एकटीच वाढली, तेणेंकरून हीचें स्वरूप अपूर्व व असाधारण झालें; आणि त्या योगानें पुढें हिंदुलोकांस कोणाचें साहाय्य नसतां त्यांची सुधारणा जी आपोआप वाढून उंच पदवीस गेली, ती पाहून चमत्कार वाटतो. याप्रमाणें प्राचीन काळीं दुसऱ्या कोणत्याहि लोकांशीं न मिळतां जी हिंदूंची सुधारणा झाली, ती हिंदुलोकांचें एक दुर्दैवच किंवा नाहीं याविषयीं संशय आहे; कारण ( हे सुधारल्यामुळें ) जा सर्व दुसऱ्या लोकांची माहिती यांस होती, त्यांहून आपण श्रेष्ठ झालों असें पाहून, हे परदेशी लोकांचा रीति तुच्छ मानून आपल्यांस मान देऊं लागले; असें होतां होतां शेवटीं, बाहेरील सुधारणा घेऊन त्यांप्रमाणें आपली स्थिति चांगली करण्याची त्यांची शक्ति गेली, आणि ते आपल्या आपल्यांतहि फेरपालट करण्यास नाखुश होऊन गेले.

मनुस्मृतींतून घेतलेला वरील मजकूर पाहतां तीन द्विजवर्णांपासून सर्व लोक झाले: तेवढ्यांविषयीं धर्मशास्त्रानें नियम बांधिला आहे, आणि शूद्र हे चाकरपेशाचा व नीच स्थितींत होते असें दिसतें. असें असतां कितीएक नगरांत शूद्र राजे राज्य करित होते, असें दिसतें, व तेथें ब्राह्मणांनीं राहूं नये असा स्मृतिकारानें उपदेश केला[१७] आहे; आणि "सर्व देशांचे देश शूद्रांनीं वसलेले, नास्तिकांनीं पीडित, आणि जांत ब्राह्मण नाहींत" असे होते;[१८] याप्रमाणें दिसून येतें.

हिंदुलोकांची उत्पत्ति व स्थिति.

हिमवंते व विन्ध्यांद्रि या दोन पर्वतांचा मध्यें पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रापर्यंत जो देश आहे, त्यांत तिन्ही द्विजवर्णांनीं सर्वकाळ राहवें अशी आज्ञा केली आहे; परंतु या तीन मुख्य वर्णांस जरी एवढ्याच प्रदेशांत राहण्याची बंदी होती, तरी उपजीविकेची आपत्ति झाली असतां शूद्रानें इच्छेस येईल तेथें जावें असें सांगितलें होतें.[२१]

या सर्व गोष्टींवरून, द्विजवर्णांचे लोक हे, जांणीं बाहेरून येऊन देश जिंकून घेतला, ते होते; आणि शूद्रवर्णाचे लोक हे मूळचे राहणारे असून पराजित झालेले होते, आणि जीं शूद्र लोकांचीं स्वतंत्र शहरें होतीं, तीं उत्तरहिंदुस्थानाचे जे लहान लहान विभाग झाले होते त्यांतून जे

(१७) अ० ४ श्लो० ६१.
(१८) अ० ८ श्लो० २२.
(१९) यास हिमालय ह्मणतात.
(२०) यास अद्यापि हेंच नाव आहे, व जसा हिमालय हीं उत्तरहिंदुस्थानाची उत्तरसीमा आहे, तसा हा दक्षिणसीमा आहे; या पर्वताचा शेवट पूर्वेकडे कसा झाला आहे याविषयीं स्मृतिकाराचा मनांत अर्धवट कल्पना आली असावी.
(२१) अ० २ श्लो० २१ - २४.

कांहीं लहान प्रदेश अद्यापि आपली स्वतंत्रता बाळगून होते, त्यांत होतीं; आणि विन्ध्याद्रिपलीकडील सर्व देशास या आगंतुक लोकांचा अद्यापि हात लागला नव्हता, आणि त्यांचा धर्मांचा त्यांत प्रवेश झाला नव्हता; असा सिद्धान्त न करणें हें अशक्य दिसतें.

आतां असा संशय उत्पन्न होतो कीं, वर सांगितलेले हा देश जिंकणारे जे द्विज ते बाहेरून आले होते; अथवा देशांतीलच एका जातीचे लोक होते; किंवा ते एकाद्या एतद्देशीय राज्यापैकीं एका भागांतील धर्मसंबंधीं पंथाचे लोक होते, व त्यांणीं आपल्या इतर देशबांधवांहून विशेष ज्ञान संपादन करून सर्व लौकिकी फायदे आपणच बळकावून बसले? हे तीन संशयाचे प्रकार आहेत.

शूद्रांहून दुसऱ्या उंच वर्णांचा चेहरा बाहेरून भिन्न आहे, तो आज दिवसपर्यंत नजरेस येण्याजोगा आहे; त्यावरून ते दुसऱ्या वर्णाचे लोक परदेशांतून आले असें आपणास वाटे, आणि मीहि हें बोलणें (ब्राह्मण व क्षत्रिय यांस जेवढें लागू होतें, तेवढें तरी निदान) अगदीं नाकबूल करित नाहीं; परंतु दुसऱ्या कांहीं गोष्टी अशा आहेत, कीं जा या बोलण्याची मातबरी बरीच मोडितात, त्या गोष्टींचा आपण विचार केला पाहिजे; सबब त्या पुढें सांगतों.

चाण्डाळांचा वर्ण हा ब्राह्मणांहून अतिशय निराळा आहे, असें असून चाण्डाळांची मूळ उत्पत्ति ब्राह्मणी आईपासून आहे, ह्मणून त्यांचें रूप तरी मूळपिंडाप्रमाणें कांहीं राहवें; कारण त्यांची जात अति नीच आहे ह्मणून स्वतांचा खेरीज दुसऱ्या जातींत त्यांस मिसळवत नाहीं. त्याशिवाय दुसरें असें आहे, कीं जर चाली निराळ्या असल्या, व उद्योग निराळे असले, तर एवढ्या कारणांनींच ब्राह्मण व शूद्र यांचा मध्यें जेवढें वैपरीत्य आहे तेवढें उत्पन्न होऊं शकेल; आणि हिंदूंचे धंदे वंशपरंपरेनें वेगळे लावून दिलेले असतात,

त्यामुळें तो भेद राहून उत्तरोत्तर वाढतच जाईल.[२२]

मनुस्मृतीमध्यें, (व मला वाटतें कीं वेदांमध्येंहि ) अथवा खचित मनुस्मृतीचा पूर्वींचा अशा कोणत्याहि ग्रंथामध्यें ( हिंदुस्थानाशिवाय अमुक देशांत ) या लोकांचा पूर्वीं वास होता, अथवा हिंदुस्थानाबाहेरील कोणत्याहि देशाचा नावाशिवाय त्या देशाची दुसरी कांहीं माहिती यांस होती असा कोठें उल्लेख नाहीं. या लोकांचा जा दंतकथा आहेत त्यांतहि हिमालयपर्वताचा पलीकडेस गति नाहीं, व त्या पर्वतांत देवांचें राहण्याचें ठिकाण आहे, असें सांगितलें आहे. या गोष्टींवरून द्विज हे परदेशांतून आले, या ह्मणण्यास बाध येतो.

संस्कृत भाषा व पश्चिमेकडील ( युरोपखंडांतील वगैरे ) देशांतील भाषा यांचें मूळ एक आहे; यावरून जे लोक या भाषा बोलत असत त्यांचा, कोणी एका वेळीं, परस्परांशीं संबंध होता यांत संशय नाहीं; परंतु हा संबंध कोठें होता, व केव्हां होता, याविषयीं त्यावरून कांहीं सिद्ध होत नाहीं. कदाचित् हा संबंध फार प्राचीन काळीं असेल, तेणेंकरून त्या संबंधापासून त्या वेळचा निरनिराळ्या लोकांचा इतिहासाप्रकरणीं आपणास कांहीं माहिती मिळूं शकणार नाहीं. कोणी ह्मणेल कीं, ही ( संस्कृतादिकांची ) मूळभाषा एका मध्यदेशांतून सर्वत्र पसरली; तर असें ह्मणणें हें उगाच पोकळ आहे, व इतर उदाहरणांचाहि विरुध आहे; कारण ज्या देशवसाहती झाल्या, व जो ज्ञानप्रसर झाला, त्या

---

( २२ ) दोन पुरुष जेव्हां प्रपंचांत शिरले तेव्हां एकसारखेच होते; असें असून ते पुढें निरनिराळ्या धंद्यांत शिरले व त्यांतील एक असामी एका चांगल्या कवायदी पलटणींत शिपाई राहिला, व दुसरा जा शहरांत पुष्कळ पक्का माल करण्याचे कारखाने होते, व जेथें हालचाल अगदीं कमी व जागा रोगट, अशा ठिकाणीं जाऊन राहिला; असें झालें असतां थोडक्याच वर्षांत त्या दोघांमध्यें किती तफावत पडेल ती पाहा ह्मणजे वरील तफावत कांहींशी लक्षांत येईल.

दोहींचाहि फैलावा वर्तुळाकार झाला नाहीं; परंतु पूर्वेपासून पश्चिमेस होत गेला आहे. दुसरें, जी भाषा हिंदुस्थान, ग्रीस, व इटली, या देशांत पसरली, आणि क्याल्डीया, सिरिया, व आरेबिया, या ( मधल्या) देशांस जिणें स्पर्शहि केला नाहीं, अशा भाषेचा मध्यबिंदु तो कोठें असेल बरें ?

यावरून ही गोष्ट अद्यापि वादग्रस्तच आहे. हल्लीं जेथें हिंदु राहतात त्या देशाशिवाय दुसऱ्या देशांत ते कधीं राहत होते असें मानण्यास कांहीं कारण नाहीं; आणि त्यांचे अगदीं जुनाट इतिहास व त्यांचा दंतकथा यांचा जितका मूड आहे, त्याचा पूर्वीं ते कदाचित् दुसऱ्या मुलूकांत राहिलेले असतील, हेंहि नाकबूल करण्यास तसेंच कांहीं कारण दिसत नाहीं.

स्वदेशांत असूनच अथवा बाहेरून येऊन जांणीं हा देश जिंकिला त्या जिकणाऱ्या कुळांतील हे सर्व लोक आहेत, असें मानिलें असतां, असें दिसतें, कीं साम्प्रत हिंदुलोकांतील जो जातिभेद, व जे दुसरे त्यांचे विलक्षण धर्म, हे, पूर्वीं ठराव केल्याशिवाय अथवा तसे उद्देश मनांत धरिल्याशिवाय, त्यांचा साहजिक स्थितीपासूनच उत्पन्न झाले असतील. तें असें घडून आलें असेल, कीं एकादें नवीन संस्थान घेतल्यावर जे श्रीमान् किंवा विशेष लढाऊ लोक असतील, त्यांणीं लढण्याचाच धंद्रा पतकरिला असेल, आणि त्यांहून जे कमी मख्यात लोक होते, ते कृषिकर्म, कलाकौशल्यें, व व्यापार, यांत शिरले असतील. प्राचीन अथवा नवीन महाद्वीपांत कोठेंहि, सर्व रानटी लोकांत जसे असतात, त्याप्रमाणें या लोकांमध्येंहि देवभक्त, व शकुन सांगणारे झाले असतील, व ईश्वराचे उद्देश काय आहेत, व तो प्रसन्न होण्याचीं साधनें काय आहेत हें आपणास माहीत आहे असें ते सांगत असतील; आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांपेक्षां जे विशेष हुशार असतील, तेच प्रथम हें काम करूं लागले असतील, आणि त्यांचा मागून त्यांणीं आपलें कसब आपल्या मुलांस शिकवून ठेविलें

असेल. मग कांहीं वेळानें त्यांची संख्या व सत्ता वाढून ती पवित्रता अमुकच कुळांत मात्र आहे अशी यत्ता ठरविण्याची शक्ति त्यांस आली असेल. क्षत्रियवर्णाचा अभिमानामुळें इतर कसबें करणाऱ्या लोकांचा वर्णाशीं लग्नें करून आपल्या वीर्यास हलकेपणा आणण्यास ते उद्युक्त झाले नसतील; याचप्रमाणें पुष्कळ काळपर्यंत युरोपीयन लोकांमध्येंहि अभिमान होता, तेणेंकरून त्यांतहि जातिभेदाप्रमाणेंच अडथळे होत असत. असा मोठेपणा ओढून घेण्याचा कामांत ब्राह्मण हेहि मागसावत नसत, आणि देवसेवेकरितां राखलेल्या पवित्र जातीची शुद्धता राखण्याची अवश्यकता असल्यामुळें, तीहि त्यांस पाठपुराव्यास मिळत असे. बहुधा अशा स्थितींत सर्व ठिकाणीं होतें त्याप्रमाणेंच या देशांतील जे पूर्वींचे लोक असतील, त्यांचाच एक निराळा वर्ण होऊन राहिला असेल, आणि ते, देश जिंकून घेणाऱ्या लोकांचा उपयोगाकरितां, पहिल्यानें जमीन कशित असतील; परंतु जे त्यांस जिंकून घेणारे धनी त्यांणीं आपल्या लोभामुळें, अथवा आपल्या सुखाकरितां इच्छेस येईल तशी शेती करण्याची त्यांस परवानगी दिली असेल. आतां, यांत ब्राह्मणांची जात वेगळी पडून गेली एवढी गोष्ट खेरीज करून, या लोकांची जी बाकीची गति झाली, ती प्राचीन काळचा अथवा मध्यकाळचा बहुतेक लोकांचा पूर्वचरित्रांप्रमाणेंच झाली आहे; आतां हिंदूंचा सर्व रीतिभाती वगैरे नियमित ठरून त्यांची यत्ता झाली आहे, आणि त्यांत पुढें फेरफार किंवा सुधारणूक व्हावयाची नाहीं, यामुळें त्या सर्व कायम राहिल्या आहेत; हा या देशांतील लोकांचा व अन्य देशांतील लोकांचा स्थितींमध्यें पहिला विलक्षण भेद आहे. या अशा कायम राहण्याचें मूळ असें दिसतें, कीं जेव्हां ब्राह्मणांचा वर्ण निराळा झाला,तेव्हांपासून पुढें त्या लोकांची एकी असल्यामुळें त्यांची सत्ता वाढली आणि राजाशींहि त्यांची दोस्ती निकट होती; हीं वरील रीतिभातींचा मजबूदीचीं दोन कारणें होतीं.

राजांचे कायदे ईश्वराचा अनुमतानें होऊन बाहेर पडत, अथवा कदाचित् स्वर्गींचाच प्रेरणेनें झालेले असे बाहेर निघत, त्यामुळें त्यांविषयीं वाद करण्यास जागा नसे; आणि या कायद्यांत धर्मसंबंधीं, नीतिसंबंधीं, व लोकव्यवहारांतील दिवाणीफौजदारी कायद्यासंबंधीं सर्व धर्मांचें निरूपण केलें असे, त्यामुळें त्या कायद्याखालीं वागणारे जे लोक त्यांचा वर्तणूकेवर व चित्तांवर त्याचा पुरा दाब बसून, तेणेंकरून जो सर्व बनाव बनून गेला, तो पुढें कधींहि फिरूं शकला नाहीं. वरील हेतु तडीस नेण्याकरितां, ब्राह्मणलोकांनीं, चाललेल्या शिस्तीस मजबूदी यावी अथवा त्यांस चांगले वाटले तसे फेरफार सुरू करतां यावे म्हणून, जातींची पीठिका व दुसऱ्या दंतकथा रचल्या असतील. इकडे राजाची सत्ता तर त्यांणीं शिखरास चढविली होती; तथापि राजाचा मनांत द्वेषभाव उत्पन्न न होऊं देतां, व यांचा विरक्ततेमुळें व सद्गुणांमुळें लोकांमध्यें जें यांचें वजन असे तें नाहींसें होऊं न देतां, आपल्या जातीचें वैभव जितकें वाढवूं शकले, तितकें त्यांणीं वाढविलें. हा ( ब्राह्मणांचा ) मजबूद कटाव कोणत्या प्रत्यक्ष कारणांनीं झाला, व हा होण्यास कोणतीं साधनें लागलीं होतीं, याची आपल्याचानें कल्पना करवत नाहीं; परंतु जर आपण अशी कल्पना केली, कीं जा वेळीं फ्रान्सचा बादशाह चार्लमेन यास रोमन क्याथोलिक धर्माचें अगत्य होतें, त्या वेळीं जर त्या धर्माचा, पोप हा, निराळा अध्यक्ष नसता, ( ह्मणजे राज्याचा व धर्माचा मुख्य अधिकार त्याच बादशाहाकडे असता ); आणि तिकडील धर्माध्यक्षांचे दुसरे नियम राखून त्यांस लग्न करण्यास व आपल्या मुलांस आपला धंदा शिकविण्यास परवानगी असती, तर जसा हल्लीं हिंदुलोकांत परिणाम झाला आहे, तसाच युरोपांतहि झाला असता अशी कल्पना करणें हें सहज आहे, यांत कांहीं भारी नाहीं.

त्या वेळचा लोकांतील प्रवृत्ति, व राजानें प्रसंगवशात्

केलेले कायदे, यांचा ग्रंथ होई तों बराच काळ गेला असेल, आणि पुढें लोकांचा वाढत्या स्थितींतील फेरफारांस योग्य अथवा राजांचा राजकारणांमुळें जेथें जरूर आलें तेथें, त्या कायद्यांत नकळत फेरफार झाले असतील. जुन्या ग्रंथांचा आधारावरून धर्मशास्त्राचे नवेहि ग्रंथ पुष्कळ दिवस होत गेले असतील, व त्या सर्वांस ईश्वराची आज्ञा होती याविषयींचा संदेह उत्पन्न झाला नसेल; परंतु शेवटीं त्या धर्मशास्त्राचीं मूळसूत्रें काईम होऊन गेलीं असतील, तेव्हां जे पुढें फेरफार करावयाचे ते, मूळग्रंथांवर टीका करून, अथवा राजाधिकारानें नवे कायदे प्रसिद्ध करून, केले असतील.

हिंदुलोकांचा स्थितीचा अगदीं पूर्वींचा मजला वटावून जाऊन पुष्कळ काळ जाईपर्यंत, मनुस्मृतीची रचना झाली नव्हती, असें सर्व प्रकारें पाहतां दिसतें.

मनुस्मृतीचा घाट ब्राह्मणांनीं घातला असें दिसतें. असें असून तो सर्व ग्रंथ तपासून पाहतां त्यांत जेथें ब्राह्मणांचा संबंध आला आहे, तेथें दोन विलक्षण गोष्टी आपल्या मनांत भरतात. पहिली ही कीं, देवालयांत पूजा करण्याचा अधिकार व धर्मसंबंधीं सर्व प्रकारचे संस्कार, यांचा त्यांणीं अगदींच थोडा मान ठेविला होता. आतां कोणत्याहि देशांत धर्माध्यक्ष हे, इतर प्रापंचिक लोक व ईश्वर यांचा मध्यें दर्शनी मध्यस्थी करितात, असें लोकांस वाटल्यामुळें त्यांचा सन्मान होतो; तसेंच ईश्वरी प्रेरणेनें भविष्यें सांगून त्या योगानें, व दुसऱ्या रीतीचा ठकबाजीनें त्यांस पुष्कळ सत्ता मिळत्ये; असें असून, जर पुष्कळ दिवसपर्यंत ऐहिक सत्ता मिळाल्यामुळें निर्धास्त होऊन त्या धर्माधिकाऱ्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें आपलें वजन वाढविण्याचे उपाय योजण्याची हयगय केली असती, तर असो; परंतु मनुस्मृतीसारख्या धर्मशास्त्राचा जुन्या ग्रंथांतून, ( जा ग्रंथाचा मुख्य उद्देश ब्राह्मणांची सत्ता मजबूद करून वाढवावी असा आहे, त्यांतून ) हे वरील सांगितलेले

ब्राह्मणलोकांविषयीं चमत्कारिक गोष्टी.

उपाय टाकून दिले आहेत हें आश्चर्य आहे.

या हयगयीपासून जे परिणाम झाले, तेहि लक्ष देऊन पाहण्याजोगे आहेत. वेतन घेऊन देवालयांत पूजा करणें, याचा मान कमी झाल्यामुळें ती पूजा करण्याविषयीं जी अनास्था सांम्प्रत आपल्या दृष्टीस पडत्ये, ती सहजच प्रवृत्त झाली असावी; परंतु असें असून अद्यापि सर्व वर्णांचा लोकांत नियमितपणें पूजेचा पाठ राहिला आहे, आणि यात्रांमध्यें, उत्साहांमध्यें व इतर प्रसंगीं त्या ईश्वरभक्तीचा योगानें लोकांत स्फुरण उत्पन्न होतें, हेहि चमत्कार आहेत.

दुसरी ( या ब्राह्मणांविषयीं ) चमत्कारिक गोष्ट अशी आहे, कीं त्यांचा प्रपंचांतील सर्व व्यवहार कसे चालवावे ते, जसे एका मठांत चालवितां येतील, अशा कठीण व सूक्ष्म रीतींनीं, बांधून टाकिले आहेत. आतां ब्राह्मणांचा समाज इतका मोठा, एवढ्या विस्तीर्ण देशभर पसरलेला, व इतर लोकांप्रमाणें आपल्या कुटुंबांसुद्धां ते राहणारे, त्यांवर कोणी एका मुख्याची किंवा मंडळीची सत्ता नाहीं, आणि धर्मसंबंधीं तरी ठरावलेल्या अधिकाराची,अथवा ताबेदारीची कांहीं शिस्त लावून दिलेली नव्हती; अशा सर्व गोष्टी असतां, वरील नियमांची शिस्त त्यांमध्यें कशी चालली, हा चमत्कार आहे. या शिस्तीचा प्रथम नशिबावर हवाला ठेविला होता असें वाटतें, परंतु पुढें तिचा पाठपुरावा पुष्कळ कारणांनीं केला; तीं येणेंप्रमाणें:—( १ ) ईश्वरी शास्त्रावर प्रथम भोळेभावानें ठेविलेली जी श्रद्धा, ती जा लोकांनीं तें शास्त्र रचिलें त्यांचा वंशजांचाहि मनांत काळें करून वाटूं लागली असावी; ( २ ) त्यांची लहानपणीं विद्या शिकविण्याची कठीण शिक्षा; ( ३ ) त्यांचा धर्मांत सांगितलेलीं प्रायश्चित्तें, व तीं कदाचित् अमलांत आणण्याविषयीं राजसत्तेची मदत; (४) ते नियम जुने झाल्यामुळें त्यांविषयीं लोकांस सवयी पडून त्यांचा मनावर उत्पन्न झालेला ग्रह; या सर्व कारणांनीं त्या शिस्तीस पाठबळ झालें; परंतु आपली सत्ता राहण्यास ही शिस्त राखण्याची

आवश्यकता आहे अशी या लोकांची माहिती, व आपल्या सगळ्या वर्णाचा साधारण हिताविषयीं फार तीक्ष्ण कळवळा ( हा जसा ब्राह्मणांचा ऱ्हदयांत आहे, तसा कोणाचाहि नसेल, ) या दोन कारणांनीं त्या लोकांचीच दक्षता विशेष होऊन, वरील शिस्त राहण्यास सर्व कारणांहून मोठें कारण ती झाली असावी.

एवढी बळकटी असतांहि, ती ब्राह्मणी शिस्त हळूहळू कमी होत आली आहे. जेथें पाश मोठे होते, अथवा वजन जाण्याचें जोखम दिसावयाजोगें नव्हतें, तेथें आपल्या जातीचा नियमांवर त्यांचें दुर्लक्ष झालें आहे; त्यामुळें शेवटीं त्यांचा स्वरूपाची पवित्रता कमी होऊन त्यांची सत्ता निर्बळ झाली, आणि ती बहुतकरून दुसऱ्या वर्णाचा लोकांचा हातांत गेली आहे; ते अन्य वर्णांचे लोक एकत्र मिळून गोसावी, बैरागी वगैरे पंथांचा मोठा समाज झाला आहे.

---

# खण्ड दुसरें.

## मनुस्मृतीनंतर झालेले फेरफार, व अर्वाचीन काळचा हिंदुलोकांची स्थिति.

हिंदुलोकांनीं आपल्या चाली पुष्कळ जशाचा तशाच राखिल्या आहेत, तशा दुसऱ्या कोणत्याहि लोकांनीं राखिल्याची आह्मास माहिती नाहीं, व यांचा चाली जितक्या वर्षें राहिल्या आहेत तितका काळपर्यंत दुसऱ्या कोणाचाहि राहिल्या असल्याचा लेख नाहीं; परंतु असें जरी आहे, तरी ( मनुस्मृति झाल्यापासून पंचवीस शतकें झालीं) तेवढ्या मुदतींत यांचा स्थितींत फेरफार झाले नाहींत, असें कोणी समजूं नये. ते फेरफार कोणते झाले आहेत तें वर्णन

करण्याचा यत्न मी आतां करितों. आतां त्यांत जे फेरफार मुसलमानांपासून उत्पन्न झाले ते अमुक अशी निवड करणें हें जरी अशक्य आहे, तरी, धर्म, रीतिभाती, व राजरीति, यां संबंधीं जीं लक्षणें अद्यापि विशेषेंकरून हिंदूंत आहेत त्यांचेंच मात्र वर्णन करीन. त्यांत, जसा मनुस्मृतीमध्यें क्रम धरिला आहे, तोच ठेवून पूर्वीं सांगितलेल्या वर्णांची साम्प्रतची स्थिति कशी आहे तिचा इतिहासास मी आतां आरंभ करितों.

---

# प्रकरण पहिलें.

## जातींमध्यें फेरफार.

चार मुख्य वर्णांमधील फेरफार.

मनूनंतर जे अतिशय मोठे फेरफार झाले ते जातिविभाग व प्रत्येक जातीचा लोकांचे धंदे यांत झाले आहेत; असे दुसऱ्या कशांतहि कदाचित् झाले नाहींत असें म्हटलें असतां चालेल.

क्षत्रिय, वैश्य, व कदाचित् शूद्र वर्णहि साम्प्रत नाहींत असें ब्राह्मण ह्मणतात; परंतु जा लोकांविषयीं ब्राह्मण हा निर्णय करितात ते लोक हें ह्मणणें केवळ कबूल करितात असें नाहीं. आपली उत्पत्ति शुद्ध क्षत्रियांपासून आहे असें राजपूतलोक अद्यापि प्रसिद्धपणें ह्मणतात, आणि कांहीं उदमी लोक त्याच प्रमाणें आपण वैश्यांपासून झालों असें बोलतात. तथापि बहुधा जिकडे तिकडे ब्राह्मणांचें चालून त्यांणीं इतर वर्णांचा हातीं वेद लागूं दिले नाहींत, आणि सर्व मानुषीय व ईश्वरी विद्या, ही त्यांणीं आपल्या समाजाचा हातीं ठेविली आहे.

जरी ब्राह्मणांनीं आपली स्वतांची पिढी निर्विवाद राखिली आहे, तरी त्यांणीं पुष्कळ गोष्टींत आपल्या पूर्वजांचे नियम व आचार सोडून दिले आहेत. कांहीं प्रकरणीं ते पूर्वींपेक्षां

फार सक्त झाले आहेत. यास दृष्टान्तः— त्यांस साम्प्रत मांसभक्षणाचा निषेध आहे[1], आणि नीच वर्णांशीं शरीरसंबंध करण्याचा प्रतिबंध आहे; परंतु यांशिवाय बहुतेक गोष्टींमध्यें त्यांचा आचार पुष्कळ रीतींनीं फार ढिला झाला आहे. त्यांस जे चार आश्रम सांगितले, व त्या आश्रमांमध्यें ब्रह्मचारी, विरक्त, ( ह्मणजे वानप्रस्थ या आश्रमामध्यें असणारा पुरुष ) व यति, यांविषयीं जे निर्बंध सांगितले आहेत, ते सर्व लोकांनीं सोडून दिले आहेत. साम्प्रत कोणाचा इच्छेस आल्यास वर सांगितलेल्या चार आश्रमांतून एकादा स्वीकारी; परंतु पूर्वीं ते चारहि आश्रम क्रमानें सर्वांस घ्यावे लागत असत.

साम्प्रत ब्राह्मण चाकरीस राहतात, व ते सर्व व्यापारधंद्यांत शिरलेले दृष्टीस पडतात. पूर्वींचा पद्धतीप्रमाणें भिक्षेवर उपजीविका करणारे असे एकंदरापैकीं अगदीं थोडे सांपडतील; पुष्कळ शेतकीचा कामांत पडलेले दृष्टीस पडतात; व त्यांहूनहि पुष्कळ शिपाई झालेले आहेत; आणि जा धंद्यांविषयीं त्यांस प्रत्यक्ष निषेध केला आहे, आणि जे केले असतां कठीण शिक्षा सांगितल्या आहेत, त्यांतून जे अति नीच ते करण्याविषयीं मात्र ते कांकूं करितात, व कित्येक ठिकाणीं तेहि करण्याविषयीं मागें पुढें पाहत नाहींत. दक्षिणहिंदुस्थानामध्यें लिहिणें व सरकारी कामकाज, यांसंबंधीं जे रोजगार आहेत, ते अगदीं विशेषेंकरून त्यांचे झाले आहेत. (त्या मुलूकांत) राज्यांतील प्रधानापासून तों गांवचा कुळकरण्यापर्यंत वर सांगितलेल्या प्रकारचा जागा त्यांचा हातांत आहेत, व हिंदुधर्मशास्त्राचा अर्थ सांगणें हेंहि त्यांजकडेसच आहे; तसेंच धर्माध्यक्षपणाचें बहुतेक काम, व प्रसन्याचा

( १ ) उत्तरहिंदुस्थानामध्यें कांहीं जातींचे ब्राह्मण यज्ञांत हवन केलेलें कित्येक प्रकारचें मांस भक्षितात; आणि अशा प्रसंगीं मांस हें सर्वत्र सशास्त्र भक्ष्य आहे; परंतु दक्षिणेंत या प्रकारचा यज्ञ इतका विरळा होतो, कीं थोड्याच ब्राह्मणांनीं तो पाहिला असेल.

मामलतींचा वगैरे पुष्कळ जागा (जांत लिहिण्याची व इतर कारभाराची माहिती लागत्ये त्या) त्यांकडेसच असतात.

उत्तरहिंदुस्थानांतील जा प्रदेशांत मोगलांची शिस्त पक्की सुरू झाली होती, तेथें फारसी भाषा वहिवाटींत आल्यामुळें, सरकारी कामकाज मुसलमान व कायतें यांचा हातांत आलें आहे. याच कारणानें दक्षिणेंत निजामाचा मुलूकांतहि ब्राह्मणांचा रोजगार कांहींसा कमी झाला आहे; असें असूनहि, मनुस्मृतीचा वेळीं एक ब्राह्मण मंत्री व न्यायाधीश एवढ्याच ब्राह्मणांचा हातांत प्रत्यक्ष राजसत्ता असे, त्यापेक्षां हल्लीं जिकडे तिकडे सरकारी कामांत उघड रीतीनें त्यांचा प्रवेश विशेष झाला आहे, हें निर्विवाद आहे.

याप्रमाणें ब्राह्मणांचा धंद्याचा कल ऐहिक व्यापाराकडे गेल्यामुळें त्यांचें धर्मसंबंधीं वजन कांहीं कमी व्हावें हें सहजच आहे, आणि त्याप्रमाणें गंगाकांठचा प्रदेशांत तर त्यांची धर्मसंबंधीं सत्ता नाहींशी झाली आहे, आणि त्यांत व्युत्पन्न थोडे असून त्यांस विशेष उत्तेजनहि मिळत नाहीं, असें एका फार मोठ्या विद्वानाचें सांगणें आहे. कुटुंबांचे गुरू होऊन लोकांस दीक्षा देण्याचा कामामध्यें गोसावी, व दुसऱ्या पंथांचे बैरागीलोक यांणीं ब्राह्मणांस माजी पाडिलें आहे.

असें असतांहि बंगाल्यांत अद्यापि इतर प्रापंचिक लोक ब्राह्मणांस मान देतात, आणि फार मोकळ्या हातानें त्यांस धर्म करितात. बहुतेक देवालयांचा पूजारीपणा, व धर्मसंबंधीं संस्कार चालवणें, हीं अद्यापि त्यांचाच हातांत आहेत, आणि हिंदुस्थानाचा कांहीं प्रदेशांत त्यांचा धर्मसंबंधी अधिकार मुळींच कमी झाला असा नाहीं. महाराष्ट्रदेशांतील प्रकार तर खचित याप्रमाणें आहे, व उत्तरहिंदुस्थानाचा

(२) एक शूद्रजाति आहे. पृष्ठ ११ पाह. (त्यांस संस्कृतांत कायस्थ ह्मणतात. भा० क०)

पश्चिमेकडील प्रान्तांतहि तसाच असावा असें दिसतें. ब्राह्मणलोकांची संख्या, लक्ष्मी, व पदवी, या तिहींमुळें त्यांचें वजन सर्वत्र पडतें; परंतु तेथें, व जेथें त्यांची धर्मसंबंधीं सत्ताहि राहिलेली आहे तेथें, त्यांवरून बहुतेक लोकभीति उडून गेली आहे. हा प्रकार मुख्यत्वेंकरून राजपूतलोकांमध्यें व त्यांहूनहि विशेष मराठेलोकांमध्यें झाला आहे असें दिसतें; कारण त्या मराठेलोकांचा मतें लढाऊपणाचे गुण जांत असतील तेच सेनाधिपत्यास योग्य आहेत; त्या गुणांमध्यें ब्राह्मण आपणापेक्षां कमी असें ते मानितात, असें असून ब्राह्मणांनीं त्यांस हुसकावून त्यांचाच देशांतील राजसत्ता घेतली, हा अपकार ते अद्यापि विसरले नाहींत.

संकरजाति.

मनूचा वेळीं जे अगदीं शेवटचे वर्ण होते ते अगदीं नाहींसे होऊन त्यांचा जागीं साम्प्रत पुष्कळ जाती झाल्या आहेत, त्यांतून कांहीं दुसऱ्या वर्णांचा संकरापासून झाल्या आहेत, व कांहींची मूळपीठिका बराबर समजत नाहीं. तथापि जसे पूर्वींचे चार वर्ण आपले भेद बाळगित असत, त्याहून विशेष सक्तीनें हे आपल्या जाती राखितातः यांचा कधीं अन्नव्यवहार होत नाहीं, व शरीरसंबंध होत नाहीं, व धर्मसंबंधीं संस्कारहि एका ठिकाणीं होत नाहींत. पुण्याचा जवळपास या जाती विशेषेंकरून पुष्कळ आहेत असें बहुधा नाहीं, तथापि तितक्या प्रदेशांत सुमारें १५० निरनिराळ्या जाति आहेत. पुष्कळ ठिकाणीं या जाती धंद्यांशीं मिळत्या असतात; जसें, सोनारांची एक जात, सुतारांची दुसरी, इत्यादि; हा प्रकार मनूस अनुसरून आहे, कारण प्रत्येक मिश्रजातीस एक वंशपरंपरेचा धंदा त्याणें लावून दिला आहे.

जातींचे नियम अद्यापि सक्तीनें परंतु मनमानेल तसे अमलांत घेतात. जर एका उंच वर्णाचा मनुष्यानें स्वयंपाककरितां केलेल्या चौक्यांत नीच वर्णाचा मनुष्याचें पाऊल

पडलें, तर त्या पहिल्या मनुष्यास दुसरें अन्न मिळविण्याचें जरी साधन नसलें तरीहि, तो त्या अन्नास हात न लावितां तें लागलेंच टाकून देईल.

ज्ञातिभ्रष्टता हें एक प्रपंचामध्यें मरण आहे असें जरी ह्मटलें, तरी तिचें जें कठीण स्वरूप तें सगळें चांगलें स्पष्ट होत नाहीं. जो ज्ञातिभ्रष्ट होतो त्याचा वारसा जिंदगीवर पोंचत नाहीं,[अ] आणि तो करार करण्यास व साक्षी देण्यास अधिकारी होत नाहीं; शिवाय त्याचा खासगी व्यवहार बंद होतो, व लौकिकी हक्कहि त्यास मिळत नाहींत; अशा मनुष्यास त्याचा बापाचा घरांत शिरूं देऊं नये; त्याचा अगदीं जवळचा नातलगांनींहि त्याशीं बोलण्याचालण्याचा वगैरे संबंध ठेवूं नये; अशी त्यांची यत्ता आहे. धर्मापासून जें सुख या लोकीं होणार तें, व जो आनंद परलोकीं मिळणार त्याची आशा, हीं दोन्हीं त्याचीं नाहींशीं होतात. आतां महा दोषामुळें, अथवा पुष्कळ दिवस जातीचे नियम तोडल्यामुळें जर जात गेली असेल, तर मात्र नाहीं; परंतु हीं दोन कारणें खेरीज करून इतर कारणांमुळें गेलेली जात प्रायश्चित्त घेतलें असतां पुनः मिळत्ये, आणि अशी जात पुनः मिळविण्याचीं साधनें फार सोपीं असतील असें दिसतें; कारण, ज्ञातिभ्रष्ट झाल्याचे परिणाम बहुधा पाहण्यांत येत नाहींत. हल्लीं लोकांची जात जात्ये; आणि जातींतून विनाकारण बहिष्कार केल्याबद्दल हल्लींचा आमचा कोर्टांमध्यें (नुकसानीचा) फिर्यादी पुष्कळ होत नाहींतशा नाहींत; परंतु मी पुष्कळ दिवस हिंदुस्थानांत होतों तितक्या मुदतींत मी जसें वर्णन वर केलें आहे तशा स्थितींत पडलेला असा पुरुष मी कधींहि पाहिल्याची किंवा अशाविषयीं ऐकिल्याची मला आठवण होत नाहीं.

साम्प्रत गुलामांची (ह्मणजे दास्य करणारांची) जात नाहीं; हा फेरफार सर्व फेरफारांमध्यें अति मोठा आहे.

(अ) इ० स० १८५० या २१ व्या आक्टोबरून पोंचतो. भा० क०.

दक्षिणहिंदुस्थानामध्यें आणि दुसऱ्याहि जागीं कांहीं डोंगराळ व रानवट प्रदेशांत शेतकीसंबंधीं गुलाम अद्यापिहि आहेत; हे कदाचित् प्राचीनकाळचा शूद्रांपैकीं शेष असतील; परंतु बाकीचा दुसऱ्या सर्व प्रदेशांमध्यें सर्व वर्ण स्वतंत्र आहेत, ( ह्मणजे कोणी कोणाचा गुलाम नाहीं. ) कोठें कोठें लोकांचा घरांत गुलाम आहेत, परंतु हे असल्यामुळें वरील गोष्टीस अपवाद येत नाहीं; कारण हे कोणत्याहि जातीचे लोक असून प्रसंगवशात् गुलामगिरी पावलेले असे असतात.

जे संशयबुद्धीनें जातींची मूळपिठिका लावणारे आहेत, ते असा वाद घेतात कीं साम्प्रतकाळीं शुद्ध शूद्र असे कोठेंहि नाहींत; तथापि पुष्कळ जातींचे लोक या प्रकारचे आहेत असें ब्राह्मणहि कबूल करितात. यास उदाहरणः- सर्व मराठे हे त्याच वर्णांतले आहेत. शूद्राचा वास्तविक धंदा शेतकी असें आतां कित्येकांचें मत आहे; परंतु साम्प्रत त्यांस त्याच उद्योगाची यत्ता बांधून दिली आहे असें नाहीं; पुष्कळ शिपाईहि झाले आहेत; तसेंच कायत ह्मणून एका जातीचे लोक आहेत, ते कामकाजांत, व लिहिण्यासंबंधीं हरएक गोष्टींत ब्राह्मणांचे प्रतिस्पर्धी आहेत, असें त्यांविषयीं मागें वर्णन केलें आहे, व ते ( निदान बंगाल्यांतील तरी ) निवळ शूद्र आहेत, व त्यांचा साम्प्रतचा धंदा हा प्राचीन काळापासून आजपर्यंत पिढी दर पिढी चालत आला आहे.

जातींची यत्ता ठरल्यामुळें जरी एकंदर लोकांची गति पुढें वाढण्यास मोठा अडथळा झाला आहे, तरी निरनिराळ्या लोकांस पराक्रम करण्यास त्या जातिभेदापासून जितका अडथळा व्हावा असें युरोपीयन ग्रंथकारांस कदाचित् वाटत असेल तितका झाला आहे, असें कांहीं नाहीं. जसे हिंदुस्थानामध्यें लोकांचा स्थितीचे पालट अकस्मात व मोठें आश्चर्य वाटण्याजोगे झाले आहेत, तसे पृथ्वीवर दुसऱ्या कोणत्याहि भागांत बहुधा झाले नाहींत. शेवटल्या पेशव्याजवळ

( १ ) ह्मणजे दुसरा बाजीराव. भा० क०.

निरनिराळ्या वेळीं दोन मुख्य कारभारी होते, त्यांतून एक पूर्वीं एका देवालयांत पुजारीपणाचा किंवा गवय्येपणाचा कामावर होता[४], (जीं दोनहि कर्मे नीच आहेत;) व दुसरा मुख्य कारभारी शूद्र होता, आणि तो पूर्वीं हुजुऱ्या होता[५]. जयपूरचा राजाचा मुख्य प्रधान हजाम होता. हल्लीं जो होळकरांचा वंश राज्य करित आहे, त्याचा मूळपुरुष धनगर होता; शिद्यांचा मूळपुरुष हुजुऱ्या होता; आणि हे दोनहि शूद्र होते. महाराष्ट्रदेशांत रास्त्यांची जी मोठी कुळी आहे तींतील पुरुष प्रथम ब्राह्मणांचे साहजिक धंदे करित असत; पुढें ते मोठे सराफ झाले, आणि शेवटीं लश्करी सरदार झाले. याप्रमाणें उंच पदवीस चढलेल्या लोकांचीं पुष्कळ उदाहरणें सांगतां येतील. खासगी व्यवहारामध्यें लोकांनीं आपले धंदे बदलल्याचीं उदाहरणें विशेष दृष्टीस पडत नाहींत; परंतु (अगदीं नाहीं ह्मणावें तर) युरोपीयन रीतीप्रमाणें लहान लहान तसबिरा काढण्याचें काम जो हिंदु कारीगर प्रथम करूं लागला, तो जातीचा लोहार होता.

गोसावीलोकांचे पंथ.

या देशांत गोसावीलोकांचा पंथांची स्थापना झाल्यानें एक नवी जात चालू झाली असें ह्मटलें असतां चालेल. यांत पुष्कळ पंथ आहेत. त्यांचे लोक प्रथम कसे एकत्र जमले याविषयीं जें पुढें थोडेंसें वर्णन केलें आहे, ती केवळ उगाच एक कल्पना सुचलेली सांगितली आहे. तो प्रकार:—

मनुस्मृतींतील नियमांप्रमाणें ब्राह्मणानें, तिसऱ्या आश्रमांत, वनामध्यें एकान्तवासांत व आपल्या शरीरास दंड करून नियमित वेळ घालविला, आणि पुढें चौथा आश्रम घेतला, ह्मणजे मग तो सर्व तान्त्रिक कर्मांपासून सुटतो, आणि मग ईश्वराविषयीं विचार करण्याकडे वेळ खरचण्याविषयीं तो अधिकारी होतो. या प्रकारचे संन्याशी लोक, धर्मसंबंधीं

(४) हा माणकेश्वर असावा. भा० क०.
(५) हा त्रिंबकजी डेंगळ्या असावा. भा० क०.

182278

वादविवाद करण्याकरितां, जमत असतील, आणि त्यांतून जे विशेष विद्वान् असतील, त्यांचें बोलणें ऐकण्यास दुसरे लोक मिळत असतील, व ते श्रोते त्यांचा आसमंतात् राहत असतील, परंतु त्यांमध्यें अमुक असा धर्म स्थापित होऊन निराळ्या मंडळ्या झाल्या नसतील. आतां हिंदुस्थानामध्यें असें झालें किंवा कसें झालें असेल तें असो; परंतु प्राचीन काळचा ख्रिस्ती लोकांत जे प्रथम एकेकटे गोसावी असून पुढें मठ झाले ते याचप्रमाणें झाले होते. वर सांगितल्याप्रमाणें धर्मतत्त्वांविषयीं शोध करणाऱ्या लोकांचा सभांत काळेंकरून ब्राह्मणांशिवाय जा इतर वर्णांस वेदाभ्यासाचा अधिकार होता त्यांतील शिष्य येऊं लागले असतील, व त्यांतील प्रत्येक आपआपल्या वर्णाचा चालीप्रमाणें स्वतन्त्र राहत असेल. जा वेळीं सिकंदरबादशाह हिंदुस्थानांत आला, त्या वेळीं हे धर्मसंबंधीं पंथ वरील स्थितींत होते असें दिसतें; परंतु त्या पूर्वींचा युनानी ग्रंथकारांचे लेख आहेत त्यांवरून असा तर्क बांधितां येतो, कीं हल्लीं पक्के बनलेल्या गोसाव्यांचे जसे पंथ झाले आहेत, त्यांचा साम्प्रतचा पद्धती जवळजवळ, वर सांगितल्याहूनहि जास्त, यांची गति झाली होती. वरील प्रमाण पुरें नाहीं असें जर आपण ह्मटलें, तर वर सांगितलेल्या मेळ्यांचे पंथ केव्हां निरनिराळे झाले, व त्यांतील संप्रदायीलोक आपआपल्या जातींचे नियम सोडून त्या त्या पंथाचा नियमांस केव्हांपासून अनुसरूं लागले, याविषयीं अनुमान करण्याचें आपल्याजवळ दुसरें साधन नाहीं. हिंदूंचा ग्रंथांत पाहूं गेलें असतां अशा पंथांची स्थापना झाल्याचा पत्ता ख्रिस्ती शकाचा आठव्या शतकापर्यंत लागतो, त्या पूर्वींचा थांग लागत नाहीं; आणि जे पंथ साम्प्रत चालत आहेत त्यांतून चौदाव्या शतकाचा पूर्वींचे असे थोडेच आहेत. कांहीं पंथांत अद्यापि ब्राह्मण मात्र आहेत, आणि असे जे पंथ आहेत त्यांतून कांहीं थोडे पंथ, हे, पूर्वीं सांगितलेल्या जा

धर्मसंबंधीं वादविवाद करणाऱ्या सभा त्यांचाच प्रतिमा आहेत असें मानिलें असतां चालेल; परंतु गोसाव्यांचा पंथांत शिरलें ह्मणजे सर्व जातिभेद नाहींसे होतात; हा बहुतेक पंथांतील विलक्षण धर्म आहे. ब्राह्मण आपलें जानवें तोडितात; क्षत्रिय, वैश्य, व शूद्र, हे पंथांत आल्यावर आपली जात सोडितात, आणि त्या पंथांतील सर्व लोक बराबरीचा नात्याचे सम्प्रदायी होतात. हा धीटाईचा फेरफार चौदाव्या शतकाचा अखेरीचा अथवा पंधराव्या शतकाचा अवेलीचा सुमारास सुरू झाला असावा, असें विद्यागुरु विल्सन् याचें मत आहे.

जसें युरोपखंडामधील बैराग्यांचा पंथांतील लोकांचें एकसारिखें नियमित स्वरूप दिसतें, तसें हिंदूंचा पंथांचें दिसत नाहीं. तसेंच त्यांस इतर लोकांपासून अथवा दुसऱ्या पंथांतील लोकांपासून तरी ओळखायास, सोप्या रीतीनें समजण्याजोग्या अशा, प्रत्येक पंथाचा जाहीर खुणा कांहीं नाहींत. याचप्रमाणें या एकंदर वर्गास सामान्य नामहि नाहीं. आतां सर्व पंथांस सामान्यतः गोसावी असें ह्मणतात, परंतु वास्तविक पाहूं जातां हें नाव एका अन्तरभेदाचें आहे. या सर्व लोकांस त्यांचा पोषाकावरून ओळखतां येतात; कारण त्यांचीं कांहीं तरी वस्त्रें ( बहुतकरून पागोटें व धोतर, ) मळकट तांबूस रंगाचीं असतात; कांहीं लोक अगदीं नागवे फिरत असतात; सर्वांनीं कांहींतरी शपथा वाहिलेल्या असतात; आणि सर्व भिक्षा घेतात, परंतु सगळेच भिक्षा मागत फिरत नाहींत.

वर सांगितलेल्या गोष्टी एवढ्याच मात्र सर्व गोसाव्यांस लागू करण्याजोग्या आहेत; परंतु बहुतकरून पुष्कळ पंथांविषयीं दुसरींहि कांहीं सामान्य लक्षणें आहेत. प्रत्येक पंथाचा जो गुरू असतो, त्याचा स्थितीप्रमाणें त्या पंथाची स्थिति असत्ये; त्या गुरूचीं मतें तत्पंथी लोक पाळितात, व तो जा नियमांनीं वागला असेल ते नियम बाळगितात. अशा पंथांचा

पुष्कळ स्थापकांनीं निरनिराळीं धर्मसंबंधीं मतेंहि स्थापिलीं आहेत; त्या कारणामुळें गोसावीलोकांचीं मतें शुद्ध हिंदूंचा धर्माप्रमाणें अशीं विरळाच असतात. अशा पंथांतील लोकांचा संख्येमध्येंहि पुष्कळ तफावत असत्ये: कांहीं पंथांचे सम्प्रदायी थोडकेसे असून एकाद्या प्रदेशांतच मात्र असतात, आणि दुसऱ्यांचे शिष्य सर्व हिंदुस्थानभर पसरलेले असतात.

बहुतेक पंथांचे मठ आहेत; त्यांकडेस कांहीं कांहीं ठिकाणीं जमीनी लावून दिल्या आहेत; त्याशिवाय भाविक लोक धर्म करितात, ती, व भिक्षेनें द्रव्य मिळतें ती, अशी त्यांस आणखी पैदास्त आहे. पुष्कळ ठिकाणीं व्यापारांचेंहि उत्पन्न आहे. तो पुष्कळ जागीं उघड रीतीनें करितात, परंतु त्याहून फार ठिकाणीं गुप्त रीतीनें चालतो. या प्रत्येक मठांत एक मुख्य महंत असतो; तो त्या सर्व पंथाचा लोकांनीं अथवा त्या पंथांतील दुसऱ्या महंतांनीं पसंत करून नेमलेला असतो; कित्येक ठिकाणीं हा महंतपणा वंशपरंपरेनें चालतो आणि याहूनहि पुष्कळ जागीं महंत हे आपल्या मागें आपली गादी कोणी चालवावी हें ठरावून ठेवितात. एक किंवा दोन वर्षंपर्यंत परीक्षा घेतल्याशिवाय बाहेरील लोकांस पंथांत घेत नाहींत. नंतर त्या नव्या शिष्यास एक गुरु आपला चेला ह्मणवितो, व असे एकेका गुरूचे दुसरेहि चेले बहुत ठिकाणीं असतात; ते सर्व शिष्य व त्यांचा गुरु यांवर त्या मठाचा मुख्य महंताचा हुकुम चालतो. बंगाल्यामध्यें एक पंथ आहे त्यांत एका मठामध्यें पुरुष व स्त्रिया राहूं शकतात; परंतु त्यांणीं शुद्ध राहण्याविषयीं कठीण शपथा वाहिलेल्या असतात.

पुष्कळ गोसावी लोकांचे मठ असतांहि ते आपलें बहुतेक आयुष्य भटकत फिरून घालवितात, व भिक्षा मागून आपली उपजीविका करितात. दुसरे कांहीं गोसावी अगदीं जन्मभर फिरते असतात. त्यांतून कांहीं, असे असूनहि

महंतांचा हुकुमांत वागतात, व दुसरे अगदीं स्वतन्त्र असतात, व हे दुसऱ्या प्रकारचे गोसावी इच्छेस येईल त्या नियमांनीं वागतात. परंतु या शेवटचा जातीचा गोसाव्यांमध्यें कांहीं अतिशय विरक्त साधु असतात; त्यांतहि मुख्यत्वें करून असे असतात, कीं ते अगदीं अरण्याचा मध्यभागीं जाऊन मनुष्यमात्राशीं अगदीं तुटून राहतात; जर कोणी धार्मिक पुरुषानें त्यांची तजवीज ठेविली नाहीं, तर ते दुष्काळांत सांपडतात, आणि तशा जंगली व एकान्त जाग्यांमध्यें जीं हिंस्र श्वापदें मात्र राहतात त्यांपासून त्यांना विशेष भीति असत्ये.[६]

अति कठीण शपथा अशा थोडक्याच पंथांत असतात. गोसावी लोकांत देवळास जाणें, उपोषणें करणें, जागर करणें, अथवा युरोपखंडांतील बैराग्यांसारखे दुसरे कांहीं विधि करणें हें कांहीं नाहीं. बहुतेकांनीं एकाकी राहवें अशी यत्ता असत्ये; परंतु इतर प्रापंचिक लोकांप्रमाणें लग्नें करून आपल्या कुटुंबांत राहण्याविषयीं पुष्कळ आपल्या सम्प्रदायी लोकांस परवानगी देतात. एका पंथाचे लोक केवल बालकृष्णाची भक्ति करणारे आहेत. त्यांचें मत असें आहे, कीं, उंच पोषाक वापरणें, व मिष्टान्न खाणें, व सर्व प्रकारचा निरुपद्रवी मौजा मारणें, हा आपला धर्म आहे, आणि या मतामुळें त्यांची अब्रू कमी न होतां त्यांचा शिष्यसम्प्रदायी लोकांमध्यें त्यांचें वजन अपार आहे, व त्यांचे जे धर्मसंबंधीं कर्त्तव्याकर्त्तव्याचे दिलदार विचार त्यांप्रमाणें आचार करण्याचीं साधनें, त्यांचे शिष्यसम्प्रदायी हे त्यांस भरपूर मिळवून देतात.

कांहीं पंथ आहेत ते वर सांगितलेल्या शेवटचा पंथाहून फार भिन्न आहेत. उदाहरण— कांहीं पंथांतील लोक आपले एक किंवा दोनहि हात उंच उभे धरितात; ते शेवटीं

(६) वार्ड साहेबानें एक ग्रंथ केला आहे, त्यांत तो लिहितो, कीं सागर म्हणून एका बेटांत एका ठिकाणीं तीन महिन्यांत या प्रकारचे सहा बैरागी वाघांनीं उचलून नेले असें वर्तमान मला लागलें होतें.

ताटकळून तसेच होऊन राहतात, आणि त्यांचीं नखें हातां-तून फुटून बाहेर पडतात; तसेच दुसरे कांहीं सुऱ्यांचे बिछाने करून त्यांजवर निजतात; तसेच कांहीं शपथ वाहून अगदीं मुके राहतात; व दुसरे आणखी दुसऱ्या प्रकारचे मनास ये-तील तसे देहदंड करून घेतात.

कांहीं थोडे सर्व प्रकारची घाण व अपवित्रता करून दाखवितात, आणि आपल्या दर्शनानें लोकांस त्रास उत्पन्न करून अथवा आपल्या अवयवांत सुऱ्या भोंसकून लोकांपा-सून जुलूमानें भिक्षा घेतात.

वर सांगितल्याप्रमाणें कांहीं लोक नागवे फिरतात, व पुष्कळ बहुतेक अंग उघडें ठेवितात. या प्रकारचे कांहीं गोसावी आहेत त्यांस नग्गे म्हणतातः हे शिपाइगिरीची चा-करी करितात, व कित्येक ठिकाणीं हजारो असतातः यांचे सरदार यांपैकींच असतात.

आपल्या धर्माचा प्रसर करण्याकरितां आपण शस्त्र धरितों असें हे लोक म्हणत नाहींत; परंतु कोणीहि राजानें त्यांस पगार दिला असतां ते त्याची चाकरी करितात. ते ब-हुधा व्रात्य व दुर्व्यसनी असतात, परंतु मोठ्या निकरानें ल-ढतात अशी त्यांची ख्याति आहे. त्यांचे राख फांसलेले नागवे अवयव, त्यांची मोठी वाढलेली दाढी, आणि जटा प-डलेले व कृत्रिम उपायांनीं वाढवून डोक्याभोंवते पिळवटलेले शेंडे, या सर्वांहीं मिळून ते लढाऊ गोसावी मोठे चमत्कारि-क दिसत असतात. जेव्हां ते कोणाचा चाकरीस नसतात, तेव्हां त्यांचा मोठ्या टोळ्या जमून मुलूकभर लुटीत व द्रव्य वसूल करीत असे ते भटकत फिरतात, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. पूर्वींचा कारकीर्दींतून अशा लुटारू लोकांनीं ब्रिटिश लोकां-चा राज्यावर अनेक हल्ले केले होते.

वर सांगितलेल्या टोळ्यांशिवाय अथवा लढाईचा प्रसंगीं जमाव होतात त्यांशिवायहि, हे हत्यारबंद गोसावीलोक केव्हां केव्हां पुष्कळ एकत्र जमतात; आणि याप्रमाणें परस्परविरुद्ध

पंथांचे मोठे मेळे एका ठिकाणीं मिळाल्यामुळें मोठे हाणामारीचे प्रसंग घडून आले आहेत. इ० स० १७६० त हरिद्वार एथील मोठ्या यात्रेचा वेळीं शिवाचे नग्गे व विष्णूचे नग्गे यांचा एक लहानसा प्रसंग झाला, अथवा लढाई झाली असेंहि म्हटलें असतां किंबहुना चालेल. त्या वेळीं १८,००० लोक रणभूमीवर मरून पडले असें तेथें म्हणत असत. ही सांगितलेली संख्या विलक्षण अतिशयोक्तीनें वाढविलेली असेल, यांत संशय नाहीं, परंतु त्या लढाईत किती लोक होते याविषयींचा त्यावरून कांहींसा सुमार करितां येतो.

एका प्रकारचे शैव गोसावी आहेत, ते योगी असतात (प्रकरण ५ वें पहा.) ते, ध्यान, प्राणायाम, व दुसरीं ढोंगें करून, सायुज्यता मिळविण्याचा यत्न करितात. या पंथांतील जे अति नीच आहेत ते सृष्टिनियमांचा विरुद्ध चमत्कार आपण करून दाखवितों असा आव घालितात, आणि कित्येक तर उघड गारुडीपणाचा धंदा करून माकडें व कांहीं वाजवायाचीं वाद्यें घेऊन मुलूकभर फिरतात, आणि गारूडानें व हातचलाकीचा दुसऱ्या युक्तींनीं लोकांचीं मनें रिझवितात. दुसऱ्या एका प्रकारचे गोसावी आहेत, ते यांहून चमत्कारिक आहेत. ते आपण मोठे उत्सुक भक्त आहों असें ह्मणवितात; आणि पैक्याकरितां नाहीं परंतु आपण मोठे पुण्यवान् अशी आपली कीर्ति व्हावी म्हणून ठकविद्या चालवितात. त्यांमध्यें कांहीं आहेत ते पुष्कळ मिनिटेंपर्यंत जमिनीपासून तीन हातपर्यंत देखील उंचीवर अंतरिक्ष बसतात. त्यांचा तळहाताचा पृष्ठभाग एका कुबडीवर अलगत ठेविलेला असतो, एवढाच काय तो त्यांस दर्शनी आधार असतो, आणि त्यांचीं बोटें स्मरणी फिरविण्यांत गुंतलेलीं असतात. हे कोणत्या युक्तीनें असे बसून राहतात त्याचें अद्यापि स्पष्टीकरण झालेलें नाहीं.

(७) १ मिनिट ह्मणजे २ $\frac{1}{2}$ पळें.

गोसावी लोकांमध्यें कांहीं थोडे विद्वान् आहेत, अथवा कांहीं होऊनहि गेले आहेत; कित्येक, रीतीनें वागणारे, निरुपद्रवी, व आपल्या धर्माप्रमाणें चालणारे आहेत, व पुष्कळ निर्लज्ज, व त्रासदायक भिकारी आणि कवडीचे माल असे सर्व प्रकारचे खराब चालीचे लोक, हेहि आहेत, व या पंथांत आळशी राहून भटकावयास सांपडतें म्हणून ते यांत गेलेले आहेत. साधारण मानानें, विष्णूचे भक्त आहेत ते फार प्रतिष्ठित आहेत, व शिवाचे भक्त आहेत ते, बैराग्यांमध्यें जितके त्रासदायक गुण, त्यांहींकरून अतिशय लपेटलेले आहेत. या गोसावी लोकांचा कृति जसजशा अधिकाधिक अकटोविकट व छान्दिष्ट असतात, त्या त्या मानानें लोकांत त्यांचें मान कमी होतें; यावरून, हिंदुलोकांचा चांगल्या सारासारविचारशक्तीची तारीफ केली पाहिजे.

कांहीं वैष्णवपंथी आपल्या गोसावीगुरूंस जो मान देतात, तो किती, हें सांगितलें असतां कोणाला खरेंहि वाटणार नाहीं. बंगाल्यामध्यें आपल्या गुरूंचें माहात्म्य ईश्वराहून अधिक, व त्यांचा सत्कार ईश्वराहूनहि अधिक करणें योग्य आहे असें कांहीं लोक मानितात.

हिंदुधर्मांत सर्वसाधारण असा एक मुख्य नाहीं; त्यामुळें पुष्कळ पंथांची शिस्त ढिली झाली आहे; एकटेदुकटे बैरागी व योगी यांमध्यें कांहींच नियम राहिला नाहीं; आणि लढाऊ नग्ग्या गोसाव्यांचे जसे मेळे असतात त्यांप्रमाणें बेकायदा लोकांचे जमाव झाले आहेत.[८]

---

(८) खिस्ती लोकांमधील गोसाव्यांचा पंथांमध्यें कित्येक वेळीं याप्रमाणें ढिलाई असे, त्यामुळें त्यांचा जो मुख्य धर्माध्यक्ष पोप, त्यास व दुसऱ्या मंडळ्यांस, बंदोबस्ताकरितां, त्यांचा मंडळ्यांत हात घालावा लागे.

खिस्ती धर्माचा अवेलीस साराबत ह्मणून जे गोसावी होते, त्यांना मठ नसत, व त्यांवर कोणाची कैदहि नव्हती; ते देशभर भटकत फिरत, भिक्षेनें उदरनिर्वाह करीत आणि वारंवार सर्व प्रकारचीं दुराचरणें आचरित असत. याप्रमाणें अंदाधुंदी नवव्या शतकाचा मध्यापर्यंत चालली होती. त्या वेळीं जे सर्व आपणास गोसावी असें ह्मणवित असत, ते अमुक

त्याच कारणामुळें या गोसाव्यांचा पंथांची स्वतन्त्रता राहून ते युरोपांतील गोसाव्यांप्रमाणें धर्माधिकारी लोकांचा कबूजांत सांपडले नाहींत; आणि त्यांचा स्वतन्त्रतेमुळेंच त्यांमध्यें व ब्राह्मणांमध्यें एकविचार राहिला नाहीं. या प्रकारें जी स्पर्धा उत्पन्न झाली, तिजपासून विशेष जोखम लागण्याजोगे परिणाम झाले असते; परंतु सर्व लोकांची विद्या व धर्मशास्त्र हीं ब्राह्मणांचा हातांत असल्यामुळें जसें त्यांचें वजन दुसऱ्या हिंदूंवर पडलें आहे, तसेंच या पंथांचा लोकांवरहि पडलें आहे; कारण मनुस्मृति व आपल्या देशांतील धर्मसंबंधीं परंपरागत दंतकथा, या जेव्हां गोसावी लोकांनीं कबूल केल्या, तेव्हां त्याच लेखांचा बळानें जा ब्राह्मणांनीं आपल्या वर्णास श्रेष्ठत्वास आणिलें, त्यांची उंच पदवी त्यांस सहजच कबूल करावी लागली.

---

मठाचे सम्प्रदायी असें त्यांजकडून सक्तीनें ठरावून घेण्यांत आलें होतें. मठांतील सम्प्रदायीहि केव्हां केव्हां वर सांगितल्याप्रमाणें दुर्व्रात्यपणा करित असत; शेवटीं मुख्य धर्माध्यक्षांनीं सत्तेचा बळानें त्यांचा बंदोबस्त केला. ख्रिस्ती लोकांमध्येंहि हिंदूंप्रमाणेंच अनावर रीतीनें नवनवे पंथ होत असत. शेवटीं इ० स० १२१५ त तिसरा इनोसेंट या नावाचा पोपानें नवे पंथ होणें बंद केलें.

अलीकडचा काळांतहि जेसुइट नावाचे ख्रिस्ती गोसावी पुष्कळ व्यापार करित असत, आणि त्यांचा पंथ मोडून टाकण्यास हेंच एक कारण अनुकूळ पडलें. मागील शतका इतक्यांहि अलीकडील काळांत अति कठीण पंथांमधीलहि कांहीं पंथांचे लोक आपल्या मेळ्यांत एका प्रकारचे सम्प्रदायी घेत असत. ते कांहीं शपथा घेत, व गोसाव्यांचा पोषाक करीत; परंतु त्यांस प्रपंचांत राहण्याची व धंदा करण्याची परवानगी असे; लग्न झालेल्या लोकांचीहि यांत बगळ केलेली नव्हती.

# प्रकरण दुसरें.

## राज्यरीतींत फेरफार.

मनूनें जी राज्यरीति वर्णिली आहे, तिजमध्यें, आणि अर्वाचीन काळचा हिंदूंचा राज्यरीतीमध्यें, तफावत आहे. ही तफावत मुद्दाम फेरफार केल्यामुळें विशेष झाली असें नाहीं; परंतु त्या प्राचीन स्मृतिकारानें जी पध्दत शिस्तवार घालून दिली होती ती ढिली पडल्यामुळें असें झालें आहे; आणि असेंहि दिसतें, कीं मनूचा शिस्तीप्रमाणें अगदीं बरोबर वहिवाट अशी कदाचित् कोणत्याहि राज्यामध्यें कधींहि चालू नव्हती.

कारभार.

पूर्वींप्रमाणें अमुकच प्रधान व नियमित मंत्र्यांची सभा, हीं साम्प्रत राजाजवळ नसतात. त्यांचा ऐवजीं त्याचा हाताखालीं निरनिराळ्या खात्यांचे मुख्य असतात, त्यांस व आपल्या मुख्य प्रधानास जा गोष्टी प्रत्येकाचा विशेष भागाप्रकरणीं असतील त्यांविषयीं तो प्रसंगवशात् मसलत विचारितो.

देशाचे महसूली विभाग.

दशग्रामाधिपति, शतग्रामाधिपति, व सहस्रग्रामाधिपति, असे जे देशाचे महसूली विभाग मनुस्मृतींत सांगितले आहेत,[1] त्यांचा थोडथोड्या खुणा अद्यापि सांपडतात, व त्या विशेषेंकरून दक्षिणेंत आढळतात; आतां हे सर्व विभाग तसेचातसेच राहिले

---

(१) महसूलाचा वरील हकीकतीप्रकरणीं जा टीपा घालावयाचा त्यांतील पुष्कळ टीपा लांबट आहेत, आणि हा विषय साधारण रीतीनें समजण्यास त्यांचें कांहीं कारण नाहीं; यास्तव मी त्या पुरवणी अंक ५ यांत घालून त्यांची जेथें जेथें अपेक्षा होती, तेथें तेथें मूळग्रंथांत अ, ब, क, ड, इ० साङ्केतिक अक्षरें घातलीं आहेत.

आहेत असें नाहीं; परंतु त्यांतून परगणा ह्मणून जो विभाग राहिला आहे तो बहुधा पूर्वींचा प्रमाणेंच आहे, आणि तो शंभर गांवांचा अधिकाऱ्याचा मुलूकास मिळता आहे. त्या त्या देशाचा विभागांमध्यें पूर्वींचा शिस्तीपैकीं अम्मलदारहि अद्यापि राखलेले आहेत, व त्यांस जमीनी व कांहीं हक्क पोंचतात; परंतु आतां सरकारचा बंदोबस्ताचा कांहीं कारभार त्यांजकडे नाहीं, जमीनीसंबंधीं दफ़्तर बाळगण्याचें काम मात्र त्यांजकडे आहे. (अ). मुसलमानांनीं देश जिंकून घेतल्यावर हे अम्मलदार माजी पडले असें साधारण अनुमान करितात; परंतु जशा सर्व हिंदूंचा गोष्टी वंशपरंपरेनें चालतात, त्याप्रमाणें हे हुद्देहि वंशपरंपरेचे होऊन गेले, आणि वारसांत विभक्त होण्यास पात्र झाले; त्यामुळें जा कारणांसाठीं हे हुद्दे केले तीं पार पाडण्यास हे हुद्दे उपयोगीं पडावयाचे नाहींत असें सर्व हिंदु व मुसलमान राजांस वाटूं लागून, आपणास भरवसा ठेवितां येई असे स्वतः पसंद केलेले अम्मलदार त्यांचा जागीं नेमण्याची अवश्यकता त्यांस वाटली असावी.

साम्प्रतकाळीं हिंदूंचाहि मुलूकाचे विभाग होऊन लहानमोठीं राज्यें झालीं आहेत, आणि जशी जरूर लागल्ये, तसे त्यांचेहि पुनः विभाग करिताहेत. राज्यांतील मुख्य प्रान्तांचे सुभेदार राजा नेमतो, व प्रत्येक सुभेदार आपल्या हाताखालचा प्रदेशांचे मुतालिक नेमतो.

साम्प्रत कारभाराचीं सर्व अंगें एका सुभेदारांतच असतात; मनूचा वेळीं जसे लक्ष्करी विभाग होते तसे आतां नाहींत, आणि इनसाफाचीं कोर्टें, असल्यास, राजधानींत मात्र आहेत, बाकी कोठें नाहींत.

इतके सर्व फेरफार झाले त्यांत गांवक्यांची स्थिति मात्र एकसारखी राहिली आहे. या गांवक्या, हे अविनाशी कण आहेत; यांपासून हिंदुस्थानांतील अति विस्तृत राज्यरूप घट झाले आहेत.

जा लहान मोठ्या नियमित जाग्यांत लोकांचा एक समाज राहतो त्या जाग्यास गांवकी ह्मणावें. तिचा हद्दी बराबर लावून दिलेल्या असतात, व त्यांविषयीं लोक मोठ्या दक्षतेनें टपत असतात. गांवकींत सर्व प्रकारचा जमीनी असतातः कांहीं लागवडीखालीं असतात; कांहीं ओसाड टाकलेल्या असतात; कांहीं पिकास येण्याजोग्या असून अद्यापि कधींहि पिकलेल्या नाहींत अशा असतात; व कित्येकांत कांहीं उत्पन्न व्हावयाचें नाहीं अशा असतात. या जमीनींचे तुकडे पाडिलेले असतात, आणि जशा एकंदर गांवकीचा हद्दी तंजवीजेनें आंखलेल्या असतात, त्याचप्रमाणें या तुकड्यांचाहि असतात; आणि प्रत्येक जमीनीचें नाव, तिचा मकदूर, तिचें क्षेत्रफळ, व तिचा मालक, यांची नोंदणी गांवकीचा दफ्तरांत तफ्सीलवार असत्ये. सर्व गांवक्यांचे लोक आपल्या गांवांचा हद्दींत जमतात; हिंदुस्थानाचा पुष्कळ भागांत या गांवांस तटबंदी असत्ये, अथवा गांवास आश्रयाकरितां जवळ एक लहानशी गढी किंवा बालेकिल्ला असतो.

गांवकीचें वर्णन.

प्रत्येक गांवकी आपआपले आंतील कारभार चालवित्ये; जो महसूल सरकारास द्यावयाचा, तो गांवांतील लोकांपासून वसूल करित्ये, आणि पुरी रकम भरणा करण्याचें जोखम एकंदर गांवकीवर असतें. गांवचा हद्दींतील गुन्हेगार लोकांचा बंदोबस्त गांवकीकडून ठेविला जातो, व तितक्या जाग्यांत कांहीं माल चोरीस गेल्यास त्याची जबाबदारी गांवकीवर असत्ये. हलक्या गुन्ह्याबद्दल शिक्षा करणें, व कोणत्याहि कज्जांचा प्रथमतः निवाडा ठरवणें एवढ्या बाबदींत गांवांतील लोकांचा इनसाफ गांवकीकडून होतो. गांवचे तट व देवालयें दुरुस्त करणें, गांवकीकडील होमांचा व धर्मादायांचा खर्च चालविणें, व तसाच उत्साहांचा वेळीं कांहीं धर्मसंबंधीं क्रिया करण्यास व कांहीं खेळ करण्यास खर्च लागेल तो करणें, हे गांवांतील

गांवकीचे हक्क.

सर्व खर्च करण्यास पैका जमविण्याकरितां गांवकीकडून लोकांवर पट्टी बसत्ये.

गांवकीचीं वर सांगितलेलीं सगळीं कामें, व दुसरीं गांवचा लोकांचा स्थितीस योग्य अशीं नाना प्रकारचीं कामें, हीं करण्यास अवश्य असावे तितके गांवकीकडे अम्मलदार असतात. हें गांवकीचें एकंदर खटलें सरकारचा अगदीं हुकमतींत असतें; तथापि पुष्कळ प्रकारें पाहिली असतां, प्रत्येक गांवकी ही एक चांगलें रचलेलें लोकसत्ताक राज्यच आहे, व ही स्वतांच पुरी लोकसत्ताक असून हिला बाहेरचा साधनांची जरूर नाहीं. या गांवकीची स्वतन्त्रता व तिजबराबरील हक्क, हे राजांनीं पुष्कळ वेळा मोडिले आहेत, तथापि कोणीहि अजीं नाकबूल असे केले नाहींत. राजा जुलूमी असला, तर यांचा योगानें रयतेचा कांहींसा बचाव होतो, आणि समयीं जेव्हां एकंदर देशांतील राज्याचा नाश होतो, तेव्हांहि गांवकीचा हद्दींत कांहींसा बंदोबस्त राहतो.

सर चार्लूस मेट्क्योफ् याचा एक लेख आहे, त्यांतून खालीं लिहिलेला वेंचा उतरून घेतला आहे; कारण त्याचा भाषेंत भारदस्तपणा असून लोकांत त्या पुरुषाचा बोलण्याचें वजनहि आहे. तो असें ह्मणतो कीं :— "प्रत्येक गांवचा लोकांचे जे समुदाय तीं लहानशीं लोकसत्ताक राज्येंच होत; त्यांस जें कांहीं पाहिजे, तें बहुतकरून त्यांजवळ आपसांत असतें, आणि, बाहेरील संबंधांचा तत्त्वानें तीं बहुतकरून नसतात. जेथें दुसरा कोणताच बंदोबस्त टिकत नाहीं, तेथें हे समुदाय टिकतात असें दिसतें: वंशांमागून वंश धुळीस मिळाले; घालमेलींमागून घालमेली झाल्या; हिंदु, पठाण, मोगल, मराठे, सीक, व इंग्लिश, हे सर्व एकामागून एक सत्ताधीश झाले; परंतु हे गांवकीचे समुदाय तसेच राहिले आहेत. शत्रु आला असतां, त्या अडचणीचा वेळीं

(२) हा एके वेळीं हिंदुस्थानाचा गवर्नर जनरल् होता. भा० क०.

ते हत्यारबंद होऊन तटबंदी करितात: जेव्हां शत्रूची फौज देशामधून जात असल्ये, तेव्हां हे गांवोगांवचे लोक आपलीं गुरेंढोरें आपल्या गांवकुसांत जमवितात, आणि शत्रूची कांहीं खोडी न काढितां त्यास जाऊं देतात. जर त्यांसच लुटावयाचें व त्यांची दुर्दशा करावयाचें शत्रूंनीं योजिलें, आणि शत्रूंची फौज अनिवार असली, तर जे आपल्या दोस्तांचे गांव तेथून दूर असतील तेथें ते पळून जातात, आणि ती वाव्हटळ नाहींशी झाली ह्मणजे परत येऊन आपले धंदे करूं लागतात. जरी एका प्रदेशांत पुष्कळ वर्षेपर्यंत एकसारखी लुटालूट व कतल चालून गांवांत वस्ती होऊं शकत नसली, तरी इतकेंहि झालें असतां स्वस्थपणीं सत्ता चालविण्याचा वेळ जेव्हां पुनः येतो, तेव्हां ते चोहोंकडे पसरलेले गांवकरी पुनः परत येतात. एका पिढीचे लोक नाहींसे झाले, तरी पुढल्या पिढीचे लोक परत येतातच. मुलगे आपआपल्या बापांचा जागा घेतात; जेव्हां गांवची वस्ती मोडून लोकांस गांवांतून पळून जावें लागलें होतें, तेव्हांचे लोक जा ठिकाणीं राहत असत त्याच चतुःसीमेंत राहतात, आणि तेच घरटे, आणि तींच शेतेंभातें, हीं त्यांचे वंशज पुनः घेतात; तशांत कांहीं हलकें कारण असलें, तर ते गांव सोडून जावयाचे नाहींत; कारण पुष्कळ ठिकाणीं बखेड्याचा व घालमेलीचा वेळीं ते आपली जागा धरून बसले आहेत, आणि लूट व जुलूम करणाऱ्या शत्रूंस हटवून आपली फत्ते करण्याजोगेहि कितीएक ठिकाणीं हे बळकट झाले आहेत. या गांवकीचा लोकांचा जमावांतील प्रत्येक जमाव हें एक स्वतः लहानसें राज्यच झालें आहे; आणि हिंदुस्थानांत जा राज्यांचा घडामोडी व उलटापालटी झाल्या तितक्या सोसून त्यांतून जो लोकांचा बचाव झाला, तो त्या सर्वांचा कटाव असल्यामुळें झाला आहे; त्याशिवाय दुसरें विशेष सबळ कारण होतें असें मला वाटत नाहीं. तसेच हे जमाव त्या लोकांचा सुखास, व मोकळीक व स्वतंत्रता, यांचा जो त्यांस बराच

उपभोग मिळतो, त्यास, मोठे साधनीभूत झाले आहेत. ”

जेथें गांवांत एक मुख्य असतो, तो गांवकीचा अगदीं साधा प्रकार होय (ब). हा मुख्य, फकत राजाचा कारभारी, असा त्याविषयीं मनुस्मृतींत लेख आहे, व राजाचा मनांत येईल तेव्हां तो त्यास काढूंहि शकत असेल. हा मुख्याचा हुद्दा साम्प्रत वतनी झाला आहे, आणि जरी अद्यापि, हा मुख्य ह्मणजे पाटील, हा राजाचा चाकर असें मानितात, तरी वास्तविक पाहतां तो लोकांचा तर्फेचा कारभारी आहे. पाटीलकीचा कामास योग्य असा मनुष्य वतनदार घराण्यांतून निवडणें हें केव्हां केव्हां गांवकरी लोकांचा हातांत असतें, परंतु बहुतकरून ती नेमणूक सरकारचाच हातांत असत्ये; तथापि जर त्यावर दोघांचाहि भरवसा असला तरच त्यापासून लोकांस अथवा सरकारास उपयोग होतो. त्याकडेस कांहीं जमीन असत्ये व शिवाय त्यास सरकारांतून वार्षिकी वेतन असतें; परंतु त्यास कांहीं बाबी लोकांकडून मिळतात, ती त्याची मुख्य मिळकत आहे. तो पाटील आणि त्याचा गांव हीं दोन्हीं एकच समजतात; ती एथवर कीं, सर्व गांवाचा कबुलातीबदल त्यास जातीनें जबाबदार धरितात, आणि कोठें महसूलास अटकाव झाला असतां, अथवा महसूल देणें राहिला असतां त्यास तुरुंगांत टाकितात.

*एक मुख्याचा हातून गांवकीचा कारभार.*

सरकारास वर्षाची जमाबंदी किती द्यावयाची तिचा बंदोबस्त पाटील सरकाराशीं करितो, आणि गांवकरी लोकांकडेस जितकी जमीन असेल त्याप्रमाणें, व धान्याची अगर ज्या प्रकारची असेल त्या मालकीप्रमाणें, कोणी किती वसूल द्यावा तें ठरावून देतो. त्याप्रमाणेंच ज्या जमीनींचा वाहणारा मुकरर नाहीं, त्या तो मक्त्यानें लावितो; शेतकीचा कामास पाटाचें पाणी वांटून देतो, तंटे मिटवितो, गुन्हेगार लोक पकडतो, आणि त्यांस

*पाटीलाचीं कामें.*

परगण्याचा सरकारी कचेरीस पाठवितो; सारांश याप्रमाणें तो गांवसंबंधीं सरकारचीं सर्व कामें उठवितो.

हें सर्व काम तो प्रसिद्धपणें त्या कामाकरितां नेमलेल्या जागीं बसून ( ह्मणजे चावडीवर ) करितो, आणि जा गोष्टींत सर्व लोकांचें हिताहित असेल, त्या सर्व प्रकरणीं गांवकरी लोकांशीं मोकळेपणानें बोलून चालून त्यांचा सल्ल्यानें काम होतें. दिवाणी कज्जांमध्यें पाटीलाचा मदतीस पंच असतात; त्यांची नेमणूक पक्षकार करितात, अथवा तो स्वतः करितो. त्याचा हुद्यामुळें सर्व प्रान्तांतील लोकांत त्याची पुष्कळ प्रतिष्ठा असल्ये, आणि स्वतांचा गांवांतहि त्याचें वजन बरेंच असतें. पाटीलकीचें वतन फरोक्त करतां येतें, परंतु तें मालकानें अगदीं सोडून दिलें असें क्वचितूच घडतें. समयीं पाटीलकीसंबंधीं जे सर्व हांशीलाचे लाभ व्हावयाचे ते विकण्याचें जेव्हां त्यास अगत्य पडों, तेव्हां तो, गांवकीचा कांहीं नियमित कृत्यांत पुढारीपणाचे हक्क व दुसरे कांहीं नामधारी मानपान, हे आपणाकडे राखून ठेवितो.

गांवाकडील लोकांची नेमणूक; कुळकरणी, ठाणगा इत्यादि.

पाटीलाचा मदतीस दुसरेहि निरनिराळे अम्मलदार असतात, त्यांत कुळकरणी व ठाणगा हे मुख्य होत.

कुळकरणी ( क ) हा गांवचें दफ्तर ठेवितोः त्यांत गांवाकडील जमीनीचा प्रतींचा भरपूर तफसील, व ती जमीन साम्प्रत वाहणारे असतील त्यांचीं व पूर्वींचा वाहणारांचीं नावें, त्या जमीनीचा धारा, व तिचा मालकीसंबंधीं दुसऱ्या शर्ती, हीं सर्व त्यांत असतात. तो गांवकीचे हिशेब बाळगतो, व प्रत्येक गांववाल्याचे सरकाराबरोबरील व आपसांतीलहि हिशेब ठेवितो. त्याप्रमाणेंच तो त्यांचीं खतेंपत्रें लिहिण्याचें काम करितो, आणि जांस जरूर लागेल, त्यांचीं खासगी पत्रेंहि लिहितो. त्यास वेतनाबद्दल लोकांकडून हक्क मिळतात, व कोठें कोठें

सरकारांतून नक्त नेमणूक अथवा जमीन तोडून दिलेली असत्ये.

ठाणगा ( ड ) हा, गांवचा सीमा व लोकांचा जमीनींचा सीमा यांचा रक्षक होय. तो शेतें राखितो, सरकारी वाटाड्या व जासूदहि तोच असतो, आणि पाटीलाचा खालीं गुन्ह्यांचा बंदोबस्तासंबंधीं मुख्य अम्मलदार तो आहे. या शेवटील हुद्यानें तो रात्रीचा पाहरा करितो; गांवांत आले कोण व गेले कोण या सर्वांचा तपास ठेवितो; गांवांतील प्रत्येक मनुष्याची चाल कशी आहे तिची माहितगारी करून ठेवितो; आणि गांवामध्यें कोणाजवळ चोरीचा माल असल्यास त्याचा पत्ता लावून देणें हें काम त्याचें आहे, अथवा आपल्या गांवाची सीमा उलटून जाईपर्यंत त्याणें त्या चोराचा माग लावून दिला पाहिजे, ह्मणजे मग त्या चोरीचें जोखम जवळचा शेजाऱ्यावर जातें.

हीं सर्व कामें एका मनुष्याचा शक्तीबाहेर आहेत असें दिसेल; परंतु या कामांसंबंधीं जें वेतन असतें तें एका कुटुंबाकडेस लावून दिलेलें असतें, त्यामुळें त्या कुटुंबांतील सर्व लोक ती चाकरी बजावण्यास मदत करितात.[३] ठाणगे हे हमेशा नीच जातीचे लोक असतात.

गांवचा सराफ, हाहि पाटीलाचा एक मदतनीस असाच समजला पाहिजे; कारण जो पैका वसूल येतो तो पारखून घेणें हें त्याचें एक काम आहे, व गांवचा सोनारहि तोच असतो. यांशिवाय गांवकीचे दुसरेहि कामदार असतात; ते बारा असतात असें साधारण एतद्देशीय लोकांचें मत आहे, व त्यांस

( ३ ) वर सांगितल्याप्रमाणें सर्वांकडे सामइक काम असल्यामुळें फायदा होतो, असा या हुद्याचा कामांत मात्र. बाकीचांत हिसेदार पाळीपाळीनें काम करितात. अशा शिस्तीपासून कुळकरण्याचा कामांत जी खराबी होत्ये ती अगदीं उघड दिसत्ये; कारण कामगार वारंवार बदलल्यामुळें कागदपत्र नाहींसे होतात अथवा गोंधळून जातात; आणि कामांत पुरा वाकब होण्याजोगा कोणी फार वेळ राहत नाहीं.

देशभाषेंत ( बारा बलूतदार हें ) नावहि तसेंच आहे; परंतु वास्तविक पाहूं जातां ही संख्या निरनिराळ्या गांवांत निरनिराळी असत्ये, आणि तींतील कामदार हेहि हमेशा सारखे नसतात.

उपाध्या व जोशी, ( यांतून एक बहुधा शाळागुरुहि असतो, ) व शिवाय लोहार, सुतार, हजाम, कुंभार, आणि चाह्मार, हे सर्वहि बहुधा नसतात असें नाहीं. शिपी, परीट, वैद्य, वाजंत्री, भाट, व दुसरे कित्येक हे तितक्या पुष्कळ ठिकाणीं असतात असें नाहीं. दर एक गांवास एक कलावंतीण, अशी दक्षिणहिंदुस्थानांत मात्र आहे असें दिसतें.

भाट हा पद्यात्मक कवनें ह्मणतो, आणि नवी कविता करितो. कांहीं ठिकाणीं तरी त्याचें मुख्य काम गांवची वंशावळी ठेवण्याचें आहे.[४] वर सांगितलेले गांवचे कारभारी व कारीगर यांस हक्क अथवा बलूतीं करून दिलेलीं असतात. तीं कोठें कोठें नकूदी असतात, परंतु बहुतकरून धान्याचा दर मापास एक किंवा दोन पसे या मानानें ऐनजिन्नसावर असतात.

गांवकीचा कारभार.

जेव्हां जमीन वाहणार व राजा यांचा मध्यें दुसरा कोणी नसतो, तेव्हां गांवचा कारभाराची पद्धत वर सांगितल्याप्रमाणें असत्ये; परंतु अर्ध्या हिंदुस्थानांत, व त्यांतूनहि उत्तरेकडील व अगदीं दक्षिणेकडील प्रदेशांत, प्रत्येक गांवांत एक समुदाय असतो तो त्या गांवकीचा ठिकाणीं मानिला जातो, अथवा तो समुदाय तीच गांवकी, असें म्हटलें असतां चालेल: कारण तेथील बाकीचे लोक हे त्यांतील लोकांचीं कुळें असतात. (इ) त्या समुदायांतील जे लोक ते जमीनीचे केवळ धनीच असें बहुतेक मानितात, आणि जेथें जेथें ते आहेत तेथें तेथें त्यांचें जमीनीवरील

( ४ ) हिंदुस्थानांत मिळकतीचा वारशाचें भारूड मोठें आहे, आणि शरीरसंबंधाविषयीं नियमहि घोंटाळलेले आहेत; त्यामुळें इंग्लंडांतील वंशावळ्या राखण्यापेक्षां एथील वंशावळ्या राखणें फार कठीण आहे.

स्वत्व वतनी व दुसऱ्यास विकत अथवा इतर रीतीनें देण्याजोगें आहे, असें सर्वांचें मत आहे; परंतु या लोकांचा मालकीचा हक्काचा पक्केपणा संशयित आहे, यास्तव त्यांचें जें तद्देशीय द्व्यर्थ नाव आहे तें राखून, त्यांस गांवांतील "जमीनदार" (फ) असें ह्मटलें असतां सोयीवार पडेल.

जेथें असे (जमीनदार) लोक असतात, त्या गांवांत समयीं वर सांगितल्याप्रमाणें एक मुख्य कारभार चालवितो; परंतु याहून पुष्कळ ठिकाणीं असें होत असतें कीं या लोकांचा कुटुंबांचीं (पुष्कळ) घराणीं असतात, त्यांत प्रत्येकांत एक मुख्य असतो (अथवा मूळीं जमीनदारांचीं कुटुंबें पुष्कळ असल्यास प्रत्येक कुटुंबाचा एक मुख्य असतो), तो त्या घराण्याचा (अथवा कुटुंबाचा) आंतील कारभार पाहतो, आणि दुसऱ्या घराण्यांचा (अथवा कुटुंबांचा) मुख्यांशीं मिळून गांवचा एकंदरांतील कारभार पाहतो.

याप्रमाणें त्या मुख्यांची जी मंडळी जमल्ये तिचा हुद्दा जसा इतर ठिकाणीं एकल्या पाटीलाचा असतो तसाच असतो; आणि त्या हुद्याबद्दल सरकारांतून व गांवकऱ्यांकडून जें वेतन पोंचतें तें त्या मंडळींतील लोक आपसांत वांटून घेतात; जितके गांवाचे भाग असतील तितके हे मुख्य असतात. परंतु आठ किंवा दहा यांहून जास्त असतात असे विरळा. प्रत्येक भागांत जें अगदीं वडील घराणें असेल, त्यांतून त्याचा मुख्य नेमितात; परंतु तो बाकीचा जमीनदारांहून विशेष श्रीमान् असतो अथवा दुसऱ्या रीतीनें प्रसिद्धीस आलेला असतो असें नाहीं.

गांवचा लोकांचा प्रती.

जा गांवांमध्यें गांवचे जमीनदार असतात, तेथें ते पहिल्या प्रतीचे लोक असें समजावें; परंतु त्यांशिवाय त्यांहून कमी प्रतीचे असे दुसरे चार वर्ग असतात, जसें:— २. मिरासदार; ३. उपरी; ४. मजूर; ५. बाजाराचा सोईकरितां गांवांत वस्ती धरून राहिलेले दुकानदार.

जे एक किंवा अनेक लोक एका गांवांत प्रथम वसाहात करून राहिले होते, त्यांपासून त्या गांवढ्यांतील सर्व जमीनदार झाले आहेत; आणि जा लोकांनीं मूळच्या घराण्यांतील लोकांपासून त्यांचे हक्क विकत घेतले आहेत, अथवा दुसऱ्या रीतीनें ते हक्क संपादन केले आहेत, तेवढे लोक मात्र वर सांगितलेल्या नियमास अपवाद आहेत, असें लोकांचें मत आहे. आज दिवसपर्यंत लहान लहान खेड्यांतून पुष्कळ ठिकाणीं एकाच जमीनदाराचा वंश आहे, व मोठ्या गांवांतूनहि असे वंश पुष्कळ नाहींत; (ग) परंतु प्रत्येक वंशाचे पुष्कळ फांटे फुटून, उपरी लोक अथवा मजूर यांतून एकाचाहि मदतीशिवाय सर्व शेतकीचें कामहि जमीनदार लोकच करितात, असें थोडक्या ठिकाणीं आहे असें नाहीं: या गोष्टीवरून वरील अटकळीस बळकटी येत्ये.

गांवढ्यांतील जमीनदार.

वर सांगितलेल्या जमीनदारांचे हक्क सामइक असतात, आणि जरी बहुतकरून हमेशा त्यांचे थोडेबहुत हिसे पडलेले असतात, तरी ते आपले तनखे अगदीं साफ तोडित नाहींत. यास उदाहरणः— कोणी जमीनदार आपले हक्क विकूं अथवा गहाण ठेवूं शकतो; परंतु तसें करण्यापूर्वीं त्याणें गांवचा दुसऱ्या लोकांचा कबूलपणा घेतला पाहिजे, आणि जो त्याचे हक्क विकत घेईल, त्याणें त्याचा स्थानीं होऊन गांवसंबंधीं खर्चाचा वगैरे बोजाचा पतकार घेतला पाहिजे. जर एका घराण्याचा निर्वंश झाला, तर त्याचा हिसा पुनः सामइक भांडवलांत येतो.

कित्येक गांवांमध्यें जमीनदारलोक हे आपले हक्क सामइकच ठेवितात, आणि सर्व जण एकंदरांकरितां मेहनत करून सरकारचें मागणें देऊन निकें उत्पन्न राहील तें वांटून घेतात. कित्येक ठिकाणीं लागवड जमीनीचें वांटप करून घेतात, परंतु तसें केलें तथापि सरकारचा देण्याचें जोखम जतीमतीनें सर्वांवर असतें; केव्हां केव्हां ते आपले हिसे

फेरावारीनें खातात. दुसऱ्या कितीएक गांवांतून लागवड जमीनीचें पक्कें वांटप करितात, आणि पडित जमीन व दुसरे कांहीं हक्क हीं मात्र सामइक ठेवितात; परंतु प्रसंगवशात् ती पडित जमीनहि वांटून घेतात. जमीनीचे हिसे पाडिल्ये वेळीं प्रत्येक जमीनदारास एकाच ठिकाणीं एकाच प्रकारचा धडा वांटणीस येतो असें बहुधा होत नाहीं; परंतु प्रत्येकास सर्व प्रकारचा जमीनीपैकीं एकेक वांटा ठरवितात, तेणेंकरून प्रत्येकास एका ठिकाणीं चांगल्या जमीनीचा एक तुकडा, दुसऱ्या ठिकाणीं खराबीचा एक तुकडा, तिसऱ्या ठिकाणीं कुरणाचा जमीनीचा एक तुकडा, आणि याप्रमाणें जितक्या जितक्या जातीचा जमीनी त्या गांवांत असतील त्यांचे हिसे मिळतात ( गअ. )

या मुलूकाचा निरनिराळ्या भागांत जमीनदार लोकांचे हक्क नाना प्रकारचे आहेत. जेथें त्यांची मालकी पुरी आहे, तेथें त्यांणीं सरकारास आपल्या जमीनींबदल अमुक धारा द्यावा आणि त्या वाहव्या, अशी कायम यत्ता ठराविलेली आहे, अथवा त्यांचा जमीनी मुळींच माफीचा आहेत. जेथें त्यांजकडे अगदीं थोडी मालकी असल्ये, तेथें त्यांजकडेस कांहीं पोकळ मानपान राखिलेले असतात, तेवढाच काय तो त्यांमध्यें आणि इतर गांवकऱ्यांमध्यें भेद असतो ( ह ).

जमीनदार लोक जीव तोडून आपल्या जमीनीवर राहतात; ही त्यांची प्रीति पाहून इतर शेतकरी लोक जितके कर देण्यास नाखुश असतात, तितके जरब कर सरकार यांवर बसविते. अशीं पुष्कळ उदाहरणें घडून आलीं आहेत. असें असतांहि त्या लोकांस कांहीं तरी प्रत्यक्ष अथवा पुढें होणारा फायदा असतो. कारण जा गांवढ्यांमधून जमीनदार लोक आहेत, तेथें त्यांचे हक्क प्रसंगवशात् विकत नाहींत अथवा गहाण ठेविले जात नाहींत, असा कोणचाहि प्रदेश नाहीं. जा प्रदेशांत ते असतात, तेथील लोक हमेशा त्यांचा मान राखितात; हा त्यांचा फायदा हमेशा होत असतो. जरी कोणी आपल्या हातांनीं कष्ट करणारा असा जमीनदार असला, तरी त्या

मानाचा योगानें लोक त्याशीं शरीरसंबंध करितात; आणि जरी दुसरा द्रव्यवान्, व त्या जमीनदाराप्रमाणेंच चांगल्या जातीचा, परंतु कमी प्रतीचा गृहस्थ असेल, तर त्याशीं करित नाहींत.

गांवचा जमीनदार लोकांची मालकी त्यांचा जमीनीवर आहे, ही कल्पना लोकांचा मनांत इतकी भरून गेली आहे, कीं जेव्हां एकाद्यास सरकारचा धारा देण्याचें सामर्थ्य नाहींसें होऊन त्यास आपली जमीन सोडून द्यावी लागल्ये, तेव्हां ती जमीन सोडल्यावरहि त्यास मालक असें समजतात; तसेंच त्याचें नाव गांवचा पटावर राहतें, व तीन पिढ्या, किंवा १०० वर्षेपर्यंत, जर त्याचा स्थितींत कांहीं बदल होऊन त्यास आपली जमीन घेण्याची इच्छा होईल तर वारसा सांगण्याचा हक त्यास असतो.

तमीळदेशांत व उत्तरहिंदुस्थानांत कोणी जमीनदारानें वसूल न दिल्यामुळें त्यास सरकारानें काढून टाकिलें आणि नवा जमीन कसणार लावून दिला तर तो कसणारा त्या काढलेल्या जमीनदारास मालकाची दस्तूरी आपल्या इच्छेनें देतो असेंहि कोठें कोठें होतें.

सर्व गांवांमधून दोन प्रकारचीं कुळें असतात; जेथें जमीनदार असतात, तेथें तीं त्यांपासून साऱ्यानें जमीन करितात, व जेथें जमीनदार नसतात तेथें सरकारापासून करितात. या कुळांस साधारण रीतीनें रयत असें ह्मणतात ( ऐ ); आणि यांचा दोन प्रति आहेत उपरी आणि मिरासदार.

मिरासदार कुळें.

जे लोक राहत्या गांवांतील जमीनी कसतात, आणि त्या जमीनी त्यांचा हयातीपर्यंत त्यांजकडे राहून पुढें त्यांचा मुलांस मिळतात, ते लोक मिरासदार होत. ( के )

मिरासदार व गांवचे जमीनदार हे एकच असा गोंधळ पुष्कळ ठिकाणीं झाला आहे; परंतु या दोहोंमध्यें भेद

असून, जेथें मालकाची दस्तूरी ह्मणूनी निराळा हक्क आहे, तेथें तो सर्वत्र स्पष्ट रीतीनें दिसतो; जमीनदाराशिवाय कोणत्याहि कुळास त्या दस्तूरीचा हिसा मिळत नाहीं.

पुष्कळांचें असें मत आहे, कीं मिरासदार हे जमीनीचे खरे मालक आहेत, व दुसऱ्यांचें असें ह्मणणें आहे, कीं हे केवळ सुखवस्तु राहणारे आहेत. आतां मिरासदारांस स्वतः जमीन वहिवाटण्याचा कांहीं हक्क आहे, परंतु त्यांचा जमीनी विकण्याचा त्यांना हक्क नाहीं, या दोहों यत्तांस सर्वांचें सम्मत आहे.

आतां जरी मिरासदारांस जमीन वापरण्याचा हक्क आहे असें सर्व कबूल करितात, तरी जमीनदारांस आपल्या जमीनीचा धारा वाढविण्याचा हक्क आहे त्या योगानें तो वहिवाटण्याचा हक्क व्यर्थ होतो असा कांहीं लोक वाद घेतात; आणि दुसरे असे भांडतात, कीं जमीनीचा धाऱ्याची इतकी यत्ता ठरलेली आहे कीं आसपासचा प्रदेशांत जा दराची शिस्त असेल त्याहून जास्त धारा कोणी घेऊं नये, असें आहे.

आतां जेथपर्यंत सरकारचा मागण्याची यत्ता होती तेथपर्यंत मिरासदारांचा हक्क स्पष्ट होता; परंतु जेव्हां सरकारची जमाबंदी मनमानेल तशी होऊं लागली, तेव्हां तो हक्कहि पोकळ व बेफायद्याचा असा होऊन गेला; ही गोष्ट खरी आहे असें संभवतें.

साम्प्रत जमीनदारांची दृष्टि स्वहितावर असत्ये, त्यामुळें मिरासदाराचा बचाव होतो; कारण मिरासदार हा जी जमीन कशित असतो, ती त्याचा वंशानें पुष्कळ दिवसपर्यंत भोगिली असत्ये व जा गांवांत त्याचें घर असतें, तेथेंच ती जमीन असत्ये, त्यामुळें तो परक्यापेक्षां अधिक धारा देतो; परंतु जर जमीनदारानें त्यास अडविलें, तर त्याहूनहि हलक्या दरानें दुसऱ्या गांवांत त्यास थोड्या मुदतीचा करारानें सहज जमीन मिळूं शकत्ये. (ल)

गांवढ्यांतील पूर्वींचा जमीनदार लोकांवर जुलूम झाल्यामुळें जेरीस येऊन त्यांतून शेष राहिले ते मिरासदार झाले आहेत, असें कांहींचें मत आहे. दुसऱ्यांचें मत असें आहे, कीं मिरासदार हे पूर्वीं उपरी होते, त्यांस फार दिवसांचा वहिवाटीवरून मिरासदारीचे हक्क मिळाले आहेत. या दोन्ही वरील अटकळी कांहीं अंशीं खऱ्या आहेत असें संभवतें; परंतु जेव्हां गांवांचा वसाहती झाल्या तेव्हां जमीनदारलोकांनीं हे हक्क त्या मिरासदारांस पुष्कळ ठिकाणीं दिले आहेत, अशी एक तिसरी अटकळ आहे, तीहि तशीच संभवत्ये.

**उपरी कुळें.**

जो मनुष्य उपरी कूळ ( म ) असतो, तो जा गांवांतील असतो तो गांव सोडून दुसऱ्या गांवांचा जमीनी कसतो. त्या लेखी अथवा आपसांत झालेल्या समजुतीचा ठरावानें वर्षाचा बोलीनें घेतलेल्या असतात. गांवांत जा अव्वल प्रतीचा जमीनी असतात त्या तेथील राहणारीं कुळें कसतात, यामुळें जा जमीनींस विशेष मागणेंकरी नाहींत, अशा हलक्या प्रतीचा जमीनी उपरीस मिळतात. या कारणास्तव व त्यास दुसऱ्याहि गोष्टी प्रतिकूळ असतात त्यामुळें, मिरासदारापेक्षां त्यास हलक्या दरानें जमीन मिळत्ये.

दुसऱ्या आणखी एका प्रतीचीं कुळें असतात; त्यांची मातबरी वर सांगितलेल्या दोहोंहून कमी आहे; तथापि त्यांची हकीकत सांगावयाजोगी आहे ( न ). हीं कुळें अशीं आहेत कीं त्यांस आपल्या ज्ञातिपरत्वें अथवा लौकिकी स्थितिपरत्वें स्वतः हातानें मेहनत करवत नाहीं, अथवा जा धंद्यांत पुरुषांपुढें यावें लागेल असा धंदा त्यांचा बायकांस होत नाहीं. या प्रतिकूळ कारणांमुळें पगारदार मजूरखोरांचा हातून त्यांस आपल्या कुशलतेचा अथवा द्रव्याचा साहाय्यानें धंदा करतां यावा इतकी सवड होण्याजोग्या हलक्या दरानें त्यांस जमीनी मिळतात. ( ओ )

मजूर.

मजूरलोकांचीं कामें व त्यांचे रोजमुरे हे सहजच पुष्कळ प्रकारचे असतात; परंतु हीं दोन्ही इतर देशांपेक्षां विशेष भिन्न आहेत असें नाहीं, ह्मणून त्यांचें वर्णन करित नाहीं.

वर सांगितलेल्या सर्व प्रकारचे लोक प्रत्येक गांवांत अवश्य असतात असें नाहीं; एकाद्या गांवांत एकाच प्रकारची वस्ती असत्ये, अथवा सर्वांची असत्ये, अथवा निरनिराळ्या मानानें असत्ये हें सर्व पुनः सांगण्याचें कारण नव्हतें परंतु सांगितलें आहे.

दुकानदार इत्यादि.

दुकानदार इत्यादि लोकांस जमीनीचें भाडें भरावें लागतें, आणि शिवाय जांचा जमीनींत ते राहतात त्यांस कांहीं कर द्यावा लागतो. फौजदारी कामांमध्यें त्यांजवर पाटीलाचा साधारण अधिकार असतो, परंतु त्याशिवाय लोकांशीं त्यांचा थोडाच संबंध असतो.

ग्रामसमुदाय ह्मणजे गांवक्या, यांची उत्पत्ति व क्षय.

हिंदुलोकांनीं जे गांव प्रथम वसविले ते सर्व वर सांगितलेल्या ग्रामसमुदायांचा हातांत होते, या गोष्टीचा संभव पुष्कळ आहे. त्यांचा वाढीचा पक्या हिल्या प्रांत जंगल तोडून शेतें पाडणें, आणि मूळचा राहणाऱ्या लोकांचा व हिंस्र जनावरांचाहि हल्ल्यांपासून आपलें संरक्षण करणें, हीं एकएकट्याचानें कामें होणें अशक्य होतें; दुसऱ्यास चाकरीस ठेवण्यास जवळ कुणगा नसे; आणि जेथें तीं कामें करणारास पुष्कळ सोयरे नसत तेथें त्यास मदतीस दोस्त बोलवावे लागत; मग ते वसाहतीपासून होणाऱ्या फायद्यांस भागीदार होत; आणि याच कारणापासून ग्रामसमुदाय झाले, व देशाचे विभाग पडून गांवक्या बनल्या.

जेथें लोकांची स्थिति नियमित झाली असत्ये, तेथें सर्वत्र बेचिराघ जमीन राजाची असत्ये, त्याप्रमाणेंच या देशांत होती असें निःसंशय दिसतें; परंतु एकदम किम्मत

घेऊन अथवा ( इतर देशांत वहिवाट आहे त्याप्रमाणें ) वर्षाचा काईम धारा ठरवून उमेदवार शेतीलोकांस ही मिळकत न देतां आपणास ऐनजिन्नस हिसा द्यावा असा ठराव राजानें करून ठेविला होता असें दिसतें. हा हिसा शेतकीचा विस्ताराप्रमाणें व जातीप्रमाणें अधिक उणा होत असे. बाकी राहिलेलें उत्पन्न वसाहत करणारांचा जमातीचें असे, परंतु आपणास स्वतः कसावयास राहून शिवाय पुष्कळ चांगली जमीन आहे असें जर त्यांचा नजरेस आलें असलें तर त्यांणीं दुसऱ्यांचा मेहनतीचा साहाय्यानें त्या जमीनीपासून आपला फायदा करून घेण्याचा यत्न केला असेल. तेव्हां जो मनुष्य सरकारचा हिसा भरून शिवाय त्या ग्रामसमुदायास हिसा देण्याचें कबूल करील, त्यास त्यांणीं ती जमीन लावून दिली असेल, कारण वर सांगितलेल्या रीतीनें फायदा करून घेण्याचा याहून दुसरा सुलभतर उपाय दिसत नव्हता. आतां जेथपर्यंत जमीन पुष्कळ होती आणि पुष्कळ गांव वाढत चालले होते, तेथपर्यंत आपणास जमीनीचा उपभोग सतत मिळावयाचा असल्याशिवाय कोणीहि जमीनीवरील रान तोडून साफ करण्यास धजला नसेल, आणि याकारणामुळें मिरासदार उत्पन्न झाले असतील. पुढें जसजशी लोकांची वृध्धि होत गेली तसतसे उपरी मजूर हे लोक मागाहून आले असतील. पुढें वारशामुळें मालमत्तेचे तुकडे होऊन वर सांगितलेली स्थिति मोडून सर्व मतीचे लोक मजूरांचा स्थितींत येण्यास सहजच पात्र झाले असतील; परंतु जेथपर्यंत पडित जमीनीची लैलूट होती, तेथपर्यंत वर सांगितलेला नियम भरपूर चालू झाला नसेल.

हें वरील कारण नसेल, तर जेथपर्यंत राजभागाची यत्ता न फिरतां एकसारखी राहील, तेथपर्यंत त्या ग्रामसमुदायांची स्थितिहि एकसारखीच राहील. जेव्हां राजा आपला कर वाढवील तेव्हां जमीनदार व मिरासदार कुळें यांचे फायदे कमी होत जातील, आणि अमुक यत्तेपलीकडे राजाचें

मागणें वाढत गेलें असल्यास, त्यांस आपली जमीन नुकसान सोसून कसावी लागली असेल; आणि जर असेंच कांहीं दिवस चाललें असलें, तर त्यांस आपल्या जमीनी सोडून उदरनिर्वाहाचीं दुसरीं साधनें शोधावीं लागलीं असतील.

मनूचा वेळीं उत्पन्नाचा एकषष्ठांशाचा मानानें लोकांवर राजाचा कर होता, त्याचें हल्लीं शिकस्त मान एक द्वितीयांशावर आलें आहे; त्यामुळें पुष्कळ ग्रामसमुदायांचा निःपात होऊन दुसऱ्यांची दुर्दशा झाली आहे. हें सर्व कां झालें याचें कारण सांगणें सुलभ आहे. जमीनदार लोकांनीं जा जमीनीचा बेदावा दिला, त्या परत सरकारास मिळाल्या आहेत.

वर सांगितलेला स्थितीचा पालटाचा प्रकार हा बराच साधारण असावा; परंतु तो सर्वत्र तसाच होता असें नाहीं. जे प्रदेश जिंकून घेत असतील, त्यांतील पूर्वींचीच लागवडीस आलेली जमीन राजाचा मालकीची होत असेल, व ती त्याचा मार्फत, त्या जमीनीचे जुने मालकच क्षेत्रदासांचा स्थितीस येऊन कशित असतील. साम्प्रतहि लोकांचा जमीनदारपणा कबूल केल्याशिवाय, गांव वसविण्याचें पतकरणाऱ्या लोकांस सरकाराकडून हमेशा जमिनी मिळत असतात. या देण्यांत नानाप्रकारचा शर्ती असतात. साधारण रीतीनें सर्व कौलांत अमुक वर्षेपर्यंत अर्जी अथवा थोडीबहुत माफी, व त्यानंतर जवळील गांवांचा शिरिस्त्याप्रमाणें वसूल द्यावा असें असतें.

वर सांगितलेल्या प्रकारांशिवाय, दुसरेहि वसाहतीचे प्रकार झाले असतील, असें, जे त्यांचे परिणाम झाले आहेत त्यांवरून, दिसतें; परंतु ते कसकसे झाले त्याचा पत्ता लावतां येत नाहीं. कानडा, मलबार, व त्रावणकोर, या प्रान्तांत एकेकट्या लोकांकडेस पुऱ्या मालकीनें जमीन आहे, तिजवर जें सरकारचें देणें आहे तें कायम ठरलेलें आहे.

जमीनीवरील उत्पन्नाचा एक द्वितीयांश हा पुरा राजभाग असें साम्प्रत म्हणतात, आणि जेथें राजा एक तृतीयांश घेतो, त्या देशावर नेमस्तच महसूल आहे असें मानितात.

जमीनीवरील सरकारी कर.

जो पिकाचा हिसा राजास मिळावयाचा तो उघड रीतीनें चढवून ही महसूलाची वाढ झाली आहे असें नाहीं; परंतु दुसऱ्या नाना प्रकारचा करांनीं व बाबींनीं झाली आहे; त्यांतून कांहीं प्रत्यक्षच जमीनीवर बसतात, आणि दुसऱ्या लांबचा अथवा जवळचा आडव्या तिडव्या मार्गानें शेतकऱ्यांस उपद्रव करितात. नांगरांवर व गुरांवर कर व याच प्रकारचे जे दुसरे कर, ते वर सांगितलेल्या पहिल्या प्रकारचे कर आहेत. कांहीं सरकारांचा कारकीर्दीत वाद्यें वाजवितात त्यांवर व विधवांशीं लग्नें लावणें त्यांवर, इत्यादिकांवर कर व घरगुती खर्चाचा पदार्थांवर नवे कर होते; हे सर्व दुसऱ्या प्रकारचे कर होत. यांशिवाय दोन्ही तऱ्हांचा मनःपूत बाबी आहेत; त्या प्रथम तूर्तातूर्त कारणांसाठीं असें सांगून बसविल्या होत्या, परंतु वहिवाटींत त्या कायम होऊन गेल्या आहेत. सर्व जमीन वहिवाटणारांचा पूर्वीचा वसूलाचा मानानें जी बाब त्यांवर बसविली आहे ती, व गांवचा व परगण्याचा अम्मलदारांचा उत्पन्नावर जी बाब बसविली आहे ती, हे वर सांगितल्या प्रकारचे कर आहेत.

जा लोकांवर हे कर बसतात ते पुरे करून देण्याची जी त्यांची शक्ति असेल ती त्या करांची मर्यादा असत्ये; शिवाय दुसरी या सरकारचा मागण्यास मर्यादा नसत्ये; त्यामुळें आपलें उत्पन्न छपावण्याचा यत्न करणें हाच काय तो गांवकरी लोकांस आपला बचाव करण्याचा उपाय असतो. या कारणास्तव ते आपलें उत्पन्न कमी सांगतात; तहसीलदारांस न समजूं देतां त्यांतून कांहीं भाग छपवून काढून नेतात; व त्याहूनहि पुष्कळ वेळा आपण कसलेली जमीन छपावतात, आणि आपले हिशेब खोटे करून ठेवितात, तेणेंकरून

फार त्रासदायक व खर्चाखालीं आणणारा असा, जमीनीची पाहणी करून, तपास केल्याशिवाय त्यांची चोरी उघडीकीस येणें अशक्य होतें. शिवाय जेथें जेथें जमीनदार लोक आहेत तेथें तेथें त्यांचे दुसरे आंतले फायदे असतात त्यांचा मानाचा तपास सरकारास क्वचितच लागतो. कांहीं लांच देऊन महसूल करणाऱ्या अम्मलदाराकडून कानाडोळा करवितात, आणि तो पैका आंतील खर्चाकडे म्हणून वसूल करून " गुप्त चाकरीकडे " खर्च घालितात. गांवकरी लोक व पुढील येणारे महसूलाचे अम्मलदार व तपासनीस हे कधींहि या खर्चाविषयीं चौकशी करित नाहींत, ही एक त्यांची आपसांत प्रतिष्ठेची यत्ता आहे.

सरकारचा वंचनेचा तुलनेस वर सांगितलेल्या प्रकारची लोक वंचना करतात, म्हणूनच जमीनीचा सोसण्याचा मकदूराची शिकस्त होईपर्यंत तिजवर उघड धारा बसविलेला असतांहि, त्या जमीनीचा सारा लोकांस मिळतो, व ती विकतां येत्ये; नाहीं तर असें झालें नसतें.

याप्रमाणें दोहीं पक्षांकडील खोडसाळपणांनीं जो गोंधळ उत्पन्न होतो, त्यांत, उत्पन्नाचा मानानें कर घ्यावयाचा हा जो नियम, तो दिसत नाहींसा होतो; आणि हिंदुस्थानांतील बहुतेक प्रदेशांत वर्षास जमाबंदी करणें ती मागील सालांचा जमाबंदीचा मुकाबल्यानें करितात, आणि ऋतूंचें मान कांहीं विलक्षण झालें असल्यास, अथवा दुसरा तूर्तातूर्त फायदा, किंवा आपत्ति झाली असल्यास, तींत जो फेरफार करणें योग्य वाटेल तो करितात.

या प्रकारचा बंदोबस्तास जेव्हां उभय पक्षींचे लोक कबूल होत नाहींत, तेव्हां त्या वर्षीं किती नक्की वसूल देण्याची त्या गांवची ताकद आहे, त्याविषयीं मुद्दाम तपास करितात. तो असा कीं, जमीनीचा मकदुराप्रमाणें (वर सांगितलेल्या रीतीनें) प्रती लावून तींत शेतकी करण्यास अनुकूलता किती आहे तें पाहतात; मग उत्पन्न करण्यास खर्च किती

लागेल तो वजा जातां शेष काय राहील त्याची अटकळ करितां येत्ये; त्यांतून कसणाराचा निर्वाहापुरतें उत्पन्न एकीकडे काढितात, आणि बाकीचें, गांवखर्च इत्यादि वजा करून, सरकारास मिळतें. बाकीचीं सर्व सामोपचाराचीं साधनें नाहींशीं झालीं, ह्मणजे शेवटचा बाणीस पिकाचे हिस्से पाडण्यावर येतें; परंतु या समजूतीचा रीतींत दगा होण्यास पुष्कळ वाटा आहेत, त्यामुळें उभयपक्षींचे लोक तिजवर बहुधा आणित नाहींत; परंतु जेथें सरकारच्या मुतालिक व गांवचे लोक, यांचा पुष्कळ दिवस संबंध वाढून एकमेकांचा परस्परांवर विश्वास बसला असेल, त्या ठिकाणीं सर्व बंदोबस्तांपेक्षां पिकाचे धडे पाडणें हें लोकांस अतिशय पसंद पडतें.

या सरकारचा अम्मलदारांचा व गांवकऱ्यांचा भांडाभांडीमध्यें जर शेतकऱ्यांस दुःसह होई असा बोजा त्यांजवर बसला, तर जमावानें एकदिल करून ते आपल्या जमीनी टाकितात, आपला गांव सोडून जातात, आणि सरकाराशीं कांहीं कबुलात करण्याचें नाकबूल करितात. मग सरकारचे अम्मलदार त्यांशीं गोडी करितात व भीति दाखवितात व जरूर असेल तेथें त्यांचा ह्मणण्याप्रमाणें कांहीं कबूलहि करितात. जर त्यांणीं सक्ती केली, तर तिजपासून लोकांस फार जुलूमसा वाटतो, आणि त्यापासून कार्यहि होत नाहीं; कारण तेणेंकरून गांवकरी लोकांची वाताहत होऊन ते दुसऱ्या हद्दींत निघून जातात, एवढाच काय तो परिणाम होतो.

गांवकीचा आंतील बंदोबस्तांत पुष्कळ घालमेल केल्याशिवाय या प्रकारचे बंदोबस्त होऊं शकणार नाहीं हें सहजच आपल्या लक्षांत येईल. बहुतकरून सरकारचा अम्मलदारास जो वसूल सक्तीनें करावयाचा असतो, तो तो पाटीलाचा मार्फतीनें करितो; परंतु जेव्हां कोणी पाटीलाचा आड येतो, तेव्हां त्यास मदत करण्याकरितां मात्र आपण आंत

पडतो. केव्हां केव्हां तो पाटीलास त्याचा हुद्यावरून अमानत करतो, आणि तितकी मुदतपर्यंत सरकारचा महसूल ठरवून वसूल करण्याचें कच्चें काम आपल्या हातांत ठेवितो. न्यायाचा व गुन्ह्यांचा बंदोबस्ताचा बाबदींत लोकांकडून फिर्यादी व अपिलें हींहि मुद्दाम करवितो, तेणेंकरून जुल्मानें पैसे काढण्यास निमित्तें मिळतात; या सर्व कारणांस्तव जर राजा वाईट असला तर गांवक्यांचे हक्क हे बहुधा कांहीं नाहींसे होऊन जातात.

हिंदुस्थानाचा पुष्कळ भागांत महसूलाचा मक्ता देण्याची शिस्त आहे, तेणेंकरून हीं सर्व विघ्नें अधिक वाढतात. असें असतें तेथें जो मनुष्य सरकारचा खजिन्यांत वर्षाची अति मोठी रकम भरण्याची जामीनगत पटवील त्यास त्या त्या प्रान्ताचा कारभार मिळतो. हा मक्तेदार त्याच प्रमाणें आपल्या प्रान्ताचे तुकडे करून जे सर्वांहून मोठ्या रकमा बोलतील त्यांस मक्ते देतो, आणि हे शेवटचे मक्तेदार गांवगन्नाचा पाटीलांबराबर अमुक रकमा भराव्या, आणि शिवाय आपला फायदा करून घेतां येईल तितका घ्यावा, असे ठराव करितात. या कारणांमुळें जो पाटील शेतकरी लोकांचा स्वाभाविक साहाय्यकर्त्ता असावयाचा, तोच स्वतः त्यांवर मुख्य जुलूम करणारा होतो. कदाचित् जर त्या सरकारी मक्तेदाराचें बोलणें पाटीलानें नाकबूल केलें, तर जो कोणी परकी तो मक्ता करण्यास कबूल असेल, त्याकडेस पाटीलकीचा हुद्दा जाऊन मग त्या लोकांची उलटी अधिक खराबी होत्ये.

पुष्कळ ठिकाणीं जे गांवांतील जमीनदार लोक पूर्वी गांवकीचे मालक होते ते अशा जुलूमांनी आतां केवळ सरकारची रयत होऊन गेले आहेत; आणि कितीएक ठिकाणीं अशा दुःसह करारांनीं आपल्यावर जुलूम होऊन जमीनी कसणें जरूर न पडावें ह्मणून आपल्या जमीनी टाकून त्यांस पळून जावें लागलें आहे.

वर सांगितलेल्या वर्णनांत गांवांतील प्रत्येक हिसेदार आपआपल्या हक्काप्रमाणें वर्तत असतो, असें अनुमान केलें आहे; परंतु राजा व जमीनदार, यांस आपले हिसे व त्यांपासून होणारे फायदे हे दुसऱ्यांस विकत देण्यास, अधिकार आहे. जरी कदाचित् गांवचा दुसऱ्या अधिकाऱ्यांस हा अधिकार नसला, तरी पाटील व कुळकरणी हे आपले हुद्दे व त्यांसंबंधीं सरकारी वेतनें विकूं शकतात. या प्रकारें-करून त्या गांवकींत नव्या लोकांचा प्रवेश होतो; परंतु हे जे हुद्दे विकत घेणारे लोक येतात, ते त्यांचा पूर्वींचे जे लोक असतात त्यांचाच जागा अवलंबन करितात.

जास राजा आपला भाग देतो तो उत्पन्नापैकीं राजभाग मात्र घेण्यास मालक होतो; परंतु गांवकीचा कामांत पाटीलास तो माजी पाडित नाहीं, आणि सुखवस्तु राहणाऱ्या लोकांचा कारभारांत तर त्याहूनहि अगदीं हात घालित नाहीं. तसाच जुन्या जमीनदारापासून विकत घेणारा नवा जमीनदार जुन्या जमीनदाराचे सर्व संबंध आपल्याकडे ओढून घेतो; त्याचप्रमाणें नवा पाटील, कुळकरणी, इत्यादि हे नवीन झालेल्या वंशांतून निवडले जातात; परंतु त्याचा कामांत कांहीं फेरफार होत नाहीं.

आणखी थोडासा ग्रंथ झाल्यावर पुढें राजानें दिलेल्या इनामतींचा उद्देशांचें विवेचन केलें जाईल.

जमीनीची मालकी.

हें निरनिराळ्या प्रकारचा जमीन वहिवाटणारांचें वर्णन झालें; आतां जमीनीचा मालकीचें जें मोठें वादग्रस्थ प्रकरण तें सहजच यापुढें येतें. कांहींचा मतें ही मालकी राजाची आहे; कांहींचा मतें मोठमोठ्या जमीनदारांची आहे; कांहींचा मतें गांवांतील जमीनदारांची आहे; व कांहींचा मतें जमीनीवर राहणाऱ्या कुळांची आहे.

मोठ्या जमीनदारांचा हक्क हा बाकी वर सांगितलेल्या तिघांचांतून एकापासून उत्पन्न झाला आहे, हें पुढें

योग्य स्थळीं दाखविलें जाईल; यास्तव आतां जो वाद राहिला, तो बाकी राहिलेल्या तिघांमध्येंच आहे.

जमीनीचा उपभोग करण्याचा व तिची व्यवस्था करण्याचा एकट्यासच सार्वकाल अधिकार असणें, व तसेंच जमीनीचें स्वरूप बदलण्यास, अथवा जेथें तसें होणें शक्य असेल तेथें जमीनीचा नाश करण्याचाहि हक्क असणें, यास जमीनीची मालकी ह्मणावें असें दिसतें. हे सर्व हक्क एकत्र केले असतां, त्यांपासून मालकीची गुणदर्शक कल्पना उत्पन्न होत्ये; मालकी ह्मणून या मूळतत्त्वांपासून कांहीं निराळा पदार्थ दाखवित नाहीं. जेथें हीं मूळतत्त्वें एकत्र असतात, तेथें मालकी असत्ये; दुसऱ्या कोठें नाहीं. आतां उत्पन्नाचा एका हिशावर मात्र राजाचा निवळ हक्क असतो, आणि राजाचा मर्जीस आल्यास राजा तो हक्क दुसऱ्यास देऊं शकतो; परंतु या हद्दीबाहेर, जमीन अथवा तिचें उत्पन्न यांत त्याचानें हात घालवत नाहीं. जर सरकारी इमारती, रस्ते, अथवा दुसरीं कांहीं लोकोपयोगी कामें, यांसाठीं त्यास जमीनीची जरूर लागली, तर तो देशरक्षकाचा ह्मणजे माजिस्त्रेटचा हुद्यानें ती घेऊ; परंतु त्या प्रसंगीं त्याणें, आपल्या बरोबरीची हिसेदार जी रयत, तीला नुकसानी भरून द्यावी; तसेंच अडचणीचा प्रसंगीं, गाड्या, नावा, इत्यादि राजा पकडूं शकतो, व शत्रूनें वेढलेल्या शहरांमधील घरेंहि मोडूं शकतो; परंतु त्या प्रसंगीं त्यास मालकीचें वारेंहि नसतें.

राजाचा भाग दिल्यानंतर बाकीचें जें उत्पन्न जमीनदाराचा हातांत येतें, तें त्याचें, आणि पुढें त्याचा व्यय करण्याचा जो त्याचा हक्क तो दुसऱ्यास देण्यास त्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. राजभाग व जमीनदारांचा सारा हीं दिल्यानंतर जें उत्पन्न बाकी राहतें, तें कुळाचें; त्याचा तो हमेशा उपभोग करितो, परंतु तो हक्क त्यास व त्याचा वारिसांस मात्र आहे, त्याची दुसऱ्या रीतीनें त्यास अफरातफर

करितां येत नाहीं इतकी त्यास यत्ता आहे.

जमीनदार अथवा कूळ हे दोघेहि जमीनीचा नाश करूं शकत नाहींत, अथवा ती कांहीं दिवसहि निरुपयोगी होई असें त्यांचानें करवत नाहीं. जर राजा व जमीनदार या दुसऱ्या हिसेदारांस आपआपले भाग घेण्यास कुळानें पीकच उत्पन्न केलें नाहीं, तर त्याची जमीन जात्ये; आणि जर तसाच गुन्हा जमीनदारानें केला, तर गांवकीकडील किंवा राजाकडील कूळ त्याचा जागीं लावून त्यास कांहीं मुदतपर्यंत अमानत करितात, आणि कांहीं नेमलेल्या मुदतीनंतर त्याचा हक्कहि मूळींच घेतला जातो.

या सर्वांवरून असें दिसण्यांत येतें, कीं जेथें ग्रामसमुदाय व मिरासदार कुळें असतात, तेथें, राजा, जमीनदार, व कुळें, या वर सांगितलेल्या कोणत्याहि हिसेदाराची पुरी मालकी नसत्ये. जेथें ग्रामसमुदाय नाहींत, व मिरासदार कुळेंहि नाहींत, तेथें राजा निःसंशय भरपूर मालक आहे, आणि जे तेथील हक्क पुष्कळ उत्पन्न व्हावयाचे, ते त्याणें दिल्यामुळें, अथवा त्याकडून मिळालेल्या मक्त्यांपासून उत्पन्न होतात. या देणग्यांची व्याप्ति त्यांचा कारणांप्रमाणें बदलत्ये; परंतु जेव्हां आंत खांचखोंच न राखितां व चिरकाळ राहण्याचा अशा देणग्या दिलेल्या असतात, तेव्हां त्यांपासून जी मालकी उत्पन्न होत्ये, ती उत्कृष्ट पुरी मालकी होय.

जा गोष्टी एका प्रदेशास लाविल्या असतां खऱ्या असतात, त्या सर्व प्रदेशांस लागू केल्यामुळें आणि जमीनीचा एका प्रकारचा भोगवट्यापासून जे सिद्धान्त ठरविले असतील त्यांत दुसऱ्या अगदीं भिन्न स्वरूपांचा भोगवट्यांचा समावेश केल्यामुळें, जमीनीचा मालकीविषयींचे पुष्कळ तंटे उत्पन्न झाले आहेत; दुसरें, कित्येक असें समजतात, कीं जेथें सरकार आपल्या हक्कांवर कांहीं नजर देत नाहीं, तेथें आतां तसे सरकारचे हक्कच नाहींत, यामुळेंहि

पुष्कळ तंटे उद्भवतात. असें असतां ते हक्क मोडल्यापासून ज्यांचें नुकसान होतें, ते, ते हक्क आहेत असें ह्मणतात, आणि जे ते हक्क तोडतात, तेहि ते हक्क नाहींत असें ह्मणत नाहींत; आणि जेथें सर्व गोष्टी अनुकूल असतात तेथें ते हक्क पूर्वींप्रमाणें चालू होतात. व्यवहाररीत्या पाहूं गेलें असतां, मालकी कोणाची आहे याविषयीं वाद नसतो; परंतु उत्पन्नाचा केवढा भाग प्रत्येकास द्यावा हा वाद असतो: तेव्हां या गोष्टीचा निर्णय करणें तो जागचा जागीं तपास करून ठरविला तर होऊं शकेल; क्रम मालकीचा हक्कावरून स्थापिलेल्या साधारण नियमांनीं, अथवा ज्यांचा पुष्कळ दिवस विसर पडून गेला आहे अशा प्राचीन कायद्यांनींहि करितां येणार नाहीं.

राजाचा महसुलाचा दुसऱ्या शाखा.

सर्व जमीनीचा उत्पन्नांतील राजभाग, व ज्या जमीनी खालसा असतील त्यांचा सारा, हीं दोन्ही मिळून सरकारचा महसूलाची बहुतेक मोठी रकम होत्ये. बाकीचा महसूल पुष्कळ द्वारांनीं उत्पन्न करितात: त्यांतून कांहीं वर सांगितलेल्या बाबी, व कर, हीं जमीनीपासून उत्पन्न करितात; आणि दुकानें व धंदे यांवरील, व शहरांतील घरांवरील, अथवा खाण्यापिण्याचा वगैरे जिनसांवरील कर, बाजारपट्ट्या, मोठाल्या रस्त्यांवरील दस्तुऱ्या, जकाती, व दुसरे कांहीं कर, या प्रमाणें, ज्या लोकांचा शेतकीशीं संबंध नाहीं त्यांपासून, वसूल करितात; हेंहि एक महसूलाचें सदर आहे: यांतील बहुतेक करांपासून, व त्यांतूनहि रस्त्यांवरील दस्तुऱ्यांपासून पुष्कळ जुलूम व त्रास उत्पन्न होतो, आणि इतक्या वाइटाबद्दल सरकारास निवळ नफा असा थोडाच होतो. गांवचे व दुसरे जागजागचे अम्मलदार लोक हीं उत्पन्नें बहुधा वसूल करितात; परंतु त्यांतून कांहीं व मुख्यत्वेंकरून रहदारीचा रस्त्यांवरील दस्तूऱ्या व जकाती, यांचे फार करून निराळ्या मक्तेदारांस मक्ते देतात.

इनामती वगैरे.

राजा आपला गांवामधील हिसा दुसऱ्यास देऊं शकतो, असा पूर्वीं उल्लेख आला आहे. त्याचप्रमाणें देशांतील मोठे प्रान्त, जांत पुष्कळ गांव व बेचिराघ ओसाड प्रदेश असतात, असेहि पुष्कळ प्रसंगीं तो देतो. परंतु या सर्व प्रसंगीं तो आपले स्वतांचे हक्क मात्र देतो; आणि त्याणें आपले हक्क दुसऱ्यास दिल्यामुळें गांवांतील जमीनदारांचे व ( जेथें असतील तेथें) मिरासदारांचे, परगण्यांचा व गांवचा अम्मलदारांचे, व आपण अथवा आपले पूर्वज, यांणीं पूर्वीं जा दुसऱ्यांस दिलेल्या देणग्या असतील त्यांचे, या सर्वांचा हक्कांस कांहीं बाध येत नाहीं. या देणग्या लश्कराचा व दिवाणी अम्मलदारांचा तैनातीबदल, देवालयांचे खर्च चालविण्याबदल, साधूंचा निर्वाहाकरितां, अथवा सरकारचाकरीबदल बक्षिसादाखल दिलेल्या असतात. वर सांगितलेल्या कारणांतून पहिल्या दोहों कारणांकरितां जमीनी दिल्या असतां, त्यांस जाहगीरी ह्मणतात. विवक्षित अम्मलदारांचा चाकरीबदल मुशाहिरा देण्याची व साधूंचा निर्वाहाची तजवीज करण्याची जी ही रीति ती मनूचा इतकी प्राचीन आहे; ती लश्करचा खर्चास केव्हां लागू केली याचा निश्चय होत नाहीं. जेव्हां मुसलमानलोकांनीं विजयनगर व दुसरीं दक्षिणहिंदुस्थानांतील राज्यें मोडून टाकिलीं, तेव्हां त्यांमध्यें अशी जमीन देण्याची चाल होती; परंतु साम्प्रत मराठे लोकांत ही रीति जी विशेष पुऱ्या रूपानें प्रवृत्तींत आली आहे, ती रीति बहुधा अर्वाचीन काळची आहे. जा ठिकाणीं लश्कर असेल, त्या नजीकचा परगण्यावर नेमणूक तोडून देणें हें मुख्य खजिन्यावर हुकूम देण्यापेक्षां सोईवार पडत असल्यामुळें अशा देणग्यांचा पाठ निघाला असेल; कारण, जा देशांत ऐनजिन्नशी जमाबंदी होत असल्ये तेथें अशी दुबेर्जीची रीति विशेषच लागू पडत्ये.

लश्करी चाकरीकरितां तोडून दिलेल्या जमीनी.

प्रथम या नेमणुका जितकी तैनात असेल तितक्या

असत; परंतु त्या पुष्कळ दिवस चालल्या, आणि एका परगण्याची सर्व जमाबंदी खाऊन जाण्याजोग्या मोठ्या झाल्या, ह्मणजे त्या परगण्याचा वसूलाचें कामच त्या लश्करचा सरदाराकडेस सोंपून पूर्वींचा बंदोबस्त सरळ करून टाकणें हें सहजच ओघास आल्यामुळें होत गेलें असेल. सरदारलोकांनीं आपल्या लोकांचा तैनातीहून जास्त घेऊं नये, व दुसऱ्या तहसीलदारांहून अधिक अधिकार चालवूं नये, ह्मणून ही शिस्त सावधगिरीनें सुरू केली होती. वरील कारणास्तव कोणते उपाय योजिले होते, हें, या बाबदींत मराठे लोकांनीं जो बंदोबस्त केला होता, त्यावरून स्पष्ट समजतें.

त्यांचा बंदोबस्तांत प्रत्येक सरदारानें किती व कोणत्या प्रकारचे लोक ठेवावे, ती यत्ता त्यांणीं लावून दिली होती; प्रत्येक मनुष्याचा पगाराचा तजविजीनें आकार केला होता; अम्मलदारांकरितां नेमणुका करून दिल्या होत्या, त्या एथवर कीं केव्हां केव्हां नावांचाहि उल्लेख केला होता; मुख्य सरदाराचा खासगत खर्चाकडेस नेमणूक लावून दिली होती; आणि कशी चाकरी करावयाची त्याविषयीं करार, लोक जमा करण्याची पद्धत व दुसरे बंदोबस्त, यांविषयीं तफसीलवार लिहून ठेविलें असे. इतकें केल्यानंतर वर लिहिलेल्या कामांस जितकी रकम पाहिजे असेल, तितकी, वसूलसंबंधीं व इतर खर्च जाऊन जा परगण्याचा राजभाग जमा होत असेल असा प्रान्त निवडून काढीत; आणि तितकी रकम उत्पन्न होण्याजोगा तो सर्व प्रान्त त्या सरदाराचा हवालीं करीत. मग जसे इतर महसूली सुभे असत, त्यांप्रमाणें तो सरदार एका प्रान्ताचा सुभेदार होऊन राही, व तें काम करणाऱ्या अम्मलदाराकडे जीं दुसरीं सर्व कामें साम्मन असतात तीं तो करी.

असें झालें असतांहि, त्याचा हाताखालचा लोकांचा हक्कांचें रक्षण करण्याचा अधिकार, व जितक्या रकमेबदल तो प्रान्त तोडून दिला असेल तीहून अधिक उत्पन्न झालें

असतां तें घेण्याचा हक्क, हीं दोन्ही सरकार आपल्याकडे राखित असे. हे करार अमलांत आणण्याकरितां दोन किंवा अधिक दिवाणी अम्मलदार परभारे सरकारांतून नेमित असत; आणि तो सरदार आपल्या लश्करची व मुल्काची व्यवस्था कशी ठेवितो, त्याविषयीं त्याचा कामाचा तपास ते ठेवित असत.

इतक्या सर्व खबरदाऱ्या ठेविल्या असतांहि, अशा देणग्यांपासून जे सहज होणारे परिणाम ते झाल्यावांचून राहिले नाहींत. हे तोडून दिलेले मुलुक पहिल्यापासूनच वतनी होत चालले; आणि प्रथम नेमणूका तोडून दिल्या त्या वेळापासून जसा अधिक काळ होत गेला, तसा त्यांवरील सरकारचा अम्मल हमेशा नबळा पडत चालला; तथापि या नेमणूकांचा मूळ कारणांवरून लोकांची दृष्टि अगदीं सुटली असें नाहीं, आणि त्या कारणांतील ठरावाप्रमाणें चालण्याची अवश्यकता नाकबूल अशी कधींहि केली नाहीं.

अशा नेमणूकांनीं एकंदर राज्याचा मुलूकापैकीं थोड्याच प्रान्तांत घालमेल झाली. बाकीचा मुल्काचा कारभार मनुस्मृतींत सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें प्रत्यक्ष राजाचा हाताखालीं प्रान्तांतील अम्मलदार करित असत. जमीनी तोडून द्यावयाचा हा, लश्करचा पगार द्यावयाचा एक उपाय होता, राज्याचा कारभार करावयाचा मार्ग नव्हता; त्यामुळें जरी त्या वेळीं जाहगीरी होत्या, तरी जाहगीरींचीच शिस्त सर्वत्र चालू नव्हती.

याप्रमाणें जमीनी तोडून देण्याची चाल वसाहत झालेल्या प्रान्तांत मात्र होती, परंतु जेथें परदेश जिंकून घेत, तेथें ही शिस्त निराळ्याच रीतीनें सुरू होत असे. कित्येक ठिकाणीं परदेशावर चाल करणारे लोक, आपल्या शत्रूचा मुलूकांतील दूरचा प्रान्त बळकावून त्यांतील उत्पन्नावर आपल्या लश्कराचा गुजारा चालवावा अशा हेतूनें एक सरदार पाठवीत, आणि त्याचा वंश तेथें कायम होईपर्यंत त्याचा

वाटेस न जातां त्यास राहूं देत; नंतर जसे लश्करची टोळी घेऊन गेलेले सरदार असतात त्यांप्रमाणें न राहतां त्याचे वंशज बदलमुशाहिऱ्याचा नात्यानें चाकरी बजाऊन राहत असत. हिंदूंचीं जीं राज्यें दक्षिणहिंदुस्थानांत होतीं त्यांत या प्रकारचीं उदाहरणें सांपडतील; व त्यां अलीकडील मराठ्यांमध्यें पुष्कळ व उत्कृष्ट मिळतील.

परदेश जिंकण्याचा वेळीं उत्पन्न झालेले जे वरील जाहगीरीचे प्रकार सांगितले, ते एकंदरांमध्यें अपवाद असें ह्मटलें असतां चालेल. कारण असा कांहीं नियम नव्हता; आणि अशा घेतलेल्या मुलूकाचा बहुतेक भाग प्रत्यक्ष राजाचा हातांत राहत असे. परंतु दुसरी एक बंदोबस्ताची रीति वर्णन करावयाची राहिली आहे, तींत, अशी जमीन परभारी तोडून देण्याची चाल, याहूनहि विशेष पुढें गेली आहे, आणि तिजपासून जी शिस्त उत्पन्न झाली आहे ती, ( जरी दूर देशांतील शिस्तींस आपल्या नेहेमींचा वहिवाटींतील नावें देणें तीं तजविजीनें दिलीं पाहिजेत, तरी ) फ्यूडल म्हणजे जाहगीरीची असें न ह्मणणें, हें अशक्य आहे.

लश्करी चाकरीबद्दल राजपूतलोकांत दिलेले मुलुक.

जी शिस्त राजपूतलोकांत चालत्ये ती वर सांगितलेली ही होय. त्या लोकांत, राज्य स्थापणारा पुरुष हा, आपल्याकरितां कांहीं मुलुक राखून बाकीचा मुलुक हिंदुशास्त्रांतील दायभागाचा नियमांप्रमाणें आपल्या भाऊबंदांस वांटून देत असे. ज्या प्रत्येक सरदाराचा वांटणीस हिसा येई, त्याणें मुख्य राजाची लश्करी चाकरी करावी, व साधारण रीतीनें त्याचा हुकूम मानावा असें असे; परंतु तो आपल्या मुलूकांत आपला अधिकार आपल्या इच्छेप्रमाणें चालवी. तो सरदार आपणहि तशाच कबुलातीनें आपल्या भाईबंदांस आपल्या जमीनी वांटून देई; याप्रमाणें एका खालीं एक सरदारांची माळिका स्थापित होई, त्यांकडेस देशांतील दिवाणी व लश्करी अम्मल सोंपलेला असे. ( प )

युरोपखंडांत जी जाहगीरीची पध्धत आहे, तिजपासून ही भिन्न आहे; कारण हिचें मूळ भाईबंदीचा हिसेदारीवर आहे, मोठ्या लश्करी सरदारांची आपणास मदत मिळावी या गोष्टीवर नाहीं; परंतु या लोकांनीं जे नवे मुलुक घेतले त्यांतच ही शिस्त हमेशा उत्पन्न झाली असेल असें नाहीं, आणि जेव्हां तशी झाली असेल, तेव्हां राजपूतांमध्यें जो भाईबंदीचा संबंध असतो त्यावरून असें संभवतें, कीं नवीन देश जिंकावयास जाणाऱ्या लोकांचें सेनाधिपत्यहि पिढीप्रमाणेंच चालत असे, आणि मुख्य सरदारानें जिंकून घेतलेल्या मुलूकाचे वांटे जे भाईबंद घेत, तेच, ज्या पराक्रमानें तो मुलुक साध्य केला त्यापूर्वीं, त्या जातीमध्यें नायक असत, असें संभवतें.

आपल्या भाईबंदीचा हक्काचें मूळ राजपूत सरदार अद्यापि विसरले नाहींत. राजा हा एका प्रकारें आपला भागीदार व दुसऱ्या प्रकारें आपला अधिपति आहे, असें ते समजतात. एका समयीं मारवाडचा सरदारांनीं आपल्या राजावर फिर्याद केली होती, तींत पुढें सांगितलेला लेख आहे, त्यांत हा मिश्र संबंध चांगला दाखविला आहे; तो असाः—ते असें ह्मणतात, कीं "जेव्हां आमचा चाकरीचें काम असेल, "तेव्हां तो आमचा प्रभु आहे; जेव्हां नसेल, तेव्हां पुनः "आह्मी त्याचे भाऊबंदच आहों, आणि मुलूकाचे वारिस-"दार व त्यावर हक्क सांगणारे आहों."

कोणताहि देश घेतल्यावर त्याचे विभाग करण्याचा जो नियम तो चालू ठेविलेला असे, आणि प्रत्येक सरदारास पिढी दर पिढी आपल्या बापाचा कुटुंबांतील धाकट्या घराण्यांतील लोकांचा लवाजिम्याची तजविज करावी लागे. जेव्हां त्यांतून कोणी वारिसाची पुरी तजवीज होत नसे, तेव्हां स्वाऱ्या करण्यास, व दुसरे देश जिंकून तेथें नवीं राज्यें स्थापण्यास त्यास मदत देत असतः—( क्यु ).

जमिनी देण्याचा पाठ हा प्रथम राजाचा कुटुंबांत

सुरू झाला; तो वाढून पुढें परक्यांसहि लागू झाला. साम्प्रत एका जातीचा राजपूतांचा राज्यांत अगदीं निराळ्या जातीचा राजपूतांकडे पुष्कळ जाहगीरी आहेत, आणि अलीकडील कारकीर्दींत एक पहिल्या प्रतीची जाहगीर एका मुसलमानास दिली गेली होती असें दिसतें. (२)

जेव्हां पूर्वीं इ०स० ७११ त मुसलमानांनीं सिंधमुलूकावर स्वारी केली, तेव्हां त्या देशाचा स्थितीविषयीं जा हकीकती त्यांणीं लिहिल्या आहेत, त्यांवरून, अर्वाचीन काळचा राजपूतांमध्यें जी जाहगीरीची शिस्त राहिली आहे, तिचा तेव्हां पुष्कळ प्रसर झालेला होता हें असंभाव्य असें दिसत नाहीं.

लश्करी खेरीज इतर चाकरीबद्दल दिलेल्या जमीनी.

लश्करी खेरीज इतर चाकरीबद्दल दिलेल्या जा जमीनी आहेत त्या पूर्वीं सांगितलेल्या ठिकठिकाणचा अम्मलदारांना दिल्या आहेत; त्यांशिवाय प्रधान, व दुसरे कारभारी यांस दिल्या आहेत, व तसेच खासगी खटल्यांतील मोठे अम्मलदार व वंशपरंपरेचे खासगीकडील खिद्मतींतील लोक यांस दिल्या आहेत.

खेरीजमुशाहिरा जमीनी.

देवालयें अथवा धार्मिक लोक, अथवा मोठी योग्यता पावलेले चाकर आणि मर्जींतील लोक, यांस दुसऱ्या परभाऱ्या जमिनी दिल्या आहेत. हीं परभारीं देणीं पुष्कळ आहेत. परंतु बहुधा लहान रकमेचीं आहेत: एक एक गांव असे पुष्कळ आहेत; कोठें एका गांवापैकीं राजभागामधील थोडथोडे हिसे दिले आहेत, परंतु कांहीं ठिकाणीं मोठ्या मिळकती होण्याजोग्या देणग्या दिल्या आहेत. धर्मसंबंधीं नेमणूका हमेशा चिरकाळ राहणाऱ्या असतात, आणि त्यांत बहुधा कोणी हात घालित नाहींत. लोकांस दिलेल्या देणग्याहि बहुतेक निरंतर चालण्याचा असतात, आणि जा कांहीं निर्भय खासगत मिळकती ह्मणावयाचा त्यांतल्या ह्या मानितात; परंतु अशीं

औदार्याचीं उदाहरणें हळू हळू वाढून व सनदाहि वारंवार खोट्या होऊं लागल्यामुळें, आपल्या पूर्वजांनीं दिलेल्या देणग्या परत घेण्यास राजे केव्हां केव्हां उद्युक्त झाले आहेत, अथवा त्याहूनहि पुष्कळ ठिकाणीं त्यांवर भारी कराचा बोजा त्यांणीं ठेविला आहे. अशा देणग्यांचा विकरीवर, अथवा एक पुरुष मेल्यानंतर त्याचा वारिसाकडे त्या चालविल्ये वेळीं, जेथें असा कर घेतात तेथें तो अन्यायाचा आहे असें मानित नाहींत; परंतु जेथें अशा देणग्या अर्जी खालसा केल्या आहेत, अथवा त्यांवर निरंतर चालण्याचा असा कर लावून दिला आहे, तेथें मोठा जुलूम झाला आहे, असें मानितात. ही नेमणुका परत घेण्याची रीति पुष्कळ दिवसांपूर्वीं सुरू झाली असावी असें दिसतें; कारण प्राचीन काळचा ताम्रपटादिलेखांत दान देणाराचा वंशजांतून जो कोणी तें परत घेईल त्यास शाप दिले आहेत, असें वारंवार आढळतें.

कर देणारे व दुसरे आधारानें राहणारे प्रदेश.

पहाडांतील व जंगलांतील राहणाऱ्या लोकांचे सरदार पूर्वींपासून सर्वकाळ हिंदुराजांपासून स्वतंत्र होते असें संभवतें, कारण मोगल व ब्रिटिश हीं सरकारें आपल्या मोठ्या कडक कारकीर्दींतहि त्यांस हमेशा जेरीस आणूं शकलीं नाहींत. असें असतां दुसरेहि असे कांहीं लोक खचित होते, कीं ते या राजांस कबूल करीत, आणि खराखुरा किंवा नावास तरी, त्यांस कर देत, अथवा कांहीं नियमित लश्कर पुरवीत, अथवा कांहीं साधारण मदत करीत; परंतु असें असूनहि ते आपल्या देशाची आंतील व्यवस्था आपल्या हातांत राखीत, आणि राजास मान देणें तो वेळ बनेल त्याप्रमाणें अधिक उणा देत असत.

जेव्हां निरनिराळीं हिंदुराज्यें मोडून गेलीं, तेव्हां कांहीं प्रान्तांचे सुभेदार व लश्करी जाहगीरदार हे, तीं राज्यें जिंकणारांचा बराबर दाली बांधून राहिले, आणि कमजवाद

स्वतंत्रतेनें वागूं लागले; याप्रमाणें वर सांगितलेल्या अर्धवट जिंकलेल्या सरदारांची संख्या वेळोवेळीं वाढत गेली. दुसरे कांहीं त्याच प्रतीचे लोक, व त्याहूनहि विशेषेंकरून, महसूलाचे मक्तेदार लोक यांणीं, नव्या सत्ताधीशांचा उपयोगीं पडून आपल्या जागा राखल्या; त्यांणीं स्वतंत्रतेचा तिळभरहि आव घातला नाहीं, परंतु ते आपल्या प्रान्तांचा कारभार खातरी पटण्याजोगा करीत, व सरकारास यावयाचा तितका वसूल देत असत, तेथपर्यंत त्या प्रान्तांसंबंधीं त्यांस वंशपरंपरेचा हक्कच आहे असें मानित असत.

जमीनदार ह्मणजे काय?

वर सांगितलेल्या तीन प्रकारचे लोक व जे दुसरे लोक मुसलमानांचा कारकीर्दीत वाढले आहेत, त्या सर्वांचा एक मोठा वर्ग झाला आहे, त्यास इंग्लिश लोक हे, वादविवादांमध्यें, जमीनदार[5] या नावानें वर्णितात. त्यांचा हक्कांविषयीं मोठ्या त्वेषानें वादविवाद होऊन फार गोंधळ झाला आहे, आणि त्यांविषयीं जेथें जेथें पुनः प्रसंग येईल तेथें तेथें उल्लेख येतील.

लढाईची रीति पूर्वीपेक्षां फार बदलली आहे. जेव्हां

---

(५) झमीनदार (म्ह० जमीनदार) हा फारसी शब्द आहे; त्याचा अर्थ जमीन राखणारा असा होतो, व त्यांत त्या जमीनीचा मालकीची व्याप्ति अवश्य होत्येच असें नाहीं. जा मनुष्याजवळ कांहीं वस्तु ठेवावयास दिली असेल, (मग ती अगदीं हलकी कां असेना, तरी) त्या वस्तूचा तो मनुष्य दार असें ह्मणतातः उदाहरण,—जो खझाना (खजीना) राखतो तो 'खझानेदार' (खजीनदार;) 'किल्लेदार,' किल्ल्याचा नायक; 'चोबदार,' चोब ह्मणजे दंड धरणारा; 'आबदार' पाणीवाला (ह्म० पाणीथंडकरणारा); इत्यादि. जा सरदारांस कांहीं स्वतंत्रता असे त्यांसच मात्र जमीनदार ह्मणत असा औरंगझेबापर्यंत पाठ होता, असें स्टर्लिंग साहेबानें ह्मटलें आहे. अर्वाचीन काळीं हा किताब त्यांस मात्र देतात असें नाहीं; कारण दक्षिणेंत, एतद्देशीय लोक (देशमुख इत्यादि) परगण्यांचा अम्मलदारांस जमीनदार (अ० जमींदार) ह्मणतात; आणि उत्तरहिंदुस्थानांत गांवचा जमीनवाल्यांस जमीनदार ह्मणतात.

गिझनीहून मुसलमानलोकांचा स्वाऱ्या आल्या, तेव्हां हिंदुलोकांस बेतबात करण्याची शक्ति आली होती; त्याप्रमाणें त्यांणीं पुष्कळ प्रसंग केले; केवळ महिना पंधरादिवस लूट करण्याचें मात्र त्यांस त्या वेळीं सामर्थ्य होतें असें नाहीं. पुढें तोफा चालू झाल्यावर लढाईचा कामांत दुसरा मोठा फेरफार झाला, आणि नियमित पलटणींची सुरुवात झाल्यापासून तर लढाईचें स्वरूप अगदींच बदललें. पलटणींची एवढी युरोपीयन लोकांपासून जी घेतलेली सुधारणूक ती जर एकीकडे ठेविली, तर, कूच करणें व लढाई करणें या बाबदींत जी त्यांची हल्लीं कैद आहे ती मनूंचा कैदेपेक्षां खराब आहे; परंतु रणभूमि शोधून काढण्याविषयींची हुशारी, त्वरेनें फिरणाऱ्या घोडेस्वारांस युध्दाचा कामांत लावण्याविषयींची चपलता, व आपल्या अन्नपाण्याची तजवीज ठेवून आपल्या शत्रूंस तोटा पाडण्याची तजवीज ठेवणें, हे जे गुण साम्प्रत त्यांमध्यें दृष्टीस पडतात त्यांचा लेशहि मनूंत दृष्टीस पडत नाहीं. लढाई.

मनूंतील जुन्या नियमांमध्यें लढाईसंबंधीं जी उदार व दयार्द्र बुद्धि दाखविली आहे, ती साम्प्रत दृष्टीस पडत नाहीं, परंतु साम्प्रतहि एशियाखंडांतील दुसऱ्या देशांपेक्षां हिंदुस्थानांतील लढाया विशेष सौजन्यानें चालत असतात, आणि त्यांतूनहि मुसलमानांपेक्षां हिंदूंचा विशेष तशा असतात.

हल्लीं त्यांचा लढाया पूर्वींपेक्षां पुष्कळ मुदतपर्यंत चालतात, त्यामुळें त्यांचें जें आयुष्य लढाईत जातें तें पूर्वींपेक्षां विशेषेंकरून लक्षांत येण्याजोगें असतें. कांहीं मराठे सरदार तर जन्मभर रणांतच राहिले आहेत, व छावणीशिवाय त्यांची दुसरी राजधानीहि नव्हती; यामुळें त्यांचा लश्कराची जी संख्या असे तींत लढाई मारणाऱ्या लोकांहून इतर लोक बेसुमार जास्त जमा झालेले असत; आणि जेव्हां ते कूच करित असत, तेव्हां त्यांचा अव्यवस्थित थवा होऊन पांच सहा कोश लांब, व अर्धा

किंवा एक कोशभर रुंद, इतक्या प्रदेशाभर पसरलेला असे; व शिवाय सामग्री आणण्याकरितां किंवा लुटण्याकरितां कांहीं टोळ्या डाव्या उजव्या गेलेल्या असत.

या प्रकारचें जें मुख्य लश्कर असतें, तें कांहीं ठिकाणीं दाट, व कांहीं ठिकाणीं पातळ, असें असतें, आणि त्यांत हत्ती व उंटें; घोडेस्वार व पायदळ; गाड्या, पालख्या, बैलांचे गाडे, व बारबरदारीचे बैल; हमाल, बायका, व पोरें; गुरें, बकरे, मेंढे व गाढव, यांचे कळप; या सर्वांचा एकमेकांत पराकाष्ठेचा गोंधळ झालेला असतो, आणि त्या सर्वांभोंवतीं धूळ वातावरणांत उंच उडून तिचा मोठा दाट ढग होतो व त्याचें त्यांवर आच्छादन पडतें: या प्रकारचें लश्कर पुष्कळ कोशांवरून दृष्टीस पडतें.

जेथें कवाइती पायदळाचे लोक असतात, तेथें ते एका भरण्यानें कूच करितात, अथवा, निदान पक्ष, पलटणी पलटणींनीं तरी करितात. लश्करांत जा तोफा असतात, त्यांची लांबच लांब रांग लागत्ये, आणि रस्ते वाईट असल्यामुळें अथवा तोफा ओढण्याचे गाडे मोडल्यामुळें त्यांपासून हमेशा अडथळे होत असतात. बाकी राहिलेले लश्करचे लोक सामानाचा मधून फुटकळ फुटकळ येत असतात. दोन उंच निशाणें व त्यांबराबर नौबती ( तीं सर्व बहुधा हत्तींवर असतात, ) इतकीं मिळून एक पतक होतें. तें सुमारें पांचशांपासून पांच हजारांपर्यंत घोडेस्वारांचें असावें; परंतु त्यांचा मागून सगळे पांच पन्नास लोक येत असतात. त्या पतकांतील बाकी राहिलेले घोडेस्वार एकेकटे किंवा टोळ्या टोळ्यांनीं चालत असतात. त्यांतील प्रत्येक घोडेस्वार कदाचित् आपला भाला खांद्यावर लटकवून चालत असतो, तेणेंकरून जे त्याचा मागून लगट करून येत असतात, त्यांस मोठें जोखम असतें, आणि इकडे तर तो भालेवाला आपल्या सोबत्याबरोबर खुशाल थट्टामस्करी करित असतो, अथवा गात असतो, तो त्याचा आवाज सभोंवारचा गोंगाटामध्येंहि ऐकूं येतो.

हें सर्व लश्कर बहुधा इतकें फुटून पसरलेलें असतें, कीं एकादा घोडेस्वार यांतून पिछाडीपासून आघाडीपर्यंत भरधांव दौड करून जाऊं शकेल, आणि तो जसाजसा जाईल तसतशी त्यास वाट मिळेल; मात्र जेथें खिंडींतून जावयाचें येईल, अथवा अरुंद रस्त्यानें जावें लागेल, तेथें त्यास दुसऱ्या सर्वांप्रमाणें पुष्कळ वेळ फार त्रासदायक उशीर सोसावा लागेल.

प्रसंगवशात् आघाडीस अर्धवट मुक्काम होतात; कारण बिनीवाला सरदार हा गांववाले लोकांबरोबर ठराव करित असतो कीं आह्मी तुमचा जाग्यांत छावणी दिली नाहीं तर त्याबद्दल तुह्मी आह्मास अमुक द्रव्य द्यावें. पिछाडीकडेसहि कोणास गुडगुडी ओढावयाची असत्ये, अथवा एरव्हीं विसावा घ्यावयाचा असतो, किंवा कांहीं उपहार करावयाचा असतो, त्यामुळें तिकडेहि मुक्काम होतो.

केव्हां केव्हां मधून हरिण अथवा रानडुकर जातो; त्याचा पुढून व मागून ओरड व गवगवा हीं चाललेलीं असतात; कोणी काठ्या टाकतात, कोणी गोळ्या घालतात, आणि कोणी आपल्या किंवा दुसऱ्याचा शरीरावयवांस अथवा जीवास धक्का पोंचेल याचा कांहीं विचार मनांत न आणितां, त्या दाटींतून टांच लावून घोडे पुढें चालवित असतात.

इतकी अव्यवस्था असतां, त्यांची बातमी चांगली असत्ये, व त्यांजवळ त्वरेनें जाणारे घोडेस्वार पुष्कळ असतात, त्यामुळें एतद्देशीय लोकांची फौज कूच करून जात असतां तिजवर छापा घालण्यास सांपडत नाहीं.

इतक्या आमचा लढाया झाल्या, त्यांत, एकामागून एक अशा मोठ्या मजला करून समोर लढाईत ते पडोत; परंतु त्याशिवाय एतद्देशीय लोकांचा फौजेचें बारबरदारीचें सामानहि मारून नेण्यास सांपडलें असें उदाहरण मिळणें





कठीण पडेल. उलटें असें झालेलें सांपडेल, कीं त्या लोकांचा कूच करण्याचा गुप्ततेमुळें व त्वरेमुळें त्या, दिसण्यांत बोजड अशा, समुदायांनीं पुष्कळ फायदे करून घेतले आहेत. हैदर, टिपू, व मराठे, हे कोठें दूर प्रदेशांत आहेत असें लोकांस वाटत असतां, त्यांणीं पुष्कळ वेळा निरनिराळ्या टोळ्यांवर हल्ले करून त्यांस पाडाव केलें आहे; आणि आमचे सरदार आपल्या मतें त्यांस आपल्या पुढें घालून त्यांचा राजधानीकडे पिटून नेत असतां, त्यांणीं वर सांगितल्याप्रमाणेंच पुष्कळ वेळा कठीण खिंडींचा मार्गानें जाऊन त्यांचा मुल्कांत धुमाळी उडविली आहे.

ते मुक्कामास पोंचले, ह्मणजे त्यांची व्यवस्था बरी असत्ये, अशी आशा गोंधळांत असावी अशी कोणी अटकळ करणार नाहीं. प्रत्येक सरदारास अथवा खात्यास जिकडे जागा नेमून दिली असेल, ती समजण्याकरितां ढवढवीत दिसण्याजोगे बावटे मारलेले असतात; आपल्या ओळींतली आपली जागा कोणती हें प्रत्येक मनुष्यास माहीत असतें.

त्यांचा छावणीचा तळ पडला ह्मणजे त्यांत कांहीं व्यवस्था व कांहीं अव्यवस्था यांची मिसळ झालेली असत्ये. त्यांत शहराप्रमाणें बाजारांचा लांब व नियमित ओळी लागलेल्या असतात, त्यांत सर्व प्रकारचीं दुकानें असतात. तोफांचा व कवाइदी पायदळांचा रांगा लागलेल्या असतात; परंतु बाकी लोक इकडे तिकडे पसरलेले असतात, त्यांमध्यें, दिसण्यांत, कांहींच व्यवस्था नसत्ये. बहुतेक तंबू सफेद असतात, परंतु पुष्कळांस तांबडे, हिरवे, अथवा निळे पट्टे असतात, व कांहीं सगळेच त्या रंगांचे असतात.

गरीब लोकांचे तंबू सखल व काळ्या ऊर्णावस्त्राचे असतात. केव्हां केव्हां तीन भाले जमीनींत रोवून त्यांवर एक फकत कांबळें मात्र टाकिलेलें असतें. भालेवाले लोकांची बिऱ्हाडाची इतकी वाईट सोय नसत्ये.

मोठ्या लोकांचे डेरे शोभायमान असतातः त्यांना आड कपड्याचे पडदे करून खोल्या पाडलेल्या असतात, आणि दरबारांकरितां जे कांहीं केलेले असतात ते मोठे व उंच असतात. दुसरे कांहीं ठेंगणें व नेमस्त मोठे असतात; त्यांचा कनाथा रूंदार व केव्हां केव्हां दोन टपांचा असतात; तेणेंकरून आंत अदब राहून धूळ व वारा बंद होतो. त्यांस एकमेकांशीं जोडण्याकरितां मध्यें आच्छादित वाटा असतात, आणि राजवाड्यांत जा सर्व सोई मिळावयाच्या त्या तेथें असतात. परंतु इतकाहि डौल असून, कोणतीहि गोष्ट करणें झाली तर ती पुरी करावयाची नाहीं, हा जो या लोकांचा नेहेमींचा अव्यवस्थितपणा, व ही जी उपेक्षा, ती एथेंहि कांहीं दृष्टीस पडत्ये. हे कपड्याचे राजवाडे एकाद्या वेळीं इतक्या वाईट रीतीनें उभारलेले असतात, कीं कित्येक ऋतूंचीं वादळें सहन करण्याजोगेहि ते नसतात. एका वेळीं असें झालें, कीं शिद्यांचे सगळेचा सगळेच तंबू वादळानें जमीनदोस्त होऊन गेले; तेव्हां एक लहानसा खासगी तंबू वाऱ्याचा झपाट्यांतून बचावला होता, त्यांत, वाऱ्या-पावसापासून बचाव करण्याकरितां, त्यांचा बायकांस जावें लागलें.

लढाईचा वेळीं, दुसऱ्या दिवशीं काय करावयाचें तें फकीर अथवा गोसावी सांगत जातात. मुक्काम व्हावयाचा असल्यास मुक्काम, अथवा कूच व्हावयाचें असल्यास तें केव्हां व कोणीकडे व्हावयाचें, हें सर्व छावणीभर सांगत फिरतात, आणि जेथें पुढें छावणी द्यावयाची असत्ये त्याच ठिकाणीं बराबर भिक्षा मागावयास उभे राहतात; व ते मुक्कामाचे बावदे पाहून त्या वेळीं लोकांची बुद्धि उदार होत असत्ये, त्यामुळें त्यांचें साधतें.

लश्करास अन्न पुरविणें, तें वणजारी लोकांचे मेळे पुरवितातः हे एका जातीचे लोक आहेत, त्यांचा धंदा धान्य वाहण्याचा आहे. तें धान्य ते दूर देशाहून आणितात,

आणि दुकानदारलोकांस घाऊक विकतात.

जे लहानसहान व्यापारी असतात, ते छावणीपासून सुमारवट अंतरावर जे गांव असतील तेथें जाऊन तेथील लोकांपासून खरेदी करितात. या कामांत विशेषेंकरून सरकार हात घालित नाहीं; असें असून एतद्देशीय लोकांचा छावण्यांत सामग्रीचा बहुधा हमेशा चांगला पुरवठा असतो.

छावणीचा जवळील गांवांस कांहीं आश्रय नसल्यास त्यांत खचित लूट होत्ये. फौज आली, ह्मणजे नेववेल तितकी मिळकत घेऊन तेथील लोक पळून जातात; नंतर बाकीचा माल लश्करचे लोक लुटून टाकितात, आणि दरवाजे व वांसे हे ओढून नेऊन जळवणास जाळितात. जर गांव मोठा असला, तर द्रव्यासाठीं जमीन खणून पाहतात, आणि लहान खेड्यांतूनहि पेवांतून दाणा भरून ठेविलेला असतो ह्मणून तीं सांपडण्याचा आशेनें लोक यत्न करून पाहतात, अथवा भोंकें पाडण्याचा लोखंडाचा सोट्यांनीं जसे आमचे मोजणीदार जमीन खोदित जातात, त्याप्रमाणें हे खोदून त्या सोट्याचा वास घेऊन, तो धान्यांतून गेला आहे, कीं नाहीं, याचा निश्चय करितात. या शिस्तीनें देश लवकरच वैराण होऊन जातो. जा प्रदेशांतून फौजा वारंवार गेल्या असतात, त्यांतील गांवांचा नाश होऊन ते ओसाड पडलेले असतात, आणि सपाट प्रदेशाभर लहान मोठीं झाडें झालेलीं असतात; त्यावरून पूर्वीं जेथें लागवडीचीं शेतें होतीं त्याचें लवकरच जंगल होऊन जात आहे असें पाहणाराचा लक्षांत येतें. खेड्यापाड्यांतील पळून आलेल्या लोकांनीं मोठमोठालीं शहरें भरून जातात; आणि त्या शहरांचा जवळील प्रदेशांत बहुधा चांगली लागवड झालेली असत्ये, कारण तेथील लोक तिकडून जाणाऱ्या फौजांस कांहीं देऊन त्यांबरोबर बंदोबस्त करून आपला बचाव करून घेतात.

साम्प्रत हिंदूंचा लढायांमध्यें तोफखान्याचें अंग हें अति मोठें आहे. तोफा मारण्यामध्यें ते फार कुशल आहेत,

आणि त्यांजबरोबर जा आमचा सर्व लढाया झाल्या, त्यांत त्यांणीं त्या योगानें आमचें पुष्कळ नुकसान केलें आहे. टोळ्यांटोळ्यांमध्यें लहान लहान लढाया मारणें ही तऱ्हा या लोकांस फार आवडत्ये. त्याशिवाय सर्व घोडेस्वारांनिशीं एकदम हल्ला करावयाचा ही एक त्यांची लढण्याची विलक्षण रीति आहे, तेणेंकरून लढाई लवकरच निकरास येत्ये. या हल्ल्यांहून दिसण्यामध्यें भव्य असें दुसरें कांहीं नाहीं. या प्रकारचा घोडेस्वारांचा समुद्र जरी हळू हळू लोटत येत असला, तरी त्यापासून मनावर विलक्षण ग्रह होतो; आणि तशांत जेव्हां ते भरधांव जात असतात तेव्हां त्या भूमीची गर्जना, त्यांचा हत्यारांची लकाकी, त्यांचा भाल्यांचे ठणत्कार, वाऱ्यामध्यें त्यांचा पताकांचा फडफडाट, आणि अशा असंख्य समुदायाचें त्वरित येणें, यांहींकरून जा भव्यतेचा प्रतीति उत्पन्न होतात, त्यांचा पलीकडे कल्पनाहि जाऊं शकत नाहीं.

आघाडी व बाजू यांजवर एकदम हल्ला करण्याची त्यांची रीति आहे, आणि हें काम ते जा रीतीनें करितात, ती पाहून केव्हां केव्हां त्यांचे युरोपीयन प्रतिस्पर्धीहि वाखाण करित आहेत, आणि बिनकवाइदी समुदायांमध्यें असें कसब पाहून खचितच आश्चर्य वाटतें. असें करावयाचा पूर्वीं हे सर्व लोक, दिसण्यांत, आपल्या शत्रूचा आघाडीवर भरधांव येताहेत असे दिसत असतात; इतक्यांत, जांस तें काम नेमून दिलें असतें, ते अकस्मात् एकदम आंतल्या बाजूस वळतात, आणि, त्यांचा मसलतीविषयीं शत्रूचा मनांत संशय येण्याचा पूर्वींच, एका झपाट्यानें शत्रूचा जवळचा बाजूकडे भाले करून तिजवर तुटून पडतात. हे हल्ले भव्य खरे, परंतु जर शत्रूचें लश्कर कवाइदी असलें, तर त्यावर चालत नाहींत; मात्र जर कवाइदी लोक असूनहि गलबलीचा वेळ असला अथवा तोफांचा मारानें ते पूर्वींच पातळ होऊन गेले असले, आणि जर मग ते तावडीस सांपडले, तर मात्र हे हल्ले साधतात.

साम्प्रत राज्यांतील निरनिराळ्या प्रदेशांमध्यें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें पुष्कळ ठिकाणीं घोडेस्वारांचा लश्करास सरकारचा जमाबंदीची नेमणूक तोडून देऊन बाळगलेलें असतें; परंतु त्याहूनहि पुष्कळ ठिकाणीं सरकारी खजिन्यांतून पगार देऊन ठेवितात; तो पगार दर घोड्यास अमूक, असा सरदारांस देतात, ( शिवाय त्या सरदारांस स्वतांस वेतन व हाताखालचा अम्मलदारांचा पगार मिळतो ); याप्रमाणें होतें, अथवा एकएकट्या स्वारास देतात. या शेवटचा प्रकारचे जे लोक असतात, ते बहुधा खासे देखणें, व चांगले घोडे बाळगणारे असे असतात; व ते साधारण मानापेक्षां जास्त पगार मिळण्याची इच्छा ठेवितात. कांहीं लोकांस बसावयास सरकारचे घोडे असतात, आणि हे लोक जरी दुसऱ्यांपेक्षां कमी पदवीचे असतात, तथापि सर्व लश्करामध्यें उत्तम रीतीनें हुकूम बजावणारे व कामकाज करणारे असे हे असतात. साम्प्रत जे उत्कृष्ट पायदळाचे लोक चाकरीस ठेविलेले आहेत, ते गंगायमुनाकांठावरील प्रदेशांतील आहेत, व आरब व सिदी हेहि आहेत; परंतु त्यांत मुख्यत्वें करून आरब हे तसे असतात. शौर्य, कैद, व विश्वासूपणा यांमध्यें एशियाखंडांतील दुसऱ्या बहुतेक लोकांपेक्षां आरब फारच श्रेष्ठ आहेत; त्यांविषयीं त्यांची तुलनाहि करतां येत नाहीं.

वेढे देण्याची जी हिंदूंची स्वतांची चाल तींत मनूनंतर बहुधा कांहींच सुधारणा झाली नाहीं. अद्यापिहि, लोक लपून लपून तटाजवळ जातात, आणि बसून बसून तटाजवळ निर्भय जातां येईपर्यंत खाडे खणित खणित ते आपल्यास आच्छादून घेतात; आणि किल्लेकऱ्यांपैकीं एकाद्यास गोळी घालून उठविण्याची संधि पाहत असतात; हळू हळू मोरचे देतात; वेळोवेळीं तोफा मारतात, त्यांपासून किल्ल्यांचा तटांस कांहीं धक्का लागत नाहीं: किल्ल्यास वेढा घालून राहणें, छापा घालणें, व आंतील लोकांनीं निरर्थक हल्ला करून बाहेर पडणें, एवढ्या तिहींतून एका गोष्टीनें त्या वेढ्याची

समाप्ति होत्ये; परंतु नेमून हल्ला करून किल्ला पडत नाहीं.

राज्य करण्याची व मसलतीची अर्वाचीन काळची रीति ही यापुढें पुष्कळ स्वरूपांनीं दृष्टीस पडेल; यास्तव या ठिकाणीं त्या विषयाचें विवेचन करण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

राज्य करण्याची रीति.

# प्रकरण तिसरें.

## कायद्यामधील फेरफार.

हिंदुलोकांचा धर्मशास्त्राचा पाया अद्यापि मनुस्मृतीच आहे, आणि त्या शास्त्रांतील मुख्य मुख्य गोष्टी आजपर्यंत तशाच राहिल्या आहेत.

लेखी कायद्यांतील फेरफार.

शिवाय दुसऱ्या ईश्वरप्रेरित अशा मानलेल्या ऋषींचे नाना प्रकारचे ग्रंथ, व लहानमोठ्या लोकांनीं केलेलीं अनेक भाष्यें, व कालाचा गतीनें जे अधिक नियम अवश्य करावे लागले ते, यांहींकरून लेखी कायद्यांत पुष्कळ फेरफार झाले आहेत; तेणेंकरून पुष्कळ शाखा झाल्या आहेत, त्यांचा नाना प्रकारचा अभिप्रायांप्रमाणें हिंदुस्थानाचा निरनिराळ्या प्रदेशांतील लोक चालतात.

दिवाणी कायदा.

असें आहे, तथापि या सर्व ठिकाणीं मूळ पाया मनुस्मृतिच आहे; परंतु चांगल्या टीकाकारांनी जसे तिचे अर्थ केले आहेत, व तींत जसे फेरफार केले आहेत, त्यांप्रमाणें लोक हल्लीं चालतात; आणि याप्रकारें जें हें धर्मशास्त्राचें भारूड झालें आहे, तें एकत्र करून त्याचे व्यवस्थेनें संक्षेप केले आहेत, ते निरनिराळ्या शाखांचा हद्दींत चालतात.

बंगाल्यांतील लोकांची एक स्वतांचीच निराळी शाखा आहे, आणि जरी हिंदुस्थानांतील इतर प्रदेशांतील लोकांचीं मुख्य मुख्य मतें परस्परांशीं मिळतात, तरी त्यांत

निदान चार शाखा आहेत, त्या येणेंप्रमाणें:—मिथिला (म्ह० उत्तरबहार) काशी, महाराष्ट्रदेश, आणि द्रविडदेश; या चार देशचा.

विषमजातींचीं लग्नें, आणि भावाचा विधवेचाठायीं पुत्रोत्पत्ति करणें, यांचा सर्व निषेध करितात, आणि तसेंच औरस व दत्तपुत्र हे खेरीज करून बाकी मनूनें सांगितलेल्या सर्व जातींचे पुत्र कबूल करित नाहींत. या बाबदींत सर्व शाखांचे मत एक आहे. नवऱ्यानें जीवंतपणीं वास्तविक अथवा क्लृप्त आज्ञा दिल्यामुळें त्याची विधवा त्याचा ठिकाणीं पुढें दत्तपुत्र घेत्ये हें दत्तविधान मनूंत आढळत नाहीं; परंतु तें वरील शाखांतील बहुतेक कबूल करितात. कित्येक पक्षांचा मतें नवऱ्याकडून कांहीं अधिकार नसतांहि त्याचा विधवेस स्वतंत्रपणें दत्तक घेण्यास अधिकार आहे.

वंशपरंपरेचा मिळकतीचा वांटा सर्व मुलांस सारखा मिळावा, यावर या सर्व पक्षांचा कटाक्ष मनूहून विशेष आहे. बहुतेकांचें असें मत आहे, कीं आपल्या पुत्रांचा कबूलपणा शिवाय, व त्यांतून प्रत्येकाचा निर्वाहाची योग्य रीतीनें तजवीज करून ठेविल्याशिवाय बापानें वंशपरंपरेची मिळकत दुसऱ्यास देऊं नये; वंशपरंपरेचा मिळकतीचे मन मानेल तसे विभाग करण्याविषयीं सर्वांनीं निषेध केला आहे, आणि जो विभाग करणारा त्याणें जी जिनगी स्वतः मिळविली असेल, तिचेहि तसे विभाग न केले असतां बरें असें विशेषेंकरून सांगितलें आहे. द्राविडपक्षाचा मतें बापाचा मिळकतीची व्यवस्था करण्याविषयीं पुत्रांस बापाइतका अधिकार आहे, आणि वर्तमान काळीं उपभोग घेण्याचा अधिकार मात्र बापास अधिक आहे, तेवढा खेरीज करून, बाकी तो व ते बराबरच आहेत.

बंगालचा खेरीज करून, बाकी सर्व पक्ष, किती एक प्रसंगीं, अद्यापि मृत्युपत्र करण्याचा अधिकार देत नाहींत.

मनूचा वेळापेक्षां साम्प्रतचें धर्मशास्त्र सर्व विषयांमध्यें

सूक्ष्म गोष्टींचा विचार फार करतें. पुष्कळ ठिकाणीं जमीनीचीं नाना प्रकारचीं स्वरूपें सांगितलीं आहेत, आणि जमीनदार व कूळ यांचे कांहीं परस्परांशीं संबंधहि मुकरर केले आहेत.

वकील करण्याची परवानगी दिली आहे, आणि जाबजबाबांचे नियम सांगितले आहेत; ते असे आहेत कीं सरविलीयम जोन्स याणें त्यांचें वर्णन मोठ्या प्रशंसेनें केलें आहे.

निरनिराळ्या रीतीचा पंचाइती सांगितल्या आहेत, आणि जरी या कायद्यामध्यें पूर्वीचा धर्मशास्त्राचा रचनेचे पुष्कळ ओबडधोबड भाग राहिले आहेत, तरी जा वहिवाटीचा रीति सांगितल्या आहेत त्यांवरून हे नियम करणाऱ्या शास्त्रकारांस त्यांविषयीं पूर्वींपेक्षां विशेष अनुभव होता; आणि यांत जी लोकांची स्थिति सांगितली आहे ती पहिल्या स्मृतीचा काळापेक्षां विशेष गुतागुत झालेली अशी आहे, त्यावरून हा कायदा अलीकडे झाला आहे, असें स्पष्ट दिसतें.

लेखी कायद्यामध्यें जा सुधारणा झाल्या आहेत, त्यांची, मूळ धर्मशास्त्राचा संक्षिप्त पायाचा उत्कृष्टतेशीं तुलना करूं गेल्यास, त्या कांहींच नाहींत; आणि पूर्वीं जसें हिंदूंचें शास्त्र, पहिल्या अवस्थेंत असतांना, एशियाखंडांतील त्याचा बरोबरीचा दुसऱ्या शास्त्रांहून श्रेष्ठ ह्मणावयास योग्य होतें, तें श्रेष्ठत्व हिंदूंचा साम्प्रतचा शास्त्रास नाहीं.

आचारामध्यें फेरफार.

लेखी कायद्यांत अगदीं फेरफार न होतां आचारांत पुष्कळ मोठे मोठे फेरफार निमूटपणीं झाले आहेत. उदाहरणः—लग्नाचे आठ प्रकार अद्यापि सशास्त्र आहेत; परंतु त्यांतून जो एक सदसद्विचारबुद्धीस व इतर लोकांचा आचारास अतिशय अनुसरतो, तेवढा मात्र वहिवाटींत सुरू आहे.

फौजदारी कायदा.

फौजदारी कायदा हा पूर्वींचा सारखाच अद्यापि कुरूप आहे, आणि ( बहुधा त्याच कारणामुळें ) तो गैरविल्हेस पडून त्याचा

जागीं वहिवाटीचा अथवा मन:पूत इच्छेचा असा एका प्रकारचा कायदा चालू आहे.

नियमानें न्यायमनसुबी करण्याकरितां मनूचा वेळीं जीं इनसाफाचीं कायम कोडतें ठरविलीं होतीं, व जांचा अधिकाराविषयीं पुढील ग्रंथकारांनींहि वर्णन केलें आहे, त्यांप्रमाणें कोणतेंहि हिंदुसरकार चालत नाहीं. साम्प्रत, त्या न्यायकर्त्यांचा जागीं बहुधा दरबारी कृपेचा उद्देशानें राजा हा, आपल्या मर्जीप्रमाणें, इनसाफ करणारे नेमितो; बहुतकरून जो कोणी दरबारांतील आश्रय देणारा असेल त्याचा उद्देशास योग्य असे, ते लोक असतात. पूर्वींचा कोडतांचा ठिकाणीं साम्प्रत मध्यस्थी करणाऱ्या लोकांचा मंडळ्या झाल्या आहेत; त्यांस पंचाइती ह्मणतात; केव्हां केव्हां त्या सरकारचा हुकुमानें काम करितात, व केव्हां केव्हां पक्षकारांचा फकत कबूलातीनेंच कज्जे मिटवितात. जरी त्यांविषयीं सरकारची अनास्था आहे, तरी मनूनें धनकोस रिणकोवर जी सत्ता दिली आहे, ती अद्यापि चालू आहे; तिजमुळें, जो पुरुष अद्यापि पैका देत नसेल त्यास आपल्यावरील हक्काचा तपास करण्याविषयीं कबूल होण्यास हेतु उत्पन्न होतो; आणि या कारणामुळें अद्यापि या पंचाईतींची कांहींशी मातब्बरी राहिली आहे.

एकंदराखालीं विचार करून पाहतां, जा अगदीं प्राचीन काळाविषयीं आपणास खचित माहिती आहे, त्यापेक्षां साम्प्रत हिंदूंचा राज्यांत दिवाणी इनसाफ फार खराब होतो, याविषयीं अगदीं संशय नाहीं.

देशरिवाज. मनूमधील नियमांत जे पुढें फेरफार झाले आहेत, त्यांशिवाय पुष्कळ देशरिवाज साम्प्रत दृष्टीस पडतात, त्यांविषयीं मनुस्मृतींत कांहीं उल्लेख नाहींत. यांतील बहुतेक क्षुल्लक आहेत; परंतु कांहीं, जे विषय पहिल्या प्रतीचे मोठे आहेत, त्यांसंबंधीं आहेत; बहुतकरून ते फेरफार जेथें हल्लीं चालू आहेत, तेथें, जेव्हां मनुस्मृति

अथवा ब्राह्मणांचा अधिकार यांची सुरूवात झाली नव्हती, त्यापूर्वी त्या त्या प्रदेशांत पूर्वीचा लोकांचे जे कायदे होते त्यांतील हे बहुधा शेष राहिलेले आहेत. या प्रकारचें कदाचित अति विलक्षण उदाहरण मलबारप्रान्तांतील नायर लोकांत आढळतें; तें असें कीं त्यांमध्यें विवाहित स्त्रीस सजातीय अथवा उंच जातीचा सर्व पुरुषांशीं, मनास येईल त्याप्रमाणें, व्यवहार करण्यास तेथील शास्त्राची परवानगी आहे; आणि याप्रमाणें उत्पन्न झालेली जी प्रजा, ती कोणाची, याचा निश्चय होत नसल्यामुळें, कोणी पुरुषाचा बहिणीचे जे मुलगे असतील ते त्याचे वारिस होतात, त्याचे स्वतांचे असतील ते वारिस होत नाहींत.

---

# प्रकरण चौथें.

## धर्माची साम्प्रतची स्थिति.

मनुस्मृतीनंतर झालेले फेरफार

मनुस्मृतीनंतर धर्मामध्यें जे मुख्य फेरफार झाले आहेत, ते येणें प्रमाणें:—

( १ ) केवलेश्वर मताचा अव्हेर:

( २ ) कितीएक देवांचा अव्हेर, आणि दुसऱ्यांचा ( लोकांचा सम्प्रदायांत ) प्रवेश:

( ३ ) ईश्वर अशा मानलेल्या मानवांची भक्ति:

( ४ ) ( नानाप्रकारचा ) पंथांची प्रवृत्ति, अथवा निदान पक्ष त्यांची वृद्धि; आणि एका देवाचें वर्चस्व वर्णन करून दुसऱ्यांचा हलकेपणा वर्णन करण्याची रीति:

( ५ ) समाधि, संस्कार करणें, अथवा परोपकारी कृत्यें करणें, यांपेक्षां कोणत्या तरी एका देवाची भक्ति केली असतां विशेष श्रेयस्कर होत्ये असें मत:

( ६ ) वेद सोडून नव्या कर्मकाण्डाची प्रवृत्ति, आणि गोसावी लोकांचा पंथांचें धर्मसंबंधीं वर्चस्व.

साम्प्रत हिंदुधर्म कसा आहे त्याचें वर्णन केलें असतां त्यांत या फेरफाराचें स्वरूप कळून येईल, आणि इकडील लोकांचे साधारण व्यवहार समजावयासहि तें वर्णन आवश्यक आहे.

धर्म हा जसा हिंदुस्थानामध्यें सर्वकाळ आपल्या पाहण्यांत येतो, तसा दुसऱ्या कोणत्याहि देशांत नाहीं. प्रत्येक शहरांत नाना प्रकारचीं देवालयें असतात, त्यांतून कित्येकांत नुसतें मूर्त्ति राहण्यापुरतें सिंहासन मात्र असतें; परंतु दुसरीं कित्येक मोठीं देवालयें असतात, त्यांना उंच कळस, प्रशस्त सभामंडप, व स्तंभावलि, अशीं असतात. या सर्व देवालयांत मूर्त्तीस माळा घालण्याकरितां, अथवा फलपुष्पें अर्पण करण्याकरितां भक्त सर्वकाळ जात असतात. बहुधा सर्व शहरें नद्यांचा अथवा तलावांचा किनाऱ्यांवर बांधलेलीं आहेत; आणि पुष्कळ जागीं अशा नद्यांचा अथवा तलावांचा तीरांस पाण्यापर्यंत पोंचणारे असे मोठे प्रचंड घाट बांधलेले आहेत. त्या घाटांवर सकाळचा प्रहरीं, स्नान करणाऱ्या लोकांचे, व प्रवाहांत उभे राहून संध्या करणारांचे असे थवे भरलेले असतात. दिवसास, बायका कांहीं तरी देवापुढें ठेवण्याकरितां, थव्यांचा थव्यांनीं देवळास जात असतात; तेव्हां त्यांचा गाण्यांनीं अथवा त्यांचीं सुंदर रूपें व भरगच्ची पोषाक यांहीं मन वेधित होतें.

ब्राह्मण व दुसरे लोक, यांचेहि मेळे असेच जात असतात, आणि ताशेवाजंत्री घेऊन कांहीं सणांसंबंधी क्रिया करण्याकरितां वारंवार पुष्कळ लोक समारंभानें चालले असतात. ते रथांवरून बसविलेल्या मूर्त्ति घेऊन जातात; व तशींच देवालयें, रथ, व दुसरे पदार्थ, यांचीं चित्रें, हींहि बरोबर नेतातः हे पदार्थ स्वस्ते व हलक्या सामानाचे असतात, तथापि ते कुशलतेनें व त्यांतील मर्म समजून केलेले असतात. ते बाहेरून पाहिले असतां मौजेचे व लकलकीत दिसतात.

शहरांपासून कांहीं पल्ल्यावर जेथें मनुष्याची वस्ती

असल्ये तेथें हमेशा देवालयें असतात; आणि नद्यांचा किनाऱ्यांवर, अथवा निबिड अरण्याचा मध्यभागीं, अथवा पर्वतांचा शिखरांवर, तीं वारंवार आढळतात. अतिशय विक्राळ अरण्यामध्येंहि एका दगडावर शेंदूर घातलेला, व त्याचा वर जें झाड असेल त्यावर एक माळ टांगलेली, व त्या झाडाचा खांद्यांत एक लहानसें निशाण अडकवलेलें, असें असलें, म्हणजे ती जागा पवित्र आहे असें पांथस्थानें समजावें.

वाटेनें जात असल्यास, यात्रेकरू व बैरागी वगैरे धर्माचा निमित्तानें भिक्षा मागणारे लोक, यांचे मेळे वारंवार भेटतात. बैरागी हे अमुक पंथाचे आहेत असें त्यांचा पोषाकावरून कळून येतें, आणि जे यात्रेकरू असतात, ते जा देवास जात असतात त्याची कांहीं तरी निशाणी बाळगतात, आणि जेथें जेथें त्यांस दुसरे पांथस्थ भेटतात, तेथें तेथें ते त्याचा नावानें आरोळी मारितात, त्यावरून ते ओळखूं येतात. सर्व वर्षामध्यें जे पुष्कळ सणाचे दिवस येतात, त्या दिवशीं एतद्देशीय राजे मोठ्या डौलानें व खर्च करून उत्साह करितात; श्रीमान् लोकांस आपलें वैभव मिरविण्यास ते समय सांपडतात, आणि कमी मतीचा लोकांमध्येंहि कांहीं थोडासा समारंभ व शोभा हीं त्या योगानें होतात.

आतां निरनिराळ्या देवांचा पवित्र दिवशीं जा वारंवार यात्रा केलेल्या आहेत, त्या बहुत करून गरीब लोकांकरितां आहेत. ते लोक त्या यात्रांस दुरूनहि मोठ्या आनंदानें येतात.

या प्रकारें जो धर्म इतक्या चमत्कारिक रूपांनीं आपल्या दृष्टीस पडतो, त्यापासून जे सर्व समारंभ उद्भवतात; त्या सर्वांत वास्तविक पाहतां तो नसतो; असें आहे तरी या धर्माचें लोकांवर प्रचंड वजन आहे, आणि जेव्हां या धर्माची प्रथम स्थापना झाली तेव्हांपासून या बाबदींत त्याचें मान बहुधा अगदीं कमी झालें नाहीं, व झालें असल्यास अगदींच थोडें झालें आहे.

साम्प्रत ज्या पदार्थांवर लोकांची भक्ति आहे, ते पदार्थ पूर्वींचे नव्हत; पूर्वीं दुसऱ्यांवर भक्ति होती.

केवलेश्वरमत हेंच खरें असें वेदामध्यें जें प्रतिपादन केलें आहे, व ज्यांत बाकी सर्व प्रकारांचा समावेश केला आहे, तें जाऊन त्याचा जागीं वाईट अनेकेश्वरीमत व मूर्त्तिपूजा, हीं येऊन शिरलीं आहेत. पूर्वींचा मताचा अगदीं विसर पडला असा कोणीकडेहि नाहीं; तथापि तत्त्ववेत्ते व ईश्वरीविद्योपदेशक हे खेरीज करून, बाकी कोणाची बुद्धि याविषयीं स्थिर नाहीं.

वेदांचा मार्गानें चालणारे हे, पंचमहाभूतें व या जगांतील सृष्ट शक्ति यांची भक्ति करणें याचा पलीकडेस पोंचून, त्यांस ईश्वराचें वास्तविक स्वरूप जरी समजलें होतें, आणि आपलीं मतें पसरण्याविषयीं जरी ते उत्सुक होते, तरी त्यांणीं लोकांचा श्रद्धेस धक्का लाविला नाहीं; व जे पूर्वीं स्थापिलेले देव होते, ते खऱ्या देवाचीं निरनिराळीं स्वरूपें अथवा चिन्हें आहेत असें सांगून, त्यांची पूजा करण्यास त्यांणीं परवानगी दिली होती. असें करण्याचें कारण, असें दिसतें कीं परंपरागत आचाराविषयीं जी त्यांची विलक्षण श्रद्धा, तेणेंकरून ते तसे चालण्यास उद्युक्त झाले असावे, अथवा ब्राह्मणांचा हिताकडेस दृष्टि देऊन तसे झाले असावे, (कारण कीं अतिशय सुधारलेलाहि ब्राह्मण अशा बुद्धीपासून मोकळा असलेला दिसण्यांत येत नाहीं.) इतकेंहि करून त्यांणीं खऱ्या देवाचें एकहि देवालय बांधिलें नाहीं, व त्याची पूजा करावयाचा पाठ चालविला नाहीं; त्यामुळें मनुष्याचा बुद्धीचा दुर्बलतेपासून जसा परिणाम व्हावा, तसाच झाला; त्यांचा धर्मांतील जीं विशेष गूढ व गंभीर प्रकरणें, त्यांहून जीं दिसण्यांत येण्याजोगीं उघड होतीं, तीं बलवत्तर झालीं: पुष्कळ देवांची भक्ति करण्याचा जो प्राचीन पाठ, तो तसाच राहिला, आणि शिवाय त्यांत देव अशा मानलेल्या वीरांचा प्रवेश झाला, त्यामुळें विशेष खराबी झाली;

हे वीर ज्या देवांपासून उत्पन्न झाले असें अनुमान केलें आहे, त्या देवांसहि यांणीं माजी पाडिलें आहे.

या नव्या धर्माचीं जीं पुस्तकें आहेत, त्यांस पुराणें ह्मणतात. हीं पुराणें अठरा आहेत; आणि त्या पुराणांतील पंथांनीं चालणाऱ्या लोकांचें असें मत आहे, कीं ज्या व्यासानें वेदांची रचना केली, त्याणें तीं केलीं; तथापि वास्तविक पाहूं जातां, ख्रिस्ती शकाचा आठव्या व सोळाव्या शतकांचा दरम्यान निरनिराळ्या ग्रंथकारांनीं हीं केलीं आहेत, परंतु कित्येक ठिकाणीं त्यांतील मजकूर मात्र फार जुना आहे.

पुराणें.

या पुराणांमध्यें, देवांची पीठिका, सृष्टीची उत्पत्ति, तत्त्वविचार, धर्मसंबंधीं क्रियांविषयीं आज्ञा, वंशावळ्या, इतिहासांचे तुकडे तुकडे, आणि वीर व ऋषि यांसंबंधी असंख्य दंतकथा, अशा आहेत. बहुतेक पुराणें निरनिराळ्या पंथांचा मतांचा पुष्टीकरणार्थ लिहिलीं आहेत, आणि बहुतेकांत निरनिराळ्या मतांसंबंधी कल्पित गोष्टी घालून त्यांचा बिघाड केला आहे; त्यामुळें त्या सर्वांची एकवाक्यता होत नाहीं, आणि सर्व पुराणांचें एकवट करून एकच सर्वसाधारण धर्माची पद्धति लोकांस विश्वास ठेवण्याजोगी त्यांपासून करावी असा कोठें उद्देश दिसत नाहीं. असें असून हीं सर्व पुराणें निर्विवाद आधार आहेत, असें लोक मानितात, आणि या उगमांपासून साम्प्रतचा हिंदुधर्माची उत्पत्ति आहे म्हणून, विरोध व असूं नये तशा गोष्टी, हीं जीं त्यांत भरून गेलीं आहेत, तीं पाहून आपणास कांहीं आश्चर्य वाटत नाहीं.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें एक परमेश्वर आहे असें हिंदूंस अद्यापि माहित आहे; त्याचापासून अथवा त्यांतूनच अंशभूत सर्व रचना झाली आहे असें त्यांचें मत आहे. यास प्रमाणः— अर्वाचीन काळचा सिद्धान्तांत सृष्टि व ईश्वर हीं एकच आहेत; परंतु

साम्प्रतचीं पूज्य दैवतें.

असें असून साम्प्रत ते, नानाप्रकारचे देव व देवी, यांची भक्ति करितात; त्या दैवतांचा संख्येची यत्ता करणें अशक्य आहे. कितीएक वर्णनांत हिंदूंचा नेहेमींचा अतिशयोक्तीनें एकंदर देवांची संख्या तेतीस कोटि असें सांगितलें आहे; परंतु त्यांतील बहुतेक निरनिराळ्या स्वर्गस्थ लोकांत गण अथवा असेच दुसरे यक्षगंधर्वादि देवलोकस्थ आहेत; त्यांस व्यक्तिव्यक्तीस निराळें नाव व रूप नाहीं, त्यांची गणती लक्षांवर करितात.

आतां पुढें सांगितलेले सतरा देव, हे मुख्य आहेत; आणि या प्रत्येकामध्यें निराळी ईश्वरी शक्ति असून, ते भक्ति करण्यास योग्य आहेत; याप्रमाणें एवढे मात्र सर्वमान्य आहेत; ते येणेंप्रमाणें:—

१ ब्रह्मा, म्हणजे उत्पादक शक्ति.
२ विष्णु, म्हणजे संरक्षक शक्ति.
३ शिव, म्हणजे संहारक शक्ति.
४ सरस्वती.
५ लक्ष्मी.
६ पार्वती, हिला देवी, भवानी, व दुर्गा हींहि नावें आहेत. या वर सांगितलेल्या तीन देवता, पहिल्या तीन देवांचा स्त्रिया असें दंतकथामानानें मानिलें आहे. परंतु तत्त्वविचाररीत्या त्रिगुणात्मक ईश्वराचीं जीं तीन रूपें तीं प्रकट करण्यास या कारणशक्ति आहेत, असें मानिलें आहे.
७ इन्द्र, वातावरण व स्वर्ग, यांचें दैवत.
८ वरुण, उदकांचें दैवत.
९ पवन, वायूचें दैवत.
१० अग्नि, आगीचें दैवत.
११ यम, नरकलोकाचें दैवत व मेलेल्यांचा न्याय करणारा.
१२ कुबेर, द्रव्याचें दैवत.
१४ कार्त्तिकेय, युध्याचें दैवत.

१४ काम, प्रीतीचें दैवत.
१५ सूर्य, रवि.
१६ सोम, चन्द्र.
१७ गणेश, हा सर्व संकटांचा हर्ता आहे. म्हणून सर्व घरांचा दरवाजांवर हा प्रथम असतो, आणि सर्व कार्यांस आरंभ करण्याचा वेळीं याचें स्मरण करितात.

यांशिवाय नवग्रह व पुष्कळ पवित्र नद्या हींहि दैवतें आहेत; त्यांतून मुख्यत्वेंकरून गंगा, हिला देवीचें रूप मानून हिची सर्व प्रकारें पूजा करून हिला मान देतात.

वर सांगितलेल्या देवांपैकीं पहिले तीन, ब्रह्मा, विष्णु, व शिव, हे मिळून हिंदूंचें प्रख्यात त्रिगुणात्मक दैवत झालें आहे. या सर्वांचीं स्वरूपें चांगलीं दिसण्याजोगीं निरनिराळीं आहेत, आणि हे तिन्ही मिळून एक असा जो तर्क आहे, तो, पाहूं गेलें असतां, सर्व दैवतें हीं केवळ एका परमेश्वराचीं निरनिराळीं रूपें आहेत, असा खऱ्या हिंदुलोकांचा जो साधारण सिध्धान्त, त्यांत मिळून जाईल.

कोणा एका काळीं ब्रह्मदेवाचें कांहीं विशेष माहात्म्य होतें असें दिसतें, आणि तिहींपैकीं मनूंत एवढ्याचाच उल्लेख आहे, तथापि त्याची कधींहि पुष्कळ पूजा करित नसत, आणि सर्व हिंदुस्थानांत त्याचें साम्प्रत एकच देवालय आहे. नेहमींचा संध्येमध्यें त्याचें स्तवन करितात, परंतु त्याचा निराळ्या पूजेचा बहुतकरून अगदीं अव्हेर होऊन गेला आहे. त्याची स्त्री सरस्वती, ही विद्या व वाणी यांची देवता आहे, म्हणून ती लोकांचा लक्षांतून अगदीं इतकी गेली नाहीं.

विष्णु व शिव यांचा याहून अगदीं निराळा प्रकार आहे. ते व त्यांचे अवतार यांसच बहुतकरून साम्प्रत हिंदुलोक भजतात. या दोहोंतून प्रत्येकाचें माहात्म्य वाढविण्यास असंख्य भक्त उत्सुक झाले आहेत, आणि कांहीं लोकांनीं एकपक्षी मतें धरून मोठे पंथ केले आहेत, त्यांतील

प्रत्येक पंथाचे लोक आपआपल्या देवाचें ईश्वरत्व स्थापितात, आणि त्याचा प्रतिस्पर्ध्यास अगदीं काढून टाकितात.

शिवाविषयीं पुराणान्तरीं वर्णन केलें आहे. तें येणेंप्रमाणें:— "भूतप्रेतपिशाच यांसहवर्तमान, उन्मत्त, नग्न, केश अस्ताव्यस्त झालेला, चिताभस्माचा लेप केलेला, मनुष्यांचा करट्या व हाडें यांचीं भूषणें ल्यालेला, कित्येक वेळीं हंसत व कित्येक वेळीं रडत, असा तो भटकत फिरतो." जीं शिवाचीं चित्रें नेहमीं दृष्टीस पडतात, तीं या खेदकारक वर्णनाप्रमाणेंच असतात; याशिवाय त्यांमध्यें यांस तीन नेत्र असतात, आणि एका हातांत त्रिशूळ असतो; वैराग्याप्रमाणें त्याचा केशांचा जटा केलेल्या असतात, आणि तो मोठा गहन विचार करित बसला आहे असें दर्शविलेलें असतें. शिवाविषयीं जा दंतकथा सांगितल्या आहेत त्यांशीं ही शेवटची गोष्ट जुळत्ये. त्या कथांत, शिव हा सर्वकाळ समाधींत निमग्न असतो व तो त्या स्थितीमध्यें असतां जे उत्धटपणा करून त्यास गडबड करितील त्यांस तो आपल्या नेत्रांचा तेजानें भस्म करून टाकितो, असें त्याचें वर्णन केलें आहे. आतां शिवाचें स्वरूप संहारकर्त्याचें आहे, ह्मणून त्याशीं हीं वर्णनें चांगलीं जुळतात; परंतु त्याचा जा स्वरूपाची साम्प्रत पूजा करितात, त्यावरून, संहार ह्मणजे केवळ पुनरुत्पत्ति, असें त्या स्वरूपानें दाखविण्याचा हेतु आहे, असें दिसतें.

शिव.

पश्चिमेकडील प्राचीन काळचा लोकांनीं उत्पादक ईश्वरी तत्त्वाचें जें चिन्ह वहिवाटींत आणिलें होतें, त्याप्रमाणें त्याचाहि उद्देश आहे; परंतु पाहूं जातां, हें एक दगडाचें सखल लिंग असतें; तें शिवाचा सर्व देवालयांमध्यें मूर्तीचा ठिकाणीं असतें, परंतु त्यापासून त्याचा मूळचा अर्थाविषयीं लोकांचा मनांत कांहीं येत नाहीं. शिवास रक्ताचे बळी देतात, परंतु साम्प्रत त्याचा पंथांतील ब्राह्मण असें करणें हें मोडून पाडितात. प्रतिवर्षीं नेमलेल्या दिवशीं

शिवाचा व त्याचा स्त्रीचा प्रीत्यर्थ पुष्कळ लोक आपल्या शरीरांस स्वतःच क्लेश करून घेतात. अशा प्रसंगीं कित्येक आपल्या हातापायांतून सुऱ्या बोंचून घेतात, व जिभेला सुऱ्या बोंचतात, आणि त्या घायांमध्यें तलवारी, तीर, व जीवंत सर्पहि घालून समारंभानें फिरतात; दुसऱ्या कित्येकांचा पाठींस आंकडे टोंचून त्यांस बगाडांवर चढवून गरगरां फिरवितात; ते इतके उंच वर चढवितात, कीं जर त्यांची कातडी तुटली तर त्यांचा खचितच नाश होईल.

शिवाचा व्यावृत्तींवरून मनुष्यांचा कारभारांत त्याचें विशेष लक्ष आहे असें दिसत नाहीं, आणि साम्प्रतचा हिंदुलोकांचा मताप्रमाणें जा परमेश्वराचा अंशापासून सर्व जग उत्पन्न झालें आहे तो त्याचा कारभारांत मुळींच हात घालित नाहीं, आणि जगाचा बंदोबस्त अमुक देवाकडे विशेषेंकरून सोंपलेला आहे असा देव मुळींच नाहीं: परंतु या बाबदींत साधारण लोकांचें जें मत आहे, तें त्यांचा गुरूंचा मतापेक्षां विशेष बुद्धिग्राह्य दिसतें. ते साधारण लोक जा देवाची पूजा करितात, त्यांतच सर्वेश्वरत्वाची कल्पना करितात, आणि तोच मनुष्यांचा कृति पाहून इहलोकीं व परलोकीं, भल्यांस बक्षीस व दुष्टांस शिक्षा, अशीं देतो असें म्हणतात.

हिमालयाचीं जीं अति भव्य शिखरें, त्यांतून कैलास म्हणून जो एक अति उंच व तुटलेला असा शिखरांचा समुदाय आहे, तेथील सार्वकाळ राहणाऱ्या बर्फांत शिवाचें स्थान आहे, असें म्हणतात.

देवी म्हणजे भवानी.

शिवाची स्त्री देवी म्हणजे भवानी, इची शिवाप्रमाणेंच भक्ति करितात, आणि तिचें रूप शिवाचा पेक्षांहि भयंकर असें दाखविलेलें आहे. दक्षिण-हिंदुस्थानामध्यें इचीं विशेष सौम्य रूपें बहुधा दृष्टीस पडतात, तथापि तिकडेहि एक सुंदर स्त्री, वाघावर आरूढ झालेली आणि विक्राळ व भयंकर मुद्रा धारण करून

जा राक्षसांचा नाशार्थ तिणें अवतार घेतले त्यांतून एकास मारण्याकरितांच जशी कांहीं जात आहे, अशी ती दृष्टीस पडत्ये; परंतु तिचें दुसरें स्वरूप प्रसंगवशात् सर्वत्र प्रवृत्तींत आहे, आणि बंगाल्यांतील लोकांस तें विशेष प्रिय आहे असें दिसतें. तें स्वरूप पाहिलें असतां, तिची कातडी, काळी; मुखचर्या, विक्राळ व भयानक; तोंडांतून रक्ताचे प्रवाह चालले आहेत; मस्तकाभोंवते सर्प गुंडाळलेले आहेत; गळ्यांत रुंडमाळा आहेत; आणि सर्व गोष्टींनीं देवीपेक्षां आगजाळीची उपमा जीस द्यावयास योग्य आहे; असें तिचें स्वरूप आहे. त्या देशामध्यें तिचा संबंधीं जा पूजा वगैरे क्रिया करितात, त्याहि त्याच प्रकारचा असतात. पूर्वीं तिला मनुष्यांचे बळी देत असत, आणि हल्लींहि जी हिंसा तिचा समोर करितात, तिजपासून तिला आनंद होतो, असें लोकांचें मत आहे. कलकत्त्याजवळ तिचें एक आलय आहे, तेथें, दर महिन्यास, हजार बकरे व शिवाय दुसरीं जनावरें, इतक्यांची तिला बळ देतात असें म्हणतात. विन्ध्यवासिनी म्हणून एक स्थान आहे, तेथें विन्ध्याद्रि पर्वतानजीक गंगेचा ओघ चालला आहे; त्या ठिकाणीं देवीचा मूर्त्तीपुढील रक्त कधींहि सुकलें नाहीं, असें म्हणून तेथील पुजारी लोक मोठा गर्व मानित असत.

दुसऱ्या देवांचा पूजेंत व देवीचा पूजेंत इतर पर्यायांचा विशेष भेद नाहीं; परंतु कोठें कोठें या पूजेचा एक प्रकार आहे त्याचा योगानें हिंदूंचा सर्व धर्मास डाग लागला आहे. मी जो प्रकार सांगतों तो हा कीं,—कांहीं लोक देवीची गुप्त पूजा करित असतात; व त्याविषयीं पाद्रीलोकांनीं वारंवार वर्णन केलें आहे, आणि अशा गोष्टी आपणांमध्यें नाहींत, असें म्हणण्यास कोणीहि पुढें सरसावला नाहीं. देवीउपासकांमध्यें ( वाममार्गी म्हणून ) एका मताचे लोक आहेत, ते मुख्यत्वेंकरून ब्राह्मण असतात. ( परंतु सार्वकाळ ब्राह्मणच नसतात, कारण या पंथांत जातिभेद नाहींसा होतो; )

त्या लोकांचा मंडळ्या जमतात, त्यांत पुरुष व स्त्रिया हीं दोन्हीं असतात. हे लोक मांस व गाळलेलीं मद्यें यांचा मेजवान्या करण्याकरितां आणि अतिशय खराब व्यभिचार करण्याकरितां एकत्र जमतात. आतां हें सर्व कृत्य मूळींच त्रासदायक; त्यांतहि हे लोक धर्माचें निमित्त करून त्याचा छायेखालीं असें करितात, तेणेंकरून तें दुप्पट त्रासदायक होतें; परंतु हा प्रकार विरळा होतो; आणि होतो तेथें अतिशय गुप्ततेनें करितात. जा पंथाचे लोक ही गोष्ट चालूं देतात, ते, आमचा पंथ अमूक असें लोकांत बहुधा कबूल करित नाहींत, आणि सर्व चांगले हिंदु त्या पंथांतील लोकांचा त्रास करून त्यांस नीच मानितात. या देवीभक्तांशिवाय दुसरे कांहीं जातींचे गोसावी आहेत, त्यांचा इचा उपासनेशीं कांहीं संबंध नसतां, आपणावर कायद्याचा हुकूम नाहीं आणि आपण आपले काम मनःपूर्वक पुरें करून घेतले असतां आपल्या हातून पाप होत नाहीं, असें ते मानितात. या लोकांचा योगानें हिंदूंचा धर्माची विशेष अपकीर्ति होत्ये, आणि हिंदु लोकांचा दंतकथांचें जें भारूड आहे, त्याचा प्रत्येक भागांत जागजागीं कामवासना व विषयासक्तपणा यांचा तरंग मिसळलेला आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे; परंतु तो प्रकार ग्रंथांत व गाण्यांत, व देवळांत व समारंभांमध्यें मात्र आहे, आणि, तीं पुस्तकें इत्यादि, सर्व प्रत्येकाचा दृष्टीस पडत नाहींत. जर कोणी परकी मनुष्य हिंदूंमध्यें वर्षांचीं वर्षें राहून त्यांचा धर्मसंबंधीं क्रिया व घरगुती मंडळ्या पाहत असला तरी कांहीं अभद्र त्याचा दृष्टीस पडणार नाहीं. स्त्रीपुरुषांचा व्यवहारामध्यें मर्यादा कशी असावी, याविषयीं जे त्यांचे विचार आहेत, ते शिकस्त सक्त होऊन गेले आहेत; ती सक्ती सदसद्विचारबुद्धीशीं अथवा युरोपीयन लोकांचा विचारांशीं अनुसरून राहत नाहीं.

आतां हिंदूंचा देवांची कथा पुढें सांगतों. सुंदर व

विष्णु व त्याचे अवतार.

शान्त असा तरुण पुरुष असून, श्याम वर्णाचा, व प्राचीन काळचा राजांसारखा पोशाक केलेला, असें विष्णूचें स्वरूप वर्णन करितात. त्याचे दहा मुख्य अवतार झाले, त्यांचींहि रूपें चितारी काढितात. ते अवतार मी आतां सांगतों, ह्मणजे हिंदुलोकांचा कल्पनेचा ओघ कसा चालतो त्याचें स्पष्टीकरण होईल.

जलप्रलयामध्यें एका राक्षसानें वेद नेले होते, ते परत आणण्याकरितां पहिला मत्स्य अवतार झाला; दुसऱ्या अवतारामध्यें कांसव होऊन मेरुपर्वत पाठीवर धरिला अशी एक मोठी प्रख्यात दंतकथा आहे; आणखी पृथ्वी रसातलास गेली होती ती वराह अवतार होऊन त्याणें आपल्या दाढेवर उचलून धरिली. चौथा अवतार मनुष्यास कांहीं गोडी लागण्यासारखा आहे. त्याचा प्रकारः— एक पाखंडी जुलूमी राजा, आपला मुलगा विष्णूची भक्ति करितो म्हणून त्यास मारावयास प्रवृत्त झाला होता; जेव्हां त्याची आणि त्याचा पुत्राची शेवटची भेट झाली, तेव्हां त्या पुत्राचें जें आराध्य दैवत त्याचा सर्वव्यापकतेची निर्भर्त्सना करण्याकरितां, जा दिवानखान्यांत ते बसले होते त्यांतील एका खांबाकडेस बोट दाखवून त्यास म्हणाला, यांत तो तुझा देव आहे काय? त्या मुलानें उत्तर केलें कीं आहे. तेव्हां तो बाप सक्रोध होऊन त्याचा शिरच्छेद करावयाची आज्ञा करणार, इतक्यांत, विष्णु, मनुष्यरूपानें, परंतु शिर आणि पंजे एवढे मात्र सिंहाचे, असा तो खांब फोडून बाहेर आला, आणि त्यास विदारून टाकिता झाला. पांचव्या अवताराचें कारण असें झालें:— यज्ञाचा व तपाचा बळानें एका राजानें बलिष्ठ होऊन देवांपासून पृथ्वी व समुद्र हीं घेतलीं, आणि शेवटच्या यज्ञानें त्यास स्वर्ग मिळणार ह्मणून तो यज्ञ पुरा होण्याचा भीतीनें देव राहिले होते; त्या प्रसंगीं विष्णु, हा वामनरूप ब्राम्हण होऊन तेथें आला, आणि तीन पावलें भूमीची भिक्षा मागता झाला. त्या राजानें त्याची ठेंगणी मूर्त्ति पाहून

हंसून त्याणें मागितलेलें दान दिलें; तेव्हां विष्णूनें पहिल्या पावलानें पृथ्वी उल्लंघन केली; दुसऱ्या पावलानें, सागर उल्लंघिला; नंतर तिसरें पाऊल टाकण्यास जागा नाहींशी झाली, तेव्हां त्या राजानें पाताळलोकास जाण्याचें कबूल केल्यावरून त्यास त्याचा वचनांतून मुक्त केलें. सहावा अवतार परशुराम हा ब्राह्मण वीर होता; याणें क्षत्रियांबराबर युद्ध करून त्यांचा सर्व जातीचा निःपात केला. राम हा सातवा अवतार झाला. आठवा अवतार बलराम. या वीरानें राक्षसांपासून पृथ्वीचें संरक्षण केलें. नववा अवतार बुद्धः या अवतारांत विष्णूनें, देवांचा शत्रूंस ठकविण्याकरितां, हें रूप धरून खोट्या धर्मांचा उपदेश केला; या रूपावरून बौद्धधर्मावर यांचा रोंख आहे असें दिसतें, कारण त्यांची आणि ब्राम्हणांचा धर्मांची स्पर्धा आहे हें प्रसिद्ध आहे. दहावा अवतार अजून व्हावयाचा आहे. आतां राम व कृष्ण, हे जे विष्णूचे अवतार झाले, त्यांहींकरून दुसऱ्या अवतारांचा लोप होऊन गेला आहे; त्यांणीं, आपलें जें मूळ कारण विष्णु, त्यास माजी पाडून प्राचीन काळचा जा पंचमहाभूतांचा देवता, आणि शिव, सूर्य, व गणेश, हे खेरीज करून बाकीचे बहुधा सर्व देव यांचीहि पूजा रद्द पाडून टाकिली आहेः असा प्रकार निदान उत्तरहिंदुस्थानांत तरी झाला आहे. याप्रमाणें जा रामास त्याचा भक्तांनीं आपल्या भोळ्या भावानें विष्णूचा साम्यतेस

राम.

आणिलें आहे, तो राम अयोध्येचा राजा होता, आणि हिंदूंचा दंतकथांत जांचीं वर्णनें आहेत त्यांतून एवढ्याचाच कृतीस कांहींसें इतिहासाचें स्वरूप आहे. प्रथम त्यास बापाचें राज्य न मिळतां त्याणें वनामध्यें एकान्त तपश्चर्येंत पुष्कळ वर्षें काढलीं असें सांगतात. त्याची राणी सीताः तिला रावण म्हणून राक्षसानें पळवून नेली, तिचा प्रीत्यर्थ तो दक्षिणेंत फौज घेऊन आला, आणि रावण हा सिंहलद्वीपाचा राजा होता त्या बेटांत जाऊन त्याचा

पराजय करून सीतेस परत आणिता झाला. त्या स्वारींत त्याचा साहाय्यास वानरांची फौज होती. त्यांचा सरदार हनुमान होता. त्याची मूर्ति वारंवार देवाळयांतून दृष्टीस पडत्ये, आणि दक्षिणेमध्यें राम किंवा दुसरा एकादा देव याची जितकी भक्ति करितात, तितकी तरी निदान, हनुमानाची करितात. रामाचा शेवट चांगला झाला नाहीं; कारण त्याचा भाऊ लक्ष्मण जाणें त्याजबराबर सर्व संकटें व जय यांचा अनुभव घेतला होता, तो याचा अविचारानें मारला गेला, म्हणून निराश होऊन याणें नदींत उडी टाकिली, आणि हिंदूंचा मताप्रमाणें तो निजधामास गेला; असें झालें तरीहि अद्यापि बहुतेक लोक त्याची निराळी पूजा करितात, यावरून त्याची विभूती निराळी राहिली आहे. रामाचा जा प्रतिमा काढलेल्या असतात त्यांत त्याचा आकार स्वाभाविक दिसतो, आणि त्याची बहुधा सर्व लोक भक्ति करितात. परंतु भक्तांचा संख्येविषयीं पाहूं गेलें असतां याहून दुसरा एक

कृष्ण.

देवकळा पावलेला मनुष्य आहे, त्यावर लोकांची जितकी श्रद्धा आहे, त्याहून यावर अगदीं थोडी आहे: त्याचें नाव कृष्ण. हा दहा मुख्य अवतारांत नाहीं; आणि याणें राज्यपदावर किंवा लढाईमध्यें केलेले असे पराक्रमहि दृष्टीस पडताहेत असेंहि कांहीं नाहीं. त्याचा जन्म यमुनाकांठीं मथुरा म्हणून शहर आहे तेथील राजवंशांत झाला; परंतु त्याला मारण्यास एक जुलमी राजा टपत होता, म्हणून जवळील गांवचा एका गवळ्यानें त्यास लपवून ठेवून वाढविलें. या त्याचा बाळपणाचा चरित्राविषयीं हिंदूंचा मनावर विशेष ग्रह होऊन गेला आहे. दूध चोरणें, सर्प मारणें, इत्यादि कृष्णाचे लहानपणचे खेळ व पराक्रम, यांचें वर्णन करतांना ते कधींहि कंटाळत नाहींत. या लोकांत एक पंथ आहे, त्यांतील लोक कृष्णास बालरूपानें भजतात, आणि तो सर्व जगाचा आद्यकर्ता व नियन्ता असें मानितात. त्याचप्रमाणें जा स्त्रिया त्याचा भक्त आहेत, त्या त्याचा

कुमारस्वरूपाचें तसेंच प्रेमानें भजन करितात; कारण कृष्णानें नाचून, खेळून, व मुरली वाजवून आपलें कौमार गोपींमध्यें घालविलें, आणि आपल्या गांवळ्यांतील सोबतीणींचीं अंतःकरणें वेधिलीं; इतकेंच नाहीं, तर उत्तरहिंदुस्थानांतील जा राजकन्यांनीं त्याचें सौंदर्य पाहिलें होतें, त्यांचींहि वेधिलीं.

तो जसजसा मोठा होत गेला, तसतशीं त्याणें दुसरीं असंख्य साहसें केलीं, आणि जो जुलमी राजा त्यास मारायास पाहत होता त्यास जिंकून आपलें वंशपरंपरेचें राज्य घेतलें, हाहि त्यांत एक पराक्रम केला. पुढें बाहेरील शत्रूंनीं तेथें त्याजवर लगट केल्यावरून त्याणें आपलें बिऱ्हाड तेथून काढून गुजराथेंत द्वारकेस नेलें. पुढें जेव्हां हस्तिनापुरचा राज्याकरितां पाण्डवांचे दायाद जे कौरव त्यांशीं त्यांची लढाई चालली, तेव्हां तींत हा पाण्डवांचा पक्षाचा झाला. दिल्लीचा ईशान्येस जेथें गंगा उत्तरहिंदुस्थानांत प्रवेश करित्ये त्या ठिकाणापासून सुमारें वीस कोशांवर हस्तिनापुर होतें असें अनुमान करितात.

हिंदूंमध्यें "महाभारत" ह्मणून जें वीरकथापर काव्य आहे, त्यांतील विषय ही लढाई आहे. वास्तविक पाहूं गेलें असतां, त्या ग्रंथांतील मुख्य वीर कृष्ण आहे. त्या लढाईचा शेवटीं पाण्डवांचा जय झाला, आणि कृष्ण हा गुजराथेंत आपल्या राजधानीस आला. पुढें त्याचाहि शेवट वाईट झाला; कारण लवकरच त्याचा राज्यांत आंतल्या आंत तण्टे लागून, त्यास एका पारध्यानें रानामध्यें चुकून बाण मारिला तेणेंकरून तो शेवटीं मरण पावला.

सर्व दैवतांमध्यें हिंदूंस कृष्ण हा अति प्रिय आहे. जे लोक बाकीचा देवांस सोडून विष्णूसच भजणारे आहेत, त्यांतून एका पंथांतील आहेत ते रामास मात्र भजतात. या पंथांतील लोक पुष्कळ मख्यात आहेत, कारण बैराग्यांतील

पुष्कळ लोक या पंथाचे असतात, व मोठ्या धैर्यानें धर्मतत्त्वांचा शोध करणारे असेहि कित्येक त्यांत आहेत; तथापि वैष्णवांचा जो दुसरा एक भाग कृष्णभक्तीस लागलेला आहे, त्याशीं तुलना केली असतां रामाचा पंथांतील लोकांची संख्या, व या पंथाचा लोकप्रियपणा, हीं कांहींच नाहींत.

सर्व श्रीमान् व ऐषआरामी लोक, बहुतेक स्त्रिया, आणि हिंदुस्थानांतील सर्व मतीचा लोकांपैकीं पुष्कळ हिसे लोक, हे सर्व कृष्णाचा पंथांत आहेत.

कृष्णाचा भक्तांतील बहुतेकांचें मत असें आहे, कीं कृष्ण हा विष्णूचा अवतार नव्हे; तो साक्षात् विष्णु असून या जगाचा अनाद्यंत व स्वयंभू उत्पन्नकर्त्ता आहे.

याप्रमाणें विष्णूचे मुख्य अवतार आहेत; परंतु त्याचे दुसरे असंख्य अंशावतार ग्रंथान्तरीं सांगितले आहेत, आणि त्यांशिवाय कितीएक ठिकाणचे साधु अथवा वीर यांस त्यांचा साम्प्रदायी लोकांनीं आपल्या इच्छेनें ईश्वर बनाविले आहेत, त्यांचा स्वरूपानेंहि विष्णु आला आहे असें मानून, त्याचा अवतारांची संख्या ते अधिक फुगवितात.

याच प्रमाणें दुसऱ्या देवांचीहि दशा झाली आहे; खंडोबा, ह्मणून जें मराठे लोकांचें ग्रामदैवत आहे, व जाची मूर्त्ति एका हत्यारबंद स्वाराचा स्वरूपाची असत्ये, तो शिवाचा अवतार आहे; आणि पुण्याजवळ चिंचवडास एक ब्राह्मणाचें कुटुंब आहे,[1] त्यांतील एक पुरुष वंशपरंपरेनें देव असतो. हें त्यांचें देवत्व त्यांस गणपतीचा अवतारापासून प्राप्त झालें आहे, असें ह्मणतात.

याशिवाय खेड्यांपाड्यांतूनहि ग्रामदैवतें असतात; तीं पुष्कळ ठिकाणीं शिव, अथवा विष्णु, अथवा त्यांचा शक्ति यांचे अंश असतात. विष्णूचा मोठ्या अवतारांशीं व त्यांतूनहि राम व कृष्ण, यांशीं यांची तुलना केली असतां हे सर्व अवतार कांहींच नाहींतसे होतात.

(१) त्यांस देव असें ह्मणतात. भा०क०

विष्णूची स्त्री लक्ष्मी; तिला देवालय नाहीं, परंतु समृध्दि व संपत्ति यांची ती देवता आहे, यामुळें तिची तत्परतेनें भक्ति करितात, आणि तिचा कधीं अव्हेर होईल असा संभव नाहीं.

इतर देव.

बाकी उरलेल्या देवांतून **गणेश** व **सूर्य** यांस विशेषेंकरून पूजितात. ते इतर सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ आहेत, असें त्यांचे भक्त मानितात; व त्यांचीं देवळें असून त्यांची नियमानें पूजा होत्ये. शिवाचीं खेरीज करून इतर कोणत्याहि देवापेक्षां गणपतीचीं देवालयें दक्षिणहिंदुस्थानांत अधिक आहेत. सूर्य रथांत बसलेला आहे, व त्याचें मस्तक किरणांनीं वेष्टित आहे, अशा त्याचा मूर्त्ति असतात.

गणेश ह्मणजे गणपति; याचा आकार ढोण्या मनुष्याचासारिखा असून त्यास हत्तीचें शिर आहे.

वर सांगितलेल्या देवांपैकीं बाकी राहिलेल्या नऊ देवांतून साम्प्रत एकाचेंहि देऊळ नाहीं, परंतु मागल्या काळीं बहुतेकांचीं होतीं. कित्येकांचा एक वर्षदिवस येत असतो; त्या दिवशीं त्यांचा मूर्त्ति करून पूजितात, आणि दुसऱ्या दिवशीं त्या प्रवाहांत टाकून देतात. दुसऱ्यांचा संध्येंत मात्र उच्चार होतो. साम्प्रत इंद्रास लोक जितका मानितात, त्याहून पूर्वीं त्याचें मान विशेष असे असें दिसतें; त्यास स्वर्गाचा राजा आणि अमरेंद्र असें ह्मणतात, आणि जसा युनानी लोकांत जुपितर होता तसा हा हिंदूंचा देव आहे असें, पूर्वेकडील देशांविषयींचा एका उत्कृष्ट माहितगारानें ठराविलें होतें; परंतु साम्प्रत त्याची कोणी विशेष वास्तपुस्त घेत नाहीं.

प्रीतीचें दैवत काम; त्याचीहि अशीच दशा झाली आहे. हिंदूंचा देवतांतून हा मोठा मनोरंजक आहे, व त्याचें स्वरूप युरोपीयन लोकांचा कल्पनांस विशेषेंकरून अनुसरून आहे. या देवास सर्व काळ तारुण्य व उत्कृष्ट

स्वरूप दिलेलें आहे; आणि तो, देव व मनुष्य, या दोघांवरहि आपली सत्ता चालवितो. ब्रह्मा, विष्णु, आणि दुर्मुखलेला शिव, हेहि याचे पुष्पांचें धनुष्य आणि मंजिऱ्यांनीं युक्त असे बाण, यांहीं घायाळ झाले आहेत. प्राचीन काळचा काहण्या, काव्यें, व नाटकें, यांत याचा देवालयें व वनें यांचें मोठें माहात्म्य आहे; परंतु साम्प्रत दुसऱ्या नवांप्रमाणें याचाहि अव्हेर होऊन लोक अवमान करितात; त्या नवांतूनहि यम हा मेलेल्यांचा न्याय करितो, म्हणून त्या स्वरूपावरून मात्र त्यास लोक भिऊन मान देत असतात.

या प्रत्येक देवाचा निरनिराळा लोक आहे, आणि त्याचा परिवारहि निराळा आहे. हे सर्व लोक मोठे विस्तीर्ण, व सुखाचीं स्थानें आहेत, आणि सर्वांमध्यें सोनें, व रत्नें यांचा लकलकाट आहे.

त्या सर्वांतून इंद्रलोकाचें पुष्कळ सूक्ष्म रीतीनें वर्णन केलें आहे; त्यांत रत्नखचित सुवर्णाचा मंदिरांचा असावयाचा तसा सुकाळ असून, शिवाय त्यांत उदकाचे प्रवाह, वनें, उपवनें, अशीं भरून गेलीं आहेत; असंख्य जातींचीं फुलें प्रफुल्लित आहेत, आणि त्यांचा मध्यभागीं एक देवलोकींचा सुवासिक वृक्ष आहे, त्याचा सुवासानें सर्व जागा भरून गेली आहे. त्यामध्यें, सूर्याचा प्रकाशापेक्षांहि विशेष दैदीप्यमान, अशा तेजाचा प्रकाश पडला आहे; व अप्सरा व गंधर्व, यांची दाटी होऊन गेली आहे. पुष्कळ प्रकारचे गण तेथील राहणारांची सेवा करित आहेत, आणि ते रहिवासी, गायन, नृत्य, वादन आणि सर्व प्रकारची क्रीडा यांहीं अहर्निशी सुख पावताहेत.

चांगले व वाईट भूतगण.

निरनिराळ्या स्वर्गलोकांत गंधर्व व यक्ष आहेत. त्यांशिवाय या सृष्टीचा इतर भागांत नानाप्रकारचीं भूतें पसरलेलीं आहेत.

असुर, हे देवांचे भाईबंद आहेत; देवांनीं त्यांचा वांटा घेऊन त्यांस पाताळांत टाकिलें; परंतु त्यांणीं आपल्या

प्रतिस्पर्ध्यांबरोबर पुष्कळ दिवस टकर मारिली. ग्रीसदेशांतील दंतकथांत जे तैतन ह्मणून राक्षस होते त्यांशीं हे बरेच मिळतात.

दैत्य, ही एक दुसरी दुरात्म्यांची जाति आहे; त्यांणीं फौजा जमवून देवांजवळ लढाया मारिल्या, इतके ते बलाढ्य होते.

राक्षस, हेहि मोठे व दुष्ट प्राणी आहेत, आणि पिशाच, हेहि त्याच प्रकारचे आहेत; परंतु यांची शक्ति कांहीं कमी आहे. भूत हे अति हलक्या प्रतीचे आहेत; आमच्यामध्यें लहान मुलांस भेवडावण्याकरितां जा भूतांचा व प्रेतांचा गोष्टी सांगतात, त्यांसारिखे ते आहेत, परंतु हिंदुस्थानांत आबालवृद्ध सर्व प्रतींचे लोक भूतें आहेत असें मानितात.

ग्रामदैवतें.

दुसरा एक देवतांचा अतिशय मोठा समुदाय आहे, त्याचें वर्णन सांगावयाचेंच राहिलें आहे; या देवतांची निराळी अशी सत्ता जागचा जागीं मात्र कबूल करितात; बाकी दुसऱ्या कोठें नाहीं, आणि त्यांची पूजा करणें हें सशास्त्र नाहीं असें ब्राह्मणलोक प्रसंगवशात् ह्मणत असतात. यांस ग्रामदैवतें ह्मणतात; दरगांवास असे दोन तीन देव असतात; ते क्षेत्रपाल असें समजून त्यांची पूजा करितात, अथवा एकाद्या समयीं हे देव आपणास मारितील किंवा उपद्रव करितील या भीतीनेंहि करितात. यांसारिखे रोमनलोकांमध्यें कांहीं देव होते; आणि त्यांप्रमाणेंच यांस यांचा नेहेमींचा (क्षेत्रपालांचा) रूपानें, अथवा त्यांचें साधारण रूप जसें लोकांत समजतात त्या रूपानें सर्व हिंदुस्थानदेशांतील लोकहि मानितात, असेंहि केव्हां केव्हां होतें; परंतु याहूनहि पुष्कळ ठिकाणीं असें होतें, कीं कोणी मनुष्य मरून ग्रह होतात, आणि त्यांजवर आसमंतातूचा लोकांचें चित्त लागून तेच असले देव होतात.

त्यांचीं देवालयें अथवा मूर्ति हीं क्वचितच असतात. त्यांची पूजा करणें ती मातीचा गोळ्यांचा रूपानें करितात.

या देवांतून कांहीं शूद्रांचे प्राचीन देव असून ब्राह्मणांचा धर्माची स्थापना झाल्यावरहि ते जीवंत राहिले असतील, हें शक्य आहे.

याप्रमाणें हिंदूंचा धर्माचें संक्षिप्त वर्णन केलें आहे. तो सविस्तर कसा आहे, हें समजण्यास त्यांचा कथाभारूडांत जा असंख्य गोष्टी आहेत त्यांतून कांहीं अवश्य सांगाव्या लागतील. देव व दैत्य यांणीं अमृत प्राप्त होण्याकरितां समुद्रमंथन केलें, तें, आणि पुढें जा युक्तीनें देवांनीं आपल्या भागीदारांस ठकवून जी वस्तु प्राप्य झाली ती त्यांस दिली नाहीं. तो प्रकार; तशीच एका साधूनें स्तव केल्यावरून गंगेनें आकाशांतून उडी टाकिली, ती शिवाचा मस्तकावर मोठ्या तडाक्यानें पडली, आणि त्याचा जटांमध्यें वर्षांचीं वर्षें फिरत होती, आणि शेवटीं गडबडत गडबडत मोठ्या ओघानें मत्स्य, सर्प, कांसव, व सुसर, हा जो आपला सर्व परिवार तो घेऊन पृथ्वीवर पडली, ती गोष्ट; तसेंच देवीनें आपल्या अत्यंत तीव्र मनीषेनें, बापाशिवाय, गणेशास उत्पन्न केलें, व पुढें शिवानें त्याचें मस्तक कापून, त्या अडचणीचा वेळीं जें हत्तीचें शिर हातास लागलें तें पुनः लाविलें, ती कथा; या प्रकारचा गोष्टी, व तसेच देवांचे तंटे; त्यांचे प्रसंगवशात् प्रीतिमत्सर; मनुष्य व राक्षस यांशीं त्यांचा लढाया; त्यांचे पराजय, पलायनें, व बंदी; आपल्या इच्छा पूर्ण होण्याकरितां केलेलीं प्रायश्चित्तें, व तपश्चर्या; त्यांचीं बोलणारीं आयुधें; त्यांणीं घेतलेलीं नाना प्रकारचीं स्वरूपें, आणि त्यांचा मनांतून जांचा नाश करावयाचा असे त्यांचा इंद्रियांस मोह पाडण्याकरितां त्यांणीं जा ठकविद्या केल्या आहेत, त्या:— याप्रमाणें जर हिंदुस्थानांतील लोकांचा धर्मसंबंधी मतांचें सविस्तर वर्णन करावयाचें असेल, तर या वरील सर्व गोष्टी सांगणें अवश्य होईल; परंतु त्या वर्णनांत जेवढी ग्रंथाची जागा जाईल, तितक्या ऐवजीं त्यांतील मजकूरापासून कांहींच श्रेय येणार नाहीं.

हिंदूंचा धर्माचें साधारण स्वरूप.

या सर्व दंतकथांमध्यें अतिशयोक्ति व विलगपणा हीं त्यांचीं मुख्य चिन्हें आहेत, एवढें त्यांविषयीं एथें सांगणें बस आहे. ग्रीकलोकांचे जे देव होते, ते मनुष्यांसारखे होते, आणि त्यांचा शक्ति व बुद्धि या मात्र विशेष मोठ्या होत्या; परंतु त्यांचा क्रिया मनुष्यांचा सारख्याच त्याचा स्थितीस अनुसरून होत असत; त्यांत व मनुष्यांचांत तफावत इतकीच कीं त्यांचें स्वरूप ( ईश्वराचा ) पूर्णतेचा जवळजवळ आलेलें असे, तदनुसार ते विशेष भारदस्तपणानें व सामर्थ्यानें वागत. आतां इकडे हिंदूंचा देवांस मनुष्यांसारखे मनोविकार आहेत, परंतु त्यांचा स्वरूपांत हमेशा कांहीं तरी अलौकिक असतें; आणि त्यांची वर्तणूक कांहीं अंशीं अनावर व छान्दिष्ट असत्ये. त्यांचे रंग नानाप्रकारचे आहेत:— लाल, पिवळे, व निळे. कित्येकांस बारा डोकीं आहेत, व पुष्कळांस चार हात आहेत. ते कारणाशिवाय रागावतात व कांहीं हेतु नसतां शान्त होतात, असें वारंवार घडून आलें आहे. एक देव एका वेळीं आपल्या शत्रूंस नुसत्या अवलोकनानें भस्म करून टाकण्यास, अथवा इच्छामात्रें करून जिकण्यास समर्थ होतो, आणि दुसऱ्या वेळीं त्याच देवास आपलें काम करावयास मोठ्या फौजा जमा कराव्या लागतात, आणि इतकेंहि करून त्याचा मोड होण्याची संधि जवळजवळ येत्ये, अशाहि कथा आहेत.

तीन मुख्य देवांचा शक्ति समान व अमर्याद आहेत, व ते त्यांचा उपयोग बहुधा एका विचारानें करित नाहींत, तेणेंकरून एकदां असें होऊन गेलें कीं एका तंट्यामध्यें शिवानें ब्रह्मदेवाचें एक डोकें कापून टाकिलें. त्याचप्रमाणें त्या तीन देवांची हुकमत दुसऱ्यांवर कशी चालावी, अथवा परस्परांवर तरी कशी चालावी याचा कांहीं नियमित क्रम नाहीं. ज्या इंद्रास स्वर्गाचा राजा ह्मणून ह्मटलें आहे, व ज्याची जुपितराशीं तुलना केली आहे, त्याची दुसऱ्या देवांवर कांहीं सत्ता नाहीं. या व दुसऱ्या विलग गोष्टी या धर्मांत

उत्पन्न होतात; त्यांचें कांहीं कारण हें आहे कीं, निरनिराळ्या पंथांचे लोक आपल्या प्रिय देवतेची अतिशय स्तुति करण्यास इच्छितात; परंतु मुख्य कारण असें आहे कीं सर्व पुराणें हीं सप्रमाण मानिलेलीं आहेत, त्यामुळें त्यांवरून रचलेल्या जा निरनिराळ्या जनकथा त्यांवर साधारण लोकांचा विश्वास न बसे असें करणें हें अशक्य आहे. इतकेंहि असून हिंदूंचा देवांचीं अक्राटविक्राट मानें, त्यांचे अपूर्व विचार व कृत्यें, आणि त्यांचीं विलक्षण स्वरूपें, व त्यांचा आसमंतात् असणारें वैभव, या सर्व गोष्टींत कांहीं विलक्षण आहे, तेणेंकरून आपल्या बुद्धीवर कांहीं ग्रह झाल्याशिवाय राहत नाहीं.

यज्ञ व तप यांचें जें सामर्थ्य वर्णन केलें आहे, ती हिंदूंचा धर्मांतील अतिशय विलग दिसणारी गोष्ट आहे. यज्ञ व तप यांचा योगानें कोणी तपस्वी आपल्या शापानें देवांवरहि अति कठीण संकटें आणूं शकतो, आणि अतिशय दुष्ट व अधर्मी असाहि मनुष्य देवांहून वर्चढ होऊन आपल्या कामना सिद्धीस नेण्यास त्यांस साधनीभूत करील, व त्यांस त्यांचा स्वर्गासुद्धां बलात्कारानें आपल्या सत्तेखालीं आणील, इतकेंहि होऊं शकेल. एके समयीं एका ब्राह्मणाचा शापानें इंद्र आपल्या लोकांतून पडला, आणि त्यास माजराचा जन्म घ्यावा लागला. यम ह्मणून जो मेलेल्यांचा भयंकर न्यायाधीश, त्याणें आपल्या अधिकारावर असतां एक कृत्य केलें, त्याबद्दल त्यास शाप होऊन दासाचा रूपानें जन्मान्तर करावें लागलें, अशी एक दंतकथा आहे.

एका राजाचा यज्ञापासून सर्व देवांस किती भीति पडली होती, ती विष्णूचा पांचव्या अवताराचा वेळेस दृष्टीस पडलीच आहे. दुसऱ्या एका राजानें तिन्ही लोक जिंकले, तेव्हां तीन मुख्य देव खेरीज करून बाकी सर्वांस पळून निरनिराळ्या जनावरांचीं रूपें धरून लपून राहवें लागलें; तिसरा एक राजा होता त्याणें यांहूनहि विशेष पराक्रम करून देवांस आपली पूजा करावयास लाविलें.

दुसऱ्या अशाच पुष्कळ गोष्टी आहेत, त्यांतून वर सांगितलेलीं हीं कांहीं थोडीं उदाहरणें आहेत. यज्ञादि क्रियांचें माहात्म्य वाढवून ब्राह्मणांचें महत्त्व व फायदा हीं वाढवावीं ह्मणून या सर्व कथा कल्पनेनें रचल्या आहेत, हें निःसंशय आहे. आतां साम्प्रत ज्या संबंधानें लोक देवास भजतात, त्या संबंधाविषयींचीं हीं मतें नव्हत; या केवळ पूर्वींचा काळचा दंतकथा आहेत. पूर्वीं यज्ञ व तप यांचा बळानें जीं कार्यें करून घ्यावयाचीं असत, तीं आतां भक्तीनें मिळवितां येतात. या नव्या मार्गानें जाणार जे साम्प्रदायी, ते, वेद व त्यांत सांगितलेलें कर्मकाण्ड यांचा बहुधा उघड रीतीनें तिरस्कार करितात. जशी कोणत्याहि धर्मांत नीति अगदीं सोडून दिली असत्ये असें नाहीं, त्याप्रमाणें या नव्या मताचे अनुसारीहि पवित्र असावें, असें ह्मणतात, आणि जरी सदाचरण करावेंच असें सांगत नाहींत तरी अपराध करूं नये, असें सांगतात; परंतु आपल्या पंथांतील गुरूचें जें एक दैवत असेल त्यावर विश्वास ठेवावा ही एक गोष्ट मात्र आवश्यक आहे असें त्यांचें मत आहे. जर त्या दैवतावर पूर्ण भक्ति आणि विश्वास असला, तर दुसऱ्या सर्व गोष्टींची उणीव पुरी होत्ये, आणि जर हा मुख्य विचार नाहीं, तर धर्मसंबंधीं आचार व नितीचे नियम, यांवर कितीहि जरी लक्ष दिलें, तरी त्यांपासून कांहींहि फायदा होत नाहीं. भगवद्गीतेंत या प्रकरणाचें स्पष्टीकरण करून भक्ति कशी करावी हें सांगितलें आहे; या सम्प्रदायाचा आद्य ग्रंथ भगवद्गीता आहे, असें कोलब्रूकसाहेबाचें मत आहे.

हिंदूंचा धर्मांतील देवांस नियमित स्थिति आहे, ही एक त्यांत विलक्षण गोष्ट आहे; परंतु ही यांतच आहे असें नाहीं. कल्प ह्मणून एक अचाट कालावधि आहे, त्याचा शेवटीं सृष्टीचा लय होतो; ब्रह्मा, विष्णु, शिव व दुसरे सर्व देव यांचें अस्तित्व जातें, आणि सर्वांचें मुख्य आदिकारण जो ईश्वर तो मात्र या अपार गगनामध्यें एकटाच शेष राहतो.

पुढें पुष्कळ युगें गेल्यानंतर त्याची शक्ति पुनः कार्यास लागत्ये, आणि हें सर्व जग व त्यांतील राहणारे मनुष्य व देव हे सर्व पुनः उत्पन्न होतात.

वर सांगितलेल्या बहुतेक गोष्टी अनाडी व क्षुल्लक आहेत; या अगदीं प्राचीन व अतिशय रानट अवस्थेंतील लोकांचा वेळचा शेष राहिलेल्या नाहींत असें कोण म्हणणार नाहीं ? परंतु ख्रिस्ती धर्माचें मूळ जरी पवित्र होतें, तरी जेव्हां युरोपांत विद्येचा क्षय झाला, तेव्हां, सारासार विचार करून पाहिला असतां, त्या धर्माचा योग्यतेप्रमाणें त्यामध्येंहि असेच दुष्ट आचार उत्पन्न होऊन त्याचा लोप नाहीं झाला असें नाहीं. यास्तव, पूर्वेकडील लोकांचा शास्त्रामध्यें जे उत्कृष्ट माहितगार आहेत ते जें सांगतात, कीं हिंदूंचा धर्म पूर्वीं फार शुद्ध होता, परंतु जेव्हां बाकीचा सर्व विद्येचा क्षय झाला, तेव्हां त्याबरोबर हाहि साम्प्रतचा स्थितीस आला; हें जें त्यांचें मत आहे, त्याप्रमाणेंच आपण मानिलें असतां चिंता नाहीं.

जे विचार मी वर सांगितले आहेत, त्यांत मी दुसऱ्या देशांतील धर्मांचा कांहीं उल्लेख आणिला नाहीं. हिंदुस्थानांतील देवांचा कथा जा रीतीनें उत्पन्न झाल्या, ती रीति, व त्यांतील मूलतत्त्वें, यांशीं आणि ग्रीस व मिसर या देशांतल्यांशीं कांहीं संबंध आहे असा पत्ता, प्राचीन काळचा गोष्टींविषयीं शोध करणारे लोक अद्यापि लावूं शकतील, हें शक्य आहे; परंतु या दोहोंचें बाहेरील रूप इतकें भिन्न आहे, कीं हिंदुस्थानांतील गोष्टींचें स्पष्टीकरण करण्याकरितां मिसर व ग्रीस या देशांतील भोळेभावाचा गोष्टींचे दृष्टान्त जर आणिले तर आपली कल्पना अगदीं बराबर चालूं शकत नाहीं.

मरणानन्तरची स्थिति.

मरणानन्तर आपली स्थिति कशी होत्ये याविषयीं हिंदूंचें मत काय आहे, त्या प्रकरणीं मात्र आतां कांहीं थोडें सांगावयाचें राहिलें आहे. मरणानन्तर आपलें देहान्तर होईल असें त्यांचें विलक्षण

मत आहे, परंतु निरनिराळ्या योनींतील जन्मांचा मध्यें आपल्या कर्माप्रमाणें वर सांगितलेल्या स्वर्गलोकांतून एकाद्या लोकीं आपणास सुख भोगावयास सांपडेल, अथवा त्याचप्रमाणें पाप केलें असल्यास, स्वर्गाहूनहि पुष्कळ असे जे त्यांचे नरकलोक आहेत, त्यांमधील एकाद्यांत तसेच क्लेश भोगावे लागतील, असें ते मानितात. कोणीहि चांगल्या स्थितीची आशा धरूं नये, असें नाहीं, असें दिसतें; कारण अति दुष्ट मनुष्य असला तरी किती एक काळपर्यंत क्लेश सोसून व वारंवार जन्मान्तरें भोगून आपल्या दोषांपासून तो मुक्त झाला, ह्मणजे त्यास पुनः उत्तम गति प्राप्त होऊं शकेल, व तो शेवटीं स्वर्गास जाऊन, सायुज्यतेचें म्हणून, जें पुण्यवानांस मिळावयाचें अति मोठें फळ, तें त्यास प्राप्त होईल.

मरणानन्तर सुखदुःखांचा स्थितीचीं जीं त्यांणीं वर्णनें केलीं आहेत, तीं मोठ्या आविर्भावाचीं व अलंकारयुक्त आहेत. जे पुण्यवान् असतात, त्यांणीं हा देह सोडिला, ह्मणजे ते आनंदकारक मार्गांनीं यमाचा लोकास जातातः वाटेंत त्यांस सुवासिक वृक्षांची छाया असल्ये, व कमळांनीं भरलेले असे प्रवाह असतात. ते मार्गानें जात असतां त्यांवर पुष्पांचे वर्षाव होतात, आणि पुण्यवान् लोकांचा गायनांनीं व त्यांहूनहि सुस्वर अशा गंधर्वांचा गीतांनीं वायूंत प्रतिध्वनि होत असतो. जे दुष्ट असतात, त्यांस अंधारांतून व भयंकर वाटांनीं जावें लागतें; केव्हां केव्हां त्यांस आगीसारख्या रेतीवरून चालावें लागतें, आणि केव्हां केव्हां दगडांवरून चालावें लागतें तेव्हां दर पाउलास त्यांचे पाय कापतात. ते नागवे चालत असतात, तृषेनें आक्रान्त असतात, हेंदर व रक्त यांणीं भरलेले असतात, आणि त्यांवर कढत राखाडी व रखरखित निखारे यांचा सरी पडत असतात; त्यांस वारंवार भयंकर पिशाच दिसतात, तेणेंकरून ते भीति पावतात, आणि त्यांचा ओरडण्यांनीं आकाश भरून जातें. शेवटीं जा नरकांत त्यांस टाकावयाचे असतात, त्यांचें वर्णन

केलें आहे; तेंहि तशाच रीतीनें केलें आहे.

या धर्मापासून नीतीसंबंधी परिणाम.

हीं बक्षिसें व शासनें पुष्कळ ठिकाणीं मरणाराचा पापपुण्याप्रमाणें चांगल्या मानानें बसविलेलीं आहेत, आणि व्यावहारिक लोकांचा वर्तणूकेंत पुष्कळ फेरफार होण्यास तीं कारणीभूत होतात हें निःसंशय आहे. परंतु दुसरीकडून पाहिलें असतां, भक्ति व देवसेवेप्रकरणीं बाहेरील आचार या दोहोंचा जो पराक्रम वर्णन केला आहे, तो, व अपराधांचीं प्रायश्चित्तें केलीं असतां दोषापासून मनुष्य मुक्त होतो ही जी सैल दोरी ठेविली आहे ती, या दोन गोष्टी दुर्दैवेंकरून या धर्मामध्यें विलक्षण आहेत, आणि तींहींकरून नीतीचा तत्त्वांचें पाठबळ कमी करण्याकडे या धर्माचा कल विशेष जातो.

हीं जीं या धर्मांतील व्यंगें सांगितलीं, त्यांपेक्षां या धर्माचा भक्तांवर जें त्याचें अप्रत्यक्ष वजन पडतें तें लोकांचें विशेष नुकसान करितें. त्यांत जीं अतिवाईट पाखंडें सांगितलीं आहेत, तींहींकरून मनास नीचत्व येऊन तें शक्तिहीन होतें. साधारण रीत्या पराक्रमाची प्रीति व मेल्यानंतर आपली कीर्ति व्हावी अशी इच्छा हीं जीं मनुष्यांत असतात, तींहींकरून सद्गुणांस मोठें उत्तेजन येतें; परंतु या लोकीं आपणास स्वस्थता प्राप्त होऊन, परलोकीं ईश्वराचा तेजांत आपण मिळून जावें, असा या धर्माचा उद्देश आहे, तेणेंकरून वर सांगितलेले दोन्ही प्रकारचे हेतु नाहींसे होतात. तसेच कायदा व इतर विद्या यांचें जें वास्तविक काम, तें या धर्मानें आगंतुकपणानें आपण घेतलें आहे, तेणेंकरून त्या त्या विषयांसंबंधीं जें कांहीं ईश्वरानें प्रत्यक्ष निवेदन केलें आहे असें ह्मणतात, त्या वेळीं त्या शास्त्रांची जी स्थिति होती, त्याच जागीं त्या विषयांचें ज्ञान थबकून राहिलें आहे; तसाच हा धर्म लोकांचा सूक्ष्म रीतिभातींतहि फार ढांढुळा ढांढूळ करितो, तेणेंकरून स्वेच्छाचारित्वाची संवई व बुद्धि यांचें निर्मूळ

होतें, आणि जीवित हें यंत्रासारखें फिरणें असें होऊन जातें. जेव्हां लोकांस वागण्याची मोकळीक असत्ये, तेव्हां जसजशी चांगल्या फेरफारांची गरज लागत्ये तसतसे ते होतात, आणि कोणाहि लोकांस प्रयत्न करावा न लागतां थोडक्याच कारकीर्दींत सर्व राष्ट्रांची स्थिति अगदीं बदलत्ये. परंतु जेव्हां लोकांचा मार्गामध्यें धर्माचें लांकडूं येऊन पडतें तेव्हां शंभर वर्षांचा फेरफार करावयास जितका धीटपणा लागतो तितका एक अगदीं क्षुल्लक गोष्ट करावयास लागतो; यामुळें जर मनुष्यानें आपल्या खाण्यापिण्यांत कांहीं बदल केला, अथवा आपल्या देशबांधवांमधील धर्मसंबंधीं व राज्यसंबंधीं जीं सर्व मतें असतील त्या सर्वांचा विरुद्ध मतें स्वीकारिलीं, तर या दोन्हीं गोष्टी करित्ये वेळीं आपला धर्म व आपल्या मित्रांची संगति हीं सोडण्यास सारखीच तयारी करावी लागत्ये.

आतां पाहूं जातां या धर्मांचा जा मर्यादा होत्या, त्यांतच फेरफार न होऊं देण्याविषयीं या धर्माचें अगदींच कांहीं चाललें नाहीं; कारण जरी मूळ ज्ञापित धर्मग्रंथांविषयीं कोणी संशय घेत नाहीं, तरी त्यांचा निरनिराळ्या भागांचें निरनिराळें महत्व लोकांनीं कल्पिलें आहे, आणि एकाच वाक्यांचे निरनिराळे अर्थ केले आहेत; तशांत वादग्रस्त गोष्टींचा निर्णय करावयास, आणि एकसारखा आचार बलात्कारानें चालवायास एक मुख्य सभा अथवा एक अध्यक्ष असें मुळींच कांहीं नाहीं, तेणेंकरून नाना प्रकारचे पंथ उत्पन्न झाले आहेत, त्यांचीं मतें व आचार हीं दोन्ही परस्परांपासून भिन्न आहेत.

पंथ.

त्या पंथांत मुख्य तीन आहेत; शैव (म्हणजे शिवाचे साम्प्रदायी ) वैष्णव ( म्हणजे विष्णूचे साम्प्रदायी ), आणि शाक्त, ( ह्मणजे त्रिगुणात्मक ईश्वराचा रूपाचा जा शक्ति त्यांतून कोणत्याहि एका

शक्तीचे साम्प्रदायी.)

या प्रत्येक पंथाचे आणखी नाना प्रकारचे भेद झाले आहेत; ते आपल्या आराध्य देवतांचा स्वरूपांवरून, अथवा धर्मसंबंधीं व तत्त्वविचारसंबंधीं त्या पंथांचीं जीं मूळचीं मतें त्यांत प्रत्येक शाखेचा लोकांनीं जी आपल्या पदरची भर घातली आहे त्याप्रमाणें झाले आहेत. शाक्तांमध्यें जा जा शक्तींची ते भक्ति करितात त्यांवरून दुसरे आणखी तीन विभाग झाले आहेत. देवी म्हणून जी शिवाची स्त्री तिचे भक्त हे इतर दोन्ही पंथांतील साम्प्रदायी एकत्र केले असतां त्यांहून पुष्कळ आहेत; याविषयीं कांहीं संशयच नको.

वर सांगितलेल्या तीन मुख्य पंथांशिवाय दुसरे लहान लहान पंथ आहेत ते सूर्य व गणेश यांची भक्ति करितात. शिवाय दुसरे कांहीं आहेत, त्यांणीं हिंदुधर्माचें स्वरूप मात्र बाहेरून राखिलें आहे, परंतु ते शुद्ध एकेश्वरमताचा अगदीं जवळ जवळ आहेत.

सीक लोकांविषयीं पुढें वर्णन केलें जाईल; त्यांणीं एका पंथाची स्थापना केली आहे, त्यांत एवढे मोठे नवे फेरकार सुरू केले आहेत,कीं तो एक नवाच धर्म केला आहे असें म्हटलें असतां चालेल. प्रत्येक हिंदु हा वर सांगितलेल्या पंथांतून कोणत्या तरी एका पंथांत असतोच, असें कोणीं मनांत आणूं नये. कारण जे अमुकच देवास मात्र भजावें या मताचा विरुद्ध असून सर्वव्यापक मत अवलंबन करितात, आणि वेद, पुराणें व दुसरीं पवित्र पुस्तकें यांचा आधारानें आपल्या संस्कारादि क्रिया करितात, व दुसऱ्या उगमांपासून उत्पन्न झालेल्या क्रिया वर्ज करितात, त्यांसच खरे हिंदु असें ह्मणतात. बहुतेक ब्राह्मण अद्यापि दिसण्यांत या सम्प्रदायामधील आहेत; परंतु त्यांतहि, जे विशेष तत्त्वविचारी धर्मवेत्ते आहेत ते खेरीज करून, बाकीचे सर्व वर सांगितलेल्या निरनिराळ्या देवांतून कोणा एकाकडे तरी वळलेले आहेत; आणि धर्मसंबंधीं जा आवश्यक क्रिया त्यांपलीकडेस बाकी सर्व

वस्तूंविषयीं जांस गरज नाहीं असे जे कनिष्ठ जातीचे लोक, त्यांची तर कोणत्या तरी एका देवावर स्पष्टच भक्ति असत्ये. मुख्यत्वेंकरून विष्णूचा अवतारांवर लोकांचा भाव बसला आहे, असें पूर्वीं सांगण्यांत आलें आहे. बंगाल व उत्तर-हिंदुस्थान, यांमध्यें त्या अवतारांकडे लोकांचा धार्मिक वृत्ति लागून गेल्या आहेत, आणि जरी शिवाचीं देवालयें व लिंगें जिकडे तिकडे आहेत, तरी त्याचे भक्त थोडे आहेत, आणि त्यांमध्यें भक्तीचें विशेष स्फुरण दिसत नाहीं.

शिव हा पूर्वीपासून सार्वकाळ ब्राह्मणाचें अधिदैवत आहे असें दिसतें, परंतु याचा योगानें लोकांचा मनांत पुष्कळ उत्साह उत्पन्न झाला असें कधीं झालें नाहीं. जेथें याचा पंथाची उघड प्रवृत्ति आहे, तेथेंहि राम व कृष्ण यांचा मानववृत्ति व त्यांचीं गोड चरित्रें यांहीं लोकांचीं मनें विशेष वेधिलीं आहेत; त्यांतून यमुनेचा किनाऱ्यावर व गंगेचा वायव्येकडील भागांवरील प्रदेशांत, राम हें उपासनेचें मुख्य दैवत आहे, आणि त्यांतूनहि बैरागी वगैरे जे पंथ त्यांमध्यें तरी निदान आहेच; आणि त्याहून खालचा गंगेवरील प्रदेशांत व उत्तरहिंदुस्थानाचा पश्चिम व मधील भागांतील सर्व प्रदेशांत कृष्णाचें माहात्म्य आहे. असें आहे तरी, लोक जिकडे तिकडे रामास भजतात, आणि हिंदुलोकांत साधारण रीतीनें सलाम करावयाचा असल्यास त्याचें नाव दोन वेळा ( राम राम असें ) घेतात.

बैराग्यांचा वगैरे पंथांत शैवांचें मान सर्वत्र विशेष आहे. इतर लोकांमध्यें पाहिलें तर, म्हैसूरप्रान्तांत व महाराष्ट्रदेशांत, हे अतिशय आहेत. त्यापुढें दक्षिणेस, वैष्णवांची प्रवृत्ति विशेष आहे, परंतु तेथें रामकृष्ण या मानव स्वरूपांनी विष्णूची पूजा करित नाहींत, तो जगाचा पालनकर्त्ता व नियन्ता अशा गुणविशिष्ट रूपानें त्यास भजतात. शाक्त ह्मणजे शक्तीचे उपासक हे इतर लोकांबरावर मिसळले आहेत, परंतु यांची ठिकठिकाणीं संख्या अधिक आहे;

बंगाल्यांतील तीन चतुर्थांश लोक शक्तीची पूजा करितात, आणि त्यांतूनहि बहुतेक देवीस भजतात.

वर सांगितलेल्या उदाहरणांत जे पंथांचे भेद आहेत, त्यांत परस्परांमध्यें केव्हां केव्हां हाडवैरें असतात, परंतु तीं बाहेरून प्रसिद्ध दिसत नाहींत. कोलब्रूक, प्रोफेसर विल्सन, व डाक्टर हामिल्टन बुक्यानन या साहेबांचा लेखांवरून युरोपीयन लोकांस त्यांविषयीं माहिती झाली असेल तर असेल, नाहीं तर, त्यांस स्पष्ट माहिती असणें विरळा. हिंदूंचा कपाळास गंध असतें, त्यावरून प्रत्येक मनुष्याचा पंथ समजतो, आणि जरी हिंदूंचा पोषाकांत हें अति विलक्षण चिन्ह आहे, आणि याचा उद्देश गंध लावणारांचा पंथांचा भेद समजावा असा आहे, तरी तसें न समजतां या खुणा जातीचा आहेत असें लोक समजून गेले आहेत.

जा लोकांस कोणा एका पंथांत जावयाचें असतें, त्यांस एका प्रकारची दीक्षा देऊन त्यांत घेतात; जशी ब्राह्मणांस दीक्षा देतांना त्यांस गायत्री सांगतात त्याप्रमाणें पूर्वोक्त दीक्षा देत्ये वेळीं त्या पंथाचा गुरु दीक्षा घेणाराचा कानांत कांहीं थोडक्या शब्दांनीं गुप्त मंत्र हळूच सांगतो; हा दीक्षेचा मुख्य भाग झाला.

हे पंथ निरनिराळ्या काळीं झाले आहेत. कांहीं फार जुने व कांहीं अगदीं नवे आहेत.

मुख्य तीन देव व त्यांचा शक्ति, यांची जी निरनिराळी पूजा करितात, तिचें मूळ बहुधा फार प्राचीन आहे;[२]

(२) शिवाचा शक्तीची पूजा फार प्राचीन काळीं करित असत, याविषयीं खातरीचें प्रमाण प्रोफेसर विल्सन् याणें दाखविलें आहे. कुमारी म्हणून नावानें देवीचें एक स्थान हिंदुस्थानाचा दक्षिणटोंकास होतें, असें पेरिप्लुसनामें युनानी ग्रंथांत आहे; तो ग्रंथ आर्यन् नामें पुरुषानें ख्रिस्ती शकाचा दुसऱ्या शतकांत बहुधा लिहिला असावा असें म्हणतात; त्या देवालयावरून जवळचा भूशलाकेस " कन्याकुमारिका भूशिर " असें म्हणतात.

परंतु साम्प्रतचा पंथांतील विलक्षण सम्प्रदायांप्रमाणें एकाचा वरिष्ठपणा व इतरांचा कनिष्ठपणा असें मानण्याचा प्रकारास केव्हांपासून आरंभ झाला हें इतकें स्पष्ट दिसून येत नाहीं. तथापि जा काळापासून मुख्य देवांची पूजा निरनिराळी करूं लागले, त्या काळापेक्षां हें फार अर्वाचीन आहे, असें संभवतें.

राम, कृष्ण, इत्यादि निरनिराळ्या अवतारांचा भक्तीवरून जे पंथ झाले आहेत, ते ख्रिस्ती शकाचा आठव्या शतकाचा आरंभाचा अलीकडील आहेत, असें बहुतकरून खचित दिसतें.[३]

हिंदूंचा शुद्ध धर्म मिळण्याची जागा काय ती वेद; परंतु लोकांत त्यांचा अव्हेर झाल्यामुळें नाना प्रकारचा मतांची संख्या वाढली, हें निःसंशय आहे. या वेदांचा उपयोग करण्याचा अधिकार तीन द्विजवर्णांस मात्र होता; त्यांतून साम्प्रत दोहोंचें निर्मूल झालें आहे असें मानितात, आणि बाकी राहिलेला एक वर्ग आपल्या मूळ कर्मांपासून पुष्कळ भ्रष्ट झाला आहे. याच कारणामुळें प्राचीन काळचा नित्यनैमित्तिक कर्मांचा लोप होऊन, धर्मसंबंधीं मतांत जे अलीकडे फेरफार झाले त्यांस अनुसरून नवीन संस्कारशास्त्र झालें आहे, असें संभवतें.

या शास्त्रांत, कांहीं सूक्तें, कांहीं स्तुति व कांहीं मंत्र, हीं अर्वाचीन काळीं एकत्र करून त्यांत कांहीं वेदाचे भाग घातले आहेत; या सर्व एकवट केलेल्या समूहास हिंदुलोकांचें नवीन कर्मकाण्ड असें ह्मटलें तरी चालेल. **एशियाटिकरिसर्चिस्** ( म्ह० एशियाखण्डाविषयीं शोध ) ह्मणून एक ग्रंथसमुदाय आहे; त्यांतील पांचव्या व सातव्या

---

( ३ ) एक अकराव्या शतकांत लिहिलेला ग्रंथ आहे, त्यांत शंकराचार्य म्हणून जो आठव्या शतकांत झाला त्याचा वेळचा पंथांतील मतांचें उद्घाटन केलें आहे, त्यांत वर सांगितलेले पंथ नाहींत.

भागांमध्यें कोल्ब्रूक साहेबानें याविषयीं निरनिराळ्या निबंधांत विवेचन केलें आहे.

हें संस्कारशास्त्र आणि जाविषयीं मनूमध्यें प्रसंगवशात् कांहीं लेख आपल्या दृष्टीस पडतात तें शास्त्र, यांमध्यें जितका भेद असावा असें आपणास वाटेल तितका नाहीं. स्नान, गायत्रीजप इत्यादि,याविषयीं जो यांत लांबट बोध केला आहे, तो वेदांतील धर्मास अनुसरून आहे, आणि तो कदाचित् मनूचा वेळींहि तसा असेल, परंतु त्याचा उल्लेख करण्यास त्यास कारण प्राप्त झालें नसेल. साम्प्रत लोक जा पदार्थांची स्तुति करितात, तीं सृष्टींतील पंचमहातत्त्वें व इतर शक्ति यांचीं दैवतें आहेत, व तीं बहुतकरून पूर्वींसारिखींच आहेत; त्यांत कृष्णाचें नाव आलें आहे,परंतु हें नवीन आहे हें उघड असून, त्यांतूनहि तें क्वचितच आलेलें आहे.

ब्रह्मा, विष्णु, व शिव यांचा सगुण रूपांचीं ध्यानें करणें, हा पाठ, साम्प्रत प्रवृत्त झालेल्या नवीन आचारांतील आहे, आणि "विष्णूनें तीन वेळां पावलें टाकिलीं इत्यादि" अर्थाचा जो मंत्र वेदामध्यें आहे, तो मूळारंभीं ह्मणून विष्णूचें वारंवार स्मरण करणें, हा त्या सर्वांहून विशेष आचार आहे. वेदांतील पूर्वोक्त वाक्याचा उद्देश पांचव्या अवताराचा निर्देश करावा असा दिसतो, आणि असें वर्णन दुसऱ्या ठिकाणीं फारसें केलेलें नाहीं, त्यामुळें हें वाक्य वारंवार आणिलें आहे असें दिसतें. मनूचा वेळीं जे पंचमहायज्ञ होते तेवढ्यांविषयींच उघड यत्ता करून कोल्ब्रूक साहेबानें वर्णन केलें आहे, परंतु साम्प्रत एक नवीन प्रकारची पूजा निघाली आहे तिजविषयीं मनुस्मृतींत कोठेंहि उल्लेख नाहीं, आणि ती तर प्रत्येक हिंदूचीं जीं मुख्य कर्में त्यांतील एक अशी होऊन गेली आहे. ती कोणती ह्मणाल तर मूर्त्तिपूजा.--ही नेहेमीं केली पाहिजे, आणि त्या समयीं मूर्त्तीपुढें पुष्कळ वेळा साष्टांगनमस्कार घातले पाहिजे, व दुसऱ्या रीतीनें त्यांचा स्तव केला पाहिजे; त्यांपुढें धूप जाळला

पाहिजे, त्यांस फलपुष्पें व केव्हां केव्हां पक्वान्नें अर्पिलीं पाहिजेत. कित्येक मूर्तींस त्यांचे भक्त पोशाक घालतात आणि जवाहीर व दुसरे अलंकार घालून शोभवितात; याप्रमाणें, त्या मूर्ति ह्मणजे जशीं कांहीं मनुष्येंच, असें समजून सर्व प्रकारें त्यांशीं वागतात.

हिंदुलोकांचा धर्मसंबंधीं क्रिया पुष्कळ आहेत, परंतु त्यांपासून मनावर कांहीं ग्रह व्हावा अशा त्या नाहींत. त्यांहीं करावयाची जी प्रार्थना तिचा नमूना कोलब्रूक साहेबानें दिला आहे, त्यावरून पाहतां तींत कांहीं थोडीं उत्कृष्ट वाक्यें नाहींत असें नाहीं; परंतु एकंदराखालीं ती कंटाळवाणी व नीरस आहे. प्रत्येक पुरुष आपलीं नित्य कर्में आपल्या घरामध्यें अथवा देवालयीं, अथवा प्रवाहावर, अथवा तळ्यावर, आपल्या सोईस येईल तेथें, एकटाच करितो. त्यामुळें तो जें स्तवन करून ईश्वराजवळ बोलतो त्यांत जर त्यास गोडी न लागली, तर त्याबराबर प्रार्थना करण्यास दुसरे लोक असल्यापासून जें प्रेम उत्पन्न व्हावयाचें तेंहि होत नाहीं. जरी ही प्रार्थना बदलली आहे, तरी ती करण्याचे काळ पूर्वीं मनूनें वर्णन केल्या प्रमाणेंच आहेत. आधानकाळापासून मरणकाळापर्यंत पूर्वींप्रमाणेंच संस्कार केले पाहिजेत, आणि संध्या, होम व यज्ञ, यांचा जो एक नियमित क्रम लावून दिला आहे, त्याचप्रमाणें नेहेमीं झालें पाहिजे. मनूचा वेळचा आचार कसाहि असो; परंतु या कर्मांविषयीं जें त्याणें लिहिलें आहे, त्यापेक्षां साम्प्रत लोकांनीं त्यांचा संक्षेप केला आहे; असें करण्यास त्या वेळीं मोकळीक नव्हती.

साम्प्रतहि जर कोणी कडकडीत ब्राह्मण आपलीं सर्व कर्में यथास्थित करूं लागला, तर त्यास चार तासांहून कमी काळ पुरणार नाहीं; परंतु जर तो प्रपंचांत पडलेला असेल, तर, तो ब्राह्मण असला तरी, त्यास त्याचीं धर्मसंबंधीं सर्व कर्में अर्ध्या तासांत करतां येतील, आणि तोच जर कनिष्ठ

वर्णांतील मनुष्य असला, तर तो स्नान करतांना आपल्या कुलदेवतेचें स्मरण मात्र करितो, तेवढ्यानें त्याचें सर्व होतें.

गोसाव्यांचा पंथांचें माहात्म्य.

लोकांमध्यें धर्मसंबंधीं पंथ पुष्कळ झाले तेणेंकरून गोसावी लोकांचा पंथांचें माहात्म्य वाढलें, आणि या गोसावी लोकांचा पंथाचें माहात्म्य वाढल्यामुळें हे पंथ पुष्कळ झाले; असा या परस्परांचा कार्यकारणसंबंध आहे. साधारण रीतीनें या प्रत्येक पंथाचें एक उपास्य दैवत असतें, आणि त्या पंथाचा दैवताचें जसें माहात्म्य असतें,त्याप्रमाणें त्या पंथाचें माहात्म्य वाढतें. या कारणास्तव ते लोक असा उपदेश करितात, कीं त्या देवावर श्रद्धा ठेविली असतां सर्व मनकामना पूर्ण होऊन, सर्व पापें नाहींशीं होतात. शिवाय जसें ब्रह्मचारी शिष्यानें ( त्या अवस्थेंत मात्र ) आपल्या ब्राह्मण गुरूच्या आज्ञाङ्कित होऊन राहवें असें मनूनें सांगितलें आहे, त्याप्रमाणें आपल्या सर्व साम्प्रदायी लोकांनीं जन्मभर निमूटपणीं आपलें ऐकावें, असें हे ह्मणतात.

या गोसावी लोकांचा पंथांनीं ब्राह्मणांचा धर्मसंबंधीं अधिकारावर जी चाल केली आहे ती वर सांगितलेल्याच कारणामुळें आहे, आणि त्या दोन वर्गांचा लोकांत जीं स्पर्धा व द्वेष उत्पन्न झालीं आहेत, तींहि याच कारणामुळें आहेत.

गोसाव्यांचें आचरण पाहून त्या किरयावरून आपला कायदा करून घेण्यास ब्राह्मणांनीं कमी केलें आहे असें नाहीं; तें असें, कीं जसे त्यांचे प्रतिस्पर्धी गोसावी हे पुढारी होऊन पंथ स्थापितात, तसें यांणींहि पंथ स्थापण्याचें काम चालविलें आहे. यास उदाहरण—रामानुज ह्मणून एक पंथ आहे, त्यांत ८४ गुरु आहेत; त्यांतून ७९ प्रापंचिक ब्राह्मण आहेत.

या पंथांचा मुख्यांची जी सत्ता वाढली आहे, ती, हिंदूंचा शिस्तींत जे कांहीं अति विलक्षण फेरफार झाले आहेत,

त्यांतील आहे. दक्षिणहिंदुस्थानामध्यें पुष्कळ गुरूंचे मोठे परिवार आहेत; त्यांतूनहि मुख्यत्वेंकरून जे नियमित स्थापलेले पंथ आहेत त्यांचे विशेष आहेत; त्यांचा निर्वाहार्थ त्यांचा साम्प्रदायी लोकांनीं जमीनी दिल्या आहेत,व नक्दी नेमणुका करून दिल्या आहेत; त्याचें उत्पन्न मुख्यत्वेंकरून धर्मकृत्यांकडे लावितात, परंतु ते डामडौलहि बराच बाळगतात, आणि मुख्यत्वेंकरून जेव्हां ते स्वारीस जातात,तेव्हां, ऐहिक हुद्देदारांप्रमाणें, हत्ती, जरिपटके, इत्यादि, हीं त्यांजबरोबर असतात; तसेच त्यांचा मागून शिष्यांचे थव्यांचे थवे जातात, आणि ते जा जा रजवाड्यांचा मुलूकांत जातात, ते ते त्यांचें सन्मानपूर्वक आदरातिथ्य करितात. लोकांची नीतिसंबंधीं वर्तणूक, व ज्ञातिप्रकरण यांचा तपास करणें हें मोठें काम त्यांजकडेस असतें, तेव्हां धर्मसंबंधीं चौकशी व शासन हीं करण्याचा अधिकारहि त्यांजकडे येतो.

## बौद्ध व जैन यांचे धर्म.

वर सांगितलेल्यांशिवाय बौद्ध व जैन यांचे दोन धर्म आहेत, आणि हे जरी हिंदूंचा धर्मापासून भिन्न आहेत,तरी या सर्वांची खाण एकच आहे; आणि हिंदुस्थानांत मुसलमानांनीं आनल्या अगदीं नव्या धर्माचा प्रवेश केला त्यापूर्वीं हे दोनहि धर्म हिंदुस्थानांतील कित्येक लोकांस हिंदुधर्मासारिखे मान्य होते, असें दिसतें. यांतून एकास बौद्ध (ह्मणजे बुद्धाचे साम्प्रदायी यांचा ) धर्म ह्मणतात, व दुसऱ्यास जैनांचा ( ह्मणजे जिनदेवतेचा साम्प्रदायांचा) धर्म ह्मणतात.

मनुष्यानें शान्तता संपादावी, भूतदया बाळगावी (ह्मणजे हिंसा करूंनये,) मनुष्यास पुनर्जन्म आहे, या पातक्यांस शुद्ध करण्याकरितां पुष्कळ नरक आहेत, व पुण्यवानांस सुख देण्याकरितां पुष्कळ स्वर्ग आहेत, इतक्या गोष्टी या दोहोंमध्यें ब्राह्मणांचा मतांप्रमाणेंच आहेत. केवळ पूर्ण गुणातीत

होणें अशी जी अवस्था, ती शेवटीं प्राप्त व्हावी, हा ( **हिंदु, बौद्ध, व जैन,** ) या तीनहि धर्मांचा उद्देश आहे. असा गुणातीतपणा आमचा दृष्टीनें शुन्यावस्थेहून कांहीं निराळा दिसत नाहीं, आणि हठयोग व मानवस्वभावास उत्पन्न होणाऱ्या जा चिंता, व देहसंबंधीं जा मनोवृत्ति या सर्वांपासून मुक्त होणें, या दोन गोष्टींचा अभ्यास केला असतां पूर्वोक्त स्थिति प्राप्त होत्ये, असें या तीनहि धर्मांमध्यें सांगितलें आहे.

**हिंदूंचा** धर्म व हे दोन धर्म यांमध्यें जशीं कांहीं चमत्कारिक साम्यें आहेत, तसे त्यांमध्यें कांहीं चमत्कारिक भेदहि आहेत, व ते विशेषेंकरून **बौद्धांचा** धर्मांत आहेत.

बौद्धांविषयीं.

**बौद्धांचा** जो अति प्राचीन पंथ आहे, त्यांतील साम्प्रदायी **ईश्वराचें** अस्तित्व मूळींच नाकबूल करितात; त्यांतून कांहीं आहेत ते **ईश्वर** आहे असें कबूल करितात, परंतु तो जगाचा कर्त्ता अथवा नियन्ता आहे, हें मानित नाहींत.

जो प्राचीन काळचा नास्तिक पंथ आहे, त्यांतील मताप्रमाणें प्रकृतीशिवाय दुसरें कांहीं नाहीं, व प्रकृति अनाद्यंत आहे. प्रकृतीचा अंगीं जगाची रचना करण्याची शक्ति स्वतःसिद्धच आहे, आणि जरी कालेंकरून या जगताचा नाश होतो, तरी प्रकृतीमध्यें पूर्वोक्त शक्ति आहे त्यामुळें तें कांहीं वेळानें पुनः उत्पन्न होऊन त्याचा पुनः क्षय होतो, व पुनः उत्पत्ति होत्ये; त्यास बाहेरील प्रेरकाचें कांहीं साहाय्य लागत नाहीं.

जा वस्तूंस अस्तित्व आहे, त्यांत अति उंच पदवीचीं जीं कांहीं भूतें आहेत त्यांस बुद्ध ह्मणतात. त्यांणीं या व पूर्वींचा जगांमध्यें पुष्कळ योनींत जन्म घेऊन आपल्या कर्मांचा व तपश्चर्येचा योगानें पूर्ण निश्चेष्टता व निर्गुणत्व यांची जी उंच स्थिति ती साध्य केली आहे, असा या धर्माचा सिद्धान्त आहे, व ती मिळविण्याविषयीं सर्वांचा मोठा कटाक्ष आहे.

या निरीश्वर सम्प्रदायामध्यें‌हि प्रकृतीचा प्रत्येक कणाचा अंगीं चैतन्य व चिकीर्षा हे गुण आहेत असें मानिलें आहे. प्राजनिक ह्मणून दुसरा एक पंथ आहे, त्यांतील लोक स्पष्टतेकरितां या दोन गुणांस एकत्र करितात, आणि त्यांस एका प्रकारचें स्वरूप प्राप्त होण्याकरितां त्यांत कदाचित् अहंकारहि मिश्र करितात; परंतु या मिश्रणापासून जी विभूति उत्पन्न होत्ये, ती सार्वकाळ निश्चेष्टावस्थेंत असत्ये, आणि तिचा गुणापासून जो संस्कार प्रकृतीचा दुसऱ्या अंशांवर होतो तो तिणें प्रयत्न केल्याशिवाय अथवा इच्छिल्याशिवाय होतो, असें मानितात.

दुसरें एक मत आहे तें केवलेश्वरी मताजवळ येतें, व त्याच मतांत त्याचा बहुधा समावेश होतो. त्या मताप्रमाणें पाहतां, परमेश्वर एक आहे; त्यास आदिबुद्ध असें ह्मणतात; तो अनाद्यंत, प्रकृत्यातीत, चैतन्यस्वरूपी, स्वेच्छाचारी आणि सदसद्विचारक्षम आहे; परंतु तो असा असूनहि पूर्वीं सांगितलेल्या रीतीप्रमाणें सार्वकाळ निश्चेष्ट राहतो. अशा देवास मानणारांत दोन पक्ष आहेत, त्यांपैकीं जे एका पक्षाचे आहेत ते असें ह्मणतात, कीं ईश्वर हा एकटाच अनाद्यंत व स्वयंभू मूळतत्त्व आहे; परंतु दुसऱ्या पक्षाचे जे लोक आहेत ते त्याजबराबर प्रकृति ही एक निराळी देवी योजितात, आणि त्या दोघांचा संयोगापासून जो पुरुष निर्माण होतो तो या जगाचा वास्तविक उत्पन्नकर्ता अशी कल्पना करितात. परंतु या धर्मप्रकरणीं जीं सर्व मतें आहेत, त्यांत ईश्वरानें आपल्या इच्छामात्रेंकरून आपल्या तत्त्वापासून पांच बुद्ध उत्पन्न केले ( कांहींचें ह्मणणें सात केले असें आहे, ) आणि त्याच प्रमाणें त्या बुद्धांपासून पांच ( किंवा सात ) बोधिसत्त्व ह्मणून दुसऱ्या विभूति झाल्या; त्या एक एक बोधिसत्त्वाकडे एक एक जग उत्पन्न करण्याचें काम पाळीपाळीनें सांगितलें आहे; याशिवाय ईश्वरानें ( या जगाचा उत्पत्तीविषयीं ) कांहीं केलें नाहीं.

बौद्धांचा मताप्रमाणें सौख्य, व परिपूर्णत्व हीं प्राप्त होण्यास निश्चेष्टता ही इतकी आवश्यक आहे, कीं बोधिसत्वांनीं जा सृष्टि उत्पन्न केल्या त्यांचें पालन करण्याचा कामापासून त्यांची जितकी सुटका करवली तितकी केलेली आहे. या गोष्टींविषयीं विचार करणारे कित्येक आहेत ते अशी कल्पना करितात, कीं प्रत्येक बोधिसत्व आपल्या सृष्टीची रचना अशा नियमांनीं करितो, कीं त्या नियमांचा योगेंकरून ती पुढें आपोआपच चालत्ये; दुसऱ्यांचें मत असें आहे, कीं प्रत्येक बोधिसत्व आपली सृष्टि चालविण्याकरितां आपणाहून कमी पदवीचे गुमस्ते निर्माण करितो, आणि एका मतांत असें सांगितलें आहे, कीं जा बोधिसत्वानें साम्प्रतचें जग निर्माण केलें त्याणें ब्रह्मविष्णुशिवात्मक जी हिंदूंची त्रिगुणात्मक देवता ती उत्पन्न करून, उत्पत्ति, पालन, व संहार, हीं कामें तिजवर सोंपून दिलीं आहेत.

जे जन्मान्तरें भोगून बुद्धांचा पदवीप्रत पावले आहेत, तशा बुद्धांविषयीं लोकांचे अभिप्राय निरनिराळे आहेत. कित्येकांचा अभिप्राय निरीश्वरवादी सम्प्रदायाप्रमाणें आहे; तो असा, कीं बुद्ध हे इतर मनुष्यांप्रमाणें सृष्टिक्रमामध्यें प्रकृतीपासून उत्पन्न झालेले निराळे तत्त्वरूपी आहेत, आणि जा निर्वाणाची लोक पुष्कळ इच्छा करित असतात, ती अवस्था प्राप्त झाल्यावर त्यांचा विभूतींची स्थिति निराळी राहत्ये. दुसऱ्या पंथांतील लोकांचें मत असें आहे, कीं बुद्ध हे परमेश्वराचा तेजापासून अथवा इतर बुद्ध किंवा बोधिसत्त्व यांपासून निघालेले अंश आहेत, आणि शेवटीं ते ईश्वरी तेजांत मिळून जातात, हें त्यांस त्याचा पुण्याईचें फळ मिळतें.

या जगांत व पूर्वीचा जगांत या प्रकारचे मानव बुद्ध पुष्कळ होऊन गेले आहेत; परंतु त्यांतून शेवटल्या सातांविषयीं विशेषेंकरून वर्णन केलें आहे, आणि त्यांमध्येंहि गौतम अथवा शाक्यसिंह असें जाचें नाव होतें त्याचें विशेषेंकरून

वर्णन आहे. साम्प्रतचा ईश्वरप्रणीत असा मानलेला जो बौद्ध धर्म, तो गौतमानें लोकांस उपदेशिला, आणि देवसेवेविषयीं व नीतीविषयीं नियम स्थापिले; आणि तो पुष्कळ दिवसांपूर्वीं विशेष उंच स्थितीप्रत गेला असतां-हि त्यास अद्यापि बौद्ध धर्मांचा जगद्गुरु मानितात, आणि त्याचीं नेमिलेलीं पांच हजार वर्षें पुरीं होतपर्यंत त्यास पुढेंहि मानितील.

या बुद्धांचा खालचा पायरीस असंख्य मतींचे निरनिराळे बुद्ध आहेत, ते बहुतकरून आपल्या पुण्याईचा बळानें पूर्णतेचा वरचा वरचा पायऱ्यांजवळजवळ गेलेले असे केवळ मनुष्य आहेत, असें दिसतें.

ही बुद्धांची माळिका झाली; यांशिवाय यांचा धर्मांत असंख्य स्वर्गस्थ व पृथ्वीवरील विभूति यांस देव मानिलें आहे, परंतु त्यांतून कांहीं मूळचा त्या धर्मांतील आहेत, व कांहीं हिंदूंचा देवतांतील तशाचा तशाच त्यांणीं घेतल्या आहेत.

निरनिराळ्या देशांतील बौद्धमतानुसारी लोक एकमेकांपासून पुष्कळ गोष्टींनीं भिन्न आहेत. नेपाळांतील बौद्धांत हिंदूंचा पुष्कळ खोट्या चाली भिनून गेल्या आहेत असें दिसतें, आणि चिनामध्येंहि या धर्मांचें साधारण रूप स्पष्ट हिंदुस्थानीच आहे.

केवलेश्वरवादी बौद्ध पंथ नेपाळांत आहे असें दिसतें, आणि निरीश्वरवादी पंथ सिंहलद्वीपांत आपल्या पूर्ण स्थितीचा अनुभव घेत आहे असें दिसतें.

आबेल रेमूसात याचा मतें चीनदेशांतील हलकट लोकांचा धर्म निरीश्वरवादी आहे, परंतु आंतील वास्तविक धर्म ईश्वरवादी आहे.

बौद्ध हे ब्राह्मणांपासून पुष्कळ गोष्टींनीं भिन्न आहेत; ते वेद व पुराणें हीं प्रमाण मानित नाहींत; त्यांचांत जाती



78

नाहींत; त्यांचे उपाध्ये सर्व मतीचा लोकांतून आलेले असतात; ते कोणत्याहि प्रकारचा हिंदुधर्माध्यक्षांपेक्षां युरोपीयन गोसाव्यांसारिखे विशेष दिसतात; ते मठांत राहतात; एकसारखा पिंवळा पोषाक घालतात; अनवाणी चालतात; त्यांची दाढी व डोकी मुंडिलेली असत्ये; ते सर्व एकत्र मिळून हमेशा पुनःपुनः आपल्या देवळांत नियमित पूजा करित असतात; आणि त्यांचीं समारंभानें फिरणीं, त्यांचें गाणें, त्यांचा धूप, आणि त्यांचा मेणबत्त्या, हीं सर्व रोमन क्याथलिक धर्मांतील क्रियांसारखीं विशेषेंकरून दिसतात. हिंदूंचा गोसाव्यांचा पंथांत जशी मोकळीक आहे, तशी यांत नाहीं. यांणीं लग्न केल्याशिवाय एकटें राहवें आणि बहुतेक इंद्रियजन्य सुखेंहि सोडावीं अशी कठीण यत्ता आहे; ते एका खोलींत बसून सगळे एका ठिकाणीं जेवतात; निजणें तर धर्मांत सांगितलेल्या रीतीनें बसूनच झोंप घेतात; आणि ते दर आठवड्यास एकदां सर्व मिळून जमून स्नानास जातात, व प्रति दिवशीं कांहीं वेळपर्यंत भिक्षा मागावयास जातात, ( अथवा भिक्षा घ्यावयास जातात असें ह्मटलें तरी चालेल, कारण त्यांस भिक्षा मागण्याची परवानगी नाहीं; ) या दोन वेळा खेरीज करून त्यांस कधींहि मठ सोडून जाण्याची परवानगी नाहीं. हे त्यांचे गोसावी आपल्या मठांतील देवळांत इतर लोकांस येऊं देतात असेंहि दिसत नाहीं; इतर लोक हे मठांचा हद्दीबाहेरील दुसऱ्या देवळांत ईश्वराची सेवा करितात.

एका काळीं या लोकांत गोसावणींचे मठहि सर्वत्र होते असें दिसतें.

बौद्धधर्मानुसारी हे ब्राह्मणांपेक्षां प्राणिमात्रांचा जीवाची विशेष अदब बाळगितात; त्यांचे उपाध्ये कांहीं सूक्ष्म जीव पोटांत जातील या भीतीनें दोनप्रहरांनन्तर खात नाहींत, व अंधार पडल्यानंतर कांहीं पीत नाहींत; आणि सार्वकाळ ते आपल्या बराबर एक कुंचा नेतात, आणि आपल्या

ह्यातून न समजतां कांहीं सजीव प्राणी चुरडून जाईल ह्मणून बसण्यापूर्वी ते प्रत्येक जागा त्या कुंचानें तजविजीनें झाडतात. आपल्या श्वासोच्छ्वासाबराबर बारीक जीव आंत जाऊं नये ह्मणून आपल्या तोंडावर कांहीं बारीक कपडाहि बांधितात.[४] त्यांमध्यें अग्नीची भक्ति नाहीं, परंतु त्यांत जे साधु होऊन गेले, त्यांचा अस्थि इत्यादिकांची ते भक्ति करितात. या दोन गोष्टींत ब्राह्मणांमध्यें व यांमध्यें भेद आहे. अस्थ्यादिकांची भक्ति करणें हा भाव हिंदूंत नाहीं. हीं अस्थ्यादिक ह्मणजे कांहीं केश, एकादा दांत, एकादें हाड, अशीं असतात; त्यांवर ते भरींव घंटेसारिख्या समाधि[५] बांधितात. त्या पुष्कळ ठिकाणीं मोठ्या प्रचंड असतात, आणि त्या त्यांचा धर्माचीं मोठीं विलक्षण चिन्हें आहेत.

बुद्धांचा जा प्रतिमा काढलेल्या असतात, त्या केव्हां केव्हां उभ्या असतात, परंतु त्याहूनहि विशेषेंकरून आसनमांडी घातलेल्या, तांठ, व अत्यन्त ध्यानस्थमुद्रेमध्यें मग्न, अशा असतात. त्यांची मुखचर्या सौम्य असत्ये, आणि केश हमेशा कुरळ असतात.

साम्प्रत जा देशांत बौद्ध आहेत, तेथें त्यांचीं देवालयें व समाधि आहेतच; त्यांशिवाय हिंदुस्थानामध्येंहि त्यांचा कांहीं भव्य इमारतींचे शेष राहिलेले आहेत, त्यांतून दक्षिणहिंदुस्थानांत जीं गुहांतील देवालयें आहेत तीं अतिशय विलक्षण आहेत. वेरूळ एथील जीं कांहीं आश्चर्यकारक कोरींव लेणीं आहेत, तीं या प्रकारचीं आहेत; परंतु या प्रकारचीं उत्कृष्ट देवालयें, अशीं मुंबई व पुणें यांचा मध्यें

---

(४) इतर प्रापंचिक लोक मांस खातात, त्यांस कांहीं आडकाठी नाहीं, आणि जर मुद्दाम उपाध्याकरितांच जनावर मारिलें असेल तर मात्र त्यांणीं तें खाऊं नये, एरव्हीं त्यांणींहि खाल्लें तरी चिंता नाहीं, असें त्यांचें मत आहे.

(५) त्यांस स्तूप ह्मणतात. भा० क०

कारलें ह्मणून गांव आहे तेथें आहेत. त्यांची लांबी व उंची, त्यांतील दुबाजूंनीं लागलेल्या खांबांचा रांगा आणि घुमटीसारखा शिरोभाग, हीं सर्व पाहिलीं असतां हें गाथिक[६] रीतीनें बांधलेलें एक देवालय आहे असें भासूं लागतें.

बौद्धांमध्यें व्युत्पत्तिविषयक ग्रंथांचा समुदाय पुष्कळ मोठा आहे. तो सर्व ब्राह्मणांचें पाहून केलेला आहे, आणि सर्व मूळचा हिंदुस्थानांतील आहे. साम्मत निरनिराळ्या प्रदेशांतील तद्देशीय भाषांमध्यें तो राहिलेला आहे, आणि त्यांतून पुष्कळ देशांत छापण्याची कला फार दिवस सुरू झाल्यामुळें पुस्तकांचा प्रसर विशेष झाला आहे.

प्राचीन काळीं गंगानदीचा कांठीं मगधदेशचें ह्मणून एक राज्य होतें; तेथें शाक्य ह्मणजे गौतम, हा उत्पन्न झाला. त्या मगधांतील देशभाषा, जिला पाली ह्मणतात, तींत बौद्धांचे धर्मसंबंधीं बहुधा सर्व लेख आहेत असें दिसतें; परंतु त्यांचा पवित्र पुस्तकांची भाषा हीच किंवा काय याविषयीं वाद आहे, कारण संस्कृत व तिजपासून उत्पन्न झालेल्या जा दुसऱ्या कांहीं देशभाषा त्यांविषयींहि असाच वाद आहे.

जैन अथवा जिन.

बुद्ध व ब्रह्म, यांचा सम्प्रदायांचा मध्यें जैनांची पायरी आहे. ईश्वर नाहीं, अथवा असला, तरी चांचल्य व जगाविषयीं प्रेरक शक्ति हीं तरी त्यास नाहींत, आणि प्रकृति अनाद्यंत आहे, असें ते मानितात; ईश्वर अशा मानिलेल्या साधूंची भक्ति करितात; जीव न मारण्याविषयीं फार लक्ष लावून काळजी वागवितात, व जेवढ्या सावधगिऱ्या ठेवाव्या लागतात, तेवढ्या ठेवितात; त्यांमध्यें वंशपरंपरेचे उपाध्याय नाहींत; वेद हा ईश्वरप्रणीत आहे असें ते मानित नाहींत; आणि त्यांमध्यें यज्ञयाग नाहींत, व अग्नीची भक्ति नाहीं. या सर्व गोष्टी त्यांचा व बौद्धांचा मिळतात.

(६) एक युनानी लोकांची इमारती बांधण्याची तऱ्हा आहे. भा० क०,

निश्चेष्ट ध्यानस्थ असणें ही अवस्था परम सुखाची आहे, असें बौद्धांप्रमाणें त्यांचेंहि मत आहे, आणि बौद्धांचीं जीं मतें हिंदूंचासारिखीं आहेत, तीं सर्व हे मान्य करितात.

जातिभेद इत्यादि दुसऱ्या गोष्टींमध्यें ते हिंदूंशीं मिळतात. जातिभेदाचा प्रकार दक्षिण व पश्चिम हिंदुस्थानांतील जैनांत भर घोसानें चालू आहे, आणि ईशान्येकडील प्रान्तांत निद्रित आहे असें ह्मटलें पाहिजे, परंतु केवळ नाहींसा झाला नाहीं; कारण तिकडील जैन लोक हे जरी हिंदूंचा चारी जाति कबूल करित नाहींत, तरी, जर कोणी एक जैन हिंदुधर्मांत आला, तर तो कोणत्या तरी एका जातींत शिरतो, यावरून त्या जातींतून आपला वंश उत्पन्न झाला आहे अशी पूर्वीपासून त्याजवळ पीठिका असल्ये असें सिद्ध होतें; दुसरें खुद जैनांमध्येंहि पुष्कळ जाति आहेत, त्यांतील लोक एकमेकांशीं शरीरसंबंध करण्यांत व दुसरा व्यवहार करण्यांत हिंदूंचा चार वर्णांप्रमाणें, सक्तीनें वागतात.

वेद हे ईश्वरप्रणीत आहेत असें जरी ते मानित नाहींत, तरी त्यांतील गोष्टी जेथें त्यांचा धर्मास आड येत नाहींत अशांविषयीं ते वेदास पुष्कळ मान देतात. जांत रक्तस्राव होणार, असे यज्ञ करावे असें वेदांत सांगितलें आहे, आणि हवनामध्यें ( समजून उमजून न केला तथापि ) जीवांचा घात होण्याचा संभव असतो, या मुख्य कारणांस्तव ते हिंदुधर्माचा निषेध करितात.

ते हिंदुलोकांचे सर्व देव कबूल करितात, आणि त्यांतून कांहींची पूजाहि करितात, परंतु जे त्यांचे स्वतांचे सिद्ध आहेत, त्यांहून हे अगदीं खालचा पायरीचे आहेत असें मानितात, आणि ते सिद्ध हेच वास्तविक आराध्य आहेत असें त्यांचें मत आहे.

वर सांगितलेले प्रकार हे ब्राह्मण किंवा बौद्ध यांतून कोणा तरी एकाशीं मिळते आहेत, परंतु त्यांशिवाय त्यांचीं कांहीं स्वतांचीं विलक्षण मतें आहेत.—त्यांमध्यें कांहीं सिद्ध

आहेत ते मुख्य पूज्य आहेत असें ते मानितात; ते आपल्या तपाचा बळानें देवांहून श्रेष्ठ झाले आहेत; त्यांचें रूप व साधारण लक्षणें, हीं थेट बौद्धांचा सिद्धांसारखींच आहेत, परंतु त्यांचीं नावें व त्यांचे इतिहास हे त्यांचाहून अगदीं निराळे आहेत. त्या सिद्धांस तीर्थङ्कर असें ह्मणतात.— साम्प्रतचा युगांत ते चोवीस आहेत, व पूर्वींचांत चोवीस होते, व पुढें चोवीस होणार आहेत. त्यांतून ज्यांची पूजा पुष्कळ लोक करितात असे आहेत ते.— ऋषभदेव; यास कांहीं ठिकाणीं पुजितात. साम्प्रतचा तीर्थङ्करांपैकीं हा पहिला आहे, परंतु पारसनाथ व महावीर, ह्मणून जे तेवीसावे व चोवीसावे तीर्थङ्कर, त्यांची सर्वत्र पूजा करितात. हे जे शेवटचे दोन ते खेरीज करून बाकीचा तीर्थङ्करांचें आकारपरिमाण व आयुष्याचें मान हीं अचाट आहेत, त्यांवरून हे शेवटचे दोन हे त्या धर्माचे वास्तविक स्थापक असावे अशी जी कल्पना करितात, ती बरीच खरी असावी असें दिसतें. सर्व तीर्थङ्कर निश्चेष्टतारूप परमानंदाची जी नेहेमींची अवस्था, तींत असतात, आणि या जगाचा कारभारांत अगदीं हात घालित नाहींत.

हिंदूंचा देवांचा परव्या व त्यांसंबंधीं इतर गोष्टी, यांत जैनांनीं कांहीं फेरफार केले आहेत. हिंदूंचे जे विशेष मोठमोठे देव आहेत, त्यांचें त्यांणीं कांहीं अधिक माहात्म्य वर्णन केलें आहे असें नाहीं, आणि त्यांणीं देवांची संख्या वाढवून त्यांचा शिस्तींत जा मूळींच अकलेपासून दूर अशा पुष्कळ गोष्टी होत्या, त्यांत आणखी भर घातली आहे. यास उदाहरण, त्यांचा मध्यें चौसष्ट इन्द्र व बेवीस देवी आहेत.

सिद्धांचा शरीरांचा अस्थ्यादिक अंशांस ते मानित नाहींत; त्यांचांत मठ नाहींत; त्यांचा उपाध्यांस जती ( यती ) ह्मणतात; ते सर्व जातींतले असतात; त्यांचा पोषाक ब्राह्मणांचा पोषाकाहून जरी निराळ्या प्रकारचा असतो, तरी

कांहीं त्यांचा सारखा असतो. ते फार मोठे ढिले पांढरे चोळक घालितात; त्यांचा डोकीस कांहीं नसतें; त्यांची दाढी व शेंडी काढलेली असत्ये, आणि त्यांजबरावर एक काळी काठी व जीव झाडून टाकण्याकरितां एक कुंचा अशीं असतात. ते आपली उपजीविका भिक्षेवर करितात. ते कधींहि स्नान करित नाहींत; ( ब्राह्मण लोक हे सारादिवस भर बुडया मारित असतात त्यांचा विरोधार्थ हे कदाचित् असें करित असतील, असें वाटतें. )

जैनांचीं देवालयें हीं बहुधा फार मोठीं व सुंदर असतात. त्यांचे शिरोभाग सपाट असतात, आणि लोकांचा खासगी हवेल्यांप्रमाणें त्यांत चौक, व स्तंभावलि असतात; परंतु हीं केव्हां केव्हां हिंदूंचा देवळांसारिखीं असतात, आणि केव्हां केव्हां वर्तुळाकार असून त्यांचा सभोंवार तीर्थंकरांचे प्रचंड पुतळे असतात. त्या देवळांचा भिंतींवर त्यांचा विलक्षण दंतकथा काढलेल्या असतात, आणि त्यांत कदाचित् हिंदूंचाहि मिसळलेल्या असतात. मूर्त्तींशिवाय त्यांचा मध्यें संगमरमरी दगडाचीं सिंहासनें असतात, त्यांवर सिद्धांचा आकृति खोदून काढलेल्या असतात, व पवित्र पुरुषांचा पादुकांचीं चिन्हें असतात. हीं शेवटचीं स्मारक चिन्हें बौद्धांप्रमाणेंच यांमध्यें आहेत.

हिंदूंचा चालीप्रमाणें बांधलेलीं अशीं जैनांचीं अति उत्कृष्ट देवालयें गुजराथेचा उत्तरेस आबू पर्वतावर आहेत; तीं मोठीं भव्य पांढऱ्या संगमरमरी दगडाचीं आहेत. वेरूळ, नाशीक, व दुसरीं ठिकाणें, एथें जैनांचा मोठ्या मोठ्या गुहाहि आहेत. म्हैसूरप्रान्तांत चिन्नरायपट्टणाजवळ एका तीर्थंकराची प्रतिमा एका खडकामध्यें कोरून काढलेली आहे, ती निरनिराळ्या उंचीवरून पाहिल्यावरून चौपन्नांपासून सत्तर फूट उंच असावी असें अनुमान केलें आहे.

जैनांमध्यें विद्येचा संग्रह पुष्कळ आहे. तो ब्राह्मणांचा सारखाच आहे; परंतु ब्राह्मणी कालमान व भूगोल

78

यांचा अतिशयोक्तीपेक्षां यांत अतिशयच अतिशयोक्ति आहे; पूर्वीं ब्राह्मणांचा ग्रंथांत जीं मानें लक्षांचीं असतांनाहि अकलेस दूर होतीं, तीं यांणीं कोट्यावधींपर्यंत वाढविलीं आहेत. मागधी ह्मणजे पाली ही त्यांची पवित्र, ह्मणजे धर्म पुस्तकें लिहिण्याची, भाषा आहे.

या दोन धर्मांचा व हिंदुधर्मांचा प्राचीनपणाचें तारतम्य.

वर वर्णिलेल्या तीन धर्मांपैकीं हिंदुस्थानांत कोणत्या धर्माची प्रथम स्थापना झाली? असा प्रश्न उत्पन्न झाला आहे; तो पाहूं गेलें असतां बुद्ध व ब्रह्मा या दोघांचा धर्मांमध्यें अधिक प्राचीन कोणत्यास ह्मणावें या वादावर येतो. या दोनहि धर्मांचीं मूळ मतें एकसारखीं आहेत, त्यांवरून या दोहोंचें मूळ एकच आहे असें सिद्ध होतेंसें दिसतें. तें मूळ एक आहे असें कबूल केलें असतां, जे उभय पक्षींचे वाद आहेत त्यांत ब्राह्मणांचा पक्षाकडे विशेष पारडें तोलतेंसें दिसतें. तशांत बौद्धांचा धर्म हा जरी केव्हांहि झाला असला, तरी तो अपूर्वच उत्पन्न झाला असेल ही गोष्ट असंभाव्य आहे; ह्मणून ब्राह्मणांचा धर्म अधिक प्राचीन आहे असें ह्मणायास एक अधिक कारण मिळतें.

तो धर्म जुना असें ह्मणण्याचें दुसरें कारण असें आहे, कीं ज्या मनुष्यास धर्मसंबंधीं वृत्तींचा अनुभव झाला नसेल, त्यास ईश्वराविषयीं जे विचार प्रथम उत्पन्न होतील ते आपणाहून श्रेष्ठ अशा शक्तींचा अवलोकनापासून होतील. जरी एक निश्चेष्ट राहणारा देव आहे अशी कल्पना त्याचा मनांत शिरली, तरी त्या देवाचें आराधन करण्यास त्यास कांहीं हेतु असणार नाहीं; ह्मणून तो त्यास सोडून, ज्या सूर्यापासून उष्णता प्राप्त होत्ये, व ज्या गगनामधील गडगडाटांपासून भीति प्राप्त होत्ये, त्या सूर्यास व त्या गगनास तो भजूं लागेल, हें सहज आहे. याप्रमाणें आरंभीं एका स्तब्ध देवतेची उपासना करण्याचा संभव नाहीं, व अर्थात् सिद्धांची पूजा करण्याचा संभव त्याहून थोडाच आहे; कारण जे धर्मसंबंधीं विचार पूर्वींच

स्थापित झालें असतील त्यांशीं अनुसरून चालणें हिला पुण्याई ह्मणतात, आणि अशी जांची असल्ये त्यांस सिद्ध ह्मणतात; यास्तव धर्मांचा आज्ञा कडकडितपणानें बाळगिल्याबदल आपल्या बराबरीचा मनुष्यांस ईश्वर करण्याविषयीं लोक इच्छितील अशी त्यांची मनोवृत्ति होण्यापूर्वीं लोकांचा मनांत त्या धर्मांचा प्रवेश दृढ झाला असला पाहिजे. तशांतहि जर ते सिद्ध, जगाचा कारभार पाहत नसले, व जगाचा नियंत्याबराबर इतर लोकांविषयीं मध्यस्थी करित नसले, आणि असें असून जर त्यांस ईश्वर असें लोक मानित असले, तर मग त्या लोकांचा धर्मावर दृढतर विश्वास बसलेला आहे असें समजलें पाहिजे.

हिंदुधर्मांचा मार्ग याहून विशेष सरल दिसतो. त्याचा आरंभ सृष्टींतील पंचमहाभूतादि शक्तींची उपासना करणें यापासून झाला आहे,आणि तो केवलेश्वर मतापर्यंत वाढून, पुढें त्याचा क्षय होत जाऊन, शेवटीं जे विद्वान् होते त्यांस संशयी बुद्धि उत्पन्न झाली, आणि साधारण लोकांत मानवपूजा चालू झाली आहे.

साङ्ख्य मार्गाचा तत्त्ववेत्त्यांचीं मतें परावृत्त होऊन बौद्धांचा नास्तिकत्वांत आलीं आहेत, असें दिसतें, आणि साधारण हिंदु जी वीरपूजा करितात, व बैरागी लोकांस जो अनिर्वाच्य मान देतात,त्या दोन गोष्टी, बौद्धांमध्यें सिद्धांस देव करून टाकिलें आहे अशी जी गोष्ट, तिजसारख्या बऱ्याच आहेत. यावरून ब्राह्मणांचा धर्म हा प्राचीन काळीं उत्पन्न झाला, आणि त्याचीं मूळचीं वास्तविक मतें जेव्हां अति परिपूर्ण दशेस आलीं होतीं, आणि कदाचित् तीं क्षीण होण्याचाहि कल दिसूं लागला होता, तेव्हां बुद्धाचा धर्म हा त्याचा फांटा फुटून निघाला, असें अनुमान करणें ओघास येतें.

या धर्माविषयीं जी इतिहाससंबंधीं माहिती लागत आहे, तिजवरूनहि असाच निर्णय होतो. जी वेदांची रचना साम्प्रत आहे, ती ख्रिस्ती शकापूर्वीं सुमारें चौदाव्या

शतकामध्यें झाली अशी कल्पना करितात;त्यावरून जो धर्म वेदांनीं प्रतिपादिला आहे, त्याची त्या कालापूर्वी पुष्कळ गति झाली असावी. असें असून बौद्धधर्माविषयीं जे अति उत्सुक वाद करणारे आहेत, त्यांतून, हा धर्म ख्रिस्ती शकापूर्वी दहाव्या किंवा अकराव्या शतका अगोदर झाला असें, एकहि म्हणत नाहीं, आणि जा इतिहासांविषयीं उत्कृष्ट प्रमाणें आहेत, त्यांवरून तर तो सहाव्या शतकांत झाला असें ठरतें.

जे लोक आपणास बौद्धमतानुसारी म्हणवितात, ते सर्व, हा धर्म हिंदुस्थानांत उत्पन्न झाला असें म्हणतात. याचा स्थापक शाक्य मुनि, या नावाचा गोरखपुराचा उत्तरेस काँपिल म्हणून गांव आहे तेथील जन्मलेला पुरुष होता; त्यास गौतमहि म्हणतात. या गोष्टीविषयीं सर्व एकमत आहेत; परंतु कोणी म्हणतात कीं तो क्षत्रिय होता, व तो राजाचा पुत्र होता असें दुसरे म्हणतात. तो क्षत्रिय असून सूर्य वंशांतील एका राजाचा पुत्र होता असें हिंदुलोक सांगतात; यावरून वरील हकीकतीस अधिक बळकटी येत्ये. बुद्ध हा केव्हां उत्पन्न झाला याविषयीं इतकें चांगलें मतैक्य नाहीं. हिंदुस्थानांतील लोक, व आवा, श्याम, आणि सिलोन एथील लोक ख्रिस्ता पूर्वी सहाव्या शतकाचा मध्याचा सुमारास याचा जन्म झाला असें ठरवितात, आणि मगध देशांतील राजांचा यादींत किती एक गोष्टी लिहिलेल्या आहेत त्यांचें याविषयीं प्रमाण सांपडतें.

आतां काश्मीरी लोक हे ख्रिस्तापूर्वी तेराशें बत्तीस वर्षांवर शाक्य मुनीची स्थिति कल्पितात; चिनै, मोगल, व जपानी, हे लोक सुमारें हजार वर्षांपूर्वी झाला असें म्हणतात, आणि " ओरिएंटलम्यागझीन " नामें एका ग्रंथांत तिबेटचा १२ ग्रंथकारांविषयीं उल्लेख आहेत, त्यांतून चौघांची सरासरी ख्रिस्तापूर्वी २९५९ वर्षें, आणि नवांची ८३५ वर्षें, अशी बसत्ये. असें असून तिबेटांत धर्मसंबंधीं जी मोठा

(७) कपिलवस्तु असें ललितविस्तर या ग्रंथांत नाव आहे, भा० क०

ग्रंथ आहे, त्यांत असें लिहिलें आहे, कीं अशोक राजानें जी सर्वांची सभा भरली होती; ती बुद्ध मेल्यानंतर ११० वर्षांनीं भरली होती; त्यावरून बुद्धाचें मरण ख्रिस्तापूर्वी चारशें वर्षांचा अलीकडे झालें असें होतें; कारण कीं अशोक हा इसवी शकाचा पूर्वी तीन शें वर्षां अलीकडे होता, हें पुढें निर्विवाद प्रमाणांनीं दाखविण्यांत येईल.

एका चिनई ग्रंथकाराचें मत दुसऱ्या सर्वांचांहून निराळें पडून तो ख्रिस्तापूर्वी ६७८ वर्षांवर शाक्यसिंह होता असें ठरवितो, आणि चिनै व जपानी कोष्टकांमध्यें ख्रिस्तापूर्वी ९९९ व्या वर्षी शाक्यसिंहाची प्रख्याति झाली, असें जेथें वर्णन आहे, तेथें ती गोष्ट अजातशत्रु राजाचा कारकीर्दीत झाली असें सांगितलें आहे. आतां मगध राजांचा वंशावळींत जेथें या राजाचें वर्णन आहे त्यावरून तो ख्रिस्तापूर्वी सहाव्या शतकांत राज्य करित होता असें दिसतें.

या प्रकारें या प्रमाणांमध्यें तफावती पुष्कळ आहेत. आतां एक पूर्वीचा बुद्ध व एक अलीकडील बुद्ध असें कल्पून, या दोघांचीं वर्णनें केल्यामुळें या तफावती झाल्या असतील अशी जर कल्पना केली तरीहि त्या नाहींशा होत नाहींत; तशांत सगळीकडे शाक्यसिंह हेंच एकसारखें नाव आहे, आणि जांविषयीं निरनिराळीं वर्षें सांगितलीं आहेत त्यांचा चरित्रांतील सर्व गोष्टी एकसारख्याच आहेत, यावरून वर सांगितल्याप्रमाणें दोन बुद्ध होते अशी कल्पना करण्याचा जो मार्ग तोहि बंद होतो. वास्तव हिंदुस्थानांतील बौद्धांमध्यें जो धर्म उत्पन्न झाला त्याचें त्यांस च कालज्ञान नाहीं असें म्हणून, हिंदूंचा कालमानांतील जो हा चांगला सप्रमाण स्थापिलेला भाग तो खोटा असें समजून विस्कळित केला पाहिजे; अथवा जेव्हां बुद्धानें स्थापिलेला धर्म त्याचा मरणानंतर पुष्कळ शतकांनीं काश्मीर व तिबेट एथील लोकांनीं घेतला व पुढें त्या देशांतून पूर्वेकडील देशांत तो धर्म पसरला, तेव्हां ही चुकी काश्मीर किंवा तिबेट या देशांत

झाली असावी, असें म्हटलें पाहिजे. आतां हे जे दोन पक्ष वर सांगितले, त्यांतून दुसऱ्याचा विशेष संभव दिसतो. यास्तव बुद्धाचें मरण ख्रिस्तापूर्वी पाच शें पन्नास वर्षांवर झालें असा निश्चय करण्यास आपणास कांहीं भीति नाहीं.

बौद्धांचें मूळ हिंदुस्थानामधील आहे याविषयीं प्रत्यक्ष प्रमाणें आहेत; व त्यांशिवाय त्यांची ईश्वरी विद्या, पुराणविद्या, तत्त्वविद्या, भूगोलविद्या, काळनिर्णयविद्या, इत्यादि बहुतकरून सर्व विद्या हिंदूंपासून उत्पन्न झाल्या आहेत, आणि त्या शास्त्रांमध्यें जी सर्व परिभाषा आहे, ती संस्कृत आहे; यावरूनहि त्यांची उत्पत्ति हिंदुस्थानांतील आहे असें दिसतें. बुद्ध व आदिबुद्ध हेहि चांगले प्रसिद्ध संस्कृत शब्द आहेत.

या धर्माची वृद्धि कशी झाली याविषयीं आपणास पक्की माहिती मिळत नाहीं. ख्रिस्तापूर्वी तिसऱ्या शतकाचा मध्याचा सुमारास अशोक राजाचा कारकीर्दींत हिंदुस्थानांत या धर्माचा उत्कर्ष झाला होता, आणि त्याच शतकाचा अखेरीस त्या राजानें पाठविलेल्या धर्मोपदेशकांनीं तो धर्म सिंहलद्वीपांत चालू केला.

तातार व तिबेट या देशांत पूर्वींच त्याचा प्रसर झाला होता असें संभवतें; परंतु इ० स० ६५पर्यंत त्याची प्रवृत्ति चिनेंत झाली नव्हती, आणि त्या वर्षीं तो हिंदुस्थानांतून तेथें गेला, व इ० स० ३१०पर्यंत त्याची तेथें पुरी स्थापना झाली नव्हती.

ख्रिस्ती शकाचा पांचव्या शतकाचा अवेलीस एक चिनी पांथस्थ हिंदुस्थानांत यात्रेस आला होता, त्याणें, या धर्माचें जें मूळ ठिकाण ( हिंदुस्थान ), तेथें त्याचा क्षय कसा होत गेला त्याविषयीं वर्णन केलें आहे. चीन व हिंदुस्थान, यांमधील प्रदेशांत बौद्धधर्म चांगला नांदत होता, परंतु पंजाबामध्यें त्याची उतरती कळा आली होती, आणि गंगा व यमुना यांवरील प्रदेशांत त्यास अगदीं त्रिदोष होऊन

घरघर लागली होती; याप्रमाणें त्याचा दृष्टीस पडलें. बुद्धाची जी जन्मभूमि कापिल तिचा नाश होऊन ती ओस पडली होती,—ती भूमि "मनुष्याचा वास नाहीं असें जंगल" होऊन गेली होती. सिंहलद्विपांत तो धर्म भर तारुण्यामध्यें होता, परंतु तो यात्रेकरू जेव्हां जलमार्गानें परत चिनेस गेला, तेव्हां वाटेनें जावा बेटांत गेला होता, तेथें ती वेळपर्यंत त्या धर्माची प्रवृत्ति झाली नव्हती.

पुढें हिंदुस्थानांतील कांहीं प्रदेशांत बौद्धधर्माचें माहात्म्य पुनः पूर्ववत् वाढलें; तेव्हां इसवी सनाचा आठव्या किंवा नवव्या शतकांत शङ्कराचार्यानें, व कदाचित् त्या पूर्वींहि कुमारीलानें, तद्धर्मी लोकांशीं वाद करून त्यांचा मताचें खंडन केलें, त्यांचा छल केला, आणि बहुधा त्यांस दक्षिणेंतून हाकून लाविलें; परंतु उत्तरहिंदुस्थानामध्यें आठव्या शतकांत त्यांचें माहात्म्य होतें, आणि अकराव्या शतका इतका अलीकडे काशीमध्यें त्यांचा पंथ मुख्य होता, आणि गुजराथेचा उत्तरभागांत बाराव्या शतका इतकें अलीकडे त्यांचें माहात्म्य होतें, असें दिसतें.

ते साम्प्रत हिंदुस्थानांतील सपाट प्रदेशांत नाहींत; परंतु सिंहलद्वीपांतील मुख्य चालू धर्म त्यांचा आहे, व गंगेवरील प्रान्ताचा ईशान्येस जे कांहीं डोंगराळ देश आहेत त्यांमधीलहि धर्म हाच आहे. तसाच ब्रह्मराज्य, तिबेट, शियाम, आणि हिंदुस्थान व चीन यांचा मधील सर्व देश, यांत हाच धर्म चालू आहे. चीनदेशांमध्यें याची विशेष प्रवृत्ति आहे, आणि चिनी तातार, व तातार, यांतील बहुतेक भागांमध्यें हा पसरला आहे; यास्तव दुसऱ्या कोणत्याहि धर्मापेक्षां हा धर्म अधिक लोक मानितात, असें जें म्हटलें आहे तें दिसण्यांत खरें दिसतें.

ख्रिस्ती शकाचा सहाव्या किंवा सातव्या शतकांत जैनांची उत्पत्ति झाली; आठव्या किंवा नवव्या शतकांत ते

प्रसिद्धीस आले; अकराव्यांत त्यांचा भरभराटीचा कळस झाला; आणि बाराव्यानंतर त्यांचा क्षय होत चालला, असें दिसतें. त्यांचीं मुख्य स्थानें दक्षिणहिंदुस्थानाचा दक्षिणभागांत, आणि गुजराथेंत व हिंदुस्थानाचा पश्चिमभागांत होतीं असें दिसतें. गंगाकांठचा प्रदेशांत त्यांची कधींहि विशेष बढती झाली नाहीं असें दिसतें.

निदान दक्षिणहिंदुस्थानांत तरी ब्राह्मणांनीं त्यांचा पुष्कळ छळ केला असें दिसण्यांत येतें.

अद्यापिहि जैनांची संख्या पुष्कळ आहे; ती मुख्यत्वेंकरून गुजराथ, राजपुतस्थानें, व कानडा, यांत आहे. हे लोक बहुधा दौलतवान् व सावकार आहेत; त्यांतून पुष्कळ मोठे सराफ आहेत, आणि हिंदुस्थानामध्यें जी व्यापाराची दौलत आहे तींतील पुष्कळ हिसा यांचा हातीं आहे.

---

# प्रकरण पांचवें.

## तत्त्वविद्येची साम्प्रतची स्थिति.

तत्त्वविचाराविषयीं व्याख्या करणें हा मनुस्मृतीचा उद्देशांतील विषय नाहीं; परंतु मनूचा पहिल्या अध्यायांत त्याविषयीं सहज उल्लेख आला आहे, आणि अलीकडील हिंदुलोकांचें लक्षहि या विषयांत फार गुंतून गेलें आहे, यास्तव जेथें त्यांचा बुद्धीचें व स्वभावाचें वर्णन चाललें आहे, अशा ग्रंथांतून तो विषय टाकून देणें नीट नाहीं.

मनुस्मृतीचा पहिला अध्याय हा, त्या स्मृतिकाराचाच धर्मसंबंधी मतांचा उद्घाटनार्थ आहे, हें उघड आहे, आणि, ( निरनिराळ्या काळांमध्यें नाना प्रकारचा लोकांत जीं धर्मशास्त्रें उत्पन्न झालीं त्यांप्रमाणें हें नसून ) यांत मनूचा वेळीं लोकांचीं मतें कशीं होतीं त्यांची तत्कालिक स्थिति

दाखविली आहे, असें संभवतें. ईश्वराचें व आत्म्याचें स्वरूप, सृष्टीची उत्पत्ति, आणि पदार्थविज्ञान व मानसशास्त्र यांसंबंधीं दुसरे विषय, हे त्यांत सांगितले आहेत; परंतु त्यांविषयीं उगाच उल्लेख मात्र आहे, त्यामुळें तत्त्वविचाराचे जे साम्प्रतचे सम्प्रदाय ते त्यांचा आतांचा रूपानें त्या वेळीं होते कीं नाहीं, हें त्यावरून दिसून येत नाहीं; तथापि त्यांतील कांहीं सूक्ष्म गोष्टी पूर्वींच माहित होत्या असा त्यांत उल्लेख आहे, आणि अद्यापिहि जा पारिभाषिक शब्दांचा उपयोग करितात ते त्या वेळचा वाचणारांस चांगले अवगत होते, अशा समजुतीनें त्यांचा उपयोग केलेला आहे; त्यावरून असें सिद्ध होतें, कीं जा वादविवादांतून हे निरनिराळे सम्प्रदाय उत्पन्न झाले त्या वादांचा पूर्वींपासूनच हिंदुलोकांस पुरा अभ्यास पडून गेला होता.

वर सांगितलेल्या सम्प्रदायांचीं मतें काय आहेत, त्यांचें विवेचन केलें असतां,या विद्येची स्थिति साम्प्रत कशी आहे हें उत्तम रीतीनें दाखवितां येईल. षड्दर्शनें.

हिंदुलोकांमध्यें मान्य असे तत्त्वविचारप्रकरणीं सहा प्राचीन सम्प्रदाय आहेत, त्यांस षड्दर्शनें ह्मणतात; त्यांतून कांहीं ब्राह्मणांचा धर्मसंबंधीं मतांचा उघड विरुद्ध आहेत, आणि दुसरीं जरी लोकांचा मतें धर्मास वास्तविक अनुकूल अशीं आहेत, तरी त्यांत जीं मतें प्रतिपादित आहेत, तीं वेदांत सांगितलेलीं नाहींत.

कोल्ब्रूक साहेबानें हीं सहा दर्शनें खालीं लिहिलेल्या क्रमानें सांगितलीं आहेत.—

१ पूर्वमीमांसा, हिचा स्थापक जैमिनी.

२ उत्तरमीमांसा, ह्मणजे वेदान्त, हिचा मूळ प्रतिपादक व्यास असें म्हणतात.

३ न्याय, याचा मूळ स्थापक गौतम.

४ वैशेषिक, याचा मूळ स्थापक कणाद.

५ निरीश्वर साङ्ख्य, याचा स्थापक कपिल.

६ सेश्वर साङ्ख्य, याचा स्थापक पतञ्जलि.

वर सांगितलेल्यांपैकीं शेवटील दोन्ही दर्शनांमधील पुष्कळ गोष्टी एकसारख्या आहेत, ह्मणून साङ्ख्य या साधारण नावांत या दोहोंचा समावेश होतो.

या विभागावरून तत्त्वविद्येची साम्प्रत स्थिति कशी आहे हें पुरतेपणीं लक्षांत येत नाहीं. वेदाचा अर्थ समजण्यास साहाय्य व्हावें याच उद्देशानें विचार करण्याचें कौशल्य शिकविणें, हा पूर्वमीमांसेचा विषय आहे; ह्मणून त्या संबंधानें तें विचारशास्त्र आहे; आणि वेदांत कोणतीं कर्मे सांगितलीं आहेत याचा निर्णय करणें हा त्या शास्त्राचा उद्देश आहे, याकरितां तें शुद्ध धर्मवादी आहे, तत्त्वविचारसम्प्रदायांमधील हें एक आहे, असें मानण्यास कांहीं कारण दिसत नाहीं. दुसरा प्रकार असा झाला आहे, कीं बाकी राहिलेल्या दर्शनांचा नाना प्रकारचा शाखा झाल्या आहेत, त्यांतून प्रत्येक शाखेस निराळें दर्शन असें मानण्याजोगी व षड्दर्शनांचा मूळ संख्येंत तिला मिळविण्याजोगी तिची योग्यता आहे. आतां तत्त्वविचारसंबंधी या सर्व सम्प्रदायांमधील सर्व भेदांचें विवेचन करणें हें माझा उद्देशापासून दूर आहे; याकरितां त्या मुख्य सहा दर्शनांमध्यें जीं दोन परस्परांस अति विरुद्ध आहेत, त्यांचें संक्षिप्त वर्णन, व बाकीचांचें थोडें थोडें वर्णन केलें असतां, हिंदुलोकांनीं तत्त्वविचाररूप विद्येचा प्रदेशांत किती चाल केली होती, हें आपल्या लक्षांत येईल.

आतां वर सांगितल्याप्रमाणें जें संक्षिप्त वर्णन करावयाचें, तें साङ्ख्य व वेदान्त, यांचें करितों. त्यांतून पहिल्यांत प्रकृति अनादि आहे असा सिद्धान्त आहे, आणि त्याचा मुख्य भागांत ईश्वर नाहीं असें म्हटलें आहे. दुसऱ्यांत, सर्व वस्तु ईश्वरापासून उत्पन्न झाल्या आहेत असें सांगितलें आहे, आणि त्यांत एक पंथ आहे त्यामध्यें प्रकृति असत्य आहे असें सांगितलें आहे.

हिंदुलोकांमधील निरीश्वर व सेश्वर मिळून सर्व सम्प्रदायांचा हेतु एकच आहे. तो असा, कीं निर्वाणप्राप्ति करून घेण्याचीं साधनें दाखवून द्यावीं, ह्मणजे पुनर्जन्मापासून सुटका व सर्व दैहिक उपाधींपासून मोक्ष कसा करून घ्यावा, हा आहे.

---

## निरीश्वर साङ्ख्य व सेश्वर साङ्ख्य.

वर सांगितल्याप्रमाणें या दर्शनाचे दोन सम्प्रदाय झाले आहेत, त्यांतून एक कपिलाचा, तो निरीश्वरवादी आहे, आणि दुसरा पतञ्जलीचा, तो ईश्वराचें अस्तित्व स्वीकारितो. ज्ञानाचा उद्देश.

खालीं लिहिलेलीं मतें दोन्ही सम्प्रदायांत एकसारखींच आहेत, तीं अशीं.—

खऱ्या व पूर्ण ज्ञानानें मात्र मोक्ष प्राप्त होतो. या प्रकृतिरूप जगामधील व्यक्त व अव्यक्त पदार्थ, व प्रकृतीहून पर असा जो आत्मा, त्याचें जें सचेतन व सज्ञान स्वरूप, या दोहोंमधील भेद शोधून काढणें, यास ज्ञान असें ह्मणतात.

प्रत्यक्ष, अनुमान, व शब्द, या तीन प्रकारचा प्रमाणानें वास्तविक ज्ञान प्राप्त होतें. ज्ञानप्राप्तीचे उपाय.

या प्रकारें ज्या पदार्थांचें ज्ञान होतें, ते पंचवीस आहेत; ते येणेंप्रमाणें:— पदार्थ.

१. प्रकृति.— ही सर्वांचें मूळ, सर्वांस घडविणारी, सृष्टीचें उपादान कारण, आहे; ही अनाद्यंत आहे; अव्यक्त, निरवयव, उत्पादक, व अविकृत आहे.

२. महत्तत्त्व.— प्रकृतीनें प्रथम उत्पन्न केलेलें, अनुत्पन्न, व दुसऱ्या सर्व पदार्थांचें उत्पादक आहे.

३. अहंकार. – हा महत्तत्त्वापासून उत्पन्न होतो, आणि, मी आहें, असा जो स्वतांचा अस्तित्वाविषयीं बुद्धीवर ग्रह होतो तो यापासून होतो.

४-८. अहंकारापासून उत्पन्न होणारीं पंचमहाभूतांचीं पंचतन्मात्रें, ह्मणजे त्यांचीं सूक्ष्म स्वरूपें.

९-१९. तशींच अहंकारापासून उत्पन्न होणारीं अकरा ज्ञानेन्द्रियें व कर्मेन्द्रियें. त्यांतून, डोळे, कान इत्यादि पंच ज्ञानेन्द्रियें, व वाचा, हात, पाय, इत्यादि पंचकर्मेन्द्रियें, मिळून दहा बाह्य आहेत; अकरावें इन्द्रिय मन, तें अन्तर्गत आहे, व तें ज्ञानेन्द्रिय व कर्मेन्द्रिय दोन्ही प्रकारचें आहे, ह्मणून त्यास उभयविध असें ह्मणतात.

२०-२४. वर सांगितलेल्या ४ तागाईत ८ पंचतन्मात्रांपासून उत्पन्न होणारीं, पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश, हीं पंचमहाभूतें.

२५. शेवटचा पदार्थ आत्मा; तो कोणापासून उत्पन्न झालेला नाहीं, व तो कोणाला उत्पन्न करूं शकत नाहीं. तो बहुसंघ, पृथक्, सचेतन, अव्यय, व प्रकृत्यातीत आहे.

सचेतन देही भूतांचीं रचना.

सृष्टीचा विचार करुन तिजपासून वेगळें होण्याकरितां आत्मा व प्रकृति यांचा संयोग होतो; व त्या संयोगापासून महत्तत्त्वादि पूर्वी सांगितलेले पदार्थ उद्भवून सृष्टि निर्माण होत्ये. मोक्ष, किंवा उपभोग, यांची आत्मा इच्छा करितो. हीं दोन्ही प्राप्त होण्यास, बुद्धि, अहंकार, मन, पंचज्ञानेन्द्रियें, व पंचकर्मेन्द्रियें, व पंचमहाभूतांचीं तन्मात्रें, यांहीं घटित असा सूक्ष्म देह त्यास प्राप्त होतो. हा देह बंधरहित, अव्याक्षिप्त, आणि मनोधर्मांनीं विकार पावणारा, असा आहे; परंतु पंचमहाभूतांचा स्थूल देह यास प्राप्त होईपर्यंत हा विषयोपभोग करण्यास शक्तिमान् नाहीं. हा जो दुसरा स्थूल देह सांगितला, तें मनुष्याचें शरीर; तें नाशिवंत आहे.

वर सांगितलेला सूक्ष्म देह हा विशेष कालपर्यंत राहतो, व देहान्तरें झालीं असतांहि आत्म्याबराबर जातो.

देही सृष्टीमध्यें जा जीवांस स्थूल देह आहेत त्यांचे चौदा वर्ग केले आहेत; त्यांतून आठ मनुष्याहून श्रेष्ठ व पांच कनिष्ठ आहेत.

वर सांगितलेल्या श्रेष्ठ वर्गामध्यें देवभूतपिशाचादिकांचा समावेश होतो; श्वापदें, वनस्पति व खनिज पदार्थ यांचा समावेश कनिष्ठांत होतो.

भावसर्ग.

स्थूल देही व सूक्ष्म देही या जा दोन प्रकृत्यात्मक सृष्टि आहेत, त्यांशिवाय साङ्ख्यकारांचा मतें बुद्धीचे विकार, भाव, व शक्ति यांहीं घटित अशी एक भावसृष्टि आहे. भावसृष्टि ह्मणजे भावसर्ग हा चार प्रकारचा आहेः— १. विपर्यय; २. अशक्ति; ३. तुष्टि; ४. सिद्धि. हीं चार प्रकारचीं कारणें बुद्धीस आपआपल्या रूपांप्रमाणें विकार करितात.[१]

इतर हिंदुदर्शनांप्रमाणें, साङ्ख्यामध्यें, प्रकृतीचे तीन आवश्यक गुण अथवा भेद, यांवर विशेष कटाक्ष आहे. ते गुण येणें प्रमाणें, १. सत्त्व; २. रज; ३. तम. हे सजीव व

---

(१) या कारणांची जी टीप सांगितली आहे ती फार मोठी आहे; कारण जरी मुख्य भेद ५० सांगितले आहेत, तरी त्यांचे अन्तरभेद पुष्कळ आहेत असें दिसतें. कोल्ब्रूक साहेबानें त्यांचा संक्षेप करून आपला ग्रंथ लिहिला आहे. त्यांतून निवड करून नमून्याकरितां पुढील प्रकार सांगतोंः—

१. अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, व अभिनिवेश, हे बुद्धीस पांच विपर्यय आहेत यांतून प्रत्येकांचा अर्थ सांगितला आहे; त्यांचे अन्तरभेद ६२ आहेत.

२. बुध्दीस अशक्त करणारीं कारणें २८ आहेत, तीं इन्द्रियांत व्यंग असल्यापासून, अथवा त्यांस विकार झाल्यापासून इत्यादि प्रकारांनीं उत्पन्न होतात.

३. तुष्टीचे ९ भेद आहेत, त्या सर्वांमध्यें मोक्ष प्राप्त होण्यास थोडाबहुत तरी, किंवा अगदींहि, श्रम लागूं नये, असा कल दाखविला आहे.

४. सिद्धि आठ प्रकारची आहे; त्यांत पहिले तीन प्रकार दुःख हटविण्याचे आहेत, व बाकी राहिलेले पांच प्रकार आहेत., ते,— १. ऊह; २. शब्द; ३. अध्ययन; ४. सुहृत्प्राप्ति; आणि ५. बाह्य व आभ्यन्तर शुद्धि.

निर्जीव अशा सर्व भूतांस विकार करितात. यास उदाहरण;— सत्त्व गुणाचा योगानें अग्नीस ऊर्ध्वगति प्राप्त होत्ये, आणि धर्म व सुख हीं मनुष्यास प्राप्त होतात; वायूमध्यें तुफान होणें, आणि मनुष्यमात्रांत अधर्म उत्पन्न होणें, हीं रजोगुणापासून होतात; आणि पाणी व माती यांचा जो सखल जाग्यावर जाण्याचा कल, तो तमोगुणापासून त्यांस प्राप्त झाला आहे; आणि मनुष्यास आर्षत्व व दुःख हींहि त्याच गुणापासून प्राप्त होतात.

या तीन गुणांपासून बुद्धीस आठ रूपें प्राप्त होतात, तीं;— धर्म, ज्ञान, वैराग्य, व ऐश्वर्य; आणि त्यांचा उलट, अधर्म, अज्ञान, अवैराग्य, व अनैश्वर्य, मिळून आठ. यांचे पुनः अन्तरभेद केले आहेत. उदाहरण, ऐश्वर्य आठ प्रकारचें आहे. ( परंतु आतां याचा विशेष विस्तार करित नाहीं. )

वर जीं जीं साङ्ख्यकारांचीं मतें सांगितलीं आहेत, तीं तीं त्यांचा ग्रंथांत सविस्तर विवेचन करून सिद्ध केलीं आहेत. त्यांचीं बोलणीं व त्यांचे वादविवाद यांचे कांहीं नमूनें कोलब्रूक साहेबानें दिले आहेत; त्यांचा कल अति सूक्ष्म भेदाभेद काढित बसण्याकडे आहे; परंतु अशा ग्रंथांत हा दोष सहजच येत असतो.

सांख्यमताविषयीं साधारण विचार.

साङ्ख्य दर्शनाचा छडा लावण्याचा यत्न करावयास लागलें असतां, जांणीं हें मत मूळीं शोधून काढलें, त्यांणीं या मतास जें कृत्रिम स्वरूप दिलें आहे, तेणेंकरून त्यांतील वास्तविक तत्त्व कांहींसें झांकून गेलें आहे; तथापि प्रथमदर्शनीं आपणास असें वाटतें, कीं जरी हें दर्शन निरीश्वर आहे,व यांत मुख्यत्वेंकरून प्रकृतीचें प्राधान्य आहे, तरी, जा दर्शनांत सर्व वस्तु आत्म्यापासून उत्पन्न होतात. त्यांत व यांत फारसा भेद नाहीं. कारण यांत प्रकृतीपासून बुद्धि उत्पन्न होत्ये; बुद्धीपासून अहंकार; अहंकारापासून इन्द्रियें, व पंचमहाभूतांची सूक्ष्मतत्त्वें; व या पदार्थांपासून स्थूल पंचमहाभूतें, असें होतें; आणि

या उत्पत्तीचा क्रमावरून असें दिसून येतें, कीं जरी प्रकृति अनाद्यंत आहे, तरी तिचीं रूपें आत्म्यापासून उत्पन्न झालीं असून, प्रत्यक्ष प्रमाणाशिवाय त्यांस स्वतन्त्र अस्तित्व नाहीं.

आतां असें साङ्ख्यांचें मत आहे असें जर आपल्या मनांत येईल, तर असें सांगतों, कीं या दर्शनाचा वास्तविक सिद्धान्त हा नव्हे. त्यांचा मताप्रमाणें हे पदार्थ प्रकृतीपासून पूर्वोक्त क्रमानें उत्पन्न व्हावे, हा प्रकृतीचा आंगचाच गुण आहे; आणि प्रकृतीचें ज्ञान होण्यास हे पदार्थ साधनीभूत योजावे, हा आत्म्याचा सहजच गुण आहे; परंतु प्रकृति व आत्मा यांचा जा या क्रिया त्यांचा उद्देश जरी एक आहे, तरी त्यांची उत्पत्ति पृथक् आहे. प्रकृति व निरनिराळ्या आत्म्यांचा समुदाय, हीं अनाद्यंत आहेत; आणि जरी बुद्धि व दुसरे प्रकृतिजन्य पदार्थ यांचा प्रत्येक आत्म्याशीं संयोग होतो, तरी त्यांचा उद्भव होणें तो याचा आधीन नसतो. हा जो आत्म्याचा संयोग होतो, तो, प्रकृतीपासून जें प्रथम मुख्य महत्तत्त्व झालें, त्याशीं नाहीं, परंतु त्यापासून जीं पृथक् महत्तत्त्वें होतात, त्यांशीं होतो.

आधानकालीं[२], प्रत्येक आत्म्यास एक सूक्ष्म देह व त्यावरून एक स्थूल देह, असे प्राप्त होतात. याप्रमाणें आत्मा व प्रकृति याचा संबंध झाला म्हणजे, बाह्य प्रकृतीपासून जे आभास उत्पन्न होतात ते इन्द्रियें नेऊन आंत पोंचवितात; मन हें त्या सर्वांस एकत्र करितें; ते अमुक विभूतीपासून उत्पन्न झाले असा त्यांचा पत्ता अहंकार लावून देतो; मग बुद्धि त्यांपासून अनुमान करून जें ज्ञान इन्द्रियांस प्राप्त होत नाहीं तें संपादन करित्ये: इकडे आत्मा हा अकर्त्ता असून हें सर्व पाहत तटस्थ असतो; तो सर्व पाहतो, परंतु जसा आरसा सर्व रूपांचा प्रतिमा घेतो, परंतु त्याचें रूप अगदीं बदलत नाहीं त्याप्रमाणें, आत्मा हा कशापासूनहि विकार

(२) प्रसूतिकालीं असें इंग्रेजींत आहे, परंतु ती चुकी आहे. भा०क०

पावत नाहीं. आत्म्यानें प्रकृतीचें स्वरूप पुरें पाहून जाणलें, म्हणजे त्याचा कार्यभाग संपला; मग तो मुक्त होतो, व प्रकृति आणि तो आत्मा यांचा संबंध नाहींसा होतो. याविषयीं मूळ ग्रंथांत असा दृष्टान्त दिला आहे कीं, प्रकृति ही नर्त्तकी ( म्हणजे नाचणारी ) सारिखी आपलें स्वरूप दाखविते; तिचें स्वरूप आत्म्यानें पाहिलें म्हणजे ती पुढें येत नाहीं, आणि मग, आत्म्याचा जो मुख्य उद्देश मोक्ष, तो त्यास प्राप्त होतो.

यावरून असें दिसतें, कीं प्रकृतीचा व्यापारांमध्यें आत्मा मुळींच सामिल होत नाहीं, व कोणत्याहि व्यापारास त्याची आवश्यकता नाहीं. आभास, अहंकार, ऊह, व अवधारण, हीं, तो असतांना जशीं होतात, तशींच तो नसतांनाहि होतील. दुसरें, हे सर्व व्यापार आत्म्याचा मोक्षाकरितां होतात; असें असून आत्मा तर मुळीं मुक्त आहे, व शेवटपर्यंत त्याचा स्थितींत बदल होत नाहीं. यावरून बुद्धि व प्रकृति यांचा जो हा खेळ होतो, तो निरर्थक होतो असें दिसतें. याप्रमाणें कोणत्याहि दृष्टीनें पाहूं जातां, आत्मा हा अगदीं निरर्थक आहे; यावरून असें दिसतें, कीं आपल्या देशबांधवांचा धर्म प्रत्यक्ष नाकबूल केला असतां त्यांचा अविचारी समजुतीस फारच वाईट वाटेल, म्हणून तसें न करण्याचा हेतूनें, याणें आत्म्याचें अस्तित्व व मोक्ष हीं, बोलण्यांत मात्र, कबूल केलीं असावीं, अशी अटकळ दिसत्ये.

वर सांगितलेलीं मतें हीं दोन्ही साङ्ख्यदर्शनांत साधारणच आहेत; ( आतां त्यांतील भेद सांगतों.)

निरीश्वर व सेश्वर सांख्य यांत मतभेद.

निरनिराळे आत्मे आहेत, व बुद्धि ही प्रकृतीचें जाल उकलून त्यापासून सृष्टि करित्ये, हें कपिल कबूल करितो; परंतु ज्याचा प्रयत्नेंकरून हें जगत् उत्पन्न झालें, असा कोणी प्रकृतिरूप किंवा चैतन्यरूप परमेश्वर आहे, असें तो मानित नाहीं.

असें असतां, पतञ्जलीचें असें मत आहे, कीं दुसऱ्या

आत्म्यांहून वेगळा असा एक आत्मा अथवा चैतन्य आहे; आणि जीं दुःखें इतरांस ग्रासितात, तीं त्यास विकार करित नाहींत; चांगलीं अथवा वाईट कर्में, किंवा त्यांचे परिणाम, आणि कल्पनासृष्टि, व नाशास जाणारे मनोव्यापार, यांविषयीं तो उदासीन आहे; तो सर्वद्रष्टा, अपार, व अनंत आहे. या प्रकारचें जें कांहीं सत्त्व म्हणजे सत्ता आहे, तो ईश्वर; तो परमनियन्ता आहे.

या दोन पंथांचीं जीं परस्परांहून विशेष मतें आहेत, त्यांप्रमाणें त्यांचा आचार बदलतो. सर्व ज्ञानाचा उद्देश मोक्ष व तो समाधीनें प्राप्त होतो, असें दोनहि पंथांचे अनुयायी मानितात.

जे सेश्वरमती आहेत, त्यांचा मतें समाधी असून भक्तिहि मोक्षास आवश्यक आहे; आणि या भावानें त्यांचा ध्येय विषयांची प्रवृत्ति होत्ये. प्रकृति व मन यांचा स्वरूपाविषयीं गूढ तर्कांमध्यें निरीश्वरपंथी आपला काल घालवितात; आणि सेश्वरवादी हे भक्तीचा अभ्यासांत कालक्रमण करतात, किंवा ध्यानस्थ बसतात. या रीतीनें गूढ व धर्मपिशाची वृत्ति उत्पन्न होऊन, ती लोकांमध्यें दुसऱ्याहि रूपांनीं संचारूं लागली; आणि तिचें मान वाढत जाऊन शेवटीं साङ्ख्यमताचा या शाखेची पायमळणी करण्यास ती वृत्ति कारणीभूत झाली आहे.

पतञ्जलीकृत योगसूत्र हा सेश्वरवाद्यांचा मुख्य ग्रंथ आहे, त्यांत शारीर व मानसिक अभ्यासाविषयीं पूर्ण निर्देश केला आहे; त्यांत, अमुक प्रकारचीं आसनें निश्चल घालून आणि प्राणायाम व प्रत्याहार करून, अमूक विषयांवर अतिशय गहन विचार करावा, असें सांगितलें आहे. अशा अभ्यासानें, योग्यास सर्व भूत, भविष्य, आणि जवळील अथवा अंतरावरील वस्तूंचें ज्ञान होतें; तो दुसऱ्यांचें मनोगत जाणतो; हत्तीचें बळ, सिंहाचें शौर्य, व वायूच्या वेग, यांतें प्राप्त होतो; वायूंत उडूं शकतो; पाण्यावर तरूं शकतो;

भूमींत बुडी मारूं शकतो; तो एकवार दृष्टि टाकून सर्व भुवनें पाहूं शकतो, आणि बहुधा अपार ऐश्वर्यांचा भोग त्यास प्राप्त होतो.

मोक्षप्राप्तीकरितां जो प्रयत्न करावयाचा तो सोडून कांहीं योगी वर सांगितलेल्या विलक्षण शक्ति मिळविण्याचा कामास लागतात; आणि दुसऱ्या कित्येकांस आपल्या स्तावकांस चमत्कार दाखवून भुलविण्याचें दुसरें कांहीं साधन नसल्यामुळें, ते धुतारपणाचा आश्रय करितात.

योगी. हे जे दोन प्रकारचे अतिप्रकृतिक ऐश्वर्यांची इच्छा करणारे वर सांगितले, त्यांतून पहिल्या प्रकारचे अद्यापि बैराग्यांत आढळतात, आणि अति नीच बैराग्यांत दुसऱ्या प्रकारचेहि असतात. त्या दोहोंसहि जोगी म्हणजे योगी असें म्हणतात; कारण समाधि लावून जें ध्यान करणें त्यास योग म्हणतात, व याच शब्दावरून मूळचा पंथास योग असें म्हणत असत.

---

## उत्तरमीमांसा म्हणजे वेदान्तदर्शन.

जा व्यासानें वेदांची रचना केली असें म्हणतात, त्याणें या दर्शनाची स्थापना केली. तो इसवी सनापूर्वीं सुमारें १४०० वर्षांवर होता. आतां जरी वेदांची रचना करणारा व्यास नसून, दुसरा कोणी असला, तरी जाणें त्या वेदग्रंथांची रचना केली, त्याणें त्यांचा अभिप्राय व त्यांचीं आवश्यक मतें यांचें विवेचन करण्याकरितां एक ग्रंथ लिहिला असावा, ही गोष्ट असंभाव्य आहे असें दिसत नाहीं; परंतु कोलब्रूक साहेबाचें मत असें आहे, कीं साम्प्रत जें वेदान्ताचें स्वरूप आहे, तसेंच हें दर्शन मूळीं असल्यास, हें बाकी दुसऱ्या पांच दर्शनांहून, व जैन व बौद्ध यांचा मतांहूनहि अर्वाचीन आहे; म्हणून जा ग्रंथांत याचें प्रथम प्रतिपादन केलें आहे, तो ख्रिस्ती शकाहून सहाशें वर्षांपूर्वींचा असूं शकणार नाहीं.

जरी या दर्शनास बुद्धिवादाचा आधार आहे, तरी यास मुख्य आश्रय वेदाचा आहे, अशी या शास्त्राची प्रतिज्ञा आहे; आणि जेथें कांहीं सिद्धता करावयाची असत्ये, तेथें प्रमाणांकरितां वेदांतील वाक्यें काढून दाखविलेलीं असतात. हें मत प्रतिपादण्याकरितां पुस्तकांचे ढीग झाले आहेत, व त्यांचा टीका, व टीकांचा टीका झाल्या आहेत: हे बहुतेक ग्रंथ मागील ९०० वर्षांत लिहिलेले आहेत. या टीकाग्रंथांतून निवड करून कोल्ब्रूक साहेबानें या दर्शनाची हकीकत लिहिली आहे. या दर्शनांत जो वादविषयक भाग घातला आहे त्यामुळें, आणि मानवबुद्धीचें प्रमाण घ्यावयाचें तें सोडून वेदवाक्यें घातलीं आहेत त्यामुळें, इतर दर्शनांपेक्षां हें विशेष घोंटाळलेलें व दुर्बोध झालें आहे.

या दर्शनांतील मुख्य मतें आहेत तीं येणेंप्रमाणें:—

ईश्वर हीच एक वस्तु आहे.

"ईश्वर हा ब्रह्माण्डाचा अस्तित्वाचें, स्थितीचें व लयाचें, सर्वदर्शी व सर्वशक्तिमान् असें कारण आहे. त्याचा इच्छेनें सृष्टि निर्माण झाली आहे; या जगाचें निमित्तकारण व उपादानकारण तोच आहे." प्रलयाचा वेळीं सर्व वस्तु ईश्वराशीं मिळतात. तोच "एक सार्वकाळ असणारा" आणि "सर्वात्मक आत्मा" आहे.

प्रति व्यक्तीमधील आत्मे हे त्याचा चैतन्याचे अंश आहेत; ज्वालेंतील[३] अग्निकणांप्रमाणें ते ईश्वरापासून उत्पन्न होतात, आणि पुनः त्यास जाऊन मिळतात.

आत्मा (ईश्वराचा अंश आहे म्हणून,) "अपार, अमर, बुद्धिविशिष्ट, सचेतन, व सत्य" आहे.

त्यामध्यें क्रियाशक्ति आहे, परंतु विश्रान्ति ही त्याची स्वाभाविक अवस्था आहे.

---

३ अग्नीचे असें संस्कृतांत आहे. भा० क०.

त्याचे जे कांहीं पूर्वींचे संकल्प असतात त्यांप्रमाणें परमेश्वर त्यास वर्तवितो; परंतु हे पूर्वींचे संकल्प दुसऱ्या कारणांनीं उत्पन्न झालेले असतात, आणि पाहूं जातां त्या कारणांची परंपरा अनंत काळपर्यंत मागें वाढत गेलेली अ-सत्ये.

जशी तलवार म्यानांत असत्ये, त्याप्रमाणें आत्म्यास एक कवच असतें; किंबहुना एकावर एक पुष्कळ कवचें असतात असें म्हटलें असतां चालेल. पहिला ( विज्ञानमय कोश ), यांत बुद्धि व पांच ज्ञानेन्द्रियें असतात; व दुसरा ( मनोमय कोश ) यांत पूर्वींचा तत्त्वांहून मन हें अधिक असतें; तिसरा ( प्राणमय कोश ) यांत पंचकर्मेन्द्रियें व जीवाचा इतर शक्ति हीं अधिक असतात. हे तीन कोश मिळून सूक्ष्म देह होतो; जेव्हां प्रेत्यभाव होतात तेव्हांहि तो आत्म्याबरोबर जातो.

चौथा कोश हा स्थूल देह.

देहाचा संबंधानें आत्म्याचा अवस्था पुढें लिहिल्याप्रमाणें होतातः— जागृत् अवस्थेंत असतां, तो चंचल असतो, आणि वास्तविक व व्यावहारिक सृष्टीशीं त्याचा व्यापार होतो. स्वप्नांमध्यें, ठकविणारी व मिथ्या अशी सृष्टि त्याचा दृष्टीस पडत्ये. गाढ निद्रा (म्ह॰ सुषुप्ति) आली असतां, त्या वेळीं तो ईश्वरी तत्त्वांत वेष्टिलेला असतो, परंतु त्यांत मिसळत नाहीं. मरणानंतर, तो स्थूल देह सोडून जातो. मग तो चन्द्रलोकास जातो; तेथें त्यास एक जलमय देह प्राप्त होतो; नंतर तो पावसाचा द्वारानें पडतो, व एकादी वनस्पति त्याचें शोषण करित्ये; तेथून अन्नाचा द्वारानें तो जीवाशयांत प्रवेश करितो.

याप्रमाणें त्याचा कर्मानुसार त्याचे प्रेत्यभाव समाप्त झाले, म्हणजे त्यास मोक्ष प्राप्त होतो.

हा मोक्ष तीन प्रकारचा आहे. १. जेव्हां आत्मा परब्रह्मीं मिळून जातो, तेव्हां त्यास आत्यन्तिक म्हणजे पूर्ण मोक्ष

म्हणतात. २, जेव्हां तो ब्रह्मलोकास जाऊन मात्र पोंचतो तेव्हां तो अपूर्ण मोक्ष; आणि तिसरा मोक्ष हा वरील दोहोंहू-नहि फार कमी पदवीचा आहे; हा प्राप्त झाला म्हणजे म-नुष्य जीवंत असतांनाच त्यास ईश्वरी शक्ति प्राप्त होतात, आणि त्याचा मानस शक्ति उत्कृष्ट उपभोगक्षम असतात, परंतु क्रियाक्षम नसतात. यज्ञ व भक्तिपुरःसर ध्यान केलें असतां वरचांतून शेवटचे दोन मोक्ष प्राप्त होतात.

आत्म्याचें स्वेच्छाचारित्व, ईश्वरी कृपा, कर्मांचें सा-फल्य, भक्ति, इत्यादि गूढ विचारांविषयीं या दर्शनांत वाद-विवाद आहेत.

या दर्शनकारांचा जुन्या ग्रंथांत भक्तीविषयीं उल्लेख नाहीं. जी वेदान्तदर्शनाची शाखा भगवद्गीतेनुसार चालत्ये तिचें हें मत आहे. सर्व शाखांतून जी अति नियमित आहे, तींत ईश्वरी कृपा म्हणून कांहीं आहे, आणि आत्म्याचा स्वेच्छाचारित्वास कांहीं यत्ता लावून दिली आहे असें प्रति-पादित आहे; ती यत्ता अशी कीं पूर्वीं अनंत काळापासून ब्रह्माण्डांत जीं जगें उत्पन्न झालीं, त्यांत आत्म्याचा संकल्पां-प्रमाणें तो बांधला गेला आहे, अशी अपार परंपरा आहे, व तिजविषयीं पूर्वींच सांगितलें आहे.

याप्रमाणें या दर्शनांत प्रकृतीचें अनाद्यंतत्व नाकबूल करून, ईश्वराची शक्ति व प्रयत्न यांपासून ब्रह्माण्डाची स्थि-ति झाली आहे असें प्रतिपादित आहे, म्हणून या दोन गो-ष्टींमध्यें पूर्वींचा दर्शनापासून हें अगदीं भिन्न आहे. आतां हें ब्रह्माण्डाचें अस्तित्व कसें उत्पन्न होतें त्याविषयीं या म-ताचे मूळ अध्यापक, किंवा त्याचें भाषान्तर करणारे युरो-पीयन ग्रंथकार, यांमध्यें मतभेद आहे. एका पक्षाचे वादी असें म्हणतात, कीं ईश्वरानें आपल्या तत्त्वापासून प्रकृति उत्पन्न केली, आणि प्रलयकालीं तो ती पुनः आपल्या त-त्त्वांत ओढून घेईल, आणि वर सांगितलेली जी प्रकृति तिज-पासून त्याणें हें जग उत्पन्न केलें आहे, आणि त्यापासून

मनुष्याचा आत्म्यावर पाहिजे तसा ग्रह करावा असें ठरविलें आहे. दुसऱ्या पक्षाचे असें म्हणतात, कीं ईश्वरानें प्रकृति उत्पन्न केली नाहीं, व प्रकृति मूळींच कोठें नाहीं; परंतु जसें प्रकृतिरूप जग आत्म्यावर कांहीं ग्रह उत्पन्न करितें असें पहिल्या पक्षाचे लोक म्हणतात, त्याप्रमाणें ईश्वर हाच, प्रत्यक्ष, आत्म्यावर ग्रहांची मालिका सतत उत्पन्न करित होता, व साम्प्रत करितो. एक म्हणतात कीं जें सर्व आहे तें ईश्वरापासून झालें आहे; दुसरे म्हणतात कीं ईश्वरावांचून दुसरें कांहींच नाहीं. हें दुसरें मत अर्वाचीन वेदान्त्यांत चालू आहे असें दिसतें, परंतु या दर्शनाचे जे स्थापक व प्रथमचे अनुयायी, त्यांचें हें मत होतें असें संभवत नाहीं.

बुद्धीवर जे ग्रह उत्पन्न होतात, ते नियमानें व क्रमानें होतात असें दोनहि पक्षकारांचें एकसारखेंच मत आहे; यामुळें जे दृश्य जगास खरें मानितात ते कार्यकारणांविषयीं जसा तर्क करितात, तसेच मायावादी हेहि करितात.

दोघांचाहि मतें ईश्वरास प्रयत्न आहे, आणि प्रकृतीचा स्वरूपांत, किंवा त्याचा स्वतांचा संबंधांत त्याची इच्छा बंद करणारें असें कांहीं कारण नाहीं.

आत्मा हा आरंभीं ईश्वराचा अंश होता, आणि तो पुनः जाऊन ईश्वरास मिळेल असें दोघांचेंहि मत आहे; परंतु आत्मा हा ईश्वरापासून निराळा कसा झाला हें एकहि सांगत नाहीं. त्यांतूनहि आत्म्यास त्याचें स्वतांचें ईश्वराहून पृथक् अस्तित्व खरें वाटतें, आणि बाह्य सृष्टीचे त्यावर विकार होतात तेहि त्यास खरे वाटतात, असें असून तो तर जी एकच खरी वस्तु तींतील एक अखण्ड भाग आहे; तेव्हां याप्रमाणें ईश्वर आपल्याच अंशास कसा ठकवूं शकतो, असें जर मायावाद्यांस विचारिलें तर ते अगदीं सांगूं शकत नाहींत.

---

## न्यायदर्शन.

न्यायशास्त्र हा विषय ब्राह्मणांस फार प्रिय आहे, आणि त्यांणीं यावर असंख्य ग्रंथ लिहिले आहेत. त्यांतून कांहीं नामाङ्कित ग्रंथकारांनीं लिहिले आहेत, त्यामुळें या दर्शनाचा पुष्कळ शाखा झाल्या आहेत; तथापि सर्व शाखा गोतम व कणाद या दोघांचा दर्शनांपासून उत्पन्न झाल्या असें म्हणतात; त्यांतून पहिल्या ग्रंथकारानें अतीन्द्रिय पदार्थसंबंधी न्यायाकडे लक्ष दिलें आहे, व दुसऱ्यानें इन्द्रियगोचर पदार्थांचा विचार केला आहे. जरी हीं दर्शनें कांहीं गोष्टांनीं भिन्न आहेत, तरी तीं एकाच दर्शनाचे दोन भाग आहेत अशीं मानलीं असतां चिंता नाहीं, कारण तीं एकमेकांची उणीव पुरी पाडणारीं आहेत.

आरिस्टाटलाचा न्यायदर्शनाशीं तुलना.

याप्रमाणें जें दर्शन झालें त्याची युरोपीयन लोक ऑरिसूटाटलाचा[४] दर्शनाशीं तुलना करितात; व पाहूं जातां यांतील वर्गीकरण, पद्धति, व रचना हीं त्यासारिखीं आहेत, व यांत एक ओबडधोबड न्यायाचा प्रकार आहे; त्यांत पांच अवयव असतात.[५] त्यांतून दोन अगदीं स्पष्ट रीतीनें निरर्थक आहेत.[६]

कणाददर्शनांत जा मूळपदार्थांची संख्या सांगितली

---

४ एक युनानी तत्त्ववेत्ता. भा० क०

५ त्यांस, १. प्रतिज्ञा, २. हेतु, ३. उदाहरण, ४. उपनय, व ५. निगमन, अशीं पांच नावें आहेत. भा० क०.

६ उदाहरण. १. या डोंगरांत अग्नि आहे. २. कारण त्यांतून धूर येत आहे. ३. जांतून धूर येतो त्यांत अग्नि असतो, जशी स्वयंपाकाची चूल. ४. आतां त्या टेंकडींतून धूर येत आहे. ५. ह्मणून त्या टेंकडीवर अग्नि आहे.

याशिवाय हिंदूंजवळ नियमित ( म्हणजे तीन अवयवांचा ) न्यायहि होता. तो वरील न्यायापासून सहजच उत्पन्न झाला असेल; परंतु हा न्याय विशेष अर्वाचीनकाळीं प्रवृत्तींत आलेला होता, यावरून तो त्यांणीं कदाचित् युनानी लोकांपासूनहि घेतला असेल.

आहे, ते सहा आहेत:— १. द्रव्य, २. गुण, ३. कर्म, ४. सामान्य, ५. विशेष, ६. समवाय. ( ह्मणजे निकटसंबंध ): कांहीं ग्रंथकार, अभाव, ह्मणून सातवा पदार्थ कल्पितात. यांतून तीन आरिस्टाटलाचा पदार्थांतील आहेत, आणि त्याचे सात पदार्थ यांत सांगितलेले नाहींत.[७]

वरील दोन्ही शाखांमध्यें, इन्द्रियें, पंचमहाभूतें, आत्मा व त्याचा निरनिराळ्या शक्ति, काल, देश, इत्यादि विषयांचें वर्णन केलें आहे. तेच आरिस्टाटलाचेहि विषय आहेत; परंतु आरिस्टाटलाचा दर्शनांत अगदीं पहिल्या मतीचे असे जे पुष्कळ विषय आहेत ते हिंदूंनीं टाकून दिले आहेत, आणि जे यांचांतले तसे आहेत ते त्यांत टाकून दिले आहेत. त्या दोहींचा व्याख्या पुष्कळ ठिकाणीं भिन्न आहेत, आणि त्यांची रचना तर अगदींच भिन्न आहे.

या दोहोंमध्यें एक चमत्कारिक साम्य आहे, तें हें कीं, सर्व हिंदुदर्शनांमध्यें पांच इन्द्रियांशिवाय एक सहावें इन्द्रिय कल्पिलेलें आहे, तें बाकीचांस आपआपल्या व्यापारांस प्रवृत्त करितें, आणि आरिस्टाटलानें जें अन्तर्गत ज्ञानेन्द्रिय कल्पिलें आहे, त्याशीं हें बराबर मिळतें.

गोतमाचा दर्शनाप्रमाणें वर्गीकरण.

कणादाचा दर्शनापेक्षां गोतमाचा दर्शनांतील रचना विशेष पुरी व व्यापक आहे; त्यांतील कांहीं नमूने खालीं दिले आहेत, त्यांवरून त्या ग्रंथकारांनीं किती सूक्ष्म वर्गीकरण करण्याचा यत्न केला आहे, तें कांहींसें समजेल.

त्यांतून पहिले विभाग सोळा कल्पिले आहेत; ते कोणत्या नियमानें केले आहेत तें कांहीं मला समजत नाहीं; परंतु त्यांत कांहीं वादाचीं साधनें, कांहीं वाद करण्याचा रीति, व कांहीं वादाचे विषय आहेत एवढें मात्र आहे. ते विभाग येणेंप्रमाणें:—

७ ते येणें प्रमाणें:— मनोविकार, संबंध, गुण, केव्हां, कोठें, स्थान, आणि भावना.

१. प्रमाण, २. प्रमेय, ३. संशय, ४. प्रयोजन, ५. दृष्टान्त, ६. सिद्धान्त, ७. अवयव, ८. तर्क, ९. निर्णय, १०. वाद, ११. जल्प, १२. वितण्डा, १३. हेत्वाभास, १४. छल, १५. जाति, १६. निग्रहस्थान. तत्त्वें.

यांचे जे अन्तरभेद केले आहेत ते विशेष सरळ व पद्धतवार आहेत.

पहिलें तत्त्व, प्रमाण.

प्रमाण चार प्रकारचें आहेः— प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, व शब्द. पुढें अनुमानाचे पुनः विभाग केले आहेत. तेः— पूर्ववत्, ह्मणजे ज्या अनुमानानें कारणापासून कार्याचा शोध लागतो तें; शेषवत्, ह्मणजे ज्या अनुमानानें कार्यापासून कारणाचा पत्ता लावतात तें; आणि सामान्य अनुमान.

दुसरें तत्त्व, प्रमेय व त्याचे अन्तरभेद.

प्रमेय बारा प्रकारचें आहेः— १. आत्मा, २. शरीर, ३. इन्द्रियें, ४. इन्द्रियार्थ, ५. बुद्धि, ६. मन, ७. चाञ्चल्य, ८. दोष, ९. प्रेत्यभाव, १० फल, ११. दुःख, १२. अपवर्ग ( ह्म० मोक्ष ).

१. आत्मा.

१. पहिलें प्रमेय आत्मा आहे. त्याचें स्वरूप, त्याचा शक्ति, आणि त्याचा अस्तित्वाचीं प्रमाणें यांचें पूर्ण विवेचन केलें आहे. आत्म्यास चौदा गुण आहेत असें सांगितलें आहे; ते येणेंप्रमाणेंः— संख्या, परिमाण, पृथक्त्व, संयोग, विभाग, बुद्धि, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म, भावना.

२. शरीर.

२. दुसरें प्रमेय शरीर हें आहे. याविषयीं आत्म्याहून विशेष विचार व व्याख्या केली आहे. परंतु त्यांत जो कांहीं विषय लिहिला आहे तो वास्तविक पाहतां पदार्थविज्ञानशास्त्राचा आहे.

३. ज्ञानेन्द्रियें.

३. यापुढें ज्ञानेन्द्रियांची व्याख्या केली आहे, आणि जसे साङ्ख्यकार हीं अहंकारापासून उत्पन्न होतात असें ह्मणतात, तशीं तीं होत नाहींत असें यांचें मत आहे. परंतु जशीं त्या दर्शनांत तीं इन्द्रियें

सहावें इन्द्रिय मन याशीं जोडलीं आहेत, तशींच यांतहि आहेत; असें असून ( साङ्ख्यकार आपल्या मतांत अकरा इन्द्रियांचा भरतीस जीं पंचकर्मेन्द्रियें घेतात ) तीं हे मूळीं-च निराळीं कबूल करित नाहींत.

४. इन्द्रियार्थ. ४. प्रमेयाचा चौथा अन्तरभेद इन्द्रियार्थ; यांत कणादाचे द्रव्यादि सात पदार्थ येतात.

यांतून पहिला पदार्थ द्रव्य; त्याचे नऊ प्रकार आहे-तः— पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, काल, दिक्, आ-त्मा, आणि मन. हे सांगून पुढें या नऊ द्रव्यांचा गुणांचा पुरतेपणीं विचार केला आहे, आणि नंतर गुण ह्मणून जो दुसरा पदार्थ त्याचा विचार ग्रंथकारानें चालविला आहे. तो असाः— गुण २४ प्रकारचे आहेत; त्यांतून सोळा जी-वात्म्याचे आहेत. ते— रूप, रस, गंध, स्पर्श, संख्या, परि-माण, पृथक्त्व, संयोग, विभाग, परत्व, अपरत्व, गुरुत्व, स्नेह, द्रवत्व, शब्द, आणि बुद्धि[अ]; आणि परमात्म्याचे आठ गुण आहेत. ते- सुख[ब], दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म, आणि संस्कार. यांतून प्रत्येकाविषयीं पुष्कळ विचार सांगितलेला आहे; आणि तो केव्हां केव्हां युनानी लोकांचा तोडीचाहि आहे.[८]

इतकें सांगून पुढें बाकी राहिलेल्या पांच पदार्थांची व्याख्या करून इन्द्रियार्थप्रकरण पुरें केलें आहे. नंतर त्याच रीतीनें बाकी राहिलेल्या सहा प्रमेयांचा विचार करू-न दुसऱ्या तत्त्वाचें व्याख्यान पुरें केलें आहे.

---

(अ) हा मूळ इंग्रेजींत नाहीं. भा० क०.

( ब ) हा गुण मूळ इंग्लिश ग्रंथांत नाहीं. भा० क०.

(८) यास उदाहरण, लघुत्व म्हणजे गुरुत्वाचा अभाव एवढीच लघु-त्वाविषयीं व्याख्या आहे; असें असून आरिस्टाटलानें हें तत्त्व निराळें करून, जसें गुरुत्वाचा अंगीं अधोगामित्व आहे, तसें याचा अंगीं ऊर्ध्व-गामित्व आहे असें प्रतिपादिलें आहे. एका मध्यापासून लहरींमागून ल-हरी सुटून शब्द उत्पन्न होतो असें हिंदूंचें मत आहे.

३.तिसरें तत्त्व; संशय.

नंतर तिसरें तत्त्व, ह्मणजे संशय, हा हातीं घेऊन त्याची व्याख्या केली आहे, आणि याप्रमाणें सोळा तत्त्वांची अखेरी केली आहे. आतां हा विषय व्याख्यान करण्याची रीति कशी आहे हें समजण्यापुरतें वर्णन वर आलें आहे, आणि त्यापलीकडे कांहीं मजकूर कळविणें झाल्यास पुष्कळ विस्तार करावा लागेल.

अतीन्द्रिय पदार्थांविषयीं अभिप्राय.

वरील तत्त्वांचा व्याख्यानामध्यें पुष्कळ इन्द्रियप्रत्यक्ष व अतीन्द्रिय विषयांप्रकरणीं मतें आलीं आहेत; जशीं, आत्माचें प्रकृतिरहितत्व, त्याची स्वतंत्र स्थिति, आणि त्याचें अनाद्यंतत्व हीं प्रतिपादित आहेत. ईश्वर हा परमात्मा, सर्व अनाद्यन्त ज्ञानाचें स्थान, सर्व वस्तूंचा कर्त्ता, इत्यादि गुणविशिष्ट तो आहे.

कणाददर्शन.

हें नाशिवंत जग अनादि परमाणूंचा समुदायानें झालें आहे, असें कणादाचा दर्शनाचें मत आहे. यास कणभक्षदर्शन असेंहि ह्मणतात. याप्रमाणें जी कणांची क्षणभंगुर रचना होत्ये, ती त्यांचा सहज स्नेहभावांनीं होत्ये, किंवा ईश्वराचा उत्पादक शक्तीनें होत्ये, याविषयीं निर्णय झालेला दिसत नाहीं.

हिंदुतत्त्ववेत्त्यांनीं जा विषयांचा विचार केला आहे ते, व प्राचीन काळीं ग्रीसदेशांतील तत्त्ववेत्ते जांचा विचार करित होते ते, यांचें साम्य पाहून, आणि पृथ्वीवरील इतक्या परस्परांपासून अंतरावरील देशांतील दर्शनांचा मतांमध्यें जें साम्य दृष्टीस पडतें तें पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय राहतच नाहीं. जगाचें आदिकारण; मन व प्रकृति यांचा संबंध; सृष्टि; दैव; आणि दुसऱ्या अशाच विषयांचा हिंदूंनीं विचार केला आहे; आणि त्यांत कांहीं विषय असे घातले आहेत, कीं जे ग्रीक व रोमन लोकांस माहित नव्हते, व जांचा विचार युरोपांत अर्वाचीन काळीं निघाला आहे.

प्रकृतीचें अनाद्यंतत्व, किंवा तिची ईश्वरापासून उत्पत्ति; परमेश्वराची पृथक् स्थिति, किंवा प्रकृतीचा रचनेपासून त्याची उत्पत्ति; ईश्वरापासून सर्व जीवांची उत्पत्ति, आणि त्याकडे त्यांची परावृत्ति; कणादमत; जगांची राहटी; हीं हिंदूंचीं सर्व मतें कोणी तरी युनानी दर्शनकारांनीं प्रतिपादिलीं आहेत. आतां कदाचित् कोणी म्हणेल, कीं निरनिराळ्या देशांतील विचार करणाऱ्या पुरुषांत हीं मतें एकमेकांचा साहाय्याशिवाय सुचलीं असतील; तर त्याविषयीं असें पाहिलें पाहिजे कीं जर दोन्ही पद्धतींमध्यें एक एक निरनिराळें साम्य असतें, तर तें सहज घडून आलें असें मानण्यास चिंता नव्हती; परंतु या उदाहरणांतील पिथागरसा(क)चें दर्शन पाहिलें असतां तें सगळें दर्शन अगदीं हिंदूंचा दर्शनासारिखें आहे, आणि त्या दोन्ही दर्शनांतील मतें मनुष्यास सहज सुचण्यासारिखीं नाहींत, यावरून या दोन्ही दर्शनांचें मूळ एकच आहे; आणि म्हणूनच अशा सिद्धान्ताकडे बुद्धि वळण्यास पिथागरस हा पूर्वेकडील देशांत प्रवासास आला होता अशी जी दंतकथा आहे, तिजवरच विश्वास बसला पाहिजे असें नाहीं.

बुद्धीस पूर्ण दशा प्राप्त होण्यास जीं आवरणें येतात त्यांपासून तिला मुक्त करणें; मनोविकारांचा सत्तेपासून व दैहिक ग्रहांचा भारांतून तिला सांवरून घेणें, आणि याप्रमाणें तिला ईश्वरासारिखी योग्यता येऊन तिणें देवलोकीं जाण्यास योग्य व्हावें असें करणें, हा पिथागरसाचा मताप्रमाणें सर्व तत्त्वविचाराचा निर्गम होय. त्याचीं दुसरीं मतें आहेत तीं येणेंप्रमाणें:— आत्मा हा ईश्वराचा एक अंश आहे, आणि त्याचे नानाप्रकारचे जन्मभाव होऊन व त्यास यमलोकीं मध्यवर्ती अवस्था प्राप्त होऊन त्याचीं पापें धुपून गेल्यावर, जा अनाद्यंत उगमापासून तो निर्माण झाला तेथें

(क) एक युनानी तत्त्ववेत्ता.

परत जातो. मन हें आत्म्याहून पृथक् आहे. ईश्वर हा सर्वात्मा आहे; तो सर्व वस्तूंत भरलेला आहे; तो ब्रम्हाण्डाचें मूलतत्त्व आहे; तो अदृश्य, अविकृत, व केवळ बुद्धीनें मात्र ग्राह्य आहे. ईश्वर व मनुष्यजाति, यांचा मधील पायरीचीं पुष्कळ आकाशस्थ भूतें आहेत; त्यांचे निरनिराळे वर्ग केले आहेत, आणि त्यांपासून जगाचा घडामोडींत निरनिराळ्या प्रकारचे परिणाम होतात.

आतां अतीन्द्रिय पदार्थांविषयीं जीं मतें हिंदुस्थानांत आहेत, तीं थेट हींच आहेत. त्यांशिवाय पिथागरसास मांसाचा त्रास होता, आणि यज्ञांत जें आलें असेल त्याशिवाय मांसाचा त्याणें निषेध केला होता; झाडें मारूं नयेत किंवा दुखवूं नयेत अशी आज्ञा त्याणें आपल्या साम्प्रदायी लोकांस केली होती; तो आपल्या साम्प्रदायांस फार दिवस कसोटीस लावित असे, व त्यांस फार गूढ उपदेश करित असे; या सर्व गोष्टी आणि वरील मतें हीं हिंदुंचांशीं फार चमत्कारिक रीतीनें मिळतात, तेव्हां हें साम्य प्रत्यक्ष पाहून तो किता घेतल्यावांचून होऊं शकेल असें दिसत नाहीं.

या दोन दर्शनांमध्यें याचप्रमाणें चमत्कारिक परंतु थोड्या महत्वाचीं अशीं दुसरीं साम्यें आहेत, तीं:— दोहींमध्यें ईश्वर व तेज यांचें साधर्म्य आहे; पृथ्वीवर फेरफार झाले असतां त्यांची मर्यादा चन्द्रलोकापर्यंत आहे अशी दोहींत मनःकल्पित यत्ता आहे; अशाच दुसऱ्याहि गोष्टी आहेत. दुसरें असें आहे कीं पिथागरसाचा वेळीं जीं दुसरीं सर्व युनानी दर्शनें होतीं त्यांतून एकाचाहि मतांशीं त्याचीं वरील मतें मिळत नाहींत; यामुळें वरील साम्यें विशेष मोठीं अशीं मानलीं पाहिजेत.

हिंदुदर्शन व पिथागरसी दर्शन या दोहींचा मतांतून कांहीं मतें प्राचीन मिश्री लोकांत चालत होतीं; म्हणून त्यांपासून पिथागरसानें व ब्राह्मणांनीं आपआपल्या देशांत तीं नेलीं अशी कदाचित् कोणी कल्पना करील, परंतु हीं मतें

मिश्रदेशांत होतीं असा आधार फक्त ग्रंथांत मात्र सांपडतो, आणि तीं मतें दुसऱ्या द्वारांनीं ग्रीसदेशांत आल्यावर पुष्कळ दिवसांनीं, ते ग्रंथ लिहिलेले आहेत. हिराडोटस् या युनानी इतिहासाचा मात्र काय तो याविषयीं जुना आधाररूप इतिहास आहे, परंतु पिथागरसाचा मतांचा सर्वत्र प्रसर झाल्यावर हिराडोटस् हा झाला. यास्तव जरी कदाचित् कांहीं मतें मिश्री लोकांत चालत असलीं, तरी तीं उडवत उडवत असून तेथील तत्त्वविचाराची पद्धति स्वतंत्र होती; तशींच ग्रीसदेशांत तरी हीं मतें बाहेरून आणलेलीं असून पिथागरसाचा अनुयायांशिवाय दुसऱ्या कोणी तत्त्ववेत्त्यांनीं हीं सगळींच स्वीकारिलीं नव्हतीं. असें असून, हिंदुस्थानांतील लोकांचा धर्माचा पायाच मुख्यत्वेंकरून वरील मतांवर आहे; एथील तत्त्वविचारसंबंधीं सर्व दर्शनें यांजवर हवाला देतात; आणि पदार्थविज्ञानशास्त्रांतील प्रत्येक कल्पना, व नीतिशास्त्रांतील प्रत्येक वाक्य, यांचा आधार यांवरच आहे.

कोलब्रूक साहेबाचें असें सुयुक्त म्हणणें आहे, कीं अर्वाचीन युनानी तत्त्वविद्येपेक्षां प्राचीन युनानी तत्त्वविद्येशीं हिंदूंचा तत्त्वविद्येचें विशेष साम्य आहे; आणि जर हिंदूंनीं मूळ प्रथमचीं मतें अन्य देशाचा लोकांपासून घेतलीं असलीं, तर त्याचप्रमाणें दुसऱ्या देशांत जा सुधारणा पुढें झाल्या त्यांची माहिती करून न घेण्यास कांहीं कारण नव्हतें. यावरून तो असें अनुमान करितो कीं "ही विद्या हिंदूंनीं ( दुसऱ्यांस ) शिकविली आहे, ( दुसऱ्यांपासून ) हे शिकले नाहींत."

# खण्ड तिसरें.

## हिंदुलोकांची अर्वाचीन काळची स्थिति पुढें चालू.

पुढें जे विषय सांगितले आहेत, त्यांतून मनूंत थोडेच आहेत; यामुळें मनूचा वेळानंतर जे फेरफार, झाले ते यापुढें दाखवितां येत नाहींत, आणि याकरितां पुढें जसजसा एक एक सांगण्याचा विषय येईल, तसतशी, त्याची मूळ उत्पत्ति व साम्प्रतची स्थिति हीं, दुसऱ्या प्रमाणांचा आधारें, सांगण्याचा यत्न करणें भाग आहे.

---

# प्रकरण पहिलें.

## ज्योतिष आणि गणितविद्या.

हिंदूचा ज्योतिषविद्येचें प्राचीनत्व.

हिंदुस्थानांतील ज्योतिष विद्येचें प्राचीनत्व व अपूर्वत्व हे मोठे आनंदजनक विषय होत. यांतून पहिल्या गोष्टीविषयीं युरोपांतील कित्येक उत्कृष्ट ज्योतिष्यांनीं घाटाघाट केली आहे, परंतु तिजविषयीं अद्यापि निर्णय झाला नाहीं. ख्रिस्तापूर्वी तीन हजार वर्षांचा पलीकडे घेतलेले वेध अद्यापि विद्यमान आहेत, असें क्यासीनी, बेलि, व प्लेफेयर् हे प्रतिपादितात, आणि त्या वेळीं त्या विद्येंत इकडील लोकांची बरीच गति झाली होती असें ते सिद्ध करितात; परंतु लाप्लास, डिलाम्बर, इत्यादि पुष्कळ प्रख्यात विद्वान् या वेधांचा खरेपणा कबूल करित नाहींत, त्यावरून, त्या वेधांचा आधारानें केलेला जो पूर्वोक्त सिद्धान्त, तोहि ते बळकट आहे असें मानित नाहींत हें सहजच आहे.

वरील वाद केवळ ज्योतिषसंबंधीं प्रमाणांनीं चालविलेला आहे, ह्मणून त्याचा निर्णय ज्योतिषीच करूं शकतील. आतां ज्या कोणास गणितशास्त्राची अगदींच माहिती नसेल, तो जर या वादप्रकरणीं बोलणीं पाहूं गेला, तर हिंदुज्योतिषाचा विशेष प्राचीनत्वाविषयीं जसें बोलणें आहे तसाच ठराव करण्यास आधार दिसत नाहीं, असें त्याचा लक्षांत येईल.

हिंदूंचे जे वेध साम्प्रत उपलब्ध आहेत ते फार प्राचीन आहेत, ही गोष्ट सर्व ज्योतिष्यांस मान्य आहे; आणि सूर्य व चंद्र यांच्या ज्या मध्यम गति त्यांणीं शोधून काढल्या आहेत, त्या इतक्या बराबर आहेत, कीं फार प्राचीन काळीं केलेल्या वेधांशीं अर्वाचीन वेधांची तुलना केल्याशिवाय त्या काढूं शकवणारच नाहींत, हें निर्विवाद दिसतें. हिंदूंचें ज्योतिष फार प्राचीन नाहीं असा वाद घेणारे जे आहेत, त्यांत मिस्टर बेण्ट्ली प्रमुख आहे; तथापि तोहि आपल्या शेवटील ग्रंथामध्यें असें कबूल करितो, कीं ख्रिस्ती शकापूर्वी १४४२ वर्षांवर हिंदूंनीं क्रान्तिवृत्ताचे विभाग करून २७ नक्षत्रमण्डलें केलीं होतीं: असा विभाग करण्यापूर्वी त्यांणीं पुष्कळ वेध केले असतील अशी सहजच अटकळ होत्ये. आतां वरील गोष्टींत बेण्ट्ली साहेबानें सांगितलेला जो आधार आहे त्यावरच जरी भरवसा न ठेविला, तरीहि, ख्रिस्तापूर्वी १५ व्या शतकाच्या अलीकडे हिंदुज्योतिषवेधांस आरंभ झाला नाहीं, असें मानणें योग्य दिसतें; आणि पाहूं जातां ग्रीसदेशामध्यें यापूर्वी ज्योतिषाविषयीं उल्लेख आला नव्हता.

तिथिसाधनाविषयीं जो ज्योतिषसंबंधीं नियम वेदांतून घेतलेला आहे, तो ख्रिस्ताच्या पूर्वी चौदाव्या शतकांत जुळलेला आहे असें प्रतिपादित आहे.[1] साम्प्रत ज्याच्या ग्रंथांच्या कांहीं अंश राहिला आहे, असा ज्योतिषावरील आद्य

(१) पुरवणी अंक पहिला पहा.

ग्रंथकार पराशर आहे; तो वरील काळाचा सुमारेंच नांदत होता असें दिसतें.[२]

हिंदूंचा ज्योतिषाविषयीं शोध करावयास लागलें असतां, त्या शोधास त्यांचा प्राचीन ग्रंथकारांपासून कांहीं साहाय्य मिळत नाहीं. उपाध्यांचा जा कपटानें हिंदूंची इतर प्रकारें दुर्दशा झाली आहे, त्या कपटाचेंच जाल त्यांचा शास्त्रावर पडलें आहे. त्यांचा धर्मसंबंधीं जें अमर्याद कालमान, त्याचा आधारानें त्यांणीं आपलें ज्योतिष ठेविल्यामुळें, त्या ज्योतिषशास्त्रापासून जा शकादींचा निर्णय व्हावयाचा त्यांचा गोंधळ होऊन ते अनिर्णीत राहिले आहेत. त्या शास्त्राचा क्रमाचा साधारण विचार मुळींच सांगितलेला नाहीं. त्या शास्त्रांतील जा भागांची व्यवहारांत गरज लागत्ये, त्यांचें मात्र उद्घाटन केलें आहे, आणि तेहि भाग कोठून निर्माण झाले ते उगम हुशारीनें

त्याचा विस्तार.

२ पराशरानें संपातस्थानाचा जो शोध केला आहे त्यावरून तो वरील काळीं होता असें दिसतें. याविषयीं प्रथम मिस्टर डेविस याणें लिहिलें आहे, आणि त्याणेंच आणखी कांहीं गोष्टी कळविल्यावरून (इ०स० पूर्वीं ११८१ व्या वर्षीं ह्मणजे) ख्रिस्तापूर्वीं बाराव्या शतकांत पराशर होता असें सर विलियम जोन्स याणें ठराविलें आहे. परंतु पुढें मि०डेविस याणेंच, त्या प्रकरणीं झाला तितका सूक्ष्म विचार करून, याम्योत्तर स्थानांचा वृत्ताचा पूर्वोक्त शोध इ०स० पूर्वीं १३९१ वर्षें झाला असावा असें प्रतिपादिलें आहे. पराशराचा ग्रंथांतील दुसऱ्या एका लेखांत अगस्तीचा उदयाविषयीं लिहिलें आहे; तो उदय पराशराचा वेळीं झाला आहे, आणि त्याचा काळ, हा दुसऱ्या आधारांवरून निश्चित केलेला जो पराशराचा काळ आहे, त्याशीं मिळतो. पराशराचे ग्रंथ हे कोणी तरी अर्वाचीन काळीं त्याचें खोटेंच नाव घालून केले, असा बेण्टली साहेबास एकदां संशय होता; आणि पुढें जेव्हां ते ग्रंथ त्याचेच असें त्याणें कबूल केलें, तेव्हां अगस्त्युदयाविषयीं जें त्यांत लिहिलें आहे त्याचा त्याणें निराळा अर्थ करून, त्यावरून व दुसऱ्या कारणांवरून ख्रिस्तापूर्वीं ६७६ व्या वर्षीं पराशर होता असें ठराविलें आहे. जा पौराणिक कथांत पराशराचें नाव आलें आहे, त्यांचा साहाय्यानें दुसरे काल ठरविण्याचा यत्न सर विलियम् जोन्स याणें केला होता, परंतु तो सिद्धीस गेला असें दिसत नाहीं.

लपवून टाकून त्या उगमांपासून जें शास्त्र प्राप्त झालें तें प्रत्यक्ष ईश्वरानेंच सांगितलें अशी लोकांत त्याची प्रवृत्ति केली आहे.[३]

वरील कारणामुळें, जा आधारांवरून त्यांचे कोष्टक साधले आहेत त्यांचा उपन्यास कोठेंहि केलेला नाहीं, व त्यांजवळ क्रमानें घेतलेल्या वेधांचा लेखहि नाहीं. अशा शिस्तीनें आमचा साम्प्रतचा शोधांसहि अडथळा येतो, यावरून पूर्वीं विद्येचा गतीस फारच अडचण आली असेल. त्या वेळीं वेध करण्याची कला थोड्यांसच शिकविलेली असावी असें संभवतें; आणि त्यांणीं मानलेल्या ईश्वरी सत्यांवर जी लोकांची श्रद्धा असावी, ती जा वेधांचा योगानें दृढ न होतां, कदाचित् उलटी कृश होणार, असे वेध करण्याकडे वर

( ३ ) सूर्यसिद्धान्त हा पाण्डित्याचा ग्रंथ इसवी सनाचा ५ व्या किंवा ६ व्या शतकांतील एका ज्योतिष्यानें लिहिला आहे; असें असून तो २१,६४,९०० वर्षांवर देवापासून प्राप्त झाला; असें हिंदूंचें म्हणणें आहे. जशी त्यांणीं ज्योतिषविद्या कूटार्थक रीतीनें सांगितली आहे, त्याप्रमाणेंच इतर विद्याहि त्यांणीं सांगितल्या आहेत. त्यांचा त्रिकोणमितीविषयीं प्रोफेसर प्लेफेयर याणें लिहिलें आहे, तें येणें प्रमाणें:— "पूर्वेकडील लोकांचा विद्येंत जशा दुसऱ्या पुष्कळ गोष्टी असतात त्याच प्रमाणें हा ग्रंथ आहे; आणि जाणें हा लिहिला त्यास या विषयाची माहिती पुष्कळ असून, तितकी सर्व त्याणें सांगितली नाहीं असें दिसतें. बहुधा कोणी प्राचीन भूमितिवेत्त्यानें केवळ बाहेवारीचें गणित करणारांचा उपयोगाकरितां हा केला असावा." एडिन्बरो रिव्यु, नामें त्रैमासिक पुस्तकांत हिंदूंचा अंकगणिताविषयीं लिहिलें आहे, कीं:— "हा सर्व ग्रंथ पद्यात्मक आहे. यांतील प्रश्न बहुधा कूटांसारिखे थोडक्यांत घालून, त्यांतील गणित करण्याचा रीति त्याहून विशेष स्पष्ट रीतीनें सांगितल्या आहेत; पुढें उदाहरणें दिलीं आहेत; तीं केलीं म्हणजे पुरी संशयनिवृत्ति होत्ये, तेथपर्यंत होत नाहीं. त्या रीतींची सिद्धता; किंवा त्यांविषयीं तर्क यांतून कांहींच नाहीं. असें असून, जर त्या रीति तपासून पाहिल्या, तर, साम्प्रत पृथक्करण करून शोध करण्याची रीति उत्कृष्ट स्थितींत असतांना गणितांतील नियम जसे सरळ करतां आले आहेत, त्या तोडीचेच बहुधा तेहि सरळ आहेत." याचप्रमाणें त्यांचा बीजगणिताविषयींहि लिहिलें आहे.

सांगितलेल्यांहूनहि थोडेच लोक वळत असतील. यामुळेंच त्यांचा पूर्वीचा ज्योतिष्यांनीं केलेल्या परिश्रमांपासून यांस कौशल्यहि आलें नाहीं, व यांची ईर्ष्याहि जागृत झाली नाहीं; आणि पुढें जेव्हां ईश्वरप्रणीत ह्मणून मानलेल्या कोष्टकांत अधिकाधिक चुक्या आढळूं लागल्या, तेव्हां वेध करण्याची व ग्रंथ शुद्ध करण्याची त्यांस जरूर पडली; परंतु त्या वेळचा लोकांतील साधारण अभिप्राय पाहून, आपण जा सुधारणुकी केल्या त्यांबद्दल आपली कीर्ति व्हावी ही आशा एकीकडे ठेवून, आपण कांहीं फेरफार केला नाहीं असें बाहेरून दिसे असें करण्याकरितां त्या सुधारणा करणारांस यत्न करावा लागला.[४]

इतक्याहि गोष्टी प्रतिकूळ असून हिंदूंची गति ज्योतिषांत बरीच झाली होती असें दिसतें. साधारण लोकांस समजण्याजोग्या स्वरूपानें दाखवितां यावा, आणि इतर लोकांचा ज्योतिषक्रमाशीं ताडतां यावा, असा ज्योतिषाचा पुरा क्रम त्यांणीं रचून ठेविला नाहीं; त्यामुळें, त्यांणीं जा विषयांची व्याख्या केली आहे, त्यांतच त्यांणीं जें चातुर्य दाखविलें

---

(४) धर्माचा आधारानें जा चुक्या चालत होत्या त्या नीट करणारांची जी पांचांवर धारण बसली होती, ती सूर्यसिद्धान्तावरील टीकाकाराचा लेखावरून चांगली समजत्ये. त्याचाच निबंधावरून असें दिसून येतें कीं सद्सद्विचारबुद्धीस ग्राह्य असा क्रम जरी पूर्वापार स्थापित होता, तरी तो पौराणिक क्रमाशीं लढविणें हें काम बहुधा धर्मविरुद्ध असें त्या वेळींहि समजत असत. आतां, पृथ्वी ही अपार गगनामध्यें निराधार व सारख्या तोलावर ठेविलेली आहे, आणि जनावरांचा एका हारीचा आधारानें ती सांबरणार नाहीं, याप्रमाणें एका ग्रंथकारानें लिहिलें आहे खरें, परंतु दुसऱ्या ग्रंथांत अशी वादबुद्धि नसून, आपले जे सद्सद्विचारबुद्धिग्राह्य अभिप्राय, ते पूर्वीचा कादंबऱ्यांशीं जुळत आहेत असें दाखविण्याविषयीं ते ग्रंथकार आर्त दिसतात. धर्मसंबंधीं दगाबाजीनें शास्त्राची गति कशी कुंठित होत्ये याविषयीं चांगला मार्मिक दृष्टान्त "एडिन्बरो रिव्यू" मध्यें आहे, आणि त्यावरून, हिंदूंचे पहिले शोध फार प्राचीन काळीं केले असतील हें सिद्ध करण्याकरितां एक कुयुक्तिक तर्क केला आहे.

आहे त्यावरून त्यांचा निपुणतेची परीक्षा केली पाहिजे. या प्रकरणीं ग्रंथकारांमध्यें मतभेद दिसतो, परंतु जरी त्यांचा ग्रंथांतील कांहीं मोठ्या गोष्टी अर्धकच्चा राहिलेल्या आहेत, तरी त्यांचा विलक्षण निपुणतेचीं प्रमाणेंहि त्यांत आहेत, असें सर्व लोक मान्य करितात.

ज्योतिषाशिवाय गणितविद्येचा इतर शाखांमध्यें त्यांची गति याहूनहि विशेष लक्षांत ठेविण्याजोगी झाली होती. सूर्यसिद्धान्त, हा ग्रंथ इ० स० १०९१ त रचला असावा, त्या अलीकडे तर नाहींच, असें मि० बेण्टलीचें मत आहे; परंतु तो पांचव्या किंवा सहाव्या शतकांतील आहे असा इतर ग्रंथकारांचा साधारण अभिप्राय आहे. त्या ग्रंथांत जो त्रिकोणमितीचा क्रम आहे, तो ग्रीक लोकांचा विद्येहून तर फारच मोठा आहे, आणि त्यांत जीं कांहीं प्रमेयें आहेत त्यांचा शोध सोळाव्या शतकापर्यंत युरोपांतील लोकांस लागला नव्हता.

भूमिति.

ते भूमितीमध्यें कुशल होते हें पुष्कळ गोष्टींवरून दिसून येतें. त्यांणीं त्रिकोणांचे नाना प्रकारचे धर्म सिद्ध केले, व तीन बाजू घेऊन त्यांवरून क्षेत्रफळ काढण्याची रीति ( जी युरोपामध्यें सोळाव्या शतकांत क्लेव्हियसानें प्रसिद्ध केली व तेथपर्यंत जी तेथें माहित नव्हती, ती ) शोधून काढिली; तिजवरून, आणि वर्तुळाचा व्यास व त्रिज्या यांचा प्रमाणाचें जें त्यांस ज्ञान होतें त्यावरून त्यांची हुशारी दिसून येत्ये. त्रिज्या व व्यास यांचें प्रमाण त्यांणीं विलक्षण रीतीनें लिहिलें आहे, व युरोपीयन विद्वानांनीं अतिशय परिश्रम करून जे शोध केले त्यांवरूनहि तें खरें आहे असें निश्चित झालें आहे. असें असून तें प्रमाण हिंदुस्थानाबाहेरील देशांत अर्वाचीन काळापर्यंत माहीत नव्हतें.

(५) हा ब्रम्हगुप्ताचा वेळीं झाला, व ब्रम्हगुप्त हा सहाव्या शतकाचा अखेरीस झाला असा कोल्ब्रूक साहेबाचा अभिप्राय आहे.

(६) पूर्वोक्त व्यासपरिघांचें प्रमाण सूर्यसिद्धान्तांत सांगितलें

दशगुणक अंकनाची रीति हिंदूंनी शोधून काढिली हें सर्वमान्य असून, त्याविषयीं त्यांची प्रख्याति आहे, आणि हा शोध त्यांस लागल्यामुळेंच संख्याशास्त्रामध्यें ते युनानी लोकांपेक्षां वरचढ झाले होते. अंकगणित.

सर्व प्रकरणांपेक्षां बीजगणितामध्यें ब्राम्हणांनीं पूर्वीचा लोकांमध्यें विशेष श्रेष्ठत्व संपादिलें होतें असें दिसतें. ब्रम्हगुप्त म्हणून एक ग्रंथकार सहाव्या शतकांत नांदत होता, आणि दुसरा भास्कराचार्य नामें बाराव्या शतकांत होता; त्या दोघांचा ग्रंथांवरून, या विद्येत ब्राम्हणांनीं किती शोध लाविले होते, हें आपणास समजतें. आतां या दोन्ही ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांतील उपकरणें आर्यभटाचा ग्रंथांवरून घेतलीं आहेतः- त्या ग्रंथकाराचा वेळीं ही विद्या भरांत आली होती असें दिसतें. आर्यभट, हा पांचव्या शतकाचा पूर्वी होता, असा जरी स्पष्ट पत्ता लागत नाहीं तरी इ० स० ३६० चा सुमारें डायोफाण्टस नामें जो पहिला युनानी बीजगणिती होता, तितक्याच सुमारास जवळजवळ हा असावा असें नाहीं संभवतसें नाहीं; असा कोलब्रूक साहेबाचा अभिप्राय आहे. बीजगणित.

आतां हिंदवी व युनानी यांतून कोणतें ज्योतिष पुरातन असेल तें असो; परंतु या शास्त्रास हिंदूंनीं जा उत्कृष्ट दशेस आणिलें,तिजवरून त्यांचा प्रतिस्पर्ध्यांपेक्षां ते श्रेष्ठ होते ही गोष्ट निर्विवाद आहे. अनेक अव्यक्तांचीं समीकरणें सोडविण्याची रीति, आणि निदानपक्ष एकवर्ण समीकरणांतील सर्व कुन्यें सोडविण्याची साधारण पद्धति, हीं तरी आर्यभटास माहीत होतीं. यावरून तो त्या डायोफाण्टसाहून श्रेष्ठ होता, आणि शिवाय तो व त्यापुढें झालेले जे हिंदु बीजगणिती यांणीं जे शोध लाविले होते, ते, अगदीं आमचा

---

आहे;तो ग्रंथ बहुधा पांचव्या शतकांत लिहिलेला आहे,अथवा जरी मिस्टर बेण्टलीचा अभिप्रायाप्रमाणें म्हटलें तरी अकराव्या शतकांतला आहे. वर वर्णिलेल्या सिद्धता सहाव्या शतकांतील ब्रह्मगुप्तकृत आहेत.

वेळाजवळचाच अर्वाचीन बीजगणित्यांनीं केलेल्या शोधां- जवळ येऊन ठेपतात. इतकें असून हिंदूंमधील बीजगणित- विद्या ही मूळीं आर्यभटानें शोधून काढिली असें नाहीं; कारण त्याचा वेळीं त्या शास्त्राची जी स्थिति होती, ती पु- ष्कळ काळानें घटलेली व पुनःपुनः पुष्कळ प्रयत्नांनीं शो- धून काढलेली होती असें मानण्यास चांगला आधार दिस- तो. त्याचा वेळीं, अथवा त्यामागून असल्यास पांचव्या शतकांत तरी, हिंदूंचा विद्येचा कळस झाला असावा असें दिसतें.[७]

हिंदूंचा विद्ये- चा असलपणा.

पूर्वीं जें वर्णन झालें त्यावरून, हिंदूंची पूर्वोक्त विद्या असल आहे किंवा नकल आहे, याविषयीं वा- चणारांचा मनांत कांहीं तरी विचार आला असेल. त्यांचें ज्योतिष पाहूं गेलें असतां, त्यां- त साधारण उपपत्ति नाहीं; त्या शास्त्राचे जे निरनिराळे भाग आपल्या दृष्टीस पडतात त्यांतून कांहीं चांगले सुधारलेले आ- हेत व कांहीं नाहींत अशी त्यांची विषम स्थिति आहे; त्यां- तील रीतींचा सिद्धता नाहींत; त्यांचे वेध लिहून ठेविलेले ना- हींत; ते जा यंत्रांचा उपयोग करित असत तीं ओबडधोबड

---

(७) " अक्ष + ब " यांत क्षास अशी किम्मत दे, कीं पूर्वोक्त पद हें वर्गाङ्क होईल. हें उदाहरण इ०स० ११५० त भास्कराचार्यानें केलें अ- सून, तें यूलर नामें एका फ्रेंच गणकानें अलीकडे सोडविलें, व दुसऱ्या ए- का उदाहरणाची एक चाल भास्कराचार्यानें इ०स० ११५०त काढिली होती ती इ०स० १६५७ त लार्ड ब्रौंकरानें उमगून काढिली, परंतु त्याची साधा- रण चाल इ०स०१७६७ लायाग्रं नामें फ्रेंच गणितवेत्त्यानें बसविली; अ- सें असून ती चाल पूर्वीं इसवी सनाचा सहाव्या शतकांत ब्रम्हगुप्तानें पुरी दाखविली होती. हिंदूंनीं जे शोध केले त्यांपेक्षां त्यांची गणिताची रीति सरस आहे, व हिंदूंचा बीजांत कुट्टक म्हणून जी समीकरणाची चाल आहे ती इ०स०१६२४ पर्यंत यूरोपांत माहीत नव्हती. ज्योतिषप्रकरणीं शोध व भूमितीतील सिद्धता यांत बीजाचा उपयोग करण्याची रीति यांणीं शो- धून काढिली, आणि ती साम्प्रतहि तारीफ करण्यालायक आहे. ( हा मूळ टीपेंतील मतलब आहे. भा०क० ).

असत; त्यांचे वेध बरावर केलेले नसत, आणि या शास्त्रांत जी त्यांची त्या वेळीं गति झाली त्या ठिकाणापर्यंतच त्यांचा पाय थडकून राहिला आहे; या सर्व गोष्टी पाहिल्या असतां हिंदूंनीं ज्योतिषाविषयीं सर्व माहिती परदेशीय लोकांपासून करून घेतली, असा बुद्धीचा ग्रह होण्यास हीं सबळ कारणें आहेत. परंतु या पूर्वपक्षाचा समाधानाच्या विचार करूं लागलें असतां, जेव्हां यांची ज्योतिषांत गति होऊन हे पहिला टप्पा चालून गेले होते, तेव्हां दुसरे सर्व लोक यांचाहून अधिक अज्ञानावस्थेंत होते; आणि जेव्हां हे पुढील टप्पे चालत गेले, तेव्हां यांणीं दुसऱ्यांची नकल केली असेल असा विशेष संभव असावा असें जर वाटेल, तर पाहूं जातां त्या टप्प्यांमध्यें जी चाल त्यांणीं धरिली आहे, ती असाधारण असून, तिचा पाया जा मूलतत्त्वांवर आहे, तीं प्राचीन काळचा दुसऱ्या कोणत्याहि लोकांस माहीत नव्हतीं; आणि त्यांत जा शोधांची माहिती दृष्टीस पडत्ये ती अलीकडील दोन शें वर्षांचा आंत युरोपांत झाली आहे, त्यापूर्वी तेथेंहि नव्हती. यावरून, वर सांगितलेल्या शोधांचा आधारानें जे ज्योतिषप्रकरणीं सिद्धान्त त्यांणीं केले असतील, ते त्यांणीं लोकांपासून घेतले असतील असे असूं शकणार नाहीं, हें स्वतःस्पष्टच आहे; आणि जेथें अशा शोधांचा आधार दिसण्यांत येत नाहीं, तेथें तरी, या लोकांमध्यें एवढें स्वतांचें सामर्थ्य असून, त्यांस इतरदेशीय लोकांचा साहाय्याची गरज लागलीच असेल, असा तर्क करणें हा न्याय नव्हे.

जर हिंदूंनीं दुसऱ्या लोकांपासून कांहीं माहिती घेतली असलीच, तर त्यांची ज्योतिषांत बरीच गति झाल्यावर ती घेतली असेल असें संभवतें; आणि यांचा ज्योतिषाचे जे भाग इतर लोकांचा ज्योतिषाचा भागांजवळजवळ सारखे दिसतात, तेथेंहि त्यांचें अगदीं बरोबर साम्य नाहीं; यावरून जांपासून त्यांणीं ती विद्या घेतली, त्यांचा मतांची केवळ नकल न उरतां, आपली विद्या कशी सुधारावी याविषयीं

त्यांपासून त्यांणीं सूचना मात्र घेतल्या असें विशेष संभवतें. याप्रमाणें त्यांणीं आलेक्झांड्रिया एथील युनानी लोकांपासून विद्या घेतली असावी हें असंभाव्य दिसत नाहीं. मि० कोलूब्रूकानें आपल्या स्वाभाविक विद्वत्तेनें, तारतम्यानें, व निःपक्षपातानें या विषयाची वाटाघाट केली आहे. तो असें दाखवितो कीं पांचव्या शतकांतील हिंदु ज्योतिषकारांनीं यवनांचा ज्योतिषाविषयीं लिहिलें आहे, ( व एथें यवन ह्मणून जे लोक लिहिले आहेत, ते युनानी ह्मणजे ग्रीक असावे असें मानण्यास सर्व प्रकारें आधार आहे ); आणि त्यांचा मधीलच एका ग्रंथकारानें "रोमक सिद्धान्त" नामें एक ग्रंथ लिहिला आहे, त्याचें नाव रोमक असें जे ठेविलें आहे, तें पश्चिमेकडील ( म्हणजे रोमन ) ज्योतिष्यांचा पद्धतीवरून तो सिद्धान्त रचिला हें दर्शविण्याकरितां असावें, हें शक्य आहे. याप्रमाणें वर्णन करून पुढें तो लिहितो, कीं— "या गोष्टी पाहून, आणि केन्द्रवैषम्यें व नीचोच्चप्रतिवृत्तें या उपकरणांचें जें साहित्य हिंदुज्योतिषास आहे, त्याचें पुष्कळ अंशीं युनानी ज्योतिषाशीं साम्य आहे, आणि तें साम्यहि असांकेतिक आहे असेंहि म्हणावयाजोगें नाहीं. याचा विचार करून, हिंदूंनीं युनानी लोकांपासून विद्या घेऊन तिचा साहाय्यानें आपलें अपुरें ज्योतिष नीट करून सुधारलें, असें म्हणणें जर कोणास सप्रमाण वाटत असेल, तर त्या मतास न मिळावें असा कल माझी बुद्धि घेणार नाहीं. आरबलोक या शास्त्रावर परिश्रम करूं लागले त्यापूर्वीं हिंदूंस युनानी ज्योतिषाची माहिती झाली होती, ही केवळ अटकळच नव्हे, परंतु, असें प्रमाणहि मानण्यास कांहीं आधार दिसतो."

सौर राशिचक्राविषयीं सूचना युनानी शास्त्रांतून घेऊन, हिंदूंनीं, ती आपल्या प्राचीन सत्तावीस भागांचा क्रान्तिवृत्तास लागू केली असेल, हें संभवत नाहींसें नाहीं, असा अभिप्राय कोलूब्रूक साहेबानें दुसऱ्या एका ठिकाणीं दर्शविला आहे. त्यांचें फलज्योतिष, हें त्यांणीं बहुतकरून

पश्चिमेकडील लोकांपासून घेतलें, असा त्याचा अभिप्राय आहे.(८)

जी हकीकत वर सांगण्यांत आली आहे तिजवरून असें दिसतें, कीं भूमिति व अंकगणित हीं हिंदूंनीं ग्रीकलोकांपासून घेतलीं असतील ही गोष्ट फार असंभाव्य आहे; आणि या विद्या हिंदूंचा पूर्वीं आपणामध्यें होत्या असें म्हणणारे दुसरे कोणीहि लोक राहिले नाहींत. त्यांची बीजगणिताची रीति असाधारण आहे, त्यावरून त्यांचे बीजगणितांतील शोधहि स्वतांचेच आहेत असें सर्व प्रकारें दिसतें. हिंदूंचा पूर्वीं आरबलोकांनीं बीजगणितामध्यें शोध लाविले होते, असें कित्येकांचें ह्मणणें आहे; परंतु जेव्हां हिंदुस्थानांत बीजगणितविद्या अति उत्कृष्ट स्थितीस आली होती, तेव्हां ती आरबांस माहीतहि नव्हती, आणि तीचशी काय, परंतु या गणितशास्त्रांवर परिश्रम करण्याचा मूळारंभहि झाला नव्हता. जी कांहीं विद्या हिंदूंत असून आरबांतहि होती, ती आरबांनीं प्रथम हिंदूंपासून घेतली असें मानण्यास चांगला आधार आहे; आणि जरी ते पुढें फार निपुण झाले, व त्यांणीं मोठे शोध केले, तरी त्यांस आठव्या शतकांत ग्रीक लोकांचें विद्याभाण्डार मिळाल्यावर, मग त्यांणीं त्या विषयांवर व्यासंग आरंभिला, ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे.

या विषयप्रकरणीं आणि साधारणरीत्या ब्राम्हणांचा सर्व विद्येप्रकरणीं साम्प्रतचा अति मोठ्या विद्वानांनींहि जे

---

(८) जा वर सांगितलेल्या गोष्टींत हिंदूंची गति प्राचीन काळचा दुसऱ्या लोकांहून जास्त झाली होती, त्यांशिवाय कोलब्रूक साहेबानें दोन गोष्टी सांगितल्या आहेत. एक, सम्पातांचे बिंदु मागें येतात, या गोष्टीचें ज्ञान; हें मिश्रदेशांतलि टालोमीपेक्षां यांस विशेष चांगलें होतें; दुसरी, पृथ्वीची दैनंदिन गति, हिची घाटाघाट ब्राह्मणांनीं पांचव्या शतकांत केली आहे; प्राचीन काळीं या गतीविषयीं हिराडोटसानें ग्रीसदेशांत तर्क केला होता, परंतु तो युनानी लोकांनीं टाकून दिल्यावर, कोपर्निकसाचा वेळापर्यंत ती कल्पना युरोपांत पुनः निघाली नाहीं.

निर्णय केले आहेत, ते, जा गोष्टी वस्तुतः त्यांसमोर आल्या त्यांवरून त्यांणीं मानलेले अभिप्राय आहेत; ते केवळ निश्चयात्मकच आहेत असें समजावयाचें नाहीं, आणि आम्हास संस्कृत विद्येची विशेष माहिती होऊन त्या त्या विषयांचा शेवटचा निर्णय करण्याजोगी आह्मांमध्यें योग्यता येई पर्यंत, वरील सर्व अभिप्राय वादग्रस्त आहेत असें समजलें पाहिजे.

कोणत्या देशांत विद्येचा प्रसर कसा झाला हें कळविणारा विद्येचा इतिहास पाहिला असतां, त्यावरुन त्या लोकांचा स्वभावाचें तारतम्य काढितां येतें, यामुळेंच मुख्यत्वेंकरून तो इतिहास मनोरंजक होतो; आणि अशा दृष्टीनें पाहिलें असतां, या विद्येविषयीं ब्राम्हणांमध्यें त्यांची स्वाभाविक तत्परता व कुशाग्रबुद्धि हीं आहेत; परंतु जसें इतर प्रकरणीं यांचा मध्यें दिलदारपणा व खचितपणा हे नाहींत, त्याचप्रमाणें या शास्त्रामध्येंहि नाहींत; आणि त्यांणीं सर्व गोष्टींमध्यें कल्पित कथा मिसळून जशी त्यांची माती केली आहे आणि आपल्या वर्णाचें कांहीं मानलेलें हित संपादण्याकरितां सत्याचें भस्म करुन टाकिलें आहे, त्याचप्रमाणें या शास्त्रांतहि केलें आहे.

---

# प्रकरण दुसरें.

## भूगोलविद्या.

इतर सर्व विद्यांपेक्षां या विद्येंत हिंदूंची गति फार थोडी झाली आहे.

त्यांचा भूगोलक्रमांत, पृथ्वीचा मध्यभागीं मेरु पर्वत आहे;[1] तो एक शंकाकृति उंच पर्वत आहे; त्याचा बाजू

(१) मेरु म्हणजे उत्तरध्रुव असें कोणी मानतात; परंतु तें जरी कसें असलें, तरी हिंदूंचा सर्व भूगोलक्रमांत सर्व गोष्टींचा हवाला मेरूवर असतो.

रत्नखचित आहेत, आणि त्याचा शिखरावरील प्रदेश हा जसा कांहीं भूलोकींचा स्वर्गच आहे, असें त्याचें वर्णन आहे. हिंदुस्थानाचा उत्तरेस जे पर्वत आहेत त्यांवरून ही मेरूची कल्पना या लोकांस सुचली असेल तर असो; परंतु हा पर्वत त्या पर्वतांचा सांखळींतील अथवा दुसऱ्या कोणत्याहि असणाऱ्या सांखळींतील नाहीं; तो केवळ कथाकारांचा कल्पनासृष्टींतील आहे.

त्याचा सभोंवतीं एकापलीकडे दुसरें अशीं भूमीचीं सात समकेन्द्र वर्तुलें आहेत, आणि त्यांचा मध्यें सात समुद्र आहेत.

त्यांतून अगदीं आंतील वर्तुळास जंबुद्वीप म्हणतात; त्यांत हिंदुस्थान देश आहे; व त्यासभोंवता खारा समुद्र आहे.

बाकी सहा वर्तुळांचा मध्यें दूध, द्राक्षासव, उंसाचा रस, इत्यादिकांनीं भरलेले समुद्र आहेत; हे सर्व प्रदेश अगदीं कल्पित आहेत असे दिसतात.

जंबुद्वीप हेंच हिंदुस्थान असें केव्हां केव्हां समजतात. हिंदुस्थानास केव्हां केव्हां भरतखंड असेंहि ह्मणतात.

पृथ्वीवरील देशांपैकीं हिंदुस्थान व त्याचा अगदीं जवळचे कांहीं देश एवढे मात्र पूर्वींचा हिंदूंस माहीत होते असें दिसतें.

हिंदुस्थान देशांतच पाहूं गेलें असतां, देशाचे भूगोलसंबंधीं विभाग व त्या प्रत्येक विभागांतील शहरें, पर्वत, व नद्या, यांचा अनुक्रमणिका हिंदूंचा प्राचीन ग्रंथांत आहेत. त्यांची रचना नीट केलेली नाहीं, आणि त्यांत वर्णनहि स्पष्ट नाहीं; तथापि देशाचे पुष्कळ अर्वाचीन विभाग, व त्यांतील शहरें आणि पर्वत इत्यादि त्यांचीं स्वाभाविक चिन्हें, यांचा त्या ग्रंथांत उल्लेख आहे असें ओळखतां येतें. हा हिंदुस्थानाचा आंतील वर्णनाचा विचार झाला; परंतु या देशाचा बाहेर पाहूं जातां त्या ग्रंथांत सर्वत्र अंधकार भरलेला आहे;

त्यावर अर्वाचीन भूगोलवेत्त्यांचा अतिशय अचाट तर्कांनींहि प्रकाश पाडवला नाहीं.

सिकंदर पादशाहाचा वेळचा इतिहासकर्त्यांचा ग्रंथांत जीं जाग्यांचीं नावें आलीं आहेत त्यांतून सिंधुनदाचा पश्चिमेकडील जाग्यांचीं जीं नावें आहेत, तीं त्याच स्थलांचीं जीं संस्कृत नावें आहेत त्यांशीं बहुधा मुळींच मिळत नाहींत; परंतु त्या नदाचा पूर्वेकडील ठिकाणांचीं जीं आहेत त्यांतून पुष्कळ मिळतात, ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे; आणि यावरून असें दिसतें, कीं साम्प्रतहि जसे पुष्कळ हिंदुलोक देशाटन करण्यास उत्सुक नसतात, तसेच प्राचीन कालींहि ते होते, आणि शोधक बुद्धि व चाञ्चल्य हीं जशीं हिंदूंस नाहींत, तशींच जर मनुष्यमात्रास नसतीं, तर हे लोक इतर जगापासून चिरकाळ वेगळेच राहिले असते.

सिंधुनदाचा पश्चिमेस दोहों ठिकाणीं हिंदुलोक होते हें जरी खरें आहे, तरी यावरून वरील लेखास बाध येत नाहीं; कारण त्यांतून जे लोक समुद्रकिनाऱ्यावर होते, ते आपल्या देशांतून राज्यक्रान्तीनें घालविले गेल्यामुळें जें जवळचें ठिकाण त्यांस सांपडलें तेथें जाऊन राहिले होते असें संभवतें. ( पुरवणी अंक ३ रा पाहू ). दुसरे जे हिंदु उत्तरेकडील पर्वतांत होते, त्यांचा इतिहासाची अटकळ करवत नाहीं; परंतु सिकंदर बादशाहाचा वेळीं जरी या दोन्ही लोकांचा हिंदुस्थानाशीं संबंध तुटला होता, आणि तेथील लोकांचा व यांचा मध्यें पुष्कळ तफावती पडल्या होत्या, तरी यांणीं इतर देशचा लोकांशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध केला होता, अथवा ते आपल्या हद्दी सोडून कोठें बाहेर गेलेले आढळले होते असें दिसत नाहीं.

साम्प्रत, कित्येक बैरागी क्यास्पीयन्‌समुद्राचा कांठीं बाकू म्हणून एक पवित्र अग्निस्थान आहे, तेथें केव्हां केव्हां जातात, व केव्हां आस्त्राखानास जातात; आणि मास्को शहरापर्यंतहि त्यांचा पल्ला झाल्याची माहिती लागत्ये.

त्यांशिवाय सिंधुनदाजवळील शिकारपूर शहराहून एका जातीचे हिंदु, इराण, तुर्कस्तान, व रुसांचा राज्याचा दक्षिणभाग, यांतील शहरें यांमध्यें व्यापाराचा व सराफीचा पेढ्या घालतात; परंतु या दोन्ही प्रकारचा लोकांतून कोणामध्येंहि साधारण शोधकबुद्धि नसत्ये, आणि हे आपल्या देशबान्धवांस बहुधा कांहीं तिकडील वर्तमान कळवित नाहींत. त्यांचा प्राचीन ग्रंथांतून शेजारचा देशांतील लोकांचेंहि वर्णन बहुधा नाहीं. त्यांस ग्रीकलोक माहीत होते व त्यांस हे यवन असें म्हणत; आणि पुढें जा लोकांनीं वायव्येकडून येऊन हा देश घेतला त्यांसहि यांणीं तेंच नाव दिलें. या लोकांस सिथियन् लोक हे माहीत होते व त्यांस हे शक असें म्हणत असत, असें मानण्यास चांगला आधार आहे; परंतु ग्रीक व सिथियन् हे दोन्ही लोक हिंदुस्थानांत आल्यावरून हिंदूंस माहीत झाले, त्यांचे मूळ देश हिंदूंस माहीत नव्हते. कोलब्रूक साहेबानें एका ग्रंथकाराचा ग्रंथांतून कांहीं वेंचे घेतले आहेत; तो ग्रंथकार ख्रिस्ती शकाचा सातव्या किंवा आठव्या शतकांतील आहे. तो म्हणतो कीं रानट भाषांस, पारसीक, यावन, रौमक, आणि बर्बर, असें ह्मणतात. यांतून पहिलीं तीन नावें फारसी, ग्रीक, व लाटिन यांचीं अशीं दिसतात: रोमन लोक हिंदूंस माहीत होते याविषयीं अति स्पष्ट निर्देश असा वर सांगितलेला हा मात्र माझा पाहण्यांत आहे.

जेव्हां लंकेस सूर्योदय होतो, तेव्हां रोमक नामें पश्चिमेकडील देशांत मध्यरात्र होत्ये, असें जा देशाविषयीं वर्णन आहे तें कदाचित् रोमशहर असेल. ‘ सिद्धान्तशिरोमणी ’ नामें ग्रंथाचें एक भाषान्तर आहे; त्यांत रोमक हा शब्द आहे;

(२) रोमक म्हणजे रोम असेंहि कर्नेल् विल्फोर्ड याणें लिहिलें आहे; परंतु इटाली देश व रोमशहर, हीं अद्यापि पूर्वेकडील देशांत अगदीं माहीत नाहींत. इराणांत देखील रूम म्हणजे एशिया मैनर, असें समजतात; आणि कुन्स्तन्तुनिया एथें तुर्की सुल्तानांची गादी होईपर्यंत, ‘रूमचा पादशाह,’ म्हणजे, ‘ कुन्स्तन्तुनियाचा पादशाह ’ असें समजत असत.

तेव्हां ब्राम्हणांचें मुसलमानांशीं विशेष संघटण पडण्यापूर्वीं, तो शब्द त्यांस माहीत होता असें दिसतें.[१] चीनदेशाविषयीं त्यांस खचित माहिती होती. इसवी सनाचा चौथ्या शतकांत एका चिनी गृहस्थानें हिंदुस्थानांत पर्यटण केलें, त्याचें वृत्त उपलब्ध आहे; आणि इसवी सनाचा दुसऱ्या व पुढील शतकांत मगध देशचा राजांकडून चीनचा पादशाहांकडे वकालती जात असत असें चिनी ग्रंथकार सांगतात. चीन म्हणून एका लोकांविषयीं मनूंत उल्लेख आहे, परंतु हिंदुस्थानाचा वायव्येकडील लोकांत त्यांस धरिलें आहे; आणि चीनदेशाचें चीन म्हणून जें नाव पडलें तें मनूनन्तर पुष्कळ काळ गेल्यावर पडलें आहे.

मिश्रदेशांतून ग्रीक व रोमन नावाडी हे शेंकडों वर्षे (हिंदुस्थानाशीं) व्यापार करित असत, त्यामुळें तो देश हिंदूंस माहीत व्हावा अशी अटकळ कदाचित् आपल्या मनांत येईल; परंतु कर्नल् विल्फोर्ड याणें जे पाण्डित्याचे व युक्तीचे सिद्धान्त काढिले आहेत त्यांवर जर विश्वास ठेविला, तर मात्र मिश्रदेश हिंदूंस माहीत होता असें म्हणतां येईल, नाहीं तर संस्कृताचा आधारावरून जे कांहीं भूगोलविषयक निबंध झाले आहेत, त्यांत तशी माहिती असल्याचें कांहीं चिन्ह दिसत नाहीं.

---

# प्रकरण तिसरें.

## कालगणनविद्या.

कालगणनाकरितां जे कल्पादि मोठे मोठे विभाग

---

(१) सिद्धान्तशिरोमणि, या ग्रंथाचा कर्ता भास्कराचार्य हा, मुसलमान हिंदुस्थानांत आल्यावर झाला; यावरून वरील सिद्धान्तांतील प्रतिज्ञा बराबर नाहीं हें उघड आहे. भा० क०.

हिंदूंनीं योजिले आहेत त्यांची वाटाघाट करण्या-सहि बहुधा कारण नाहीं; कारण जरी त्यांचा पाया ज्योतिषसंबंधीं मतिज्ञांवर आहे, तरी ते केवळ पुराणांतील आहेत, आणि युरोपीयन विद्वानांनीं जितकें लक्ष त्यांवर दिलें आहे, तितकी त्यांची योग्यता नाहीं.

पौराणिक काळचक्रें.

कक्षापात व नीचोच्चवृत्तें यांची मदक्षिणा होऊन तीं पूर्वस्थितीस येण्यास ४,३२,००,००,००० वर्षें लागतात अशी हिंदूंची कल्पना आहे,व इतकीं वर्षें मिळून एक कल्प ह्मणजे ब्रह्याचा दिवस होतो. त्यांत १४ मन्वन्तरें असतात; त्यांतून प्रत्येक मन्वन्तरांत जगांतील सत्ता एकेका मनूचा हातांत असत्ये. प्रत्येक मन्वन्तरांत सत्तावीस महायुगें असतात, आणि प्रत्येक महायुगांत चार युगें असतात. त्या चार युगांतील काळ एकसारखा नाहीं. या चार युगांसारिखीं युनानी लोकांत सोनेरी, रुपेरी, पितळी, व लोखंडी अशीं युगें होतीं.

वरील भागांत जो शेवटचा चार युगांचा भाग सांगितला त्याचा मात्र मनुष्यमात्राचा व्यवहाराशीं कांहीं संबंध आहे. त्यांतून पहिलें सत्ययुग, त्याची मर्यादा १७,२८,००० वर्षें आहे; दुसरें त्रेतायुग, त्याची १२,९६,००० वर्षें आहे; तिसरें द्वापारयुग, त्याची ८,६४,००० वर्षें आहे; आणि शेवटचें कलियुग, त्याची मर्यादा ४,३२,००० वर्षें आहे. साम्प्रत कलियुग चालत आहे; त्यांतून जें मन्वन्तर हल्लीं चालू आहे त्याचीं ४९४१ वर्षें गेलीं आहेत, आणि बहुतेक इतिहासांतील वर्तमानें या वेळांत झालीं आहेत असें ह्मणतात. कांहीं गोष्टी याहि पूर्वीं झाल्या असें त्या लोकांचें ह्मणणें आहे; परंतु साम्प्रतचाहून विशेष भरवसा ठेवण्याजोग्या मर्यादांत जर त्या गोष्टी आणिल्या, तर मात्र त्यांचें कालमान बसविण्याचा यत्न करितां येईल.[1]

(१) वास्तविक पाहूं जातां मनुस्मृति ही, ख्रिस्तापूर्वीं ९०० वर्षांचा अलीकडे लिहिलेली आहे, परंतु या ग्रंथाचा काळाचा निश्चय करण्यास हिंदु कालगणनकर्ते चारी युगें सोडून सुमारें सात मन्वन्तरें मागें जातात,

प्राचीन गोष्टींचा काळाचा निर्णय करण्याची अशक्यता.

या कारणास्तव, युगें, कल्प, व मन्वन्तर, हीं सोडून देऊन, हिंदूंनींच जे दुसरे मार्ग आपणास दाखवून दिले आहेत त्यांवरून त्यांचें कालगणनशास्त्र निश्चित केलें पाहिजे.

ख्रिस्तापूर्वी सुमारें चौदा शतकें होतील तेव्हां वेदांची रचना बहुधा झाली, असें पूर्वींच प्रतिपादित आहे; परंतु त्या वेळीं इतिहाससंबंधीं अमुक गोष्टी घडून आल्या असा निश्चय करवत नाहीं. पराशर नामें जो ज्योतिषी होता, तो कदाचित् इसवी सनापूर्वी चौदाव्या शतकांत नांदत असेल; आणि त्याशीं व त्याचा पुत्र व्यास, जाणें वेद रचिले, त्याशीं कित्येक पौराणिक व इतिहासांतील पुरुषांचा संबंध वर्णिलेला आहे; परंतु जे पुरुष या दोघांचाहि बराबरचा काळांत होते, ते परस्परांपासून फार दूरचा काळीं पुनः नांदत होते असें त्यांचा ग्रंथांत दृष्टीस पडतें; आणि सर्व ऋष्यादि पवित्र पुरुषांचा आयुष्याचें जें अद्वातद्वा मान वर्णिलें आहे, तें एका गोष्टीचाहि काल निश्चित करण्यास उपयोगीं पडत नाहीं.

सूर्यचन्द्रवंश.

पुराणांत अशी कथा आहे कीं सूर्यवंशाचे राजे अयोध्येस व चन्द्रवंशाचे गंगा व यमुना यांचा मधील प्रदेशांत राज्य करित असतः या दोन वंशांतून प्राचीन हिंदुस्थानांतील सर्व राजवंशाची उत्पत्ति झाली आहे. या दोन वंशांतील पुरुषांचा वंशावळ्या पुराणांत दिलेल्या आहेत; त्या वंशावळ्या हिंदूंचा कालगणनाचा

---

तो एकंदर काळ ६ × ७१ × ४३,२०,००० इतक्या वर्षांहूनहि अधिक होतो. इसवी सनाचा पांचव्या शतकांत लिहिलेला सूर्यसिद्धान्त म्हणून एक ग्रंथ आहे, तो वर सांगितलेल्या ग्रंथाहून अर्वाचीन आहे. त्याविषयीं अशी कथा आहे, कीं तो सत्ययुगांत ईश्वरानें सांगितला, म्हणून २०,००,००० पासून ३०,००,००० वर्षांचा तो जुना आहे, असें म्हणतात.

राम हा वास्तविक इतिहासांतील पुरुष दिसतो, परंतु तो १०,००,००० वर्षांपूर्वी कृतयुगाचा शेवटीं झाला असें वर्णन आहे.

निश्चय करण्यास दुसरा आधार आहेत, अशी कांहींशी आशा लागत्ये. सर् विलियम् जोन्स याचा गणतीप्रमाणें ख्रिस्तापूर्वी ३५०० वर्षांपर्यंत या वंशावळ्या पोंचतात; परंतु पाहूं गेलें असतां त्या वंशावळ्याच इतक्या विलग दिसतात कीं एकीवरहि भरवसा ठेववत नाहीं. त्या दोन्ही वंशांचीं मूळपुरुषें समकालीन असून, बहिणभावण्डें होतीं; असें असतां जितक्या वेळांत चन्द्रवंशाचे ४८ पुरुष झाले, तितक्याच काळांत सूर्यवंशाचे ९५ झाले; आणि कृष्ण हा रामानंतर पुष्कळ काळानें झाला असें पुराणें सांगतात, असें असून तो चन्द्रवंशांतील ५० वा पुरुष आहे, आणि राम हा सूर्यवंशांतील ६३ वा आहे.

या वंशावळ्यांची एकवाक्यता करण्यास लोकांनीं जे सर्व प्रयत्न केले आहेत, त्यांहींकरून त्यांतील फारफेर अधिकच झाले आहेत; आणि पुराणांत जेथें त्या वंशावळ्या दिल्या आहेत त्यांबराबर जोडलेल्या जा कथा आहेत, त्यांत कांहीं युक्ति नसून पोरकटपणा आहे, तेणेंकरून त्यांवर अधिकच अविश्वास होतो. जा राजांचीं नावें सांगितलीं आहेत, त्यांतून पुष्कळांनीं राज्य केलें असेल, आणि कांहीं कथांत वास्तविक इतिहासांतील गोष्टींविषयींहि सूचना असेल, परंतु कृष्ण राजा व महाभारतीय युद्ध, यांपर्यंत पूर्वोक्त राजांवरून व कथांवरून काळगणनाचा क्रम बांधण्यास अति अल्पहि आधार मिळत नाहीं.

हिंदुस्थानाचा निरनिराळ्या भागांतील महाभारतानंतरचा राजांचा पुष्कळ वंशावळ्या आहेत; त्या वेगळ्या वेगळ्या पाहिल्या असतां संभाव्य दिसतात; आणि कित्येक ठिकाणीं त्यांस बाहेरील पुराव्याचेंहि पाठबळ मिळतें, व त्याहून पुष्कळ जागीं धर्मसंबंधी लेख, व भूमिदानपत्रें यांणीं त्यांचा खरेपणा शाबीद झाला आहे, अथवा उदाहरणांनीं स्पष्टतर झाला आहे. त्यांतून भूमिदानाविषयीं जे लेख आहेत, ते दगडांवर खोदलेले अथवा ताम्रपटांवर कोरलेले आहेत;

त्यांपैकीं ताम्रपट हे साधारण असून बहुतकरून सुरक्षित आहेत. त्यांत मोठ्या तजविजीनें व बारकाईनें तारखा लिहिल्या असून दान देणाऱ्या राजांचा कांहीं पूर्वजांचीं नावेंहि लिहिलेलीं आहेत. जर पाहिजेत तितके ताम्रपट सांपडतील, तर त्यांवरून कदाचित् कित्येक राजांचा सगळ्यांचा सगळ्याच वंशावळ्या मुकरर करितां येतील; परंतु साम्प्रत जे सांपडले आहेत ते विसंगत तुकडे आहेतः ते एकदेशी इतिहासांत उपयोगीं पडतात, परंतु साधारण कालगणनास त्यांपासून विशेष साहाय्य होत नाहीं.

मगधदेशचे राजे.

महाभारतीय युद्धापासून इसवी सनाचा पांचव्या शतकापर्यंत मगध वंशाचा राजांची हार मात्र एकसारखी लागलेली आहे, व तिला निश्चित करण्यास बऱ्याच ठिकाणी स्पष्ट प्रमाणें मिळतात; यामुळें वरील अवधींतील मुख्य काळांचा जवळ जवळ निर्णय करण्यास सांपडतो.

महाभारतीय युद्ध संपलें तेव्हां सहदेव राजा मगध देशांत राज्य करित होता. त्यापासून पस्तिसावा पुरुष अजातशत्रुः त्याचा कारकीर्दींत बौद्धधर्माचा स्थापक शाक्यसिंह म्हणजे गौतम हा नांदत होता. आतां शाक्यसिंह हा इसवी सनापूर्वीं ५५० वर्षांचा सुमारें मरण पावला याविषयीं फारसा संशय नाहीं.[२] यास्तव अजातशत्रूचा काळ निश्चित करण्यास हिंदुस्थानाबाहेर लिहिलेलीं ब्रम्ही, सिंगाली, शियामी, व दुसरीं बौद्ध आख्यानें साक्षीभूत आहेत.

अजातशत्रु ( हा सुद्धां आंत मोजून त्या ) पासून सहावा पुरुष नन्दः त्याचा सन मुकरर झाला म्हणजे दुसऱ्या पुष्कळांचे होतात. नन्दापासून नववा चन्द्रगुप्त; आणि त्यापासून तिसरा अशोकः हा राजा बौद्धधर्माचा मोठा उत्सुक भक्त व वृद्धि करणारा होता, अशी सर्व देशांतील बौद्ध त्याची कीर्ति गातात.

(२) पृष्ठ २०४ पाहू.

या शेवटील दोन राजांचा कालावरून **हिंदुस्थान** व **युरोप** एथील कालगणनांचा संबंध जुळवितां येतो; आणि **हिंदूं**चा इतिहासाचा कालमर्यादा फार स्थूल मानानें ठरावितां येतात, सूक्ष्मतेनें ठरवितां येत नाहींत.

बहुधा **कृष्णाचें** महत्व वाढविण्याकरितां, अथवा दुसऱ्या कांहीं उद्देशानें, **महाभारतीय युद्ध** व **कृष्णाचें मरण** हीं दोन्हीं **कलियुगाचा** आरंभीं झालीं असें **हिंदु** ग्रंथकारांनीं वर्णिलें आहे; आणि जरी एका एतद्देशीय ग्रंथकारानें हें मत उघडपणें नाकबूल केलें आहे, आणि दुसऱ्या कित्येकांनीं आपआपल्या ग्रंथांत जा गोष्टी लिहिल्या आहेत त्यांणीं या मताचा निषेध पर्यायानें केला आहे, तरीहि तें साम्मत निर्विवाद मानितात.

जेव्हां या कालाचा निर्णय करण्याकरितां, **सरविलियम् जोन्स** हा पुराणांतील राजांचा वंशावळ्यांचा उपयोग करित होता, तेव्हां जा **सान्द्रकाटस्** (ह्मणजे **सान्द्रकापूटस्**) राजानें **सेल्युकसा**[3]बराबर तह केला होता असें **युरोपीयन** ग्रंथकारांनीं वर्णिलें आहे, त्याचा नावांचें व **चन्द्रगुप्त** या नावाचें साम्य पाहून तो चकित झाला: पुढें त्याविषयीं विशेष सूक्ष्म शोध केल्यावर त्या दोघांचा इतिहासांमध्यें पुष्कळ साम्य आहे असें त्याचा नजरेस आलें. मग जो **सेल्युकसाचा काळ** तोच **चन्द्रगुप्ताचा** असें कल्पून, त्या आधारानें **चन्द्रगुप्तापूर्वींचा** गोष्टींचा शकांस रूपान्तर देऊन, त्या गोष्टी **इंग्रेजलोकांचा** बुद्धीस विशेष ग्राह्य व्हाव्या अशा स्थितीस त्याणें त्यांस आणिलें. ही कल्पना सिद्ध करण्याविषयीं जीं प्रमाणें आहेत तीं **प्रोफेसर विल्सन्** याणें पूर्णतेनें व सरळ रीतीनें सांगितलीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:— **सान्द्रकापूटस्** व **चन्द्रगुप्त** या नावांचें साम्य आहे, व **डैडोरस** (नामें **युनानी** ग्रंथकार) **सान्द्रकाटस्** यास **क्सन्द्रमस्** असें म्हणतो.

चन्द्रगुप्त व सेल्युकस समकालीन होते.

(३) हा सिकंदर पादशाहाचा एक सरदार होता. भा० क०.

त्या नावाचें व चन्द्रमस् म्हणून जें नाव हिंदु ग्रंथकारांनीं त्यास प्रसंगवशात् दिलें आहे, त्याचें साम्य आहे; तो नीच कुलांत जन्मला, व त्यास हक्क नसतां त्याणें राज्य बळकाविलें, या गोष्टी युनानी व हिंदु कथांस सामान्यच आहेत; त्याचा दरबारांत मेगासूथनीस नामें वकील होता, त्याणें त्याचें राज्य कोणत्या स्थलीं होतें याविषयीं लिहिलें आहे, तें स्थल मिळतें; त्याचा रयतेस युनानी लोक प्रास्यै म्हणत; हा शब्द प्राच्य या शब्दाशीं जुळतो, आणि जा ठिकाणीं मगधदेश आहे, त्या स्थानास हिंदु भूगोलवेत्ते प्राच्य म्हणतात; आणि शेवटील साम्य हें कीं, त्याचा राजधानीस युनानी लोक पालिबोथ्रा म्हणतात, व हिंदु हे चन्द्रगुप्ताचीस पाटलीपुत्र म्हणतात. पुढें ब्राम्हणांचाच ग्रथांतून दुसरे आधार मिळाल्यावरून चन्द्रगुप्ताचा काळ विशेष सूक्ष्मतेनें ठरावितां आला: तो ख्रिस्तापूर्वी ३५० वर्षे असा विल्फोर्डसाहेबानें ठरविला, व ख्रिस्तापूर्वी ३१५ वर्षे असा विल्सन् साहेबानें ठराविला; आणि आवा व सिंहलद्वीप एथून जे बौद्धांचे कालगणनाचे कोष्टक आणिले, तेंहि वरील ग्रंथकारांचा सिद्धान्तांस अकल्पित मिळाले. त्यांतून आवा एथील लेखांत इ० स० पूर्वी ३९२ तागाईत ३७६ इतकी त्याची कारकीर्द असें सांगितलें आहे; आणि दुसऱ्या देशांतील महावंसो नामें ग्रंथांत इ० स० पूर्वी ३८१ पासून ३४७ पर्यंत असें आहे; असें असून इ० स०पूर्वी ३१२ वर्षांवर सेल्यूकस जन्मला, व २८० व्या वर्षी मरण पावला, एवढ्या काळांत चन्द्रगुप्त राज्य करित होता, असें ग्रीक लोक ह्मणतात. यावरून पाहतां ग्रीक व बौद्ध यांचा काळांत ३०।४० वर्षांची तफावत आहे, ती बौद्धांचा उपाध्यायांनीं समजूनउमजून ठेविली आहे, असें मिस्टर टर्नेर याचें म्हणणें आहे; साधारणरीत्या बौद्धांचा कालगणनामध्यें ब्राम्हणांचा कालगणनासारिखा बाष्कळपणा नाहीं; परंतु त्यांचा धर्मसंबंधीं दन्तकथांत या राजाचा जो काल कल्पिला

आहे, तो व त्यांचा इतिहासांतील काल, हे जुळविण्याकरितां त्यांणीं या ठिकाणीं लोभास गुंतून लाग्रवर्दी केली आहे. वर सांगितलेल्या हकीकतींमध्यें विरोध असून जरी आणखी दुसरें प्रमाण न मिळतें, तरी एवढया लिहिण्यावरूनच चन्द्रगुप्त व सान्द्रकाटस् हीं एकाच पुरुषाचीं नावें आहेत असा आपल्या मनावर दृढ ग्रह राहिला असता; परंतु वर सांगितलेल्यांशिवाय दुसरा एक शोध लागला आहे तेणेंकरून हिंदूंचा इतिहासाचा दुसऱ्या अंधक भागांवर कांहीं प्रकाश पडेल अशी उमेद आहे. त्या शोधाचा प्रकारः— हिंदुस्थानाचा निरनिराळ्या भागांत पुष्कळ गुहा आहेत, त्यांमध्यें व कोठें अन्यत्र दगडांवर, व स्तंभांवर असे खोदलेले लेख आहेत, परंतु ते ज्या भाषेंत आहेत तिचा अर्थ सांगण्यास कोणी युरोपीयन अथवा एतद्देशीय गृहस्थ समर्थ झाला नव्हताः जसे मिश्र देशांतील साङ्केतिक लेख पाहून लोक आशाभरित होऊन फसतात, तसे जे जे हे लेख पाहत, ते ते या मृगजलाचा मार्गे लागत असत; जसे दुसरे अभ्यास करित होते, त्यांप्रमाणें भिस्तर प्रिन्सेप हा या लेखांचा अभ्यास फार दिवस करित होता, परंतु त्यालाहि त्यांचा अर्थप्रदेशांत जाण्यास द्वार मिळालें नव्हतें. शेवटीं त्याचा नजरेस असें आलें, कीं अमुक देवालयांतून जे लेख येतात, ते तोकडे व तुटक असतात. ही गोष्ट लक्षांत आणून आणि अर्वाचीन बौद्धांचा जो एक सम्प्रदाय आहे तो त्यास माहीत होता त्यावरून, त्याणें असें अनुमान केलें, कीं एकएका लेखांत एकेका भक्तानें दिलेल्या दानाविषयीं बहुधा लिहिलेलें असावें. जेव्हां त्याणें ही मार्मिक कल्पना काढिली, तेव्हां दुसरें असेंहि त्याचा दृष्टीस पडलें कीं, सर्व लेखांचीं शेवटचीं दोन अक्षरें एकसारखींच आहेत; या कल्पनेमागून त्याणें दुसरी अशी कल्पना केली, कीं हीं दोन अक्षरें द आणि न असावीं, कारण संस्कृतांत देण्याचा वाचक शब्द जो 'दान' त्याचीं हीं मूलाक्षरें

अशोक व आण्टिओकस यांचें समकालीनत्व.

होत. त्याचप्रमाणें दुसरें एक अक्षर वारंवार येत असे, तें संस्कृतांतील षष्ठीप्रत्ययवाचक अक्षर 'स' असावें असें त्यास वाटलें; आणि याप्रमाणें आरंभास ठिकाण मिळाल्यावर त्याणें थोडक्याच वेळांत एक लीपि तयार केली. नंतर तिचा साहाय्यानें पाहूं लागतां, त्या लेखांची भाषा संस्कृत नाहीं, जा पाली भाषेंत बौद्धांचीं पवित्र पुस्तकें लिहिलेलीं आहेत, ती आहे, असें त्याचा नजरेस आलें. मग जे लेख लागले नव्हते ते या शोधांचा साहाय्यानें त्याणें वाचण्यास आरंभ केला, आणि हिंदु शिक्यांचा एका विवक्षित मालिकेवरील राजांचीं नावें वाचिलीं. एका मुद्रेचा एका बाजूस आगाथाक्लिस व पाण्टलिअन् यांचीं नावें युनानी भाषेंत असून, दुसऱ्या बाजूस तींच नावें पूर्वोक्त नवीन सांपडलेल्या पाली भाषेंत होतीं. हें पाहून त्याणें जो सदरील लिपीविषयीं पूर्वोक्त तर्क बांधिला होता, तो खरा झाला, असें पाहून त्यास आनंद झाला: ही मुद्रेवरील लेखांची गोष्ट बोन[क] एथील लासनाचार्यानें त्याच वेळीं शोधून काढिली होती.

दिल्ली एथें फिरुझशाहाचा स्तंभ आहे, त्यावर एक लेख आहे, तो कशाचा आहे हें जाणण्यास पुष्कळ विद्वान् फार दिवस उत्सुक झाले होते. तो लेख व गंगेचा तळवटांतील प्रदेशांतील दुसऱ्या तीन स्तंभांवरील लेख, या नव्या लिपीचा साहाय्यानें वाचण्यास त्यास कांहीं अडचण पडली नाहीं. त्या सर्व स्तंभांवरील लेखांत अशोक राजाचे हुकूम होते, आणि तो दुसरे लेख पाहूं लागला तेव्हां त्यास त्याच राजाचे तसेच दोन हुकूम दोन लेखांत सांपडले. त्यांतून एक डाक्तर स्टीवेन्सन् साहेबानें शोधून काढिला; तो काठेवाडांत गिर्नार नामें पर्वत हें एक बौद्धांचें पवित्र स्थान आहे, त्यावर एका शिळेवर कोरलेला आहे; आणि दुसरा लेफ्टेनेंट किटो याणें शोधून काढिला, तो हिंदुस्थानाचा पूर्वेकडील

(क) जर्मनींतील एक शहर आहे. भा० क०

किनाऱ्यावर कटकप्रान्तांत धवली एथें एका शिळेवर आहे. यांतून एकांत ११, व दुसऱ्यांत १४ हुकूम आहेत; पूर्वोक्त स्तंभांवरील सर्व लेख या दोन्ही शिळांवर होते; आणि त्या दोहों शिळांवरील लेखांतील १० हुकूम दोहोंवर एकसारखेच होते. त्यांतून एक हुकूम दोहोंवरहि होता; त्यांत, खुद्द अशोकाचा देशांत, व श्रद्धावान् लोक राहत असतील अशा दुसऱ्याहि देशांत, दवाखाने घालावे व दुसरे धर्मादाय चालू करावे असें लिहिलें होतें. पूर्वोक्त श्रद्धावान् लोकांचा वसाहतीचे असे ४ देश तेथें सांगितले आहेत, आणि "तंबपाणी ( म्हणजे सिंहलद्वीप ) पर्यंतहि" आणि "आण्टियोको यवन याचा राज्यांत, जेथें त्या आण्टियोकसाचे सरदार राज्य करित आहेत तेथें, विशेषेंकरून" असें लिहिलें आहे.

त्यांहून पुढील एक लेख एका खडपावर आहे; तो विच्छिन्न झाला आहे, आणि तो पुर्ता वाचतां आलेला नाहीं; परंतु अशोकाचा मतांचा ( व त्यांतहि मुख्यत्वेंकरून हिंसा करूंनये या मताचा ) प्रसर झाला म्हणून आनंद दर्शविण्याकरितां तो लिहिला आहे असें दिसतें. " आणि शिवाय तो युनानी राजा जाणें तुरमायो, गंगकेन, आणि मग, या„ चप्र ( ? ) राजांस, " असा लेखाचा तुकडा पूर्वोक्त हुकुमांत आहे.

पूर्वोक्त तीन नावांतून दोन नावें टालेमायोस् आणि मेगस् यांचीं आहेत असें मिस्टर प्रिन्सेप् याचें म्हणणें आहे, आणि हीं नावें त्या लेखांत आलीं आहेत यावरून अशोकास मिश्रदेशाची माहिती होती, व त्या देशाशीं त्याचा व्यवहार असे, असें त्याचें मत आहे; आणि आपण कांहीं आक्षेप न घेतां तें मत कबूल केलें तरी चिंता नाहीं. कारण टालमीवंशाचा पहिल्या पुरुषांचा कारकीर्दींत मिश्री लोकांचा व्यापार हिंदुस्थानाशीं होता, ही गोष्ट इतिहासांत प्रसिद्ध आहे. टालेमी फिलाडेल्फस् याचा भाऊ मेगस् नामें होता, व त्या

मेगसाचें लग्न पहिल्या आण्टियोकसाचा मुलीशीं झालें होतें; वर सांगितलेला जो टालमी, तो हा, असें प्रिन्सेप् साहेबाचें मत आहे; आणि तो असें स्थापूं पाहतो, कीं पूर्वोक्त लेखांत सांगितलेला जो आण्टियोकस्, तो पहिला किंवा दुसरा आण्टियोकस् असावा; म्हणजे तो सेल्यूकसाचा मुलगा अथवा नातू असावा.

चन्द्रगुप्त आणि सेल्यूकसाचा मागून लागल्याच झालेल्या राजांपैकीं एक पुरुष, हे एककालिक होते, ही गोष्ट पाहिली असतां त्यांचे पूर्वज ( अशोक व सेल्यूकस् हे) समकालिक होते याविषयीं कांहीं संशय राहत नाहीं; आणि असें झाल्यामुळें हिंदूंचा कालगणनांत एक स्थल निश्चित होऊन, त्या पूर्वींचा गोष्टींचा तारखांचा हवाला खातरीनें देतां येतो.

नन्दाचा कारकीर्दीचा काळ.

आतां प्रथम नन्दाचा काळ ठराविणें आहे. चन्द्रगुप्त व नन्द यांचा मध्यें आठ पुरुष होते; परंतु ते एकाच परंपरेचे होते, किंवा शाखासंबंधीहि होते हें माहीत नाहीं. आतां ते व नन्द मिळून नऊ पुरुषांनीं सगळें १०० वर्षें राज्य केलें, असें चार पुराणांचें एकसारखें मत आहे; याजकरितां नन्द हा, चन्द्रगुप्तापूर्वीं १०० वर्षें व ख्रिस्तापूर्वीं ४०० वर्षें, गादीवर आला, असा तर्क केला असतां चिंता नाहीं.

बुद्धाचा मरणाची मिति.

नन्दासुद्धां मोजल्यास त्याचा पूर्वींचा सहावा पुरुष अजातशत्रुः त्याचा कारकीर्दींत शाक्यसिंह मरण पावला. तो ख्रिस्तापूर्वीं ५५० वर्षांचा सुमारें मेला असें, हिंदूंचा ग्रंथांतील आधार टाकून इतर आधारावरून, पूर्वीं दाखविण्यांत आलें आहे; आणि ५५० व ४०० यांचा मध्यें पांच कारकीर्दी झाल्या, तेव्हां दर कारकीर्दीस सरासरी ३० वर्षें मात्र बसतात, त्यावरून पूर्वोक्त शकांमध्यें असंगत अंतर आहे असें नाहीं.

महाभारतीय युद्धापासून नन्दराजापर्यंत तीन वंश

महाभारतीय युद्धाचा कालाचा अजमास.

झाले; त्यांतून प्रत्येकाचें राज्य किती वर्षें चाललें त्याविषयीं चार पुराणांत वर्णन आहे. त्या सर्वांची सरासरी १५०० वर्षें आहे, परंतु त्या ग्रंथकारांनीं जा राजावळ्या लिहिल्या आहेत त्यांतून अति मोठींत सगळीं ४७ राजांचीं नावें आहेत. असें असून त्याच चारहि पुराणांत दुसऱ्या ठिकाणीं अगदीं निराळी वर्षसंख्या सांगितली आहे, व तिजविषयींहि तसाच धडा दिला आहे. नन्दापासून महाभारतीय युद्धापर्यंत १०१५ वर्षें होतात असें एका पुराणांत आहे; १०५० वर्षें, असें दुसऱ्या दोहोंत आहे; आणि १११५ वर्षें, असें चौथ्यांत आहे. आतां यांतून लघुतम काल घेऊन ४७ नीं भागिला असतां, एकेका राजाची कारकीर्द एकवीस वर्षांवर येत्ये; असें असून, तींच जर १५०० वर्षें कल्पिलीं, तर प्रत्येक कारकीर्द ३१ वर्षांची असली पाहिजे. परंतु याप्रमाणें ४७ कारकीर्दींमध्यें एकेका राजाचें राज्य इतका काळ चाललें असेल, हें इतकें असंभाव्य आहे, कीं महाभारतीय युद्धाचा काळाविषयीं पुराणांचा आधारावरून जो निर्णय करावयाचा त्यांत वर सांगितलेल्या तीन कालांचें मध्यप्रमाण धरून, ती लढाई, नन्दापूर्वीं १०५० वर्षांवर व ख्रिस्तापूर्वीं १४५० वर्षांवर, समाप्त झाली, असें ठरविण्यास आपण आवाङ्मा करणार नाहीं. हिंदूंचें मत असें आहे, कीं वेदांची जी साम्प्रतची रचना आहे, ती महाभारतीय युद्ध चालत असतां झाली; यावरून म्हटलें तर, तें युद्ध ख्रिस्तापूर्वीं चौदाव्या शतकांत, म्हणजे पुराणांनीं सांगितल्यापासून पन्नास वर्षें अलीकडे, झालें असावें. पूर्वीचापेक्षां हा बदललेला काल विशेष ग्राह्य आहे, कारण तो घेतला असतां नन्दाचा व या लढाईचा मधील राजांचा कारकीर्दी तेवढ्या मोठ्या धराव्या लागणार नाहींत. परंतु जरी नन्दापूर्वीं १५०० वर्षांवर पूर्वोक्त लढाई झाली असें धरिलें, तरी, कलियुगाचा आरंभापासून अथवा जलप्रलयापासून महाभारतीय युद्धापर्यंत, पुष्कळ काल राहतो; तेवढ्यांत

हिंदूंचा इतिहासांतील जा पूर्वींचा थोड्या गोष्टी आहेत त्यांचा समावेश करितां येईल. कलियुगारंभ व जलप्रलय हीं बहुधा जवळ जवळच झालीं असें ह्मणण्यास पुष्कळ मतांचें प्रमाण आहे; तसें धरिल्यास त्या कालापासून महाभारतीय युध्दापर्यंत १४०० वर्षांहून बराच जास्त काल राहतो.

चन्द्रगुप्ता नंतरचा काल.

नन्दापुढील पांच वंशांचा, व चन्द्रगुप्तापासून चार वंशांचा, काळ दोन पुराणांत सांगितला आहेः तो नन्दापासून ८३६ किंवा ८५४ ( वर्षे ह्मणजे इ० स० ४३६ अथवा ४५४ इतका ) आहे. या वंशांतून शेवटल्याचें नाव आन्ध्रः हा वंश सुमारें इसवी सनाचा आरंभीं सत्ता पावला. प्लिनी या युनानी ग्रंथकारानें दुसऱ्या शतकांत या नावाचा एक बलाढ्य वंश राज्य करित होता असें वर्णिलें आहे, त्याशीं ही गोष्ट मिळत्ये. आतां प्लिनीनें जांविषयीं लिहिलें आहे, ते कदाचित् दक्षिणेंतील आन्ध्र राजे असतील असें जर कोणी ह्मणेल, तर फ्युटेंजेरियन कोष्टकांत ‘ गंगाकांठचे आन्ध्र इंदी ’ असें नाव आलें आहे, त्यावरून प्लिनींतील पूर्वोक्त नाव, हें याच आन्ध्र राजांचें, असेंहि चांगलें संभवतें.

चिनी सालवार बखरेचा मेळ.

डिगीनी नामें फ्रेंच ग्रंथकारानें चिनी सालवारी बखरेचें भाषान्तर केलें आहे; तींत कि अ पि ली एथील हिंदु राजा यूज्ञै याकडून वकील आल्याचा लेख आहे. आतां, बुद्धाची जी जन्मभूमि व राजधानी कापिल, तीच किअपिली होय, तीं दुसरी असूं शकणार नाहीं; आणि चिनीलोकांनीं सर्व मगधदेशाचा जागीं कापिल एवढेंच ग्रंथान्तरीं घातलें आहे. दुसरें यूज्ञै याचें यज्ञश्री अथवा यज्ञ(अ) याशीं कांहीं साम्य आहे, आणि यज्ञ नामें आन्ध्रराजाच पूर्वोक्त कालीं गादीवर होता. आन्ध्र वंशाचा शेवटचा राजा पुलिमत अथवा पुलोमार्चिष होता; त्याबरोबर त्या वंशाची, इ०स०४३६ त,

(अ) हें नाव पुराणांत आढळत नाहीं. भा० क०.

समाप्ति झाली. यानंतर मगध राजांचा कालगणनांत जो गोंधळ झाला आहे, तो बहुतकरून महाभारतीय युद्धापूर्वीचा गोंधळा इतका मोठा आहे.

इ०स० ६४१ त कै ली तै वंशांतील हो लो मिन नामें हिंदुस्थानांतील एका मोठ्या राजाकडून वकालत आली होती, असा लेख चिनी सालवारी बखरेंत आहे. मगध, हा या राजाचा देश होता, अशी मोशूर डिगीनी अटकळ करितो; परंतु त्या राजाचा अथवा वंशाचा नावासारिखें कांहीं नाव पुराणांत सांपडत नाहीं.

विष्णुपुराण हा, म्हणण्यांत, व्यासकृत ग्रंथ आहे, म्हणून त्या ग्रंथकारास तो भविष्यसूचक वाणीनें लिहावा लागला आहे; त्याप्रमाणें व्यासाचा मरणानंतरचा गोष्टींचें वर्णन करितांना असें लिहिलें आहे कीं, " यांनंतर ( म्हणजे आन्ध्रांनंतर ) ७ आभीर, १० गर्दभिल, १६ शक, ८ यवन, १४ तुषार, १३ मुण्ड, व ११ मौन, हे १३९० वर्षेपर्यंत सर्व पृथ्वीचें राज्य करितील त्यांनंतर ११ पौर होतील, व ते ३०० वर्षे राज्य करितील; त्यांमागून कैलकिल यवन होतील, ते १०६ वर्षे राज्य करितील: याप्रमाणें वर्णन आहे. असें वर्णन धरिलें, तर हा सर्व काळ चालत्यां[४] सालाचा पुढें ५०० वर्षे जातो; परंतु तसें न धरितां, पहिल्या वंशांचा कारकीर्दीची जी बेरीज १३९० आहे, ती चुकलेली आहे, आणि वास्तविक पाहतां ते वंश समकालिक अथवा जवळजवळचा कालांत नांदणारे होते, अशी जर कल्पना केली, तर आन्ध्र राजांनंतर कांहीं वेळपर्यंत गोंधळ झाला, आणि त्या वेळीं हिंदुस्थानाचा निरनिराळ्या भागांत निरनिराळ्या जातीचा लोकांची सत्ता होती, व त्यांविषयीं दुसरी कांहीं माहिती नाहीं,

इ०स० ४३६ सां नंतर अंधार.

---

( ४ ) ज्या वर्षी हा इंग्रेजी ग्रंथ छापला ( इ० स० १८४१ ) तो हा काल धरावयाचा.— भा०क०.

असा सिद्धान्त स्वीकारणें येतो. वर सांगितलेले यवन हे जर ग्रीकलोक असतील तर इ० स० ४३६ नंतर त्या लोकांतील आठ राजे हिंदुस्थानांत झाले ही गोष्ट निःसंशय आश्चर्यकारक होय; आणि कैलकिल यवन हे कोण याविषयीं तर अधिकच गोंधळ आहे. कैलकिल हे कदाचित् मुसलमान असतील.

या सर्व गोंधळानंतर, निरनिराळ्या देशांत राज्य करणाऱ्या वंशांचा पट लिहिलेला आहे; आणि त्यामध्यें "प्रयागापर्यंत गंगाकांठचा मगधदेशचा गुप्तांचें" थोडेंसें वर्णन केलें आहे. आतां शिक्यांवरून व खोदींव लेखांवरून असें निर्विवाद स्थापित झालें आहे, कीं, पांचव्या किंवा सहाव्या शतकापासून सातव्या किंवा आठव्या शतकापर्यंत, गंगाकांठचा मुलूकांत एक वंश खचित राज्य करित होता, त्यांतून कित्येक पुरुषांचा नावाचा शेवटीं गुप्त असें येत असें. यावरून या विसंगत कथाभारुडांत कांहीं सत्य मिश्रित आहें, परंतु बाहेरील साहाय्याशिवाय तें उपयोगीं पडण्याजोगें करवत नाहीं; आणि दुसऱ्या इतिहासपर पुराणांतहि याचप्रमाणें वृत्तान्त आहे, म्हणून मगधदेशाचा इतिहासाचें कालमान ठरविण्याचा यत्न सोडून दिला पाहिजे; दुसरा कांहीं उपाय नाहीं.

विक्रम व शालिवाहन यांचे शक.

माळव्यांतील विक्रमराजाचा शकास खिस्ती शकापूर्वीं ५७ वर्षें आरंभ होऊन, तो सर्व उत्तरहिंदुस्थानभर अद्यापि सतत चालू आहे; आणि शालिवाहनाचा शकास इ०स० ७८ त आरंभ झाला, तो तसाच दक्षिणेंत चालू आहे. या शकांस आरंभ झाल्यापासून जा गोष्टी घडून आल्या, त्यांचा पत्ता यांवरून लावतां यावा अशी कोणी सहजच अटकळ करील; आणि त्याप्रमाणें भूमिदानपत्रांचीं सालें ठराविण्यास हे शक फार उपयोगीं पडतात. हीं पत्रें देशेतिहासाचीं मोठीं साधनें होत. परंतु पुराणांतील मनःकल्पित शकांमुळें त्या ग्रंथांमध्यें या दोन शकांचा उपयोग करितां येत नाहीं, आणि इतर इतिहासांत जर यांचा उपयोग करावा, तर पुराणांशिवाय तसे दुसरे ग्रंथच नाहींत.

सारांश हिंदूंचें कालगणन अपुरें आहे हें पदरीं घेऊन, हिंदुस्थानांत मुसलमान येऊन त्यांपुढील तारीखवारीसुद्धां हकीकती मिळतपर्यंत, पूर्वी सांगितलेल्या थोड्याशा गोष्टी खेरीज करून हिंदूंचा बाकीचा इतिहासांतील कालगणन करणें ही शुद्ध अटकळ आहे, असें कबूल करणें भाग आहे.

---

# प्रकरण चौथें.

## वैद्यक.

चरक व सुश्रुत हे वैद्यकाविषयीं अति प्राचीन ग्रंथ विद्यमान आहेत. त्यांतून एकाचाहि शकाची आपणास माहिती नाहीं; परंतु त्या दोहोंतून सुश्रुत अलीकडचा आहे, त्यावर काश्मीरांत केलेली एक टीका आहे, ती बाराव्या किंवा तेराव्या शतकांत लिहिलेली आहे; व ही प्रथमचीच टीका आहे असें दिसत नाहीं.

आरबांनीं आपली बुद्धि व्युत्पत्तिविद्येकडे लाविल्यावर, बहुधा लवकरच या दोन्ही ग्रंथांचीं आरबींत भाषान्तरें झालीं. आपण वैद्यकविषयक ज्ञान हिंदुस्थानांतील ग्रंथकारांपासून संपादिलें असें आरब उघडपणीं कबूल करितात, आणि यांची विद्वत्ता युनानी लोकांइतकी होती असें म्हणतात. आठव्या शतकांत हरून- उर्रशीद पादशाहाजवळ माणक व साले या नावांचे दोन हिंदु वैद्य होते; या गोष्टीवरून हिंदु वैद्य आरबांस केव्हां माहीत झाले तो काल निश्चित करण्यास कांहींसें साहाय्य मिळतें.

त्यांस पुष्कळ औषधें माहीत होतीं. त्यांस झाडपाल्यांचें ज्ञान होतें; हें अपूर्व असें वाटत नाहीं, कारण त्यांपासून हें प्रकरण पूर्वीचा काळीं युरोपांतील लोक शिकले; आणि दमा असल्यास धोत्र्याचा पाला व साल ओढावी, आणि पोटांत कृमि झाले असल्यास कुइले खावे, ही माहिती

आपणास हिंदूंपासून अलीकडे मिळाली आहे. हें असो; परंतु यांचें रसायनी कौशल्य विशेष चमत्कारिक आहे, व असें यांमध्यें असावें अशी आपली अटकळहि नव्हती.

गंधकाचें तेल, शंखद्रव, ( ह्म० सोरेका तेझाब ), नीमकका तेझाब, हीं आम्लें; ताम्रभस्म, लोहभस्म, नागभस्म ( म्ह० शेंदूर ) व मुडदारशिंग ( हीं शिशाचीं दोन्ही भस्में ), वंगभस्म ( म्ह० कथलाचें भस्म ), जस्ताचें फूल ( हीं ओक्सैडें ); सुवर्णमुखी, गंधकानें मारलेलें ताम्र, पारदकज्जली, सुरमा, व हरिताल, ( हे लोखंड, तांबें, पारा, सुरम्याची धातु, व सोमलाची धातु, या धातूंचे गंधकाशीं संयोग होऊन झालेले "सल्फ्यूरेट "नामविशिष्ट पदार्थ ); हिराकस, मोरतूथ, व सफेद तूतिया, ( हे लोखंड, तांबें व जस्त यांचे गंधकाशीं संयोग होऊन झालेले 'सल्फेट 'नामक पदार्थ ); सफेदा, व मंडूर ( म्ह०शिसें व लोह यांचे कार्बोनेट ); हे सर्व पदार्थ त्यांस तयार करतां येत होते. यांतून कांहीं पदार्थ ते विलक्षण क्रियांनीं तयार करित असत; व बहुधा त्यांचा सर्वच रसक्रिया चमत्कारिक होत्या.[१]

ते कांहीं भीति न बाळगितां हीं औषधें देत असत. धातु पोटांत देण्याचा पाठ प्रथम हिंदूंनीं घातला, व ते तशा प्रकारें पाराच देत असत असें नाहीं, तर अन्तऱ्या ज्वरांवर सोमलधातु व शंख्या सोमल हीं देत असत. ते पुष्कळ दिवसांपासून हिंगुळानें वाफारा देऊन, त्वरित व इजा न देतां, तोंड आणित असतात.

त्यांस शारीरकाचें ज्ञान नव्हतें; ही गोष्ट ध्यानांत ठेवून पाहिलें असतां, त्यांचा रसायनविद्येसारिखीच त्यांची शस्त्रविद्याहि चमत्कारिक होती. ते मुतखडा काढीत, मोतीबिंबावर शस्त्र चालवीत, आणि गर्भाशयांतून गर्भ काढीत.

( १ ) मुख्यत्वेंकरून पारदभस्म ( म्ह०भाण्डकर्पूर ), व रसकापूर, हे पदार्थ करण्याचा कृतीविषयीं लिहिण्याचा त्या ग्रंथकाराचा कटाक्ष आहे.

त्यांचा प्राचीन ग्रंथांत १२७ शस्त्रांचें वर्णन आहे; परंत तीं बहुधा अनाडी असत. साम्प्रत त्यांचीं शस्त्रें इतकीं ओबड-धोबड आहेत, कीं जरी ते मोतीबिंब चांगला काढूं शकतात, तरी त्यांणीं मुतखड्यांवर शस्त्र चालविलें असतां रोगी बहुधा प्राणास मुकतात.

देवी काढण्याची चाल पुष्कळ दिवसांपासून या लोकांत आहे, परंतु गोशितला काढण्याचा पाठ चालू होई-पर्यंत पुष्कळ लोक प्राणास मुकत असत.

हिंदुवैद्य हे नाडी पाहतात, व आंगाची कातडी, जिव्हा, डोळे, इत्यादिकांची चर्या व मलमूत्राचें स्वरूप, हींहि पाहतात, आणि रोग्याचीं लक्षणें पाहून त्यांवरून ते बराबर निदान करितात, असें म्हणतात; परंतु त्यांची सर्व कृति बाडी आहे; त्यांचें शास्त्र त्यांस बराबर मार्ग दाखवित नाहीं, व त्यांचे उपचारहि हमेशा सुयुक्त नसतात. यास उदाहरण,—मनुष्यास ताप आला म्हणजे त्यास ते एका खोलींत घालून ठेवितात, तींत मुद्दाम उष्णता केलेली असल्ये, व ते रोग्यास अन्न देत नाहींत तर नाहींत, परंतु पाणीहि देत नाहींत.

ते औषधांचा साहाय्यास फलज्योतिष व जादू हीं आणतातः औषधें देणें तीं ग्रहबल पाहून देतात, व तीं देत्ये वेळीं मंत्र म्हणतात, व कांहीं टोटके करितात.

जा वेळीं या लोकांतील ही विद्या तारुण्यांत होती, तेव्हांहि तींत पूर्वोक्त व्यंगांतील पुष्कळ व्यंगें बहुधा होतीं; परंतु साम्प्रत या शास्त्राची उतरती कला आली आहे, हें निःसंशय आहे. साम्प्रत वैद्यांस जीं औषधांचीं रूपान्तरें पाहिजेत, तीं जा नियमांनीं होतात, त्यांचें त्यांस मूळींच ज्ञान नसतांहि ते आपल्या रसायनक्रिया पार पाडितात; औ-षधें द्यावयाचीं तीं आपल्या गुरूचा पाठप्रमाणें देतात, प-रंतु ते स्वतः कांहीं शोध करित नाहींत; आणि शस्त्रविद्येची तर इतकी पायमळणी झाली आहे, कीं रक्त काढणें हें का-म हजामांकडे गेलें आहे; व हाडें बसविणें हें धनगरांचें काम

झालें आहे. जो उठला तो भुवराचा चिकाचें पलिस्तर देण्यास सिद्धच आहे, आणि त्यांहून बहुत प्रसंगीं खराखुरा डाग देण्यासहि कोणाचा अनमान नाहीं.

# प्रकरण पांचवें.

## भाषा.

संस्कृत.

"या भाषेची रचना चमत्कारिक आहे; ही ग्रीक भाषेहून विशेष अव्यंग आहे; लाटिन भाषेहून विशेष प्रचुर आहे; आणि दोहींपेक्षांहि ही पराकाष्ठेची सुधारलेली आहे;" याप्रमाणें सर्‌विलियम्‌जोन्सानें संस्कृत भाषेविषयीं लिहिलें आहे. या पुरुषास दुसऱ्या पुष्कळ प्राचीन व अर्वाचीन लोकांचा भाषा चांगल्या अवगत होत्या, म्हणून त्याचा पूर्वोक्त अभिप्राय आपल्या आदरास योग्य आहे.

याप्रमाणें जा भाषेची स्तुति झाली, तिचा योग्यतेप्रमाणें तिजविषयीं लोक सर्वदा तत्पर होते, असें दिसतें. साम्प्रत अति प्राचीन असून उपलब्ध असें संस्कृत व्याकरण पाणिनीचें आहे; परंतु तो ग्रंथकार इतका जुनाट होऊन गेला आहे, कीं कल्पित युगांचा पुरुषांतीलच हा एक आहे असें लोक मानितात. तो व त्याचा पूर्वींचे वैयाकरण यांणीं आपल्या ग्रंथांनीं जो व्याकरणाचा क्रम रचून ठेविला आहे, तसा संपूर्ण क्रम दुसऱ्या कोणत्याहि भाषेचा अवयवांची रचना करण्यास लागू केलेला नाहीं.

या भाषेचें सविस्तर विवरण जरी मला करतां येत असतें, तरी मी या ग्रंथांत केलें नसतें, (कारण हें त्याचें स्थळ नाहीं); मिस्टर कोलब्रूकाचा एका निबंधांत याविषयीं कांहीं वर्णन आहे.

संस्कृतांत असंख्य व्याकरणें व कोश आहेत, आणि

व्युत्पत्तिविद्येचा प्रत्येक शाखेचा महत्त्वाप्रमाणें अलंकार व काव्य या विषयांवर तितके ग्रंथ आहेत. अद्यापि लोक संस्कृताचा अभ्यास काळजीनें करितात; आणि जरी ती भाषा बहुत काल लोकांचा वहिवाटींतून गेली आहे, तरी विद्वान् लोक त्या भाषेनें संभाषण करूं शकतात. आतां जसें या भाषेचें स्वरूप साम्प्रत पराकाष्ठेचें सतेज आहे, तसें तें किती कालपर्यंत होतें, आणि ही भाषा लोकांचा वहिवाटींतून केव्हां गेली, याचा निर्णय करणें ही शोध करण्याजोगी गोष्ट आहे.

ग्रीक व लाटिन या भाषांशीं संस्कृत भाषेचा निकट संबंध आहे, आणि कित्येक ठिकाणीं त्यांचा अगदीं अभेद आहे; हा शोध लागल्यापासून अलीकडे आम्हास ( इंग्लिशांस ) संस्कृताची विशेष आस्था लागली आहे. हा संबंध युरोपांतील संस्कृतज्ञांस बहुत कालापासून माहीत आहे, व ते एकेरी शब्दांचा संबंध याप्रमाणें लावून देत असत; परंतु अलीकडे जर्मन विद्वानांनीं ( व त्यांमध्येंहि विशेषेंकरून मिस्टर बाप्प याणें ) प्रत्ययांची तुलना करून तो संबंध सिद्ध करून दाखविला आहे.

एका वेदांतील एका सूक्ताची भाषा, छन्द, व सरणी, हीं पाहून त्यांवरून कोलब्रूकानें असें म्हटलें आहे, कीं केवळ वेद हे पाहिले असतां त्यांतूनच असें सिद्ध होतें, कीं "वेदांतील विधिसूक्तें व अर्थवादसूक्तें यांचा समूह जा अनाडी व अनियमित भाषेंत लिहिला आहे, तिला उजळा मिळून, लौकिक व दैविक अशा पौराणिक कथा जींत लिहिल्या आहेत, त्या भाषेचा मधुर स्वरूपास जेव्हां ती भाषा पावली, तेव्हां पुढें पूर्वोक्त सूक्तांची जी साम्प्रतची रचना आहे ती झाली आहे."

वेदांचा ओबडधोबड भाषेस अलंकृत करून मनुस्मृतीची भाषा झाली; पुढें त्या भाषेस आणखी मार्दव येऊन पुराणांची भाषा झाली.

सिकंदर पादशाहाचा प्राचीन इतिहासकारांनीं जीं हिंदवी

नावें घातलीं आहेत, त्यांचें पृथक्करण केलें असतां पुष्कळांचें रूप साम्प्रतचा संस्कृत भाषेसारिखें दिसतें. त्या वेळीं लौकिक भाषेपासून दैविक भाषा निराळी होती अशी सूचना त्या ग्रंथकारांनीं कोठेंहि केली नाहीं; परंतु अति प्राचीन संस्कृत नाटकांत, स्त्रिया व अशिक्षित पुरुष, यांचीं दर्शक जीं पात्रें आहेत, त्यांची भाषा कमी सुधारलेली आहे, व उच्च पात्रांची भाषा संस्कृत आहे.

हिंदुस्थानांतील दुसऱ्या भाषा.

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या अर्वाचीन भाषांत जा मानानें संस्कृत भाषा मिसळली आहे, त्या मानावरुन त्या भाषेचा इतिहासाविषयीं कांहीं कल्पना सुचतात. उत्तरेकडील पांच भाषा,- पंजाबी, कनोजी, मैथिली, बंगाली, व गुजराथी, या मूळ संस्कृतांतून निघून त्यांत जागजागचे व परदेशांतील शब्द व प्रत्यय मिसळून झाल्या आहेत; परंतु दक्षिणेंतील पांच भाषांपैकीं निदान तामिळ, तैलंगी, व कानडी, या तिहींचा तरी उगम संस्कृतापासून निराळा आहे, आणि जसे हिंदींत आरबी शब्द आले आहेत, त्याचप्रमाणें संस्कृत शब्दांचा प्रवेश या भाषांत झाला आहे. या तिहींतून तामिळ ही इतकी निर्भेळ आहे, कीं बाकी राहिलेल्या दोन भाषा हींतून उत्पन्न झाल्या अशीहि कल्पना निघाली आहे. तैलंगीची मूळ रचना कायम राहिली आहे, परंतु तींत संस्कृताची मिसळ पुष्कळ आहे.

दक्षिणेंतील बाकी राहिलेल्या दोन भाषांमधून औढ्यादेशाचा भाषेंत इतकी संस्कृताची मिसळ आहे, कीं "जर तींतील संस्कृत शब्द काढून टाकिले, तर मग ती भाषा आहे असें म्हणवणार नाहीं," असें प्रोफेसर विल्सन् याचें म्हणणें आहे. वास्तविक पाहतां बहुत वेळा गुजराथीचा जागीं ही भाषा उत्तरेकडील पांचांत धरितात.

महाराष्ट्र ह्मणजे मराठी, हीची गणती हमेशा दक्षिणेंतील भाषांत करितात; परंतु ही उत्तरेकडील भाषांचा

कुटांतील आहे असा प्रोफेसर विलूसन् याचा अभिप्राय आहे. यास्तव महाराष्ट्रलोक हे विंध्यपर्वतापलीकडील लोकांतले आहेत; परंतु हे इकडे केव्हां आले ती अटकळ करवत नाहीं.

---

# प्रकरण सहावें.

## व्युत्पत्तिविद्या.

जास संस्कृत भाषेचा परिचय नसतो, त्याजवळ हिंदूंचा काव्याविषयीं मत देण्याचीं साधनेंहि बहुधा नसतात. या भाषेमध्यें शब्दसौरस्याकडे अपूर्व लक्ष पोंचविल्यामुळें तिला विशेष गोडी आली आहे, ती गोडी भाषान्तरांमध्यें नाहींशी होत्ये; आणि दुसरें असें आहे, कीं संस्कृतांत अपरिमित समास करावयास सांपडतात त्यामुळें त्या भाषेस जी अधिक मिष्टता येत्ये, तीच, भाषान्तरांमध्यें ते समास निराळ्या जातीचा भाषेंत करूं लागलें असतां नीरस व ओढून ताणून आणलेले असे होतात त्यामुळें, नाहींशी होत्ये. काव्य.

संस्कृत काव्य अपूर्व आहे, व त्यांतील साहित्यसंबंध आमचा ( म्ह० इंग्रेजी ) काव्यांतील साहित्यसंबंधांहून निराळे आहेत, त्यामुळें आमचा काव्याचा साहाय्यानें आपणास त्या काव्यांतील रस चांगला ग्रहण करतां येत नाहीं. त्या लोकांचा कल्पना व स्फूर्त्ति विलक्षण आहेत, त्यामुळें आमचानें त्यांचा वृत्तींत शिरवत नाहीं; आणि या देशांतील सृष्टपदार्थ व चमत्कार हे आमचा देशांतल्यांहून भिन्न आहेत, त्यामुळें त्यांपासून जे तरंग उत्पन्न होतात त्यांचा अर्धा वेधकपणा नाहींसा होतो; आणि जा शब्दांपासून कांहीं विषय हिंदूंस स्पष्टतर होतो, त्यांपासून तो आम्हास उलटा अधिक

कळेनासा होतो. यास उदाहरण;— त्या स्त्रीचे ओंठ हीं केवळ दुपारीचीं फुलेंच आहेत, अथवा तिचा गालावर मधुक ( म्ह॰ मोहा ) वृक्षाची टवटवी प्रकाशत्ये आहे, अथवा तिचे गाल चम्पकपत्रासारिखे आहेत, असें जर कोणी म्हटलें, तर त्यापासून आम्हास काय समजणार आहे? परंतु जसे आमचे उपमादि अलङ्कार आम्ही समजतों, त्यांप्रमाणें पूर्वोक्त अलङ्कार हिंदूंस समजत असतील, हें सहजच आहे.

इतकी प्रतिकूलता असतांहि, संस्कृत काव्याचे जे थोडे नमूने इंग्रेजींत प्राप्त झाले आहेत, त्यांत बरेंच स्वारस्य आहे.

अलङ्कारशास्त्र.

त्यांचा व्युत्पत्तिविद्येपैकीं अलङ्कारशास्त्राची जितकी माहिती आम्हास झाली आहे, तितकी दुसऱ्या कोणत्याहि तत्सम्बंधीं प्रकरणाची नाहीं; व त्या माहितीवरून विचार करितां त्या शास्त्रांत त्यांणीं विशेष निपुणता संपादिली आहे, असें दिसतें. सरविलियम्‌जोन्स याणें "शाकुन्तल" नाटकाचें इंग्रेजींत भाषान्तर केलें आहे; तें पंडितांचा आदरास योग्य आहे, व त्याचा योगानें युरोपांत या नाटकाची प्रसिद्धि फार दिवस झाली आहे. त्याखेरीज बाकी राहिलेल्या नाटकांतून मुख्यमुख्यांचीं उत्कृष्ट भाषान्तरें मिस्टर विल्सन याणें केलीं आहेत; त्यांवरून तीं हल्लीं आम्हांस चांगलीं माहीत झालीं आहेत.

ख्रिस्ती शकाचा आरंभाचा सुमारास लिहिलेलीं नाटकें साम्प्रत उपलब्ध आहेत, व अलीकडील ५० वर्षांत बंगाल्यामध्यें लिहिलेलें एक नाटक वर्तमान आहे; असें असून विद्यमान नाटकांची संख्या ६० हून अधिक नाहीं. वर्तमान काळीं आमचा देशांत नाटकें निरनिराळ्या शहरांत व प्रसिद्ध नाटकशाळांत वारंवार करितात; त्यामुळें लोकांस त्यांची विशेष गोडी लागत्ये; आणि हिंदूंचीं पूर्वोक्त नाटकें तर विवक्षित सणांचा दिवशीं राजवाड्यांतील मोठ्या महालांत एकवार करित असत. असें होत असल्यामुळें बहुधा त्यांची

संख्या वर सांगितल्याप्रमाणें अल्प राहिली आहे. शि-
वाय, विद्वानांनीं या विद्येचा अनादर केल्यामुळें पुष्कळ
नाटकें नाहींशीं झालीं असावीं. असें म्हणण्याचें कारण, सा-
म्प्रत या प्रकारचा काव्याविषयीं अभिरुचि या लोकांत नाहीं,
अथवा असल्यास, ती फार बिघडली आहे. कित्येक अग-
दीं अयोग्य नाटकें अद्यापि लोकांस आवडतात; परंतु या दे-
शांतील नाटकव्युत्पत्तींत निपुण म्हणण्याजोगा असा फक्त्
एक ब्राम्हण मात्र मी पाहिला होता, असें विद्यागुरु विल्सन्
खातरीनें सांगतो.

पूर्वोक्त नाटकांपैकीं आठांचीं भाषान्तरें झालीं आहेत;
आणि बाकीचांतून २४ चा सारांश आणि त्यांतील कांहीं
वेंचे इंग्रेजींत झाले आहेत.

सदरील नाटकांत जरी दुःखपरिणामक नाटकें नाहींत,
तरी त्यांत जेवढे प्रकार आहेत त्यांहून अधिक दुसऱ्या कोणत्या-
हि लोकांचा अलङ्कारशास्त्रामध्यें नाहींत. त्यांत नाना प्र-
कारचीं नाटकें, प्रहसनें, व नीतिपर्यवसायि आहेत; आणि
कित्येक नाटकांमध्यें विष्कंभक असतात; त्या सर्वांतील ना-
नाविध विषयांमुळें पुष्कळ प्रकार झाले आहेत. मुंबई ए-
थील टेलर साहेबानें एका नाटकाचें भाषान्तर केलें आहे;
त्या नाटकांत तत्त्वविद्येचा निरनिराळ्या दर्शनांचीं मतें हुबहु व
कित्येक ठिकाणीं रसाळ वाणीनें उघड करून दाखविलीं
आहेत. जीं नाटकें सरळ आहेत, त्यांतून कांहीं वीरांचा
पराक्रमांचें वर्णन करितात; कांहीं राजांचा लढाया व त्यांचे
शृंगार, यांविषयीं आहेत; कित्येकांत प्रधानांची कापट्यविद्या
उघडी केली आहे; आणि कांहींत त्यांतील पात्रांची शुद्ध
गृहस्थिति वर्णिली आहे.

या नाटकांमध्यें जसे विषय निरनिराळे आहेत, तशीं
पात्रेंहि निरनिराळीं आहेत. कित्येकांत अमानुष शक्तींचा
लेश नाहीं, व धर्माचें नावहि नाहीं. दुसऱ्यांत स्वर्गींचा
अप्सरा व भूलोकींचे नायक, यांचे शृंगार वर्णिले आहेत;

कित्येकांत देव व दैत्य आले आहेत; कित्येकांत ज्यांचा धर्माशीं संबंध नाहीं अशा जारणमारणादि क्रिया आल्या आहेत; कित्येकांत प्रारब्धाची शक्ति वर्णिली आहे; आणि एका नाटकांत नायिकेचा निर्दोषीपणाचा साक्षीकरितां हिंदूंचा सर्व देवता रङ्गभूमिवर आणिल्या आहेत.

साधारणरीत्या पाहूं जातां, या नाटकांचा रोंख, मानवांचा वृत्ति, व स्वतःसिद्ध स्थानें, यांवर असतो; आणि मनुष्यांहून श्रेष्ठ भूतांचा त्यांशीं सम्बन्ध नसतो. जेथें मनुष्यांचा साहाय्यार्थ आलेल्या देवांचें वर्णन आहे, तेथेंहि या नाटकांचा कटाक्ष पूर्वीं सांगितल्याप्रमाणेंच आहे.

नाटकांत अमुक अङ्क असावे असा नियम नाहीं:[अ] बहुधा एकापासून दहा असण्याचा पाठ आहे. जेव्हां रङ्गभूमि रिकामी होत्ये, तेव्हां, अथवा कांहीं कृत्याचा एक अंश करून दुसरा अंश करण्यापूर्वीं, मध्यें रिकामा वेळ घालवायाचा असतो अशी संधी पाहून अङ्क पाडलेले असतात.

या नाटकांमध्यें साधारणरीत्या कालसंबंध फारसा तुटलेला नसतो. परंतु एका नाटकांत पहिल्या व दुसऱ्या अङ्कांत १२ वर्षांचें अन्तर आहे. कालसंबंधापेक्षां स्थलसंबंधाकडे कमी लक्ष्य दिलेलें आहे; परंतु देशकालसंबंधापेक्षां विशेष आवश्यक असा जो वस्तुसंबंध, तो बहुतेक अर्वाचीन युरोपियन् नाटकांप्रमाणें चांगला राखलेला आहे.

या नाटकांतील वस्तु, म्हणजे विषय, हे बहुधा मनोरंजक आहेत; त्यांतील संभाषणें हुबहु, परंतु जराशीं लांबट आहेत, आणि त्यांतील पत्रांचा भावी स्थितीप्रमाणें जा त्यांचा वृत्ति बदलतात, त्या चांगल्या समजविण्याविषयीं कोठें कोठें विशेष चातुर्य दाखविलें आहे.

साम्प्रतचीं पात्रें पाहिल्यावरून प्राचीनकाळचीं पात्रें

(अ) नाटकांचा कित्येक भेदांत अङ्कांचा नियम आहे; उदाहरण, भाणांत एक, व नाटिकेंत पांच अङ्क असतात. भा० क०.

कशीं असत त्याविषयीं कांहीं निर्णय करितां येतो. हल्लीं संप्रदायशुद्ध नाटकें फार विरळा होतात; व जेव्हां त्यांचा असा अभिनय करितात तेव्हां त्यांतील पात्रांची वाणी गम्भीर व अलङ्कारी असत्ये. त्यांचे पोशाग प्राचीन काळचा पुतळ्यांसारिखे असतात, आणि श्रेष्ठ पात्रांचे मुकुट भरअस्मानी व सोनेरी रंगांचे असतात. त्यांचा आकार विलक्षण असतो, व त्यामुळें अर्वाचीन पागोट्यांपेक्षां त्या पात्रांस विशेष डौल येतो. अद्यापिहि नकल्ये, माधवी, व शीघ्रप्रहसनी, हे साधारण आहेत. परंतु त्यांची वाणी असभ्य व पोरकट असत्ये; आणि जर त्यांस पूर्वीं ताकीदकरून ठेविली नसली, तर बीभत्स असत्ये; परंतु त्यांमध्यें बराच अभिनय करण्याची शक्ति व शृंगाररस हीं असतात.

कालिदास व भवभूति, हे उत्तम नाटककार आहेत; त्यांतून पहिला, इ०स०चा ५ व्या शतकांत, व दुसरा, ८ व्या शतकांत नांदत होता. यांतून प्रत्येकानें तीन तीन नाटकग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं प्रत्येकाचा दोन दोन ग्रंथांचीं भाषान्तरें झालीं आहेत. कालिदासाचा नाटकांत मार्दव व लाघव हे गुण उत्कृष्ट आहेत, आणि त्यांतील विषयांचें वर्णन फार रसभरित आहे. त्याचा "शाकुन्तल" नाटकाची फार दिवस स्तुति झाली असून ती योग्यच आहे. "विक्रमोर्वशी" या नाटकांत त्याहूनहि विशेष अद्भुत रस आहे. भवभूतीचे ग्रन्थ ही पूर्वोक्तगुणविशिष्ट असून, त्यांत जी कथेची प्रौढी, पौरुष वाणी, आणि वीरश्री, हीं आहेत, तशीं, मी ऐकिलेल्या कोणत्याही हिंदू कवीचा, दुसऱ्या ग्रन्थांत नाहींत. हिंदुलोकांचा सदसद्विचारबुद्धींत जीं व्यंगें आहेत तींच त्यांचा सर्व ग्रंथांमध्यें आहेत; आणि, त्यांत जी मनोहारि शान्तता आहे, ती सृष्टिसौंदर्याचा निदिध्यास करण्यास जशी योग्य आहे, तशी उत्साह दाखविण्यास किंवा साहस प्रकट करण्यास योग्य नाहीं. यामुळें जरी त्यांचें साधारण काव्य सरळ व सुशोभित असतें, आणि त्यांत उत्कृष्ट कल्पनासृष्टीचा

पाऊस पाडलेला असतो, तरी त्यामध्यें बहुधा उत्साह नसतो; त्यामुळें त्याचा माधुर्यानें वाचणारांची मिठी बसत्ये, आणि त्यापासून उग्र मनोवृत्ति व प्रौढ रस यांचा प्रादुर्भाव होत नाहीं.

हिंदु कवींस शृंगार व करुणा हे रस उत्कृष्ट साधतात. परस्परप्रीतीपासून होणारा अत्यानंद, विरहापासून होणारी व्याकुलता, आणि वृथागत कामाचे विलाप, यांचें वर्णन त्यांणीं उत्कृष्ट केलें आहे; आणि एकतान आसक्ति ठेवणें आणि उदार बुध्धीनें स्वार्थ सोडून देणें, या जा उत्कृष्ट मनोवृत्ति, त्यांचें वर्णन करण्या पुर्तीहि यांचा बुध्धीची धांव पोंचत्ये; परंतु, वीर्य, गर्व, अथवा स्वतंत्रता, यांचा लेशहि यांजमध्यें दृष्टीस पडत नाहीं; आणि यांचा वृत्तींत वीरश्री नसल्यामुळें यांचा ग्रंथांतील योद्ध्यांचा सुखदुःखांविषयीं यांचा मनांत उत्पन्न झालेला कळवळा बहुधा दिसत नाहीं; म्हणून त्याऐवजीं त्यांस अतिशयोक्तीनें वर्णन करावें लागतें.

संस्कृत कवींचा मुख्य जोर व्याख्यान करण्यावर असतो, आणि त्यांतच ते अति आनंद पावतात. एकान्त अरण्यामध्यें व पुष्पवाटिकांमध्यें, जेथें सुगंध वायु वाहत आहे व स्फटिकासारिख्या पाण्याचे प्रवाह चालले आहेत, अशा विश्रान्तीचा अथवा ध्यानस्थ बसण्याचा स्थलांचें वर्णन त्यांणीं बहुधा केलें आहे; परंतु टवटवित व आनंदजनक प्रदेशांचें वर्णनहि त्यांस यथायोग्य करितां येतें. 'मालतिमाधव' या नाटकाचा नवव्या अंकांत उज्जनीसभोंवतील प्रदेशाचें जें वर्णन आहे, तें या प्रकारचें आहे; त्यांत पर्वत, खडक, वनें, खेडींपाडीं, आणि लकाकणारे प्रवाह, इतकीं मिळून एक विस्तीर्ण व चित्रविचित्र प्रदेश बनला आहे. या सर्व प्रदेशाचा मध्यास राजधानी आहे; तिचे बुरुज, तिजमधील देवालयें, व इतर इमारतींचीं शिखरें, आणि तिचे दिंडीदरवाजे यांची पडच्छाया, खालून बाजूनें वाहात जाणाऱ्या स्वच्छ प्रवाहांत, पडली आहे; पाऊस लवकर पडून त्याणें

वरील प्रवाहाचा दुथडीचीं वनें टवटवित केलीं आहेत, आणि नुकत्याच पडलेल्या सरीनें कुरणें लखलखूं लागलीं आहेत; आणि त्या वनांत व कुरणांत दुधानें भरलेल्या ओंट्यांचीं गुरें सुखानें बसून आराम पावताहेत; याप्रकारें वर्णन आहे. कोठें कोठें, या कवींस वीरश्री चढून, कोपायमान झालेले पर्वत, व सर्व जगाला आवरण घालणारे वायु, असे अलङ्कार त्यांणीं केले आहेत. या प्रकारचें अचाट वर्णन भवभूतीनें उत्कृष्ट केलें आहे त्याणें केलेलें निरनिराळ्या ठिकाणचा जंगली पर्वतप्रदेशांचें वर्णन, आणि गोदावरीचा उगमासभोंवतील चित्रविचित्र पहाड व भयंकर अरण्यें याचें वर्णन, यांत प्रौढी व रस भरलेला आहे. त्याचा एका[1] नाटकांतील नायक एके दिवशीं मध्यरात्रीस श्मशानांत गेला आहे; तेथें जळत्या सरणांचा अंधक प्रकाश मात्र पडला आहे; पुढें, त्याणें तेथील पिशाचदैवतांचें स्मरण केल्यावर, तीं आलीं आहेत; त्या वेळचा त्यांचा कर्कश आरोळ्या व विक्राळ स्वरूपें, यांचा जो घाट उतरून दिला आहे, तो भयप्रद व मनोवृत्तींचा रोध करणारा असा आहे. पुढें तीं पिशाचें अकस्मात् नाहींशीं झाल्यावर, ती जागा भणभणित व एकान्त, दिसूं लागली; वारा पिरपिर लावूं लागला; जवळची नदी रोंरावूं लागली; घुबडें रडूं लागलीं; आणि कोल्हे लांबट स्वरानें कुई करूं लागले; या गोष्टींचें जें वर्णन ग्रंथकारानें केलें आहे, त्यापासून जशी भीति वाटत्ये, तशी त्यांचा अमानुषीय व भयंकर दर्शनानेंहि वाटत नाहीं.

असें वर्णन करण्याची रुचि जशी हिंदुलोकांस आहे, तशी त्यांचा शेजारचा दुसऱ्या लोकांस नाहीं; या वैपरीत्यामुळें ही विशेष वेधक होत्ये. यास उदाहरण; इराणी काव्यांमध्यें निर्जीव सृष्टीचें लांबलचक वर्णन असें विरळाच आढळतें. गहन मनोवृत्ति अथवा प्रौढ कल्पना, यांचें वर्णन करण्याकडे त्यांचा बुध्दीचा कल आहे. त्यांणीं कोठें

---

(१) हें, मालतिमाधव या प्रकरणांत आहे. भा० क०.

कोठें संकोचित व अस्पष्ट वर्णन करण्याचा यत्न केला आहे, परंतु असें करतांना, सृष्ट पदार्थांपासून जे विकार बुध्दीस होतात, त्यांवर मात्र त्यांणीं लक्ष दिलें आहे. परंतु त्यांपासून जे विकार इन्द्रियांस होतात, त्यांवर अगदीं दुर्लक्ष केलें आहे.

इकडे संस्कृत कवींनीं नाना प्रकारचा दर्शनांनीं उत्पन्न होणारे तत्तद्गुणविशिष्ट मनोविकार यांचें उद्घाटन करून जा पदार्थांपासून ते उत्पन्न झाले त्यांचीं स्वरूपें दाखविलीं आहेत; त्या त्या प्रदेशांचीं विशिष्ट चिन्हें बाहेर आणिलीं आहेत; आणि त्या सर्व प्रसंगांचें असें चित्रविचित्र वर्णन केलें आहे, कीं त्यांत आलेल्या वनस्पतींचीं व जीवांचीं नावें जांस माहित नाहींत, अशा परदेशस्थांसहि त्या हिंदवी प्रदेशांचा स्वरूपाची कल्पना सहज करितां येत्ये.

आतां फार्सीमध्यें व संस्कृतामध्यें अलङ्कार निरनिराळ्या तऱ्हेचे आहेत. यास उदाहरण;— जर फार्सीमध्यें एका बागाचें वर्णन केलें असलें, तर त्यांत उकलणारे कळे हास्य करिताहेत; मदोन्मत्त बुलूबुलूपक्ष्यापुढें गुलाब आपलें सर्व सौंदर्य दाखवित आहे; वाऱ्याचा झुळुकेबराबर तारुण्याचें स्मरण होत आहे; आणि वसन्त हा तरुण पुरुष व स्त्रिया यांस लग्नमण्डपांत बोलावित आहे; परंतु याप्रमाणें सर्व सृष्टि आनंदित असतां सकाम पुरुषास सुख नाहीं; जवळचा वाहणारा ओहोळ त्यास सांगतो, कीं बाबारे! काळ चालला आहे; गुलाबामध्यें सत्त्व नाहीं, म्हणूनच बुलूबुलूपक्षी शोक करित आहे; व त्याचीं टवटवित पानें हिंवाळ्यांतील वारा उडवून टाकील असें त्यास भासत आहे. तो कामी पुरुष आपल्याबराबर गगनानें रडावें म्हणून त्याची प्रार्थना करितो आहे, आणि माझे विलाप माझा हट्टी प्रियेकडे घेऊन जा म्हणून वायूला सांगत आहे;— याप्रमाणें अलङ्कार फार्सी काव्यांत असतात.

आतां हिंदूंचीं काव्यें पाहिलीं तर, त्यांमध्यें उपवनांची

दाट छाया पडली आहे; तेथें काळ्या तमाल वृक्षाचा शाखा निंबवृक्षाचा पिंगट पानांत शिरल्या आहेत; आंब्याचा वृक्ष आपले वयस्क बाहु पसरून उंच पिंपळाचा सळसळणाऱ्या पानांत घालित आहे; एकादा वेल जंबुवृक्षाभोंवती वेढे घालित आहे, आणि त्याचा अति उंच डाहाळीवरून आपले लोंबणारे ताणे टाकित आहे; अशोक हा आपल्या टवटवित फुलांचे लांब झुबके सोडून देत आहे; मोगरा आपलीं पांढरीं फटफटित फुलें दाखवित आहे; आणि दुसरे वृक्ष आपल्या फुलांचा भारानें ओथिबलेल्या शाखांवरून फुलांचा पाऊस पाडताहेत. वातावरण सुगंधानें भरलें आहे, आणि मधमाशांचा घुणघुणाट चालला आहे; व जवळील ओढा झुळझुळ वाहत आहे; त्याशिवाय जिकडे तिकडे सामसूम आहे. असून असून कोकिलपक्ष्याचा शब्द दुरून ऐकूं येत आहे, अथवा एकाद्या शेजारचा झाडावरील कबूतर आंतल्याआंत अस्पष्ट शब्द करित आहे. अशा प्रदेशांत कोणी सकाम पुरुष जाऊन भटकत आहे, आणि त्याचा त्या वेळचा प्रकृतिस अनुकूल अशा त्या एकान्त स्थलामध्यें आपल्या दुःखाचें कोड पुरवित आहे. त्यास दक्षिण वायु शान्त करित आहे, व आंब्याचा मोहोराचा अल्प सुगंध येऊन त्याचा वृत्ति सद्रव होत आहेत; याप्रमाणें शेवटीं तो व्याकूल होऊन जाईजुईचा मण्डपामध्यें पडत आहे आणि आपल्या अविद्यमान प्रियेविषयीं विचारांत निमग्न होत आहे.

याप्रमाणें हिंदु व इराणीलोक यांचा विचारांत वैपरीत्य आहे, त्यामुळें त्यांचा भाषणांतील अलङ्कारहि तसेच असतात. इराणीलोकांचे अलंकार साङ्केतिक असतात, त्यामुळें ते जांस अपरिचित असतात, त्यांचा तर्कहि बहुधा चालत नाहीं. कोणी सुंदर स्त्रीचें वर्णन करणें असल्यास, तिचा बांधा सुरूचा वृक्षच आहे; तिचे केश (काळेपणांत) कस्तुरीच आहेत; तिचे डोळे, कोमलेल्या नर्गिस[ब] फुलासारखे आहेत;

(ब) इराणी पुष्पविशेष आहे. भा० क०

आणि तिचा गालावरील खळी ही एक विहीरच आहे. याप्रमाणें फार्सितील अलङ्कार दूरान्वित आहेत. आतां संस्कृतामध्यें रूपकापेक्षां उपमालङ्कार विशेष असतो; व त्या उपमा नवनव्या व यथायोग्य असतात; आणि जरी पूर्वीपासून त्यांची माहिती नसली, तरी त्या उपमांचीं कारणें स्पष्ट दिसण्याजोगीं असतात.

संस्कृत कवींचा ग्रंथांत कांहीं क्षुल्लक उष्ट्या गोष्टी आहेत, आणि त्यांतून कांहीं इराणीलोकांप्रमाणेंच छान्दिष्टहि आहेत, ही गोष्ट निर्विवाद आहे; परंतु साधारणरीत्या त्या कवींनीं आपली स्मृति व कल्पना यांतून विषय काढले आहेतः जा भांडवलांतून पूर्वींचा ग्रंथकारांची परंपरा आपली गरज चालवित असे, त्यांतून घेतले नाहींत. याप्रमाणें हिंदूंचा अलङ्कारशास्त्राची हकीकत झाली; व त्यांत साधारण संस्कृत काव्याचेंहि थोडेंसें स्वरूप येऊन चुकलें; म्हणून आतां बाकी राहिलेला विषय थोडक्यांत सांगतों.

दैविक काव्य.

हिंदूंचा काव्यापैकीं अति प्राचीन व अगत्याचा असून अति मोठा जो अंश आहे, तो दैविक व वीररसपर आहे. त्यांतून दैविक काव्याची "साधारण शैली नीरस व लांबट आहे, आणि तींत अलङ्कार फार कमी असून द्विरुक्ति अतिशय आहे," असा कोलब्रूक साहेबानें निर्णय केला आहे. त्यापैकीं कित्येक भागांचें भाषान्तर झालें आहे, त्यावरून वरील अभिप्रायाविषयीं शंका घेण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

वेदांचा प्रथम भागांत मंत्रादि आहेत, तो मात्र पद्यांचा वर्गांत येईल; आणि त्यांतील मतें जरी प्रगल्भ आहेत, तरी त्यांची रचना तशी तारीफ करण्याजोगी आहे असें म्हणतां येत नाहीं. मिस्टर कोलब्रूक, राजा राममोहनराय, व सरविलियमजोन्स यांणीं केलेल्या भाषान्तरांवरून, आणि सन १८२५ चा डिसेम्बर महिन्याचा "ओरिएण्टल् मागाझीन" पुस्तकांत छापलेल्या भागावरून पाहतां, त्यांत

काल्पनिकपणाचें कांहींच लक्षण दिसत नाहीं, आणि विचाराची प्रौढी अथवा वाणीचें माधुर्य हींहि नाहींत. कोलब्रूककृत " हिंदुधर्मसंस्कारविवेचक" या ग्रंथांत जीं सूक्तें व मंत्र सांगितले आहेत, तेहि असेच आहेत.

वेदांचा मागची पायरी 'रामायण नामें,' एका मोठ्या वीररसपर काव्याची आहे; त्यांत "सिंहलद्वीप" जिंकल्याची कथा आहे. त्याचा कर्त्ता वाल्मिकी, हा त्यावेळीं विद्यमान होता असें म्हणतात; परंतु जरी तसें असलें, तरी कोणी कवीचानेंहि समकालिक योद्ध्यावर अमानुषीय गुणांचा आरोप करून त्याचा साहाय्यार्थ वानरांची फौज देववणार नाहीं. यावरून असें दिसतें, कीं मूळची गोष्ट होऊन पुष्कळ काळ गेल्यावर, जेव्हां त्या गोष्टींतील वास्तविक मुद्द्यांचा लोकांस विसर पडून गेला, तेव्हां पुढें ग्रंथकारानें असे विलक्षण अलङ्कार करण्यास धजून ग्रंथ रचिला असावा. या तर्कावरून या काव्यांतील नायक (राम) हा फार प्राचीन होता असें दिसतें, परंतु यावरून त्या काव्याचा प्राचीनत्वास बट्टा लागत नाहीं. रामायण हें प्राचीन आहे या गोष्टीविषयीं तर वादच नाहीं; कारण याची भाषा जितकी वैदिक भाषेचा जवळजवळ आहे, तितकी दुसऱ्या कोणत्याहि संस्कृत काव्याची नाहीं; आणि याचा संक्षेप महाभारतांत असून, भारत हाहि ग्रंथ फार जुना आहे.

वीररसपर काव्य.-रामायण.

(२) मिस्टर रोसेन् याणें ऋग्वेदाचें जेवढें भाषान्तर केलें आहे तें बरवर पाहिल्यावरून त्या ग्रंथाची योग्यता विशेष आहे असें आम्हास वाटत नाहीं. हा वेद, पंचमहाभूतांचा देवता व स्वस्थ गण यांस अनुलक्षून केलेल्या सूक्तांचा समूह आहे; त्या सूक्तांत त्यांची स्तुति केली आहे अथवा त्यांजवळ कांहीं मागितलें आहे; परंतु त्यांत विशेष भिन्न प्रकार नाहींत, व त्यांत काव्यरसहि फारसा नाहीं. पूर्वोक्त स्तुति ही प्रकृतीरूप जगावरील प्रत्येक देवाचा सत्तेपासून होणारे जे परिणाम, त्यांविषयीं आहे, आणि त्यांजवळ जीं मागणीं मागितलीं आहेत, तीं याहूनहि कमी पारमार्थिक आहेत; व बहुधा केवळ संपत्ति प्राप्त व्हावी म्हणूनच आहेत.

महाभारत

भारत हें वेदांची रचना करणारा जो व्यास त्याणें केलें असें म्हणतात; परंतु भारतांतच असा लेख आहे, कीं हा ग्रंथ व्यासानें एका पुरुषास सांगितला; त्यापासून सौतीस मिळाला, आणि मग सौतीनें त्यास साम्प्रतचें रूप दिलें; दुसरें त्याच ठिकाणीं असें वर्णिलें आहे, कीं हालींचा १,००,००० ग्रंथांतून, २४,००० ग्रंथ व्यासकृत आहे. त्यांतील भाषा बरीच सुधारलेली आहे, यावरून हा ग्रंथ फार प्राचीन नाहीं असें सिद्ध होतें; आणि त्यांत यवनांविषयीं उल्लेख आला आहे, (ते जर युनानी म्हणजे ग्रीकलोक असतील, तर) त्यावरून असें दिसतें, कीं भारताचा कांहीं भाग तरी ख्रिस्तापूर्वी ३५० वर्षांचा अलीकडील आहे. आतां ख्रिस्तापूर्वी दोन किंवा तीन शतकें पर्यंत हा ग्रंथ हिंदूंस चांगला माहीत होता, असा एका चांगल्या विचारशील ग्रंथकाराचा अभिप्राय आहे, आणि त्याविषयीं आकांक्षा घेण्यास कांहीं कारण नाहीं. आतां पूर्वोक्त दोनहि ग्रंथ पाहतां त्या दोहींतील नायक हे विष्णूचेच अवतार असें जरी सांगितलें आहे, तरी रामायणामध्यें, राम हा सर्वत्र मानुषीय रूपानें दिसत आहे; आणि कृष्ण, हें मानवाकृति परब्रह्म असें जरी कोठें कोठें वर्णिलें आहे, तरी त्याचा कृतींत कोठें ऐश्वर्य दिसत नाहीं, आणि त्याचें जगन्नियन्त्याशीं साम्य जा जा लेखांत प्रतिपादिलें आहे, ते ते लेख इतर ग्रंथाचा अलीकडील काळचे आहेत, असें म्हणण्यास जागा आहे; या गोष्टींवरून पूर्वोक्त ग्रंथांचा काळाविषयीं कांहींसें ज्ञान होतें.

कोल्ब्रूक साहेबानें जसा दैविक काव्यास दोष दिला आहे, तसाच पूर्वोक्त वीररसपर काव्यांसहि दोष दिला आहे; परंतु त्याखेरीज जा दुसऱ्या विद्वानांनीं ते मूळग्रंथ वाचले आहेत, ते तर अत्युत्साहानें त्यांची स्तुति करितात, आणि त्यांतूनहि जांचे स्वतांचे ग्रंथ उत्तम असल्यामुळें त्यांचे अभिप्राय अतिसत्कारार्ह आहेत, अशांचा अनुभवास पूर्वोक्त

काव्यांतील खुब्या सर्वांहून जास्त आल्या आहेत; आणि जा विद्वानांनीं पूर्वेकडील लोकांचा व्युत्पत्तिविद्येचा अभ्यासांत आपले जन्म घालविले, तेच अशी स्तुति करितात असें नाहीं, तर इतर विद्वानहि तशीच तारीफ करितात; आणि त्यांचा ग्रन्थांवरून आपणास असें समजतें, कीं त्या काव्यांची रचना साधी असून अपूर्व आहे; त्यांतील कित्येक भागांत मागल्भ्य, शोभा, व करुणारस, हीं विशेष आहेत. त्याप्रमाणेंच त्यांत वर्णिलेल्या पुरुषांची योग्यता, त्या वेळचा रीतिभातींची अत्यन्त पवित्रता, आणि त्या ग्रन्थकारांचा कल्पनेचा अलोट ओघ, इतके गुण आपल्यास कळून येतात. यास्तव सदरील मूळग्रंथांचा योग्यतेविषयीं जो निर्णय करणें, तो वरील पुराव्यावरून केला पाहिजे, गद्यात्मक भाषान्तरांवरून करितां कामास नये. इंग्रेजीमध्यें जीं शब्दशः भाषान्तरें आहेत, ( आणि तीं बहुधा रामायणाचीं आहेत, ) त्यांवरून जर ठराव करणें जरूर पडता, तर फकत सरळपणाशिवाय दुसरा कांहीं गुण वरील काव्यांत आहे, असें आपल्याचानें म्हणवलें नसतें; आणि हीं अतिशय नीरस व लांबट चरांटें आहेत, अशीं विशेषणें द्यावीं लागलीं असतीं. कित्येक पद्यात्मक भाषान्तरें झालीं आहेत, तीं पूर्वोक्त स्तुतीस विशेष पात्र आहेत. "ओरिएण्टल मागाझीन" या पुस्तकांत महाभारतांतील कांहीं भागांचें निर्यमक पद्याचा स्वरूपानें भाषान्तर छापून प्रसिद्ध झालें होतें तें शेवटीं सांगितलेल्या भाषान्तरांतलें आहे. आतां त्यांत जरी निवडून काढिलेले वेंचे आहेत, आणि त्यांतील कित्येक मजकूर गाळून तीं सुधारलीं आहेत, तथापि तीं अद्यापि कंटाळवाणीं लांबट आहेत; परंतु त्यांत उत्साहजनक व मधुर असे पुष्कळ लेख आहेत, आणि मुख्यत्वेंकरून त्यांतील उपमा तर त्वरितान्वय, साध्या, व चित्रविचित्र आहेत.

भारतामध्येंच नलदमयंतीची जी उपकथा आहे, ती

साधारण संसारसंबंधीं गोष्ट आहे; आणि लढायांपेक्षां तिचें वर्णन करणे हें हिंदूंचा बुद्धीस विशेष योग्य आहे, त्यामुळें या कथेमध्यें जी सुंदर सरलता आली आहे, ती मासलेदार आहे. साम्प्रतचा भारतांत भगवद्गीता म्हणून दुसरी एक उपकथा आहे. ती मूळग्रंथाहून पुष्कळ अलीकडील आहे अशी अटकळ करितात. ईश्वरीविद्येविषयीं एका विवक्षित दर्शनांतील मतें काव्यरीत्या उद्घाटण्याकरितां या ग्रंथाची प्रवृत्ति आहे, आणि त्यांतील भाषा व दृष्टान्त यांची सुबोधता व् रस, यांची लोक प्रशंसा करितात. आतां सुबोधतेविषयीं, तिची योग्यता कितीहि असो, परंतु मूळ काव्याचा जडपास ही कथा जा युक्तीनें लागू केली आहे, ती युक्ति फार वर्णनीय आहे; व जा गोष्टीचा द्वारानें त्या कथेचा आंत प्रवेश केला आहे, तिचें मार्दव व शोभा हींहि तशींच फार स्तुत्य आहेत.

पुराणांतील जो कथाभाग आहे, तो पूर्वोक्त वीररसपर काव्यांचा जातीचा आहे. "हिंदुपुराणकथांविषयीं शोध" या नावाचा कर्नल केनडीचा ग्रंथांत त्याणें पूर्वोक्त ग्रंथांतील जो भाग घेतला आहे तो रसाळ व अलङ्कारपूरित आहे.

इ० स० १८२६ चा सेप्टेम्बरचा "ओरिएण्टल मागाझीनामध्यें" बोधायनकृत रामायणाचा कांहीं भागाचें मिस्टर एलिस् याणें भाषान्तर केलें आहे, तें दुसऱ्या भाषान्तरांपेक्षां युरोपियन लोकांचा रुचीस विशेष अनुसरून आहे; परंतु त्यांत एका ठिकाणीं टीप घातली आहे तिजवरून तें यथाशब्द भाषान्तर आहे किंवा नाहीं याविषयीं संशय येतो, यामुळें तो हिंदूंचा काव्याचा मासला आहे असेंच केवळ म्हणवत नाहीं.

मेघदूत हा शुद्ध वर्णनपर कवितेचा एक मासला आहे.

वर्णनपर कविता.

त्यांत एक स्वर्गांतून घालवून दिलेला गंधर्व आपल्या स्वर्गस्थ स्त्रियेस एका मेघाबरोबर निरोप सांगून पाठवित आहे; आणि स्वर्गास जातांना

वाटेस जे देश लागणार त्यांचें वर्णन त्यास सांगत आहे.

या काव्यांत, पावसास आरंभ होणें हा जो हिंदूंचा आवडता विषय, तो घेऊन, त्यावर ग्रंथकारानें पाण्डित्य केलें आहे: त्या वेळीं मेघमण्डल जमलें आहे, व विजा कडाडूं लागल्या आहेत; सृष्टीची ग्लानी जाऊन ती टवटवित होत आहे; पर्जन्याचें आगमन झाल्यामुळें कित्येक जीवांस आनंद झाला आहे, आणि क्रौञ्च व दुसरे देशान्तर करणारे पक्षी, जे आकाशाचा उच्च प्रदेशांत फिरत असतात, त्यांचा लांबच लांब हारी लागल्या आहेत; अशा लक्षणांनीं युक्त पर्जन्य येत आहे, असें त्याणें वर्णन केलें आहे. पुढें त्या मेघास जा चित्रविचित्र प्रदेशांवरून व असंख्य शहरांवरून जावयाचें आहे त्यांचें त्याणें वर्णन केलें आहे, आणि त्या त्या प्रदेशांचा संबंधांचा कथा मधून मधून घातल्या आहेत; आणि या सर्व कथेमध्यें त्या स्वर्गबहिष्कृत गंधर्वाचे विलाप, व जा रसांस व सौख्यांस तो मुकला त्यांचा आठवणा, हीं मधून मधून आलीं आहेत.

बहुतेक संस्कृत कवितांपेक्षां मेघदूतांतील वर्णन जरा कमी चघळ आहे खरें; परंतु संस्कृत काव्यावर पाल्लवित-पणाचा जो अन्यत्र आरोप आहे, त्यांतून हें काव्य निभावून जात नाहीं.

जयदेवकृत गीतगोविंद हा मात्र शुद्ध गोपाल विषयक काव्याचा मासला मला माहीत आहे. ऊत आलेली कल्पनासृष्टि आणि विलासी मार्दव, हे जे हिंदूंचा काव्यांतील गुण, आणि उत्साह व गौरव यांचा अभाव, हे जे त्यांचे दोष, ते त्यांमध्यें पूर्णपणें बाहेर आले आहेत. शिवाय त्यांत जा उपमा आहेत त्या फार दूरान्वित आहेत, हें एक त्यांत विशेष आहे; आणि हा ग्रंथकार १४ व्या शतकांत नांदत होता, यावरून कदाचित् मुसलमानांनीं प्रवृत्तींत आणलेल्या शैलीचीं हीं बहुधा चिन्हें असतील असें दिसतें.

गोपालविषयक काव्य.

निंदापर काव्यें.

हिंदूंनीं केलेल्या निंदापर काव्याचा मासला मी कोठें पाहिला नाहीं. त्यांचीं कांहीं नाटकें थोडींशीं या प्रकारचीं आहेत; परंतु त्यांचा नियमित नाटकांमध्यें जे हास्यरसपर भाग प्रसंगवशात् घातलेले आहेत, ते बोजड आहेत, त्यांवरून या प्रकारचा काव्यांमध्यें त्यांची बुद्धि विशेष चालली असेल अशी अटकळ माझानें करवत नाहीं.

गोष्टी व दन्तकथा.

वर सांगितलेल्या ग्रंथांशिवाय दुसऱ्या पुष्कळ संस्कृत पद्य ग्रंथांचीं भाषान्तरें झालीं आहेत; तरी आतां या विषयावर बरेंच व्याख्यान झालें आहे, आणि अशा व्युत्पत्तिविद्येचा आधारावरून लोकांचा स्थितीविषयीं जे अभिप्राय मनांत आणावयाचे ते विशेष उपयोगाचे नाहींत हें समजून, आतां हा विषय पुरे करणें योग्य आहे. परंतु हिंदूंचा गोष्टी व दन्तकथा हा जो त्यांचा व्युत्पत्तिविद्येचा भाग सांगावयाचा राहिला आहे, तो फार मोठा आहे, आणि या दोन प्रकारचीं व्याख्यानें करण्याची विद्या त्यांणीं इतर सर्व मनुष्यजातीस शिकविली असें दिसत आहे; म्हणून, त्या दोहींचें वर्णन केलें पाहिजे. आमचा युरोपीयन लोकांत अति प्राचीन असून विद्यमान अशा जा बिद्पैचा गोष्टी आहेत, त्या मूळ संस्कृतांत थेट तशाच आहेत[३], आणि त्यांवरून इतर देशांतील तशा गोष्टी रचल्या आहेत, असा पत्ता पक्का लागला आहे. "आरेबियन् नैट" सारिख्या, गोष्टींत गोष्टी सांगण्याची जी योजना, तीहि हिंदूंनींच काढलेली आहे, आणि युरोपांतील व पूर्वेकडील देशांतील कथांचे विषय त्यांचे आहेत, त्या कथा त्यांचा देशभाषेंत पाहिल्या असतां सरळ आहेत, आणि त्यांत उत्साह व गौरव हींहि नाहींतशीं नाहींत. साम्प्रत असें वर्णन करण्याची शैली अगदीं बदलून गेली आहे, आणि जे रसभरित व

---

(३) त्या बहुधा पंचतंत्रांत आढळतात. भा० क०.

चित्रविचित्र अलङ्कार आरबी व फारसी कथांस इतक्या मोहक करितात, ते हिंदूंचांत मुळींच नाहींसे झाले आहेत, ही गोष्ट मात्र लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

---

# प्रकरण सातवें.

## नाजूक कला

### गायन.

हिंदूंचा गायनविद्येविषयीं सर्विलियम्‌जोन्स व मिस्टर पार्टस यांणीं वर्णन केलें आहे. त्या वर्णनावरून ती विद्या पद्धतवार व सुधारलेली आहे असें दिसतें.

हिंदूंचा गायनांत ८४ राग आहेत, त्यांतून ३६ साधारण वहिवाटींत आहेत. प्रत्येक रागाची ठेव विशिष्ट आहे, आणि त्यापासून विवक्षित रस म्हणजे भाव उत्पन्न व्हावा, अशी त्यांत शक्ति आहे असें दिसतें.

त्यांचीं नावें वर्षांतील ऋतूंवरून व अहोरात्रांतील मुहुर्तांवरून ठेवलेलीं आहेत; आणि प्रत्येक राग हा, त्या त्या विवक्षित काळींच गावा, असा त्यामध्यें कांहीं गुण आहे असें म्हणतात.

जशा हिंदुस्थानांतील इतर विद्या उतरत्याकळेस आल्या आहेत, त्याप्रमाणेंच गायनविद्या ही खरजांत आली आहे; आणि साम्प्रत जे राग गातात, ते जर अशिक्षित मनुष्यानें ऐकिले, तर त्यांत कांहीं इतके भेद आहेत अथवा एवढी गुतागुत करून रचना केली आहे, असें कानास लागत नाहीं. ते बहुतेक एका प्रकारचे आहेत; त्यांत बरेंच माधुर्य व काकळुतपणा आहे, आणि ते दुसऱ्या कोणत्याहि लोकांचा गीतांपासून ओळखतां येतात. जर त्यांचें वास्तविक स्वरूप जाणणें असेल, तर ते एका मनुष्याकडून वीण्यावर गाववून ऐकिले पाहिजेत.

साधारण गाण्याचा प्रसंगीं सारंग्या व पखवाज

असतात; त्यांचा आवाज मोठा व कर्कश असतो. त्या नादांत गायकांचा शब्द गुरून जावा ह्मणून त्यांना इतकी उंच टीप घ्यावी लागत्ये, कीं तेणेंकरून सर्व मार्दवाचा नाश होतो.

## चित्रें काढणें.

हिंदुस्थानामध्यें चित्रें काढण्याची कला अद्यापि बाल्यावस्थेंत आहे. घरांचा भिंती बहुधा पाण्यांत केलेल्या रंगांनीं, आणि केव्हां केव्हां तेलांतल्या रंगांनीं, चित्रविलेल्या असतात. पुराणांतील कथा, लढाया, स्वाऱ्या, पेहेलवानांचा कुस्त्या, स्त्रिया, पुरुष, व जनावरें, या सर्वांचीं चित्रें काढिलेलीं असतात. त्या चित्रांचा बाजूंस इतर प्रदेश मुळींच नसतो; अथवा असल्यास, कोठें एखादुसरें झाड नसतें; अथवा दृष्टिशास्त्राचे नियम मनांत न आणितां, आणि कोठें रंगांची छाया कशी कमजास्त असावी तिकडे लक्ष न देतां, एकादें घर मध्येंच लोटून दिलेलें असतें. यांसारिखीं चित्रें मिश्री लोकांचा थड्यांचा भिंतींवरून आहेत, त्यांशिवाय दुसऱ्या लोकांमध्यें यांचा चित्रविद्येस उपमा देण्यास दुसरें कांहीं नाहीं. याखेरीज हे चुन्यांत दुसरे रंग व कांहीं चिटक पदार्थ मिसळून त्या रंगानें लहानलहान चित्रें काढितात, त्यांत मनुष्यांचा तसबिराहि असतात. हिंदुलोकांजवळ सुंदर मुलामा दिलेलीं हातानें लिहिलेलीं पुस्तकें पुष्कळ आहेत; परंतु त्यांवर जीं चित्रें काढिलीं आहेत, त्यांपेक्षां त्यांवरील इतर नक्शी सरस आहे. हिंदूंचा नाटकांमध्यें तसबिरांविषयीं पुष्कळ उल्लेख आले आहेत; ते जर नसते, तर ही कला त्यांणीं मुसलमानांपासून घेतली असा संशय मला वाटला असता. आतां मुसलमानांचा धर्मांत तसबीरांचा निषेध आहे, असें असून त्यांणीं त्या विद्येंत हिंदूंस फार मागें टाकिलें आहे.

## चित्रें खोदणें.

हिंदूंसारख्या अनेकेश्वरमतपरायणांमध्यें दगडाचीं

चित्रें कोरण्याची कला उत्कृष्ट पूर्ण दशेस यावी अशी कोणी-हि अटकळ करील; आणि, या कलेंतील निपुण लोकांस आपली बुद्धि खरचण्यास कांहीं उद्योग नव्हता म्हणून ती कला या देशांत उत्कृष्ट दशेस आली नाहीं असें खचित नाहीं. ती उत्कृष्ट दशेस न येण्याचीं कारणें निराळींच आहेत. या लोकांनीं असंख्य मूर्ति केल्या आहेत, व शिवाय सर्व विहारांमध्यें व देवालयांमध्यें दगडांचे पुतळे व पर्वत कोरून त्यांतून चित्रें सोडविलीं आहेत. हीं सोडविलेलीं चित्रें बहुधा घत्रचवित असनात; कांहीं नानाप्रकारमिश्रित असतात, व पुष्कळांत मानवांचा वृत्ति दाखविणारीं रूपें काढलेलीं असतात. कित्येक चित्रें मोठीं खुबीदार असतात; आणि अशा खोदींव अथवा काढलेल्या चित्रांतून कांहींचा आकृतीचें व चर्येचें गौरव मासलेदार असतें. आतां हिंदूंस शारीरकाचें अगदींच ज्ञान नाहीं; स्नायू व अवयव यांचा उघड दिसण्याजोग्या स्वरूपाकडेहि ते लक्ष देत नाहींत; निरनिराळ्या आकृतींचा मानाकडे अगदीं दुर्लक्ष करितात; आणि चित्रांचा समाज कसा करावा तें कौशल्य त्यांमध्यें नाहीं; या सर्व कारणांमुळें उत्कृष्ट खोदींव हिंदु पुतळे युरोपीयन पुतळ्यांशीं अगदीं दूरूनहि साम्य पावणार नाहींत.

---

## शिल्पशास्त्र.

हिंदूंनीं बांधलेल्या इमारती पुष्कळ आहेत, त्यावरून त्यांस शिल्प माहीत होतें असें सिद्ध होतें. त्यांचा शिल्पसंबंधी पुस्तकांतून कांहीं भाग राहिले आहेत, त्यांत जें लिहिलें आहे तें ग्रहण केलें असतां, ही विद्या प्राचीन काळींच हिंदूंस अगवत होती असें दिसून येतें.

रामराज नामें एका एतद्देशीय गृहस्थानें शिल्पावरील विद्यमान ग्रंथांविषयीं एक विचारपूर्वक व कांहीं न छपावितां निबंध लिहिला आहे, त्यांत त्यांणीं शिक्षित क्रमाचें

उत्कृष्ट उद्घाटन केलें आहे. त्यावरून असें दिसून येतें, कीं या शास्त्राचीं मूलतत्त्वें हिंदूंस चांगलीं समजलीं होतीं, आणि त्यांवरून त्यांणीं पुष्कळ नियम बसविले होते.

( १ ) उपान; ( २ ) कम्प; ( ३ ) गळ, कण्ठ, ग्रीव, अथवा कन्धर; ( ४ ) उत्तर; ( ५ ) वाजिन; ( ६ ) प्रतिवाजिन; ( ७ ) पत्थिक; ( ८ ) आलिङ्ग; ( ९ ) अन्तरित; ( १० ) कुमुद; ( ११ ) पद्म; व ( १२ ) कपोत; याप्रमाणें ( १२ ) प्रकारचे कङ्गोरे सांगितले आहेत. यांतून कांहीं प्रकार इंग्रेजलोकांत आहेत, व कांहीं विशिष्ट आहेत. उपथित्थें ( म्ह० उथळीं ), अथिस्थानें ( म्ह० बैठका ), स्तम्भमध्यभाग, बोधिक ( म्ह० शिरोभाग ), व लग, या सर्वांचे आकार व परिमाणें हीं दिलीं आहेत. कित्येक ठिकाणीं यांचा भरणा मोठाच आहे: नुसत्या बैठकांचे चौसष्ट प्रकार सांगितले आहेत. स्तंभांचे नियमित प्रकार नाहींत, परंतु स्तम्भमध्यभागाचा तळाचा व्यासाचा सहापासून दहा पट स्तंभाची उंची धरितात; आणि तिचा मानाप्रमाणें शिरोभाग, खणांची रुंदी, इत्यादि ठरवितात. हिंदुशिल्पाचे नियम सांगण्यास एथें अवकाश नाहीं. साम्प्रत हिंदुस्थानांत जा एतद्देशीय इमारती आहेत, त्यांविषयीं साधारण अभिप्राय मात्र मी देतों. या इमारतींची धरती मिश्री इमारतींचा सारिखी आहे अशी अटकळ करितात; परंतु जशा एथील इमारती व त्यांचें सामान हीं औजड आहेत, व त्यांतून कित्येकांत खोदींव काम पुष्कळ आहे, त्याचप्रमाणें मिश्रींत आहे, एवढें मात्र यांचें व त्यांचें साम्य आहे. दोन्ही देशांमध्यें दिंडीदरवाजांवर उंच बुरूज बांधण्याचा पाठ आहे, परंतु मिश्र देशांत दरवाजाचा प्रत्येक बाजूस एक बुरूज असतो, व हिंदुस्थानांत फक्त दरवाजावर मात्र असतो; मिश्र देशांतील कांहीं थोड्या स्तंभांसारिखे स्तंभ हिंदवी विहारांतील देवालयांत आहेत; इतकींच हिंदवी व मिश्री शिल्पांमध्यें साम्यें सांपडतात.

मिश्री इमारतींत पिरिमिडांचा उपयोग करितात, आणि प्रत्येक इमारतीचा बाजू शिखरापर्यंत आंत कललेल्या असतात, व त्या जा सपाट छावणीस जाऊन मिळतात, त्या छावणीचा गलथा घवघवीत व खोल असतो. मिश्री शिल्पांतील पूर्वोक्त दोन विशिष्ट प्रकारांतून एकहि हिंदुस्थानांत नाहीं. पुष्कळ देवळांचा समोरचे सभामण्डप गायदूम घुमटाकृति असतात, परंतु ते घुमट आंतून पोकळ असून, त्यांस भिंतींचा अथवा स्तंभांचा आधार असतो. पिरिमिडाकृति भरींव घुमट मुळींच कोणास ठाऊक नाहींत; आणि आतां सांगितलेल्या पोकळ घुमटांवरहि पुतळे वगैरे शोभा करितात, त्यामुळें मिश्री व या पिरिमिडांत अगदींच साम्य नाहींसें होतें. त्यांचा भिंती हमेशा उभ्या लम्बाकृति असतात, आणि देवळांचीं शिखरें हळू हळू लहान होत जातात त्यांचा प्रकार कांहीं विशेष आहे.

दक्षिणहिंदुस्थानांत पूर्वोक्त देवळांवरचा बुरुजांस (म्ह० शिखरांस) मजले असतात, त्यांतील प्रत्येक वरचा मजला त्याचा खालचा मजल्यापेक्षां तोकडा असतो. गोदावरीचा उत्तरेस जीं देवालयें आहेत, त्यांचीं शिखरें बहुधा वर गायदूम होत जातात; परंतु त्यांचा बाजूंस बाहेरून कङ्गोरा असतो, त्यामुळें त्या शिखरांचा तळांपेक्षां मध्यावर मोठा फुगवटा येतो. त्यांचा शेवट अगदीं अणीदार नसतो; परंतु त्यावर एक चपटा घुमट असतो, अथवा दुसरें कांहीं विचित्र शिखर असतें, आणि त्यावर हमेशा मुलाम्याचा उंच घुमट, अथवा त्रिशूल, अथवा त्या देवाचें दुसरें विशिष्ट चिन्ह असतें. देवालयाचा इतर भागापेक्षां शिखर साधेंच असतें, परंतु तें अगदीं साधें असतें असें नाहीं; बहुधा त्यास पुष्कळ कळस असतात, व दुसरी नानाप्रकारची शोभा आणलेली असत्ये.

देवालयांतील जो गर्भारा असतो तो हमेशा लहान व

(१) एका प्रकारचे गायदूम घुमट. भा० क०.

बहुधा घनाकृति असतो. त्याला एक दरवाजा असतो, त्याणें आंत उजेड येतो न येतो. देवापुढें जें ठेवणें असेल तें त्या दरवाजानें येऊन आंत, किंवा दरवाजांतच ठेवितात; आणि प्रार्थना करणें असेल ती तेथें करितात. फार लहान देवालयांमध्यें फकत गर्भारा मात्र असतो; परंतु मोठ्यांमध्यें त्या गर्भाऱ्यावर मोठा घुमटी कळस असतो, आंत येण्यास मध्यें विस्तीर्ण सभामण्डप असतात, आणि सभोंवार सभामण्डप व स्तंभावलि असतात; त्यांमध्यें दुसरीं देवालयें व धर्मशाळा वगैरे असतात. श्रीरङ्गगांव एथील देवालयास सात पोंवळ्या आहेत, त्यांतून अगदीं बाहेरचीचा परिघ जवळजवळ दोन कोश आहे. त्या सभामण्डपांत व देवाजवळ जाण्याचा वाटेंत, असे खण पाडलेले असतात, कीं प्रत्येकास स्तंभांचा पुष्कळ रांगा लागतात. ते स्तंभ बहुधा उंच, बारीक, नाजूक व चांगले जडलेले असतात; जशा कांहीं ताडांचाच रांगा लागल्या आहेत अशा दिसतात.

साधारण खण बहुधा त्यांहून कमी उंचीचे असतात, आणि त्यांत व पुष्कळ दुसऱ्या स्थलीं, नक्शीदार खांब असतात; ते गोल, चौरस, व अष्टपेलू, अथवा तीनहि मिसळलेले असतात. केव्हां केव्हां कुण्ड्यांसारिखे कापलेले असून, त्यांवर वेली सोडविलेल्या असतात; केव्हां त्यांवर जनावरांचा आकृति काढलेल्या असतात, आणि केव्हां त्यांत भरीस माणसांचे थवे असतात.

देवालयाचा जो विशेष मजबूद भाग असतो, तेथें गोल व चौरस स्तंभांचे पुष्कळ झुबके असतात, आणि तेथील कोंपरे फार आंत गेलेले व बाहेर आलेले असतात, त्यामुळें वरील गलथ्यास तेथेंच बांक येऊन तें काम भव्य व चित्रविचित्र दिसतें. दरवाजांचा चौकटी व उंबरठे, फळ्या व दुसरे भाग, यांचा सभोंवार व त्यांवर, कंगोरे उठविलेले असतात; आणि झाडें, फुलें, फळें, मनुष्यें, जनावरें, व कल्पित भूतें, यांचीं असंख्य चित्रें त्यांवर कोरलेलीं असतात. सारांश,

अतिशय कल्पनेनें जितके आराश सुचतात, ते तेथें आणले-ले असतात. वरील चित्रांत झाडें व वेली हीं जीं सोडविलेलीं असतात, तशा सफाईचे मासले पृथ्वीवर इतर जागीं विरळाच मिळतील.

पुष्कळ ठिकाणीं भिंतींवर चित्रें सोडविलेलीं असतात; त्यांत देवांचा लढाया व दुसऱ्या कथा हुबहु दाखविलेल्या असतात. त्याचप्रमाणें लगीचा खालचा बाजूनें कथांतील चित्रें काढतात, तेणेंकरून लगीस अधिक शोभा येत्ये.

एकाद्या ठिकाणीं, वर सांगितलेल्या प्रकारचीं देवालयें पुष्कळ बांधलेलीं असतात. यास दृष्टान्तः— ओढ्या देशांत भुवनेश्वर म्हणून स्थान आहे, तेथील मोठ्या देवळाचा कळसापासून कोणीकडे जरी पाहिलें, तरी पन्नाससाठ दगडी कळस दिसतात. त्यांतून एकाचीहि उंची पन्नाससाठ फुटींहून कमी नाहीं, आणि कांहीं १५० पासून १८० फुटी उंच आहेत.

तुङ्गभद्रेचा डाव्या किनाऱ्यावर विजयनगर एथें जे देवळांचे कळस आहेत, ते यांहूनहि भव्य आहेत.

जरी हिंदूंचीं देवळें फार मोठीं असतात, तरी प्राचीन ग्रीक देवळांची साधी शोभा व सुरेखपणा, अथवा मुसलमानी मशीदींचे फुगलेले घुमट व उंच मेहराबा यांची भव्यता, यांची बराबरी त्यांचानें होत नाहीं. जे भाग लांबरुंद असतात ते उंच नसतात, आणि उंच असतात, ते अरुंद असतात; निरनिराळ्या भागांची जुळणी चांगली केलेली नसत्ये; आणि हिंदूंचा सर्व शिल्पकामांकडे पाहिलें म्हणजे अशी खातरी होत्ये, कीं जशी इतर कृत्यांत बारीक कामाची सफाई व सौंदर्य यांकडे हिंदूंची नजर असत्ये परंतु एकंदरावर त्यांची कल्पना चालत नाहीं, त्याचप्रमाणें शिल्पामध्येंहि त्यांची अवस्था आहे. विहारांतील देवालयांमध्यें मात्र कल्पनेचें प्रागल्भ्य व भव्यता हीं दृष्टीस पडतात.

देवळांचे जे कांहीं चांगले मासले आहेत, त्यांवरून तीं

फार प्राचीन काळचीं व पवित्रतेचीं स्थानें होतीं, असा पाहणाराचा मनावर ग्रह होतो; आणि त्या ठिकाणीं जो विलक्षण गूढपणाचा आविर्भाव उत्पन्न होतो, तो व्हावा असें त्या धर्माचें स्वरूप नाहीं, व त्यांतील प्रतिदिवसाचा संस्कारांचा अति परिचय झाल्यावर व्हावा अशी त्यांची योग्यताहि नाहीं.

जरी अर्वाचीन काळचा बांधणीचा देवळांत मुसलमानी ढबीची मिसळ आहे, तरी त्यांचें साधारण स्वरूप चमत्कार वाटण्याजोगें अपूर्व आहे, व तशीं बांधपें दुसऱ्या कोणत्याहि लोकांत नाहींत. यावरून या देशांत शिल्पाचीं मूलतत्त्वें प्राचीन काळीं पक्कीं समजलीं होतीं असें अनुमान आपण केलें असतां चालेल. परंतु जा भव्य इमारतींची साम्प्रत तारीफ होत्ये त्या फार जुनाट आहेत असें मानण्यास कारण दिसत नाहीं. पर्वतांतील विहारेंहि अति प्राचीन आहेत असें नाहीं. त्यांत जे कोरींव लेख आहेत, त्यांची लीपि ख्रिस्तापूर्वी निदान तीन शतकांचा पलीकडे चालू होती, व ती साम्प्रत वहिवाटींत नाहीं. त्या लेखांवरून असें दिसतें, कीं बौद्धांचीं विहारें ख्रिस्ती शकाहून जुनीं आहेत; परंतु जीं हिंदूंचीं आहेत, त्यांचा भिंतींवर जीं पौराणिक चित्रें काढलेलीं आहेत त्यांवरून, तीं निदान इसवी सनाचा आठव्या किंवा नवव्या शतका इतकीं अर्वाचीन आहेत असें निःसंशय दिसतें. मद्रासेचा दक्षिणेस महाबलिपुरम्[अ] एथें जें खोदींव काम आहे, तें अति प्राचीन काळचें असें म्हणतात; परंतु तें जेथें आहे तेथील लोकांत जा कथा चालू आहेत त्यांत तें ख्रिस्तानंतर बाराव्या किंवा तेराव्या शतकांत केलें असें आहे; आणि तेथील इमारतींचा भिंतींवर जें खोदींव काम आहे, तें वरील कथांचा खरेपणा पक्का शाबीद करितें.

बांधलेल्या देवालयांतून जीं कांहीं अति विख्यात

(अ) हा शब्द मूळाप्रमाणें घातला आहे. भा० क०.

आहेत, तीं फार अर्वाचीन आहेत. ओढ्यादेशांतील जग-न्नाथाचें देवळ ( जाची आपण इतकी आख्या ऐकतों तें ), व त्याच प्रान्तांतील " काळें देवळ " हीं हिंदूंचा अति प्राचीन देवालयांतील आहेत, असा लेख आहे; असें असून यांतून पहिलें इ० स० ११९८ त व दुसरें इ० स० १२४१ त पुरें झालें, हें प्रसिद्ध आहे. इतर मोठ्या देवळांतून पुष्कळ यांहून विशेष प्राचीन आहेत, हें निःसंशय आहे; तीं फार प्राचीन आहेत असें खातरीजोगें एका विषयींहि प्रमाण नाहीं, आणि तीं प्राचीन नाहींत असें अनुमान करण्यास कारणें आहेत.

आतां देवालयांपेक्षां राजमंदिरें बांधण्यामध्यें त्यांणीं बाहेरील कित्ते पाहून विशेष फेरफार करावे; परंतु जरी त्यांतूनहि अर्वाचीन काळीं बांधलेलीं पुष्कळ आहेत, तरी त्यांचें स्वरूप हिंद्वीच आहे.

यांतील अति प्राचीनांमध्यें कांहीं बेतबात दिसत नाहीं. अथवा त्यांत मूळीं कांहीं बेत असल्यास, तीं वारंवार वाढविल्यामुळें मूळचा बेत नाहींसा झाला आहे. हीं कामें बहुधा बळकट असतात, आणि त्यांना गच्चा असतात, त्यामुळें मजले चढविण्यास सोपें पडतें; तेणेंकरून तीं लांबीनें वाढून त्यांची उंचीहि फार मोठी होत्ये, व त्यांत बेशिस्तपणा पुष्कळ असतो.

या इमारतींत बहुधा लहानलहान चौक व त्यांसभोंवते उंच महाल असतात. केव्हांकेव्हां पुढें नुसतेच चौक असतात, व केव्हां त्यांसभोंवार यथायोग्य झाडांचा हारींची छाया असत्ये. ( प्रत्येक चौकासभोंवार दाट स्तंभावलि असत्ये. )

दरबारचे मोठे महाल माडीवर असतात; ते मुसलमानी दिवाणखान्यांसारिखे नसतात, आमचां सारिखे असतात. जिने अरुंद असतात, व त्यांचा पायठण्या दूर दूर असून त्या भिंतीचा मधून काढून नेलेल्या असतात.





वरील उल्लेख हिंदूंचा घरांसहि लागू पडतील, परंतु शिल्पशास्त्राचा विषयांत त्यांचा विचार करावा इतकी त्यांची बहुधा योग्यता नाहीं.

श्रीमानांचा घरांस एकदोन चौक असतात, व त्यांसभोंवते महाल असून, वर बहुधा हमेशा गच्चा असतात. केव्हां केव्हां त्यांस नुसत्या चुन्याचाच गिलावा असतो, केव्हां ओंघट तांबूस रंगाचा असतो, व भिंतीवर झाडें व दुसरीं पौराणिक वगैरे चित्रें काढलेलीं असतात. परंतु सगळीं इतकीं दाट व अव्यवस्थित असतात, कीं त्या अव्यवस्थेची कल्पनाहि करवणार नाहीं.

आतां जे तलाव हिंदूंनीं पाण्याकरितां बांधिले आहेत, त्या त्यांचा अति मोठ्या इमारती आहेत असेंहि म्हटलें असतां चालेल. या तलावांचे दोन प्रकार आहेतः— जमीन खोदून पाडलेले जे तलाव, ते पहिल्या प्रकारचे, व खोऱ्यांचीं वाहणीचीं तोंडें बांधून पाणी फुगवून जे केलेले, ते दुसऱ्या प्रकारचे. पहिल्या प्रकारचांस सभोंवार दगडी अथवा दुसऱ्या कशाचा पायठण्या असतात; त्या पाण्यापर्यंत व बहुधा प्रत्येक बाजूचा लांबीचा शबलाशबल असतात, आणि पुष्कळ ठिकाणीं कडेनें देवळें असतात, व कोठें घाटांमध्यें देवळ्या असतात. दुसऱ्या प्रकारचांत अशीं देवळें वगैरे बंधाऱ्यांवर मात्र असतात. खणलेले तलाव हे बहुधा गांवांजवळ स्नान वगैरे कामांकरितां बांधलेले असतात, परंतु ते शेतकीचाहि कामास येतात. दुसऱ्या प्रकारचे तलाव, म्हणजे धरणें, हीं हमेशा शेतकीकरितां बांधतात. त्यांतून कांहीं मोठीं प्रचण्ड कामें आहेत, आणि त्यांचा बंधाऱ्यांची उंची व बळकटी हीं दोन्हीं पाहिलीं असतां तीं उत्कृष्ट आहेत. त्यांतून कांहींचे परिघ पुष्कळ कोश असून तीं सरोवरेंच बनलीं आहेत; त्यांचें पाणी मोठाल्या प्रदेशांस पुरतें.

हिंदूंमध्यें एक चमत्कारिक तऱ्हेची विहीर असत्ये. तीची ओंडी बहुधा फार असून रुंदीहि बरीच असत्ये.

अलीकडील विहिरी बहुधा वाटोळ्या असतात, परंतु त्यांहून प्राचीन आहेत त्या चौरस आहेत. त्यांचा सभोंवार उमदे व भक्कम कठडे असतात. पुष्कळ ठिकाणीं पायठण्या असतात; त्यांचा आरंभ विहिरीपासून कांहीं अंतरावर होऊन, त्या, कठड्याखालून, पाण्यापर्यंत जातात.

हिंदूंचे जे अतिशय खुबीदार पूल आहेत, त्यांचे खांब दगडी आहेत, व त्या खांबांवर धक्के करून त्यांवर दगडी बहालें टाकून जोडलेले आहेत. असे पूल दक्षिणहिंदुस्थानांत पुष्कळ आहेत. दुसऱ्या एका प्रकारचे पूल आहेत त्यांतील मधला बांध दगडी चुनेगच्ची कामाचा असतो, व त्यास एकेरी मेहेराबदार कमानी असतात; परंतु या पुलांचें प्राचीनत्व संशयग्रस्त आहे, आणि दगडांचा एका थरावर दुसरा जरा वाढता थर, असे रचून प्राचीन हिंदु काय कमानी करित असतील त्या असोत, परंतु त्यांशिवाय त्यांना कमानी माहीत होत्या, अथवा त्यांस घुमट करतां येत होते, असें कांहीं दिसत नाहीं.

युद्धामध्यें जय झाला असतां जा कमानी व जे विजयस्तम्भ उभारित असत, तोहि हिंदूंचा शिल्पाचा एक प्रकार होय. असा एक उत्तम नक्षीदार स्तम्भ चितूरास आहे, त्याची उंची १२० फुटी आहे. अशाच विजयस्मारक कमानीचा एक उत्कृष्ट मासला उत्तरगुजराथेंत वडनगर एथें आहे. तो हिंदूंचा शिल्पकौशल्याचा उत्तम नमून्यांतील एक आहे.

---

# प्रकरण आठवें.

## दुसऱ्या कला.

हिंदुस्थानांतील इतर कारखान्यांपेक्षां कापड विणण्याचा कारखान्याची प्रख्याति अतिशय आहे. एथील कापडाचा सौंदर्याची व नाजूकपणाची फार

कापड विणणें.

दिवस तारीफ होत असे, आणि एथील कापडाचा सफाई जवळ इतर कोणत्याहि देशांतल्याची सफाई अद्यापि झाली नाहीं.

हिंदुलोक रेशमाचें काम फार उत्कृष्ट करित असत; आणि हें कसब यांजवळ फार प्राचीन काळापासून आहे, व रेशीम कसें उत्पन्न करितात त्याचेंहि तेव्हांपासूनच यांस ज्ञान होतें असें संभवतें.

सोनेरी व रूपेरी जरीचें कामहि यांस चांगलें साधत असे, आणि हें काम प्रथम हिंदुस्थानांत होऊं लागलें असेंहि कदाचित् संभवतें.

रंग देणें. हिंदुलोकांजवळ जसे कांहीं उमदे व पक्के रंग आहेत, त्यांचा बराबरीचे अद्यापिहि युरोपांत झाले नाहींत.

सोन्याचें काम करणें. हिंदूंची रीझ बारीक कामावर आहे, यामुळें त्यांस सोन्याचें काम उत्कृष्ट साधलें आहे.

या देशांत स्वाभाविकच रत्नें पुष्कळ सांपडतात त्यामुळें या लोकांची जवाहिराविषयीं ख्याति झाली आहे, त्यांचा कौशल्यावरून झाली नाहीं; असें म्हणण्याचें कारण असें कीं या कामांत त्यांची रीझ इतकी वाईट आहे कीं त्यांस पिवळीं मोत्यें व हिरे पसंद वाटतात; आणि जरी ते खडे लावून फार घवघवित दागिने करितात, तरी त्यांची खडे बसविण्याची तऱ्हाहि बरीच अनाडी आहे.

सर्व कसबें करण्याचा हिंदूंचा रीति फार साध्या आहेत, आणि त्यांस साहित्य थोडें लागून तें अल्पायासानें बराबर नेतां येतें. कोणास लोहाराचें काम लागलें कीं तो आपली ऐरणी व चमत्कारिक भाता घेऊन त्या घरीं जातो. त्याहून अल्प श्रमानें सुतार आपलें काम करितो; कारण त्यास जमीनीवर काम करावयास सांपडतें, आणि जी वस्तु

धरावयाची असेल, ती, तो हातांनीं अथवा पायांचा बोटांनीं सारखीच धरूं शकतो.

---

# प्रकरण नववें.

## शेतकी.

या देशांतील जमीन व हवा चांगली यामुळें एथील शेतकीचें काम फार साधें आहे. एथील शेतकरी, हा आपला नांगर दर रोज डोक्यावर घेऊन शेतावर जातो, आणि दोन लहानसे बैल जोडून दाणा पेरण्यास उथळ तास पाडितो. पेरणीचें काम पुष्कळ ठिकाणीं पाभरेनें करितात, व तिचा पांच सहा नळकंड्यांतून दाणे पडतात. मग एका फळीवर अथवा दांताळ्यावर मनुष्य बसून गुठें फिरवितात. पावडें, कुदळ, व दुसरें थोडें सामान असलें, ह्मणजे शेतकीचीं आउतें झालीं. कापणी खराळीनें करितात; व मळणी गुरांचा पायांखालीं तुडवून करितात, आणि तें धान्य गाड्यांनीं घरीं आणून जमीनींत मोठ्या सुक्या पेंवांत भरून ठेवितात. प्रत्येक शेताचा हद्दीचा निशाण्या तजविजेनें केलेल्या असतात; परंतु शेतांस बहुधा बांध नसतात; आणि कोठें कोठें निरनिराळ्या जातींचीं पिकें असतात तो फेरबदल खेरीज करून, बाकी शेतें एकसारखीं लागलेलीं असतात.

आतां जरी हिंदुस्थानांतील शेती याप्रमाणें साधी आहे, तरी तिजमध्यें कांहीं विशेष गुण आहेत त्यांमुळें त्या देशांत जें कौशल्य व जो उद्योग लागतो तसा इतर देशांत लागत नाहीं, आणि कांहीं प्रकारची शेतकी आहे, ती मुळींच पूर्वीं सांगितली तिचा प्रमाणें सोपी नाहीं.

उन्हाळ्यांतील जित्रबास पाहिजे तितकें पावसाचें पाणी सांपडतें; हिंवाळ्यांतील बहुतेक पिकांस कृत्रिम उपायांनीं पाणी लावावें लागतें. हें पाणी, नद्या, ओहोळ, व तळीं,

यांतून आणितात; परंतु बहुतकरून विहिरींचें घेतात. या देशाचा उत्तम भागांत प्रत्येक शेतांत एक विहीर असत्ये, तींतून पाणी काढून पाटांनीं नेतात, आणि मातीचे बारीक बांध घालून केलेल्या लहान लहान वाड्यांनीं लावितात. विहिरींतून पाणी काढावयास मोट लावितात, व तिला बैल जुंकितात. अशा मोटेंत बहुधा अशी युक्ति केलेली असत्ये, कीं ती वर आली ह्मणजे आपोआपच रिकामी होत्ये.

कित्येक जमीनींतील रान काढण्याकरितां ती तीन-चार वर्षांनीं बेणावी लागत्येः जेव्हां ओलाचा दम जमीनींत चांगला असतो, त्या हंगामांत त्या बेणणीस मोठे नांगर घेऊन त्यांस रेडे जुंकितात, व खोल तास घेतात. साधारण शेतकीस खत घालित नाहींत, परंतु उंसाचा व दुसऱ्या शेतकीस पुष्कळ खत लागतें. पुष्कळ प्रकारचा शेतांस चांगल्या तजविजेनें कुंपण करावें लागतें; केव्हां केव्हां त्यांसभोंवती चिखलधोंड्याचा भिंती करितात, परंतु बहुधा निवडुंग, थुवर, कोरफड व दुसरीं मजबूद कांटेरीं झाडें व दुसरीं कांटेरी झुडुपें व वेली, यांचें उंच कुंपण करितात; त्यांतून कोणाचा आंत प्रवेश होत नाहीं.

शेतांत पाखरें येऊन नाश करितात म्हणून त्यांस हाकण्यास मोठी मेहेनत घ्यावी लागत्ये; परंतु कितीहि केलें तरी तीं पुष्कळ पिकाचा नाश करितात. त्यांस भेवडावण्याकरितां कांहीं बाहुलीं करून ठेवितात, त्यांपासून कांहीं कार्य होतें, परंतु मुख्य भिस्त राखणदारावर असत्ये; त्यास शेताजवळ एक उंच माच करून दिलेला असतो. तेथें उभा राहून तो ओरडत व गोफणीनें धोंडे मारित असतो. त्या गोफणीचा प्रत्येक फटकाऱ्यास "फा३ड(ब)" असा शब्द व्हावा अशी ती केलेली असत्ये.

एकाच जमीनीवर निरनिराळ्या प्रकारचीं धान्यें

(ब) या शब्दांत ३ ही प्लुत स्वराची खूण आहे. भा० क०.

फेरपाळीनें कशीं करावीं हें हिंदूंस समजतें; परंतु त्यांचा जमीनीचें सत्त्व अक्षय्य आहे, त्यामुळें बहुधा तसा फेरपालट करण्याचें कारण पडत नाहीं. ते जमीनीचा प्रती अति सूक्ष्मदृष्टीनें लावितात; आणि प्रत्येक जमीनींत कोणतें जित्रब उत्तम होईल व ती जमीन कशी कसावी याची त्यांस चांगली माहिती आहे. एका शेतांत निरनिराळ्या प्रकारचीं धान्यें मिसळून पेरण्याची त्यांची एक असमंजस चाल आहे; त्या धान्यांचीं पीकें केव्हां केव्हां एकदम येतात, व केव्हां केव्हां एकामागून एक येतात.

जा गोष्टींचें वर्णन वर आलें आहे, त्या गोष्टी फौजांस व मार्गस्थांस अडचणी करितात. यास दृष्टान्तः— कित्येक ऋतूंमध्यें, गांव व प्रवाह यांजवळील प्रदेशांत मात्र आवारांमुळें, वाटा अरुंद होऊन पुष्कळ मनुष्यें जाण्यास फार अडचण होत्ये; परंतु तो प्रदेश खेरिज करून, बाकी सर्व देश राजरस्त्याप्रमाणें खुला व जाण्यायेण्यास सोईवार असतो. त्या प्रमाणेंच नद्या व तळीं यांतून जे पाट व कालवे काढितात, तेहि मार्गस्थांस फार नड करितात.

आतां हिंदुस्थानाचा निरनिराळ्या भागांतील प्रदेशांची स्थिति नाना प्रकारची आहे, यामुळें या प्रकरणांत जे विचार वर सांगितले त्यांस जिकडेतिकडे अपवाद आहेत; आणि त्यांतून, बंगाला, चोलमण्डलाचा किनारा, व दुसरे भातशेतीचे देश, यांस तर हे बहुधा अगदींच लागू नाहींत. त्या देशांत भातशेतांत पाणी सोडून तीं भरावीं लागतात; बहुधा आंवण काढून पुनः लावणी करावी लागत्ये; आणि या शेतकीस मेहनत फार पडत्ये व ती करण्यास त्रास विशेष येतो.

---

# प्रकरण दहावें.

## व्यापार.

पुष्कळ ऐशआरामाचा पदार्थांचीं नावें मनुस्मृतींत

परदेशांबरोबरील व्यापार.

आलीं आहेत, परतु त्यांतून कांहीं पदार्थ परदेशांतून आलेले होते असें दिसत नाहीं. आतां ते पदार्थ विपुल मिळत असत त्यावरून हिंदुस्थानाचा निरनिराळ्या प्रान्तांचा आपसांत पुष्कळ व्यापार असे, असें दिसतें.

जडजोखमाचा व्यापारास पैका दिला असतां व्याज किती घ्यावें, तें, " समुद्रपर्यटनें व खुशकीप्रवास यांविषयीं चांगल्या माहीतगार पुरुषांनीं " ठरविलें आहे असें मनुस्मृतींत एका ठिकाणीं [1] सांगितलें आहे. मूळग्रंथांत " समुद्र " असा जो शब्द आहे, तो देशाचा आंतील जलप्रवाहांस लागू होत नाहीं, त्यावरून, मनुस्मृति झाली तितक्या प्राचीनकाळींहि हिंदु हे जाहजांत बसून समुद्रांतून जात असत, ही गोष्ट सिद्ध झाली असें धरिलें असतां चालेल; परंतु त्या वेळीं त्यांचा सफरी किनाऱ्याकिनाऱ्यानें होत असत असें संभवतें. याहूनहि प्राचीनकाळीं भूमध्यसमुद्रावरील बंदरांशीं यांचा व्यवहार निःसंशय होता, परंतु तो सर्व खुशकीनें होता, किंवा कांहीं जलमार्गानें होता; आणि, खुशकीनें असो अथवा जलमार्गानें असो, परंतु त्यांत हिंदु आपल्या देशाचा हद्दींबाहेर जात असत कीं नाहीं, या गोष्टींचा निर्णय झालेला नाहीं. हा व्यापार आरबांचा हातांत होता, आणि त्यांतून कांहीं सिंधचा पश्चिमकिनाऱ्यावरून मधील अरुंद आखातांतून मस्कतेशीं चालत असे, व तेथून आरबस्तानांतून सिरिया व मिसर या देशांत जात असे; व दुसरा व्यापार खुशकीनें अथवा समुद्रकांठानें बाबिलान् व इराण या देशांत जात असे, असें नाहीं संभवतसें नाहीं. हिंदुस्थानाचा पश्चिमेकडील समुद्रांची जी पहिली स्पष्ट हकीकत विद्यमान आहे, तिजवरून पाहतां, त्या बाजूनें हिंदूंचा व्यापार होता अशीं चिन्हें दिसत नाहींत. सिकन्दरपादशाहाचा आरमाराचा मुख्य नियार्कस्

(१) अ० ८ श्लो० १५६। १५७.

हा इसवी सनापूर्वींचा ३२६ व्या वर्षी सिंधुनदावरून फ्रात नदीपर्यंत किनाऱ्यानें हाकारून गेला, तेव्हां त्यास एकहि तारूं वाटेंत आढळलें नाहीं; आणि त्याणें मुद्दाम असें स्पष्ट लिहिलें आहे, कीं मच्छीमारी होड्या मात्र मला आढळल्या, आणि त्याहि नियमित ठिकाणींच असून थोड्या होत्या. सिंधुनदावरहि, जरी बेड्या (म्ह० मचवे) होत्या, तरी त्या थोड्या व लहान होत्या असें दिसतें; कारण मोठमोठ्या गलबतांसुद्धां आपलें सर्व आरमार सिकन्दरास स्वतः बांधावें लागलें, आणि त्यावर भूमध्यसमुद्रांतील खलाशी ठेवावे लागले, असें आर्यान् नामें युनानी इतिहासकारानें लिहिलें आहे. याच ग्रंथकारानें, हिंदूंचा ग्रंथांची गणती सांगतांना, जेथें (व्यापारी व शिल्पी यांचा म्हणजे चौथ्या वर्णाचें वर्णन केलें आहे, तेथें "गलबतें बांधणारे व नद्यांवर नावा चालविणारे खलाशी हे या वर्गांतील" आहेत, असें लिहिलें आहे; त्यावरून त्याचा माहितींत आलेले असे समुद्रांतील सफर करणारे खलाशी त्या वेळीं नव्हते असें अनुमान केलें असतां चालेल.

यानंतर ख्रिस्ती शकापूर्वीचा दुसऱ्या शतकांतल्या एका ग्रंथकारानें कांहीं हकीकत लिहिली आहे, तिजवरून पश्चिमेकडील देशांबराबरील हिंदुस्थानाचा व्यापाराविषयीं कांहीं ज्ञान होतें. या ग्रंथकर्त्यास मिसर व आरबस्तानाचा दक्षिण भाग, यांचा मधील व्यवहाराची मात्र माहिती होती; परंतु त्याणें आयातीचा मालांत दालचिनी व बाहवा हे दोन जिन्नस लिहिले आहेत, आणि आरबस्तानाचा येमन् नामें प्रान्तांतील बंदरांत हिंदुस्थानांतून तारवें येत असत असें त्याणें स्पष्ट सांगितलें आहे. परंतु या ग्रंथांत जें सर्व लिहिलें आहे त्यावरून पूर्वोक्त सर्व व्यापार आरबांचा हातांत होता असा निर्णय करणें येतो.

पश्चिमकिनाऱ्यावरून व्यापार.

हा व्यापार कोणत्या मार्गानें चालत होता त्याची

स्पष्ट व्याख्या, आणि तो कोणकोणत्या जिन्नसांचा होत होता त्या जिन्नसांची पुरी फकिका, हीं "पेरिप्लस" या युनानी ग्रंथांत सांपडतात, त्या पूर्वीचा ग्रंथांत मिळत नाहींत. हा ग्रंथ इसवी सनाचा पहिल्या शतकांतील आहे, आणि तो तांबड्या समुद्रांत नेहेमीं वागणाऱ्या एका अनुभविक नाविकानें लिहिला आहे असें दिसतें. रक्तसमुद्राचा सर्व किनारा, आरबस्तानाचा आग्नेयीकडील किनारा, व सिंधुनदापासून कन्याकुमारिकेपास प्रदक्षिणा घालून चोलमण्डलकिनाऱ्याचा बऱ्याच उत्तरेकडील टोंकापर्यंत हिंदुस्थानाचा किनारा, इतक्या सगळ्या देशाचें वर्णन त्याणें केलें आहे, आणि तितक्या हद्दींमधील देशांतील व कांहीं त्यांपलीकडील प्रान्तांतील व्यापाराची हकीकत सांगितली आहे. याचा लेखावरून असें दिसतें कीं, या वेळा जवळजवळ पर्यंत, हिंदुस्थानांतील जहाजें इराणी आखाताचें तोंड ओलाण्डून आरबस्तानाचा कांठाकांठानें चांचपत चांचपत रक्तसमुद्राचा मुखापर्यंत जात असत; परंतु, अलीकडे, मिश्रदेशांतील युनानी लोक, अथवा किंबहुना सर्व नावाडी लोक, हे, रक्तसमुद्र सोडून बाहेर आल्यावर लौकरच किनारा सोडून समूर हिंदीमहासागरांतून हंकारून मलबारचा किनाऱ्यावर जाऊं लागले होते.

याप्रमाणें पुष्कळ व्यापार चालत असे, परंतु तो सर्व ग्रीक व आरब हे करित असत. आरबस्तान, हा, सुकाण्ये, खलाशी, व व्यापारी लोक यांणीं भरलेला देश आहे असें वर्णन आहे; परंतु हिंदुस्थानांतील लोकांत असे लोक होते असें कोठें वर्णन नाहीं, आणि रक्तसमुद्राचा तोंडाजवळील एका बेटांत ( सोकोत्रा हेंच तें बेट असावें असें अनुमान करितात, ) जी थोडीशी मिश्र वस्ती होती, तींत आरब व ग्रीक या लोकांबरोबर कांहीं हिंदुहि होते असें लिहिलें आहे; त्यांशिवाय हिंदु हे आपल्या देशाबाहेर कोठें होते असा लेख नाहीं. हिंदुस्थानांतील व्यापार इतका

आरबांचा हातांत होता, कीं प्लिनीचा वेळीं सिंहलद्वीपाच्या पश्चिमकिनारा त्यांचा वस्तीनें भरून गेला होता, आणि त्यांचे कित्येक लोक मलबारचा किनाऱ्यावरहि वसाहत करुन राहिले होते. आतां हिंदु हे आपल्याच देशाचा कांठाकांठानें पुष्कळ व्यापार करित असत असें पेरिप्लस् या पूर्वोक्त ग्रंथांतच सांगितलें आहे. सिंधुनदाचें तोंड उथळ आहे, त्यामुळें मोठीं जहाजें आंत जाऊं शकत नाहींत, म्हणून त्यांतील माल उतरण्यास तेथें मचवे असत. खम्बायतचा आखाताचा तोंडावर मोठी उथळ चिखलट जागा आहे त्यामुळें, व तेथें भरतीचें पाणी लौकर चढतें त्यामुळें, जहाजांस नुकसान पोंचण्याची हल्लीं धास्ती असत्ये, त्याप्रमाणेंच पूर्वी होती; म्हणून ( बारिगझ म्हणजे ) भडोच एथें जाणाऱ्या गलबतांस मार्ग दाखविण्याकरितां मच्छीमारी मचवे ठेविलेले असत. भडोचेपासून, दक्षिणेस, सगळा समुद्रकांठ बंदरांनीं फुललेला होता; तीं व्यापाराचीं बंदरें असें ग्रंथकारानें त्यांविषयीं वर्णन केलें आहे, त्यावरून किनाऱ्याचा किनाऱ्यावरील व्यापार करणारीं गलबतें त्या बंदरांमध्यें जात असत असें अनुमान केलें असतां चालेल. पुढें कन्याकुमारिकाकेपाचा पूर्वेकडील किनाऱ्यावरील देशाचा वर्णनाचें अनुसंधान आल्यावर, मग, त्या देशांतून बंगालचा उपसागरामधून गंगेपर्यंत व क्रिसि बेटापर्यंत मोठीं गलबतें जात असत असें वर्णन आहेः क्रिसि ह्मणजे बहुधा सुमात्रा अथवा मलाया असावें असें संभवतें. ही शेवटची गोष्ट पूर्वेकडील लोकांचा हकीकतीस पुरी मिळत्येः त्या हकीकतींत असें सांगितलें आहे, कीं चोलमण्डलाचा कांठावरील लोक हे समुद्रावरील व्यापारांत पश्चिमकांठचा लोकांपेक्षां अधिक धाडशी होते, अशी त्यांची पुरातन ख्याति होती. जा वेळीं सिंधुनदावर कांहीं व्यापार नाहीं असें नियार्कसाचा दृष्टीस पडलें,

समुद्रकांठानें व्यापार.

पूर्वेकिनाऱ्यावरून व्यापार.

त्या वेळीं गंगा, हल्लीं सारिखीच, नावांनीं फुललेली असेल, असेंहि संभवतें; कारण त्या दोन नद्यांचा आसमंतात्चा प्रदेशांचें स्वरूप निरनिराळें आहे आणि गंगेचा कांठीं जुनीं व सुधारलेलीं राज्यें होतीं, त्यावरून तिकडे तसा व्यापार असावा अशी अटकळ सहजच आपल्या मनांत येत्ये. गंगाकांठचा पूर्वोक्त सुपीक व विस्तीर्ण प्रदेशांत जे पदार्थ उत्पन्न होत असतील, त्यांकडे, त्यांहून कमी सुधारलेल्या दक्षिणेंतील लोकांचें लक्ष गेल्याशिवाय राहिलें नसेल; आणि दक्षिण व गंगेवरील प्रदेश, यांचा मध्यें जशीं रानें व लुटारू लोकांची वस्ती हल्लीं आहे, त्याहूनहि विशेष बहुधा त्या वेळीं होती, त्यामुळें तें मोठें संकट चुकविण्याकरितां, पूर्वकांठचे खलाशीलोक बंगालाचा उपसागरांतून समूर हाकारून जाण्याचें लहान संकट सोसण्यास उद्युक्त होत असत; कारण त्या मार्गानें गेलें असतां जमीन फार दिवस दिसेनाशी न होतां, किनाऱ्यावरील लोकांचा पल्लयाबाहेरून त्यांस जातां येत असे.

याप्रमाणें जाण्याचा पाठ एकदां पडल्यावर, मग त्या आखाताचा वरचा भाग सहज ओलाण्डून जातां आला असेल, आणि पुढें फार दिवस गेले नाहींत तंव, मलायाचें द्वीपकल्प व सुमात्रा बेट यांपर्यंत जें त्या आखाताचें अति रुंद पात्र आहे, त्यांतून ते हाकारून गेले असतील. आतां चोलमण्डलचे लोक अशा सफरा करण्यास कशानें उद्युक्त झाले असतील ते असोत, परंतु त्या किनाऱ्याचा उत्तरभागांतील लोक हे प्रथम धारिष्ट करून मोठ्या समुद्रांत सफरा करूं लागले, त्यापूर्वीं दुसरे हिंदुलोक सफरा करित असल्याचें व्याख्यान ऐकण्यांत आलेलें नाहीं.

जावा व पूर्वेकडील दुसऱ्या बेटांतील हिंदूंचा वसाहती.

कलिंग देशांतील पुष्कळ हिंदु जावाबेटांत गेले आणि तेथील लोकांस सुधारिते झाले, व आपण तेथें आल्याचा काल निश्चित करण्याकरितां त्याच वेळीं त्यांणीं तेथें एक शक स्थापिला, तो

अद्यापि चालू आहे, व त्याचा आरंभ ख्रिस्तापूर्वी ७५ वर्षांवरचा आहे. याप्रमाणें जावा एथील इतिहासांत कथा आहे; आणि जावा एथें हिंदूंचा इमारतींचे वगैरे असंख्य व भव्य शेष राहिले आहेत, त्यांवरून, आणि जावा एथील साधारण भाषा मलै आहे, परंतु धर्मग्रंथांची, इतिहासांची, काव्यांची, व बहुतेक ताम्रपटादि कोरींव लेखांची भाषा ही संस्कृताचा एक पर्याय आहे, यावरून, वरील कथा खरी आहे असें निःसंशय सिद्ध होतें. पुढें एक फिरिस्ता चीन, गंगेवरून सिंहलद्वीपास, तेथून जावा एथें, व तेथून चिनेस जाहजांतून गेला, त्या सर्व जाहजांवरील खलाशी वगैरे लोक आपण ब्राह्मणी धर्मांतील आहों असें म्हणवित असत; त्या वेळीं जावा एथील सर्व वस्ती हिंदु होती असें त्याणें पाहिलें; याप्रमाणें त्या चीनानें इसवी सनाचा चौथ्या शतकाचा अखेरीस आपली हकीकत लिहिली आहे, तिजवरूनहि पूर्वोक्त कथा प्राचीन काळीं झाली आहे असें खचित सिध्द होतें. कांहीं काळानंतर जावा एथें बौद्धधर्म सुरू झाला, आणि हिंदुधर्म माजी पडला; तथापि चौदाव्या शतकापर्यंत राजसत्ता हिंदूंचा हातांत होती; तिचा शेवट पुढें मुसलमानांनीं केला. त्या मुसलमानांस तेराव्या शतकांत कित्येक आरब धर्मोपदेशकांनीं हिंदूंचे मुसलमान केले होते. जावाचा पूर्वेस बाली ह्मणून बेट आहे, तेथील वस्ती अद्यापि हिंदु आहे; त्यांची चर्या मलै किंवा तातारी दिसत्ये, परंतु आपण चार हिंदुवर्णांतील आहों असें ते ह्मणतात. जरी त्यांची मुद्रा बदलेली आहे, तरी त्यांची उत्पत्ति हिंदूंपासून असेल हें असंभाव्य आहे असें नाहीं; परंतु त्यांची उत्पत्ति केवळ हिंदूंपासून आहे असें ह्मणणें ही शुद्ध कादंबरी आहे, असा विशेष संभव आहे. असें ह्मणण्यास आणखी कारण असें आहे, कीं जावा एथील कवींनीं आणखी एक याहून मोठें ढोंग रचून गंगायमुनाकांठचीं शहरें,

राजे, व योद्धे, यांसुद्धां "महाभारतांतील" सर्व कथा आपल्या बेटांत घडली अशी कादंबरी रचिली आहे.

ग्रीकांचा कारकीर्दीनंतरचा व्यापार.

पेरिप्लसाचा अलीकडील पश्चिमदेशचे समुद्रयायी व इतर मार्गस्थ यांचा कथा हिंदुस्थानाशीं बाहेरील लोकांचा व्यापार मोठा होता असें सांगतात, परंतु त्यांत हिंदु किती सामिल होत असत त्याविषयीं कांहीं सांगत नाहींत. आरबी व चिनी जाहजें हिंदुस्थानांतील बंदरांस जात असत असें त्यांणीं लिहिलें आहे, परंतु हिंदुस्थानी जाहजानें परदेशी सफर केल्याविषयीं कोठें लिहिलें नाहीं.

मलबारचा किनाऱ्यावर सारा उन्हाळाभर चांचे फितर असत असें मार्कोपोलो याणें लिहिलें आहे; परंतु ते नांगर टाकून किनाऱ्याजवळ असत आणि कांहीं मिळण्याचा लाग दिसला म्हणजे हंकारून जात, असा त्यांचा पाठ होता असें पुढील ग्रंथावरून दिसतें. जेव्हां वास्को डिगामा मलबारचा किनाऱ्यावर जाऊन पोंचला तेव्हां तेथील सर्व व्यापार (मोराको एथील) मुसलमानांचा हातांत होता; आणि त्यास व पुढें त्याचा मागून झालेल्या सरदारांस जा अडचणी आल्या, त्या त्यांचाच स्पर्धेमुळें आल्या.

प्राचीन काळचे निकासाचे जिन्नस.

पेरिप्लसाचा वेळीं हिंदुस्थानांतून जो माल बाहेर जात असे तो येणेंप्रमाणें:— कापसाचें साधें कापड, मलमली, व नाना प्रकारचीं चिटें; रेशीम व रेशमी कपडे; नीळ व दुसरे रंग; दालचिनी वगैरे मसाल्याचे पदार्थ; साकर; हिरे, मोत्यें, पाच, व पुष्कळ प्रकारचे अल्पमोली खडे; तिखें; औषधी; सुगंधी पदार्थ; आणि, केव्हां केव्हां, दासी. हे पदार्थ साम्प्रतचांहून फारसे निराळे नाहींत.

आयातीचा माल.

त्या वेळीं जे जिन्नस बाहेरून हिंदुस्थानांत येत असत ते येणेंप्रमाणें:— जाडें व बारीक कापड (बहुधा लोंकरी); पितळ; कथील; शिसें; प्रवाल;

कांच; सुरमा; आणि कांहीं या देशांत माहित नव्हते असे सुगंधी पदार्थ; द्राक्षासव ( पुष्कळ येत असत, त्यांतून इटालींतील आसव लोकांस आवडत असे ); याशिवाय सोन्यारुप्याचा लगडी व नाणें हीं येत असत.

खुशकी व्यापार.

गंगा व तिचा पुष्कळ शाखा यांवरून माल नेण्यास फार सोपें पडत असे असा उल्लेख पूर्वींच आला आहे; परंतु यांशिवाय इतर नद्यांत समुद्रापासून फार दूर तारवें जाऊं शकत नाहीत त्यामुळें देशाचा आंतल्या आंतील व्यापार बहुधा खुशकीनेंच चालत असावा. तो व्यापार बहुधा बैलांवर असेल, परंतु अति प्राचीन काळापासून मोगलराज्याचा समाप्तीपर्यंत मोठ्या रहदारीचा रस्त्यांवर सरकारचें लक्ष विशेष असे, त्यामुळें अलीकडचापेक्षां त्या वेळीं गाड्यांची वहिवाट पुष्कळ असावी अशी अटकळ केली असतां चालेल.

---

# प्रकरण अकरावें.

## रीतिभाती व स्वभाव.

उत्तरहिंदुस्थान व दक्षिण मिळून जेवढा देश आहे, त्याचा विस्तार, रुशिया, स्वीडन, व नार्वे, हे देश खेरीज करून बाकीचा युरोपखण्डाचा विस्ताराबराबर आहे.

वरील हद्दींत १० निरनिराळे लोक राहतात. ते सर्व सुधारलेले आहेत, परंतु त्यांचा रीतिभाती व भाषा भिन्न आहेत: अशाच युरोपाचा पूर्वोक्त भागांतील लोकांचा आहते.

जर हिंदुस्थानांतील कोणी गृहस्थ ख्रिस्तिस्थानांत गेला, तर तिकडील निरनिराळे लोक साधारणरीत्या एकसारखे दिसतात; त्यामुळें, जर एक इंग्रेज व एक इटालिस्थ असे त्याणें पाहिले, तर त्यांमध्यें विशेष भेद आहे असें त्यास वाटत नाहीं. त्याच प्रमाणें हिंदुस्थानामध्यें जे अगदीं

भिन्न जातींचे लोक आहेत, त्यांचा जातींची निवड युरोपीयन लोकांचानें एकदम होत नाहीं.

वरील लोकांचा जातींतून हिंदुस्थानी व दक्षणी यांचा मध्यें महत्तम भेद आहे. हे दोन मुख्य भेद झाले; यांतील लोकांचा जवळचा देशांत राहणारे जे लोक आहेत ते सहजच बहुधा त्यांचा सारखे आहेत; परंतु हिंदुस्थानाचा अगदीं उत्तरेकडील व अगदीं दक्षिणेंकडील भागांमध्यें जा भाषा चालतात त्यांत, ( जी कांहीं संस्कृताची थोडी मिसळ आहे ती खेरीजकरून दुसरें ) कांहीं साम्य नाहीं; दोहींकडील धर्मांचे पंथ भिन्न आहेत; शिल्पकामें भिन्न आहेत ( हें अन्यत्र सांगितलेंच आहे ); लोकांचा पेहराव पुष्कळ प्रकारें भिन्न आहे, आणि त्यांचें स्वरूपहि भिन्न आहे; उत्तरेकडील लोक उंच व गोरे आहेत, आणि दक्षिणेकडील ठेंगणे व काळे आहेत. उत्तरेकडील लोकांचा बहुतेक निर्वाह गव्हांवर होतो, आणि दक्षिणेकडील लोक रागी म्हणजे नाचणे पुष्कळ खातात. ( रागी हें धान्य इंग्लण्डांतील लोकांस माहीत नाहीं तर नाहीं, परंतु उत्तरहिंदुस्थानांतील लोकांसहि नाहीं. ) पूर्वोक्त दोनहि प्रदेशांत प्रथम ब्राह्मणांची व त्यांमागून मुसलमानांची जितकी सत्ता चालू झाली, व जेवढी वसाहात झाली, तितक्या मानानें त्यांचा स्थितींमध्यें वरील भेद उत्पन्न झाले असतील; परंतु त्या त्या ठिकाणचा जाग्यामुळें व हवेमुळें आणि तेथील राहणाऱ्या लोकांचा मूळ जातींतील भेदांमुळें याहूनहि अधिक फेरफार झाले असावे, असें दिसतें.

यास दृष्टान्त.— बंगाला व उत्तरहिंदुस्थानांतील गंगाकांठचा प्रदेश, हे दोन्ही लगतचे देश आहेत, आणि हे दोनहि प्राचीन काळापासून एकाच सत्ताधीशांचा हातांत होते; परंतु बंगालची हवा दमसर आहे, तेथें नद्यांना पूर येऊन सर्व देश पाण्यानें भरून जातो, आणि मळीचा जमिनींत जे विशिष्ट गुण असतात ते सर्व त्या प्रदेशांत आहेत; इकडे

गंगाकांठच्या पूर्वोक्त प्रदेश हा जरी सुपीक आहे, तरी तेथील जमीन व हवा हीं दोन्हीं, तारतम्यानें पाहिलीं असतां, शुष्क आहेत. या भेदामुळें त्या त्या देशांतील लोकांचा चाली निरनिराळ्या पडल्या; त्या कारणानें त्यांमध्यें एवढें मोठें अन्तर पडलें असेलः या लोकांचा भाषांचें मूळ एकच आहे; यामुळें यांचे वंश निराळे आहेत ही कल्पना चालवून तर उपयोगच नाहीं.

आतां वर सांगितलेला भेद कोणत्या कारणानें उत्पन्न होत असेल तो असो, परंतु तो फार मनांत भरण्यासारिखा आहे. सर्व हिंदूंमध्यें गंगाकांठचे हिंदुस्थानी लोक अति उंच, गोरे, लढाऊ, व हिम्मतदार आहेत; ते पागोटें घालतात, आणि त्यांचा पोशाक मुसलमानांसारिखा आहे; ते घरांवर नळे घालतात, आणि त्यांचे गांव उघड्या मैदानांवर मजबूद बसविलेले असतात; ते गव्हांची बिनखमीरी भाकर खातात.

आतां बंगाली हे देखणे आहेत, परंतु ऱ्हस्व, काळे, व दिसण्यांत बायक्ये आहेत; ते भित्रे व अत्याचारी, आणि लाघवी व कपटी आहेत, हें प्रसिद्ध आहे. त्यांचीं गांवढीं बांबू अथवा ताड यांचा रायांतून कुइटारू झोंपड्यांचीं वसलेलीं असतात. एक धोतर नेसूं व दुसरें खांद्यांवरून टाकलेलें असा जो हिंदूंचा प्राचीन पोशाक, तोच ते वापरितात. ते स्नान केल्यानंतर आपल्या अंगास तेल लावितात, ( ही चाल उत्तरहिंदुस्थानांत माहीतहि नाहीं, ) त्यामुळें त्यांची कातडी गोंडस व तुकतुकीत दिसत्ये, आणि तेणेंकरून त्यांचा देशाचा दमसर हवेपासून त्यांस इजा होत नाहीं. त्यांची उपजीविका बहुधा तांदुळांवर होत्ये. त्यांचा भाषेची शैली जरी हिंदुस्थानीचा जवळ आहे, तरी ती हिंदुस्थानी लोकांस मुळींच समजत नाहीं.

जरी या दोन लोकांमध्यें इतके भेद आहेत, तरी त्यांचे धर्म व तदन्तर्गत येणारे असंख्य आचार व रीति, त्यांचा

व्युत्पत्तिविद्या, राजकारभार, व साधारण विषय यांवरील त्यांचे अभिप्राय, आणि त्यांमधील संस्कार व त्यांची चालचलन, इतक्या गोष्टींमध्यें या लोकांत एवढें साम्य आहे, कीं जर कोणी युरोपीयनास हा भेद पूर्वीपासून माहीत नसला, तर तो यांतून एका लोकांचा हद्दींतून दुसऱ्यांचींत गेला तरी त्यास तिकडील तफावत एकदम समजणार नाहीं, असेंहि होऊं शकेल.

आतां पुढील वर्णनांत जसजशी निरनिराळ्या लोकांची हकीकत येईल तसतसे त्यांतील भेद क्रमानें दृष्टीस पडतील. परंतु साम्प्रत सांगणें इतकेंच आहे, कीं वर जें साधारण वर्णन आलें आहे, व पुढेंहि जें येईल, तें सर्व हिंदूंस अनुलक्षून केलें आहे.

गांवढीं.

जरी हिंदुस्थानांत मोठीं शहरें पुष्कळ आहेत, तरी बहुतेक लोकांचा धंदा शेतीचा आहे. शेतकरी लोक हे जमावानें गांवढ्यांमधून राहतात; दर रोज प्रातःकाळीं शेतावर काम करावयास जातात, आणि रात्रीस बैलबांड्यासुद्धां परत गांवास येतात.

निरनिराळ्या प्रदेशांतील गांवढ्यांत तफावत पुष्कळ असत्ये: पुष्कळ प्रान्तांमध्यें गांवढ्यांस कुसें असतात; आणि जर शत्रूंचे कांहीं घोडेस्वार आले, तर त्यांस थोडेंबहुत तोंड देण्यासहि तीं उपयोगीं पडतात; आणि कित्येक ठिकाणीं त्या कुसांचा योगें शेजारचा गांवचा लोकांपासून व सरकारचा अम्मलदारांपासून त्या लोकांस आपला बचाव करितां येतो. कित्येक गांव उघडेच असतात, आणि कित्येक गांवढ्यांत गुरें रात्रीचीं आंत राहवीं ह्मणून त्यांसभोंवती कुंपण असत्ये, व तिला एक दरवाजा असतो.

उत्तरहिंदुस्थान व बंगाला, यांतील गांवढ्यांमधील घरांमध्यें तफावत किती असत्ये तें पूर्वीं सांगण्यांत आलें आहे. आतां बंगाल्यांतील गांवढ्यांमधील झोंपड्यांविषयीं सांगतों: त्यांचीं बांकदार छपरें नीटनेटकीं गवतानें शाकारलेलीं

असतात, व त्यांस वेतांचा काड्यांचे कूड असतात. या झोंपड्या सर्व हिंदुस्थानामध्यें उत्कृष्ट देखण्या असतात.

उत्तरहिंदुस्थानांतील झोंपड्यांचा छपरांवर नळे घालितात. त्यांचें बांधकाम चिकणमाती व कच्चा विटा यांचें असतें. त्यांत बंगाली झोंपड्यांसारख्या सर्व सोई असतात, परंतु त्या तशा टुमदार दिसत नाहींत. दक्षिणेंतील गांवढ्यांतल्या झोंपड्या चिखलधोंड्याचा असतात, व त्यांस धाब्याचीं छपरें असतात, आणि पाहणारास केवळ ओसाड झालेल्या घरांसारख्या त्या दिसतात. सर्व झोंपड्यांमध्यें या, दिसण्यांत, अगदीं बेरंग दिसतात. याहून खालीं दक्षणेकडील झोंपड्या अशाच चिखलधोंड्याचा केलेल्या असतात; परंतु त्यांचें काम चांगलें असतें, आणि त्यांचा भिंतींवर तांबड्या व पांढऱ्या उभ्या रेघा मारलेल्या असतात, त्यामुळें त्या नीटनेटक्या व स्वच्छ दिसतात.

प्रत्येक गांवांत बाजार असतो; त्यांत धान्यें, तंबाकू, मिठाई, जाडें कापड, व गांवढ्यांमधील खपाचे दुसरे जिन्नस विकण्याकरितां दुकानें असतात. प्रत्येक गांवाचा एक बाजाराचा दिवस असतो, व त्याशिवाय तेथील वार्षिकी यात्रा व सण असतात; आणि हिंदुस्थानांतील बहुतेक प्रदेशांत प्रत्येक गांवांत निदान एक तरी देवळ व परक्यांस उतरण्याकरितां एक धर्मशाळा असत्ये. बैराग्यांस भिक्षा घालण्याकरितां, आणि सणावारीं गांवकीकडील उत्साह करणें वगैरे दुसरे खर्च करण्याकरितां गांवकऱ्यांवर पट्टी बसवून एक डबी केलेली असत्ये, व तींतून या खर्चांचा नेमणुका करून दिल्या असतात. पूर्वोक्त धर्मशाळांमध्यें केव्हां केव्हां एकादा देव बसविलेला असतो, व बहुधा तीच गांवची चावडी असत्ये. प्रत्येक गांवांत बहुधा जीं मोठ्या छायेचीं झाडें असतात त्यांखालीं बसून गांवचे कारभारी व दुसरे लोक मिळून गांवकीचा कारभार पाहतात. या प्रसंगीं बांकांची अथवा मेजांची केव्हांहि गरज लागत नाहीं.

लोकांचा घरांमध्यें, बसावयास एक हांतरी, आणि कांहीं मातीचीं व पितळेचीं भांडीं व ताटें, हातानें ओढावयाचीं जातीं, खलबत्ता, लोखंडी तवा, आणि असेंच दुसरें कांहीं सामान असतें, शिवाय कांहीं नसतें. बिछान्याला पलंग अथवा पडदे नसतात, व त्याची गुंडळी करून दिवसास भिंतीशीं उभी टेंकून ठेवितात. हे लोक आपला स्वयंपाक घराबाहेर बेडच्यांत अथवा पडवींत करितात. त्यांचा झोंपड्या सुशोभित नसतात, परंतु स्वच्छ व ठाकठीक असतात. गांवढ्यांतील शेतकरी लोकांहून अधिक श्रीमान् जे लोक असतात, त्यांचा घरांत वर सांगितलेल्या सामानाहून अधिक असें विरळाच असतें. त्यांचा घरास २ मजले असतात, व पुढें अंगण असतें, एवढेंच त्यांचें विशेष माहात्म्य असतें.

गांवढ्यांतील लोकांची स्थितिरीति.

गांवढकरी लोकांची स्थिति, बहुतकरून, आबादीची नाहीं. ते आपला धारा देण्याकरितां बहुधा कर्ज काढितात, त्यामुळें ते खात्यांचा व कर्जाचा जाळ्यांत गुंततात; आणि मग त्यांस ठकविण्यास इतके मार्ग असतात, कीं ते त्यांतून विरळाच सुटतात. शिवाय, साधारणरीत्या ते इतके अल्पदृष्टि असतात, कीं जरी ते कर्जांतून मोकळे असले, तरी त्यांस जें देणें अवश्य द्यावयाचें तें देण्यास पैसा सांचवून ठेवित नाहींत, म्हणून पुनः लवकरच कर्जांत बुडतात. कांहीं लोक मागेंपुढें पाहणारे असतात; ते आपल्या गांठीस कांहीं मत्ता करितात. गांवांतील पाटिलावर केव्हां केव्हां तुफानें होतात, अथवा केव्हां केव्हां तो किंवा सरकारचे अम्मलदार लोकांवर जुलूम करितात, त्यामुळें गांवांमध्यें बखेडे होतात. हे लोक जितके तंटे आपसांत करितात, तितके इंग्लंडांतील त्यांचा प्रतीचे लोक करित नाहींत; परंतु यांचा मध्यें सर्व प्रकारची लांठाई अति विरळा आहे. झिंगी बहुधा लोकांस माहीतच नाहीं, आणि, सर्व गोष्टींचा विचार केला असतां, या देशांतील गांवढ्यांमधील लोक बरेच

सालस, सभ्य, व, त्यांची स्थिति पाहिली असतां, सुखी, व संतुष्ट आहेत.

जो शेतकरी असतो तो मोठ्या सुप्रभातीं उठतो, आंघोळ करितो, आणि प्रभूची प्रार्थना करून आपला बैलबांडा घेऊन आपल्या शेतांवर जातो. तीं शेतें बहुधा दूर असतात. तास दोन तास दिवस आला, ह्मणजे कालचा जेवणांतील कांहीं शेष राहिलें असेल त्याची न्यहारी करितो, आणि दोन प्रहर पावेतों आपलें काम चालवितो. नंतर त्याची बायको त्याचें उन्हन उन्हन जेवण घेऊन येत्ये; तें तो ओहळाचा बाजूस अथवा झाडाखालीं बसून जेवतो, आणि सुमारें दोन वाजत पर्यंत कांहीं बोलूनचालून व निजून काळ काढितो. इकडे त्याचीं गुरें आपला चारा खातात व विसावा घेतात. दोन वाजल्यापासून सूर्यास्तापर्यंत त्याचें काम पुनः चालतें; मग तो आपले बैल वगैरे हांकून घरीं आणितो, त्यांस खावयास घालितो, आणि आंघोळ करितो, जें काय संध्याकाळचें जेवण तयार झालें असेल तें जेवतो, हुक्का ओढितो, आणि आपली बायको व मुलें अथवा शेजारी यांबराबर कर्मणूकेमध्यें बाकीचा वेळ घालवितो. या लोकांचा बायका पाणी आणितात, दळण दळितात, स्वयंपाक करितात, घरांतील वारासार करितात; व शिवाय सूत काढणें व दुसरेहि असे धंदे करितात.

हिंद्री शहरांतील घरें, उंच, इटबंदी किंवा चिरेबंदी असतात. त्यांना लहान व थोड्या खिडक्या असतात, व त्या उंचावर असतात. शहरांतील रस्ते फार अरुंद असून बहुधा साधे असतात, व त्यांस, असली तर, मोठ्या ओबडधोबड चिऱ्यांची फरसबंदी असत्ये त्यांत स्वाऱ्या, पालख्या, बैलांचा गाड्या, ढालतलवार बांधून धांवणारे हुजुऱ्ये, बैरागी, नोकरीचा वेळाशिवाय हुक्का ओढित किंवा उगीच बसलेले शिपाई; आणि औजड पोळ (जांना एकीकडे करून वाट करण्यास जाणारयेणारास, किंवा विकावयास ठेविलेलें धान्य शहरें.

खातांना जांस हाकणारांस अडचण पडल्ये ) या सर्वांची इकडून तिकडे व तिकडून इकडे जाण्यायेण्याची गर्दी झालेली असल्ये.

मुख्य उघडीं दुकानें झटलीं तर, मिठाईवाले, फळफळावळवाले, भुसारी, कांसार, गांधी, आणि तंबाकूवाले, यांच असतात; कापड, शाली, व दुसरा तसा माल विकणारे हे आपल्या जिनसाचे गठ्ठेच ठेवितात; आणि जवाहीर वगैरे याहून अधिक मोलवान जिनसाचा व्यापार करणारे हे आपले जिन्नस मुळींच उघड्यावर ठेवित नाहींत. सर्व दुकानें रस्त्याचा बाजूनेंच अगदीं उघडीं असतात, आणि बहुधा घरापुढचा पडव्यांत असतात. गिराईकें रस्त्यांत उभीं राहून माल खरीद करितात. पुष्कळ ठिकाणीं शहरांस तट असतात, व तीं शहरें शत्रूपासून आपलें संरक्षण करूं शकतात.

खेड्यांप्रमाणें शहरांत वंशपरंपरेचे पाटील व दुसरे दरकदार नसतात; जा जा प्रान्तांमध्यें तीं शहरें असतात त्या त्या प्रान्तांचे सरकारी अम्मलदार बहुधा तेथें राहतात, व त्यांजवळ महसूली व पोलीसचा कामाकरितां जे लोक असतात त्यांचा मदतीनें ते तेथील कारभार पाहतात. पोलीसाचा बंदोबस्ताकरितां शहराचे तुकडे पाडितात. प्रत्येक जातीचे लोक आपला एक मुख्य ठरवितात, तो सरकाराशीं आपल्या जातीसंबंधीं बोलणें बोलतो. या जाती बहुधा धंद्यांप्रमाणें असतात; त्यांमुळें त्यांपासून कांहीं वाईट व कांहीं चांगले परिणाम सहजच उत्पन्न होतात.

सराफ, व्यापारी, व सरकारचा संबंधाचे लोक, हे शहरांमध्यें मुख्य असतात.

सावकारलोक हे बहुधा सराफी व व्यापार करितात, व शिवाय महसूलाचे मक्तेहि घेतात. त्यांस पुष्कळ नफा होतो, व बहुधा विशेष जोखमहि नसतें. जेव्हां ते सरकाराशीं व्यवहार करितात, तेव्हां ते आपल्या कर्जाचा हमीबद्दल कांहीं महसूली मुलुक गाहाण घेतात, अथवा कोणी मोठ्या

गृहस्थाची बाहीदारी घेतात. कर्जाऊ रुपये देत्ये वेळीं ते भारी मनोती घेतात, व त्यांचा व्याजाचा दर मोठा असून चक्रवाढ असतो, त्यांमुळें तें व्याज इतकें जलदी वाढतें, कीं कर्ज परत देत्ये वेळीं हमेशा तोड कराची लागत्ये; तींत धनको पुष्कळ सूट देतो, तरीहि त्यास नफा पुष्कळ राहतो. ते फार साध्या रीतीनें व काटकसरीनें राहतात; परंतु घरीं कांहीं कार्यप्रसंगें झालीं असतां, अथवा लोकोपयोगी कृत्यांमध्यें पुष्कळ ठिकाणीं बेसुमार द्रव्य खर्चितात.

सरकारचा मोठ्या कामदारांविषयीं उल्लेख पुढें येईल, परंतु त्यांशिवाय कमी पायऱ्यांचे असंख्य कारकून व बगल्ये भोजनभाऊ असतात, त्यांविषयीं थोडेसें एथें सांगणें अवश्य आहे. प्रत्येक कचेरींत हे लोक पुष्कळ असतात, व शिवाय प्रत्येक खातें, कितीहि लहान असलें तरी, त्याबराबर एक पंक्तिबारगीर चिकटलेला असतो: जरी एक शिपायांची टोळी जावयाची असली, तरी तिचा पाठीशीं एक कारकून लागलेलाच असतो. प्रत्येक उमरावाजवळ वसूलाचा व हिशेबाचा कामास कारकून असतात तर असतात, परंतु शिवाय वांकनिशीकडे कारकून, पागेकडील कारकून, शिकारखान्याकडील कारकून, वगैरे असतात. कामकाजासंबंधीं व इतर आदरसत्कारसंबंधीं जें दळणवळण होणें तें कारकुनांचा मार्फतीनें होतें. अखबारनवीस हेहि कारकूनच असतात. परंतु इतकेहि धंदे त्या लोकांस मिळत असतां, शेंकडों कारकून बेकार असतात, व सर्व प्रकारचा कुलंगड्यांत व फंदफितुरांत हात घालण्यास ते तयारच असतात.

सर्व प्रतींचा लोकांचे खाण्याचे पदार्थ व जेवणाचा रीति.

शहरांतील व गांवढ्यांमधील साधारण लोक बिनखमीरी भाकरी, व भाजा, तूप किंवा तेल, आणि मसाल्याचे पदार्थ, यांवर निर्वाह करितात. तंबाकू ओढणें एवढाच कायतो या लोकांस ऐशआराम आहे. कांहीं थोडे लोक गांजा वगैरे मादक पदार्थ ओढितात; आणि अति नीच

जातीचे लोक मात्र दारू पिऊन मस्त होतात, परंतु तेहि विरळा[1]. बंगाला, कोंकण, व दक्षिणहिंदुस्थानाचे दुसरे भाग, या व अशाच दुसऱ्या ओलसर प्रदेशांत मात्र लोक मद्यपी होतात. आमचा ( म्हणजे इंग्रेजी राज्यांत ) दारूवर कर आहे, व तेथें झिंगी दिवसेंदिवस अधिकाधिक होत चालली आहे. आतां या व्यसनाकडे या लोकांचा स्वाभाविक कल विशेष आहे असें दिसत नाहीं; कारण, बहुतेक एतद्देशीय राज्यांमध्यें दारूची अगदीं बंदी असत्ये, तेवढ्या बंदीनें तथील लोकांचें कैफ करणें नाहींसें होतें. उत्तरहिंदुस्थानाचा पश्चिमेकडील भागांत अफीम अतिशय खपत्ये, परंतु ती विशेषेंकरून राजपूतांमध्यें खपत्ये; तिकडील कनिष्ठ प्रतींचा लोकांस तिचा उपसर्ग लागत नाहीं. अति दरिद्री खेरीज करून, बाकीचे सर्व लोक, चुना व सामर्थ्याप्रमाणें नाना प्रकारचे मसाले घालून, पानसुपारी खातात. कित्येक जातींचीं फळें पुष्कळ व स्वस्तीं मिळतात.

उंच जातीचा लोकांत ( निदान ब्राम्हणांमध्यें तरी ) याहून कांहीं थोड्या परी विशेष असतात. परंतु त्याहि भाजीपाल्यामध्यें व मसाल्यामध्यें, व कांहीं स्वयंपाक करण्यामध्यें असतात. या लोकांस हिंग फार आवडतो, व त्याचा योगानें त्यांचा पक्कान्नांस कांहींशी मांसाची रुचि येत्ये. दुसऱ्या जातीचा लोकांनीं विटाळलेल्या ताटांतून व बैठकांवर बसून न खाण्याविषयीं हे लोक फार सावध राहतातः या गोष्टीमुळें या लोकांमध्यें कांहीं चमत्कारिक चाली उत्पन्न झाल्या आहेत. एकादें मोठें ब्राम्हणभोजन असलें म्हणजे तेथें २५।३० पदार्थ व तोंडीलावणीं असतात, तीं प्रत्येकाचा समोर पत्रावळींवर वाढतात. त्या पत्रावळी नुसत्या जमिनीवर मांडतात व जेवणारांचा समोर कांहीं अन्तरावर

(१) साम्प्रत दारू पिणें फार वाढत चाललें आहे, ही मोठी दुःखकारक गोष्ट आहे. भा० क०.

सरळ रेषेनें रांगोळी घालतात. तींत फुलांचे वगैरे नमूने पाडलेले असतात, व ती आनंदकारक रंगांची असत्ये. ती जा रांगोळ्यांनीं घालतात त्यांवर पूर्वोक्त फुलांचे वगैरे नमूने पाडलेले असतात. जेवणें झाल्यावर ही रांगोळी झाडून टाकितात. हलक्या जातीचे हिंदु मांस खातात, आणि आपल्या भांड्यांस दुसऱ्यांनीं स्पर्श केला असतां त्याची इतकी परवा करित नाहींत; त्यांतूनहि धातूचीं भांडीं असल्यास, तीं घांसल्यानें पाहिजे तेव्हां शुद्ध होतात. सर्व वर्णांमध्यें जातिभेद असल्यामुळें कोठेंहि सख्यभाव राहत नाहीं. कोणी शिपाई अथवा दुसरा कोणी सडा प्रवासी असल्यास, तो एकटाच आपला स्वयंपाक करितो, आणि एकटाच जेवतो; त्यामुळें अन्न खाल्ल्यापासून शरीरांतील भूक मिटल्यामुळें त्यास काय सुख वाटेल तें वाटो, परंतु त्याशिवाय त्या खाण्यापासून त्यास आनंद होत नाहीं. सर्व लोक हातानें जेवतात, आणि जेवणापूर्वीं मन लावून क्षालन करितात.

या लोकांमध्यें बुद्धिबळें, सोंगट्या, व गंजिफा, हे खेळ आहेत; परंतु, घरामध्यें बसून काल क्रमण्यास हे बहुधा नाचाची योजना करितात. त्यांत कांहीं गाणें असतें, व गायिका ही हळूहळू हातपाय हालवित असत्ये; परंतु त्या चालीस नाच असें म्हणवत नाहीं. त्या गाणारांचे हावभाव विशोभित नसतात, आणि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्यांचीं गाणींहि मधुर असतात; परंतु किती झाली तरी, ही मेणचट व एकसुती कर्मणूक होय; असें असून, सर्व प्रतीचा लोकांस ती इतकी आवडत्ये हें पाहून आश्चर्य वाटतें. त्यांतूनहि कमी प्रतींचे लोक तर ही खरांटी गमत पाहात रात्रीचा रात्री उभ्यांनीं काढितात.

गृहक्रीडा.

साम्प्रत हे नाच जर कोणाचा घरीं झाले, तर तेथें विलाइती झुंबर लावितात; परंतु दिवटीबुधलीचा प्रकाशानें हे

खेळ करणें, ही हिंदूंची असलची रीति होय. साधारण घरधंद्यास पणत्या व धातूचे दिवे लावतात.

श्रेष्ठ प्रतीचा लोकांचीं घरें, आचार, व संभाषणाची रीति.

श्रीमान् लोकांचा घरीं दरवाजांवर रूंदार रेशमी पडदे टांगलेले असतात, आणि त्यांचे दरवाजे, कमानी, व दुसरें लांकूडकाम, हें उत्कृष्ट नकशीदार असतें. बसायास तमाम जमिनीवर पातळ रुजामे घातलेले असतात, व त्यांवरून सरपोस टाकलेले असतात; परंतु याशिवाय तेथें दुसरें कांहीं सामान नसतें. बराबरीचा प्रतीचे लोक असतात ते दिवाणखान्यामध्यें समोरासमोर हारीनें बसतात. राजा, किंवा जो कोणी दुसरा उमराव असतो, तो, दोहों हारींचा मध्यें त्या दिवाणखान्याचा शेवटास बसतो. त्याचा खालचा रुजामा अधिक जाडा असतो, आणि त्यावर बुटेदार रेशमी कापडाची लहानशी बैठक असत्ये; व त्याचा मागें एक बुटेदार लोड असतें; या सर्व खटाटोपास मसूनद म्हणजे गादी असें ह्मणतात. चक्रवर्त्ती राजांचा पायरीखालचे जे राजे असतात, त्या सर्वांचें हें सिंहासन होय.

उठाबशीकडे या लोकांचें लक्ष फार असतें. कोणी प्रतिष्ठित गृहस्थ येत असला, तर त्यास शहराबाहेर कोश अर्धकोश सामोरे जातात, आणि आपल्या घरीं येणाराची जशी पदवी असेल त्याप्रमाणें घरचा यजमान दिंडीदरवाजापाशीं जातो, अथवा दिवाणखान्याचा दरवाजाशीं भेटायास जातो, अथवा जागचा जागींच उत्थापन घेऊन त्याचा सत्कार करितो. मित्र असून, जर त्याची फार दिवस भेट झाली नसली, तर ते एकमेकांस आलिंगितात. ब्राम्हणांस नमस्कार करणें तो, हात जोडून दोन तीन वेळा कपाळाला लावितात, म्हणजे नमस्कार झाला. दुसऱ्या जातींस रामराम करणें तो एका हातानें 'सलाम'[१] करितात. ब्राह्मणांची

१ सलाम हा शब्द अरबी आहे. भा० क०

परस्परांस नमस्कार करण्याची रीति अपूर्व आहे. इतर जातींचे हिंदु भेटले ह्मणजे दोन वेळा ( राम राम असें ) रामाचें नाव घेतात. भेटीस आलेल्या लोकांस बसविणें तें त्यांचा पदवीप्रमाणेंच बसवितात; प्रसिद्ध सभा व्हावयाची असल्यास या पदव्यांचा निश्चय करून कोणी कोठें बसावें हें ठरविण्यास पूर्वी पुष्कळ वाटाघाट लागत्ये. प्रतिष्ठित हिंदुलोक आपणाहून कमी प्रतीचा लोकांशीं फार सभ्यतेनें वागतात; त्यांशीं बोलणें तर त्यांचा मान ठेऊन मर्यादेनें बोलतात; आणि शिव्या अथवा कठोर भाषण यांपर्यंत त्यांची मजल बहुधा येत नाहीं.

कनिष्ठ प्रतीचे लोकहि आपसांत साधारणरीत्या गृहस्थाईनें वागतात; परंतु गरम झाले म्हणजे ते आपल्या वाङ्माधुर्याकडे विशेष पाहत नाहींत.

घरधन्यानें विडे दिले म्हणजे कचेरी बरखास्त होत्ये: विड्याबराबर गुलाबी अत्तर रुमालास लावितात, व गुलाबपाणी शिंपडितात; इतकें झालें, म्हणजे निरोप घेण्याचा वेळ झाला, असें आलेल्या लोकांनीं समजावें.

जेव्हां कोणाची प्रथमच भेट होत्ये, तेव्हां, अथवा समारंभाचा वेळीं, शाली व दुसरीं वस्त्रें, मोत्यांचा कंठ्या, करभूषणें, शिरपेंच, तुरे, इत्यादि ताटांमध्यें घालून नजर करितात. दोहीं पक्षींचे गृहस्थ उमराव असले, तर तलवार, घोडा, व हत्ती, हींहि देतात. या चालींतून प्राचीन किती आहे, हें मला माहित नाहीं; परंतु अति प्राचीन नाटकांमध्यें करभूषणादि नजर केल्याचा उल्लेख वारंवार आला आहे.

गुणवान् कामगारांस, पराक्रमी शिपाई लोकांस, व कवींस ( म्हणजे विद्वानांस )अशीं बक्षिसें देतात: प्रीतींतील गवई व कलावंतिणी यांवरतर त्यांचा पाऊसच पडतो.

जा सभा शुद्ध शिष्टाचाराचा असतात, त्यांमध्यें मुख्य लोक असतात ते मात्र बोलतात; इतर सभांमध्यें पाहिजे त्यास संभाषण करण्याची आडकाठी नसत्ये. हिंदूंची चाल

सभ्य, व भाषा आर्जवी असत्ये. जेव्हां कांहीं लाभावर त्यांची दृष्टि नसत्ये, तेव्हां बराबरीचा लोकांशीं बोलतांनाहि ते पुष्कळ गरीबी व पैठणी आदर दाखवितात. ज्ञान संपादण्याची इच्छा त्यांमध्यें विशेष दृष्टीस पडत नाहीं, व नेहेमींचा वहिवाटीं पलीकडे विचार करण्याचा त्यांचा कल दिसत नाहीं. परंतु जें त्यांचें भाषण होतें, त्यांत ते मोठे चतुर व विचक्षण असतात, व केव्हां केव्हां त्यांचीं बोलणीं आनंदी व छचाी असतात.

श्रीमान् लोक गरीबांचा वेळावरच निजून उठतात, अथवा कांहींसे मागून उठतात; स्वतांचा देवळांत दर्शनास जातात; आपल्या जवळचा अम्मलदारांबरोबर व आश्रितांबराबर खासगी व जें दुसरें काम असेल तें करितात; स्नान करितात, जेवतात, व निजतात. सुमारें तिसऱ्या प्रहरीं ते पोशाक घालून आपल्या कचेरीचा दिवाणखान्यांत येतात, व तेथें लोकांचा भेटी घेणें त्या घेतात, व पुष्कळ रात्र होई तों कामकाज करितात. कांहीं लोक पुष्कळ रात्र होई तों गाणें ऐकावयास बसतात. आतां वर सांगितलेला क्रम हा श्रीमंतांचा मात्र आहे, यामुळें हिंदूंचा शहरांमध्यें काळोख पडला म्हणजे लवकरच सामसूम होतें.

श्रीमान् लोकांचा मेजवान्या व डामडौल.

लग्नें इत्यादि विरळा येणाऱ्या नैमित्तिक प्रसंगीं, व विवक्षित सणावारीं, व केव्हां केव्हां कोणी मित्रांचा सत्कार करावयाचा असल्यास, मेजवान्या करितात. मेजवानीचा आरंभीं जेवणाचा समारंभ होतो; परंतु गाणेंबजावणें हा त्या प्रसंगांतील मुख्य भाग होय; शिवाय बहुरूपी व मस्कऱ्ये यांचेहि खेळ होतात. इकडे हें चाललें असतां, एकीकडे अगरबत्त्या लागलेल्या असतात, आणि पाहुण्यांस सुवासिक फुलांचा माळा घालितातः पूर्वी सांगितल्याप्रमाणें भेटीहि अवश्य देतात.

जेथें राजदरबारें असतात, तेथें वर्षांतून कांहीं नियमित

दिवशीं सर्व लोक राजाचा सलामीस जातात. या दिवशीं जितके लोक तेथें जमा होतात, तितके लोक युरोपांतील दरबारांत राजाचा वाढदिवशीं जमतात. या दरबारांमध्यें सर्व जण एकामागून एक राजाजवळ जातात, व त्यास कांहीं नजर करितातः ती कांहीं तरी रुपयांची असत्ये, व ते रुपये रुमालावर घालून पुढें करितात. ( शिष्टाचाराचा सभांमध्यें कनिष्ठांनीं वरिष्ठांस अशी नजर हमेशा देण्याचा पाठ आहे. ) नजर देणाराचा पदवीप्रमाणें तिची रकम असत्ये. अगदीं लहान नजर म्हणजे बहुधा एक रुपयाची असत्ये; परंतु गरीब लोक केव्हां केव्हां नुसत्या फुलांची नजर करितात, व दुकानदार थोडा जिन्नस नजर करितात. बहुतेक ठिकाणीं नजर करणारास कांहीं तरी पोषाग परत देतात. एका पोषागाची किंमत पुष्कळ नजरांइतकी असत्ये. १००मोहोरा म्हणजे नेहेमींची अति मोठी नजर होय; परंतु केव्हां केव्हां अति मोलवान् रत्नेंहि नजर केलेलीं आहेत, आणि जेव्हां कोणी राजा कनिष्ठ प्रतीचा गृहस्थाचा घरीं येतो, तेव्हां त्यास बसावयास एक लक्ष रुपयांचा तोड्यांची गादी करितात; तीहि नजरच असें समजतात. असें करणें हा अगदीं इतका शिष्टाचार पडून गेला आहे, कीं निजाम हा जरी आमचा सरकारचा आश्रित माण्डलिक अहे, तरी तो रेसिडेण्टाचा दरबारांत आला म्हणजे त्याचा सत्कार याप्रमाणें करितात. ही चाल असल हिंदूंची आहे अशी जरी माझी खातरी नाहीं, तरी ही हल्लीं साधारण आहे, म्हणून मी एथें ती सांगितली आहे. जे धर्मसंबंधीं समारंभ असतात, ते असे संकोचित नसतात. जो समारंभाचा दिवस येतो, त्या दिवशीं आराध्यदेवतेचा सन्मानार्थ एक मोठें मखर तयार करितात; त्यांत तिचा मूर्तीस पुष्कळ अलङ्कार घालून एका टोंकास बसवितात, व तिचा भोंवते मुलाम्याचे कठडे असतात; आणि राजा व त्याचे दरबारी लोक उंचे पोषाक व जवाहीर घालून त्या खोलीचा एका बाजूस असतात. बाकीचा तेथील थाट इतर मेजवान्यांसारखाच

असावें, तसें असतें; परंतु अगरबत्त्या, फुलांचे गजरे, व दुसऱ्या भेटी देणें, हें नेहमींचा प्रसंगांप्रमाणेंच होतें. पानसुपारी व अत्तर हें मूर्तीजवळून आणितात, आणि, जसें कांहीं तिचा तर्फेनेंच असें, तेथील लोकांस वांटितात.

रामानें लंका घेतली, या कथेचा जो समारंभ करून दाखवितात, तो, धर्मसंबंधीं पूर्वोक्त समारंभांमध्यें अति वधकें असतो; व तो घराबाहेर करावा लागतो. त्यांत एक लंका केलेली असत्ये:— तो एक मोठा किल्ला असतो, व त्याला बुरूज पाडून त्यांचा तटबंदीवर आणखी उघड्या जंग्या केलेल्या असतात; मग राम आणि त्याचे अनुयायी ( हनुमान व दुसरे वानर ) यांसारखीं सोंगें घेतलेले लोक त्या किल्ल्यावर हल्ला करितात. मग तेथें एक कृत्रिमी लढाई होत्ये, व त्या लंकेचा किल्ल्याचा नाश होतो. त्या वेळीं जो दारूकामाचा भडाका सुटतो, तो कोणत्याहि देशांत तारीफ करण्याजोगा आहे. त्या वेळीं जो जयजयकार होतो, त्याचें जें वैभव करितात तें विशेष मोठ्या प्रसंगास साजेल. हा सण मराठे लोकांमध्यें दुसऱ्या रीतीनें करितात, व त्या वेळीं याहूनहि मोठा उत्साह होतो. तो दसऱ्याचा दिवशीं करितात, आणि त्या दिवशीं रामानें जी शमीची पूजा करून तिची एक टाळी मोडिली आणि नन्तर तो लंकेस स्वारी करून गेला, त्या कृत्याचा स्मरणार्थ हा उत्साह करितात. तो येणें प्रमाणें.—

शहराजवळ किंवा छावणीजवळ उघड्या मैदानावर एक शमीवृक्ष लावितात, आणि राजाचा बराबर जावयाचें असेल तितकें घोडेस्वारांचें लश्कर खेरीज करून, बाकी सर्व घोडेस्वार, पायदळ, व तोफखाना, हे त्या जाग्याचा अथवा त्या जाग्याकडेस जो रस्ता जात असेल त्याचा दुबाजूंस तयार होऊन उभे राहतात. बाकीचा मैदानांत असंख्य तमासगीर जमलेले असतात. मुसलमानलोकांचा स्वाऱ्यांपेक्षां

या स्वाऱ्या कांहीं कमी बेतसूद असतात, तथापि हिंदुस्थानामध्यें जे या प्रकारचे थाट होतात, त्यांमध्यें हे उमदे होत. त्या वेळीं राजा आपल्या हत्तीवर बसून येतो; त्याचा पुढें निशाणें व सोन्यारुप्याचा काठ्यांचे भालदार असतात, आणि सुमारें दहाबारा हात लांब भालेवाल्यांचें एक पतक असतें. त्याचा प्रत्येक बाजूस उमदे व जरतारी पोशाक घालून घोड्यावर बसलेले उमराव व इतर सरदार असतात; त्यांतून प्रत्येकाजवळ चांगले लढाऊ व देखणे असे ज्याचा त्याचा पदरचे कांहीं लोक असतात; त्यांचा मागून हत्तींचा लांबचलांब रांगा असतात, त्यांचा गाशांचे गोंडे लटकत असतात; आणि कांहींवर अति मोठाले बावटे असतात, व कित्येकांवर सोन्याचे दागिने व बुटेदार अलङ्कार लकाकत असतात; कित्येक हत्तींवर हौदे असतात, व कित्येकांवर अंबाऱ्या असतात. तीं दोन्हीं बहुतकरून साधीं रुप्याचीं अथवा मुलाम्याचीं असतात, आणि त्यांचा आकार विशेषेंकरून पूर्वेकडील देशांतल्यासारखा असतो. या सर्वांसभोंवती व सर्वांचा मागून घोडेस्वारांचा एक लोटच येत असतो; त्यांचा घोड्यांचे साज उन्हांत चकाकत असतात, आणि त्यांचीं जरतारी ऊर्णावस्त्रें वाऱ्यांत फडफडत असतात. या सर्वांवरून भाले व निशाणें दिसत असतात. जे घोडेस्वार दोहों बाजूंनीं असतात, ते झटकन आंतून निघून बाहेर जातात, आणि आपल्या स्वारपणाचें कसब दाखविण्याकरितां कांहीं फेरफटका करून गटांत जाऊन मिळतात: या सर्व लश्करांतील लोक इकडून तिकडे जात येत असतात, त्यामुळें त्यांची टूम वेळोवेळीं बदलत्ये; त्यामुळें या रानटी वैभवाचा मुलूकामध्यें जे मोठे आल्हादकारक व भव्य असे चमत्कार दृष्टीस पडतात, त्यांतील हें लश्कर हा एक होय. राजा जवळ आला, म्हणजे तोफांची सरबत होत्ये; पायदळाचे लोक आपल्या बंदुका झाडितात; आणि ती स्वारी अधिक वेगानें पुढें येत्ये; जसें एकादें घोडेस्वारांचें सैन्य एकाद्या लश्करावर

जात असतें आणि तें लश्कर या सैन्याशीं लढावयास तयार असतें, त्याप्रमाणें त्या वेळची स्थिति दिसत असत्ये.

राजानें पूजा करून शमीची टाळी मोडिली, ह्मणजे त्याचा मागून त्याचा जवळचेहि टाळ्या मोडितात. त्या वेळीं सर्व तोफांची पुनः सरबत होत्ये. नंतर इशारत होतांच बाकीचें लश्कर फुटून त्यांतील लोक जवळच जें धान्याचें शेत मुद्दाम लाविलेलें असतें, त्यांतील कांहीं काड्या उपटून आणितात; आणि प्रत्येक आपण आणिलेल्या काड्या आपल्या पागोट्यांत खोंचतो. नंतर त्या वेळीं सर्व एकमेकांस ‘ रामराम ’ करून अभिनंदन करितात. शेवटीं त्या दिवशीं एक मोठें दरबार होतें, तेथें सर्व दरबारी व लश्करी अम्मलदार येतात.

यात्रा, जत्रा, वगैरे.

साधारण लोकांचा जा जत्रा व जे उत्साह होतात, त्यांत एवढा डामडौल नसतो; परंतु त्यांत रस कमी असतो असें नाहीं. या जत्रांत पाळणे वगैरे गरगरां फिरविण्याचीं रहाटासारखीं यंत्रें, व दुसरे खेळ, आणि इतर व्यापार जसे असतात, त्यांसारखेच बहुतकरून इंग्लंडांतील यात्रांत असतात; परंतु यांमध्यें पांढरे पोशाक आणि नानाप्रकारचा रंगांचे दुपट्टे व पागोटीं हीं घालून असंख्य लोकांचा जो मेळा जमतो, तो पाहून जसा मनास आल्हाद होतो, तसा विलायतेकडील लोकांचा काळ्या टोप्या व काळसर पोशाक असें असल्यामुळें तिकडील यात्रांत होत नाहीं; ह्मणून इकडील यात्रांची कल्पना तिकडील समाजांवरून करितां येणार नाहीं. मोठे टुमदार डौल करणें, व स्वाऱ्या मिरवणें, याजवर हिंदुस्थानांतील लोकांची रीझ असत्ये, आणि ते आपलीं हत्यारें व बावटेहि घेऊन या जत्रांस येत असतात; त्यामुळें इकडील यात्रांचा प्रकार भिन्न होतो. या यात्रांचा वेळीं जा मौजा चालल्या असतात, त्यांची हिंदुलोकांस मोठी गोडी असत्ये, व ते कांहीं गडबड न करितां तो उत्साह करून आपलें रंजन

करून घेतात, असें सर्व प्रकारें दिसून येतें. या सर्व यात्रांमध्यें कांहीं धर्मसंबंधीं क्रिया त्यांस करावयाची असली तर असत्ये, परंतु ती असल्यास तिला क्षणहि लागत नाहीं, व तिजविषयीं कोणी विचारहि करित बसत नाहीं. काशी वगैरे ठिकाणीं जेव्हां लोक यात्रांस जातात, तेव्हां तेथील देवाची पूजा करण्याविषयीं त्या लोकांचा मनांत पूर्वींपासून हव्यास असतो; आणि इकडे दुसरे यात्रिकरू त्या देवाचें मोठ्यांनीं भजन करित असतात तें यांचा कानीं पडतें; या दोन कारणांमुळें, आणि त्या जाग्याचा माहात्म्यामुळें, यात्रिकरूंचा मनांत भक्तीची दृढतर बुद्धि उत्पन्न होत्ये. त्या वेळीं तेथें दुसऱ्याहि कांहीं क्रिया करावयाचा असतात, त्यांत केव्हां केव्हां सर्व लोक एकत्र जमतात; अशा प्रसंगीं हजारों लोकांची दृष्टि एका वस्तूवर लागलेली असत्ये, व ते एकाच नावाचा उच्चार करित असतात; त्यामुळें, जरी कोणी अगदीं बिनकळवळ्याचा मनुष्य तेथें उभा असला, तरी त्याचाहि मनावर बहुत प्रसंगीं ग्रह होतो.

असें असतां, यात्रांमध्येंहि धर्मसंबंधीं औत्सुक्यापेक्षां मनोरंजनाकडे लोकांची वृत्ति विशेष असत्ये, आणि अशा यात्रेचा जा जागा आहेत, त्यांतून पुष्कळ जागीं अतिशय व्यापार होत असतो अशी त्यांची प्रख्याति आहे, व तेथें, या यात्रा, जत्रांसारख्याच उपयोगीं पडतात.

श्रीमान् लोकांचा ऐशआरामाचें वर्णन करित्ये समयीं त्यांचा बागांचेंहि वर्णन केलें पाहिजे. या बागा हमेशा शुष्क बेतींव असतात; तथापि पुष्कळ मोठ्या मनोरंजक असतात. त्यांत रुंद रस्ते केलेले असतात, आणि लांब व अरुंद पाट काढून नेलेले असतात; ते चुनेगच्ची दगडाचे असतात, व ते बागेचा मध्याकडे वाहत असतात; आणि बागेचा प्रत्येक बाजूस समूर रस्ते पाडलेले असतात, व त्यांचा दोहों बाजूंनीं खसखशीचा झाडांचा अथवा दुसऱ्या फुलझाडांचा नाना प्रकारचा रंगांचा

बागा व सृष्टरचना.

पट्ट्या एकसारख्या लागलेल्या असतात, अथवा मासले मासले मात्र असतात. त्यांचे उन्हाळ्यांत राहण्याचे बंगले सफेद चुनेगच्ची असतात. ते त्यांचा साधारण घरांइतके बोजट नसतात, व त्यांची शोभाहि बरीच असत्ये; तथापि त्या घोटींव किल्याचा बागेपासून जी प्रतीति मनावर उत्पन्न होत्ये, तिचें शमन हें घर पाहून होत नाहीं. परंतु त्या बागांमध्यें नारिंगी व महाळुंगी यांचा वृक्षांचीं उपवनें असतात; मोहर आलेल्या व फुललेल्या झाडांमध्यें काळीं सुरूचीं झाडें मिसळलेलीं असतात; तसेंच उंच व सुशोभित तालवृक्ष ठाकले असतात, आणि कित्येक झाडांवरचीं सोन्यासारखीं पिकलेलीं फळें आणि अति सुवासाचीं फुलें; या सर्व वस्तूंनीं तेथें कांहीं विलक्षण शोभा उत्पन्न होत्ये, ती पूर्वेकडील देशांसच योग्य होय. उन्हाळ्यांत जेव्हां फार गरमी पडत्ये, तेव्हां द्राक्षीचा वेलांनीं दाट आच्छादित मण्डपांत, व जेथें सूर्याचे किरण प्रवेश करूं शकत नाहींत अशी पोफळीचा सरळ वृक्षांची जी छाया तींत, सूर्याचा दुःसह तेजापासून सुटून आराम पावण्यास एकान्त व शीतल स्थलें सांपडतात; तशांतहि त्या बागांत पाण्याचे लहान पाट झुळझुळ वाहत असतात, व त्या व्याकूळ करणाऱ्या उष्णतेचा समयास जिकडेतिकडे जी अत्यन्त निश्चेष्टता व विश्रान्ति असत्ये, त्या योगानें तेथें मन विशेष संतोष पावतें.

हल्लींचे जे बाग आहेत त्यांचा पाठ मुसलमानानीं घातला, किंवा नाहीं, याचा मला बराच संशय आहे; कारण जा काव्यांचें भाषान्तर इंग्रेजींत झालें आहे, त्यांत अशा बेतसूद बागांचा उल्लेख कोठें आलेला नाहीं.

जशीं युरोपांत उद्योग करून फूलझाडें व इतर झाडें मिळवितात, व तजवीज करून त्यांची जात सुधारितात, त्याप्रमाणें हिंदुस्थानांत करित नाहींत; म्हणून उत्कृष्ट सुंदर झाडें व फुलें रानांत व इतर ठिकाणीं आपसुखानें झालेलीं मात्र दृष्टीस पडतात. पुष्कळ ठिकाणीं आंब्याचे जुनाट वृक्ष,

व चिंचा व पिंपळ यांचे उंच वृक्ष, देशभर पसरलेले असतात; तसे वृक्ष गुजराथेंत असून तेथील जमीन उंचसखल आहे त्यामुळें, तो प्रदेश चित्रविचित्र उपवनासारिखा सुंदर दिसतो. रोहिलखण्डांत व दुसऱ्या प्रदेशांत अगदीं सपाट जमीन असल्ये,व तींत पीकहि पुष्कळ येतें; तें किती, हें जर कोणास सांगितलें, तर खरेंहि वाटणार नाहीं; त्या प्रदेशांमध्यें कोठें कोठें आंब्यांचा राई असतात; या देशाचा विस्तार व समृद्धि पाहून आनंद होतो, परंतु जितकें जावें तों पुढें तसाच देश लागत जातो, त्यामुळें मन मुरून जातें. बंगालचा कांहीं भागांत मार्गस्थास कांहीं अशींच मैदानें लागतात; त्यांत एकसारखें भाताचें शेत लागलेलें असतें, व मध्यें एकहि झाड नसतें; चोंहीं बाजूंस पाहवें, तर बऱ्याच अन्तरावर बांबूचें दाट रान असतें, जांत हिंस्र जनावरें आहेत असेंहि कोणी म्हणेल; परंतु तेथें जावें तों, तें जंगल नव्हे; तो एक लहान वसाहतीचा तुकडा आहे व त्यांत लोकांनीं फुलून गेलेले असे पुष्कळ गांव आहेत, असें दृष्टीस पडतें. तो प्रदेश टाकून पुढें चाललें असतां, तसेंच मैदान दृष्टीस पडतें, व त्याचाहि सभोंवतें अगदीं क्षितीजाजवळ बांबूचा जंगलाचें तसेंच वेष्टन दिसतें.

दक्षिणेचा मध्यभागांत झुकतीं मैदानें आहेत; त्यांमध्यें एका ऋतूंत बाजरी व जवारी या धान्यांचीं हिरवींचार शेतें शेंकडों कोश एकसारखीं लागलेलीं असतातः तीं इतकीं उंच असतात, कीं घोड्यावर बसलेला स्वार जर त्यांतून जात असला तर तो दिसत नाहीं. परंतु जर उन्हाळ्यांत पाहिलें, तर तो सर्व देश ओसाड व जळकट वैराणासारिखा दिसतो; आणि तोच एकसारिखा लागलेला पाहून जें औदासिन्य उत्पन्न होतें, तें घालवायास मध्यें कांहींच झाडझुडूप नसतें. कांहीं ठिकाणीं, व मुख्यत्वेंकरून पश्चिमेकडील प्रदेशामध्यें, जुनाट वृक्षांचीं रानें आहेत, त्या वृक्षांवर सुवासिक वेली चढलेल्या आहेत; त्यांतून कित्येकांवर मोठ्या उमद्या रंगांचीं

फुलें असतात, कित्येक एकाच झाडाचा खांद्यांत गुरफट-लेलीं असतात, व कांहीं वेली मांडी इतक्या जाड्या असून त्यांचा वाढीचा जोरानें एका झाडावरून दुसऱ्या झाडावर जातात. पूर्वेकडील पर्वतांजवळ जीं सालवृक्षांचीं अरण्यें आहेत, त्यांत व हिंदुस्थानाचा मध्यभागीं नागपुरापासून बंगाल्यापर्यंत, व बुंदेलखण्डापासून उत्तरसरकारापर्यंत जें रान लागलेलें आहे त्यामध्यें,व मलबार इत्यादि प्रान्तांजवळ-चा पश्चिमेकडील घाटाजवळ जीं अरण्यें आहेत तीं, प्रचण्ड वृक्षांनीं भरलेलीं आहेत; त्यांत बहुधा मनुष्याचा वासहि नाहीं व त्यांत कोठें कोठें सरासरी अरुंद वाटा मात्र आहेत.

उत्कृष्ट लागवडीचा मुलुकाचा मध्येंहि कोठें कोठें पुष्कळ मजलांचा मजला मुलुक पळसाचा वृक्षांनीं भरलेला असतो; वसन्तकाळीं या झाडाचीं पानें गळून जातात, आणि मोठाल्या लाल व नारंगी रंगाचा फुलांनीं सर्व वृक्ष आच्छादित होतो; यामुळें जा डोंगराळ प्रदेशांत हीं झाडें असतात, तो सर्व प्रदेश लालभडक दिसतो.

हिंदुस्थानामध्यें अति भव्य सृष्टिदर्शन हिमालयाखालीं होतें. तेथें चित्रविचित्र आकृतींनीं तुटलेले पर्वतांचे कणे आहेत; कित्येक सुळे मध्येंच उभे आहेत; कित्येकांचा कडा शेवाळलेल्या आहेत; कित्येकांचा बाजूंस पैन[अ] व दुसऱ्या जातींचे प्रचण्ड वृक्ष रगडून भरलेले आहेत,व तेथें इंग्लंडांतील सुंदरतम फुलझाडें व उत्तम फळझाडें हींहि आपसुखानें त्यांमधून होत आहेतः या सर्वांवर, सर्वकाळ बर्फानें आच्छादलेला महाराज हिमालय शोभताहे. हा चमत्कार जा अति साध्या लोकांनींहि वर्णन केला आहे, ते मोठ्या रसाचा भरांत आले आहेत, आणि वास्तविक पाहतां, हा चमत्कारच असा आहे कीं तो एकदां पाहिला असतां जो ग्रह मनावर उत्पन्न होतो, तो अढळ

(अ) देवदारजातीचा वृक्षविशेष. भा० क०

राहतो, आणि तसा कोठेंहि उत्पन्न व्हावयाचा नाहीं. सह्याद्रिपर्वतामध्येंहि डोंगराळ प्रदेशाचें सौंदर्य याहून कांहींसें कमी दृष्टीस पडतें, आणि ग्रीस व युरोप यांमध्यें नीडा व लेडन ह्मणून जीं खोरीं आहेत त्यांचा सारखाच हा प्रदेश आहे, असें ह्मणण्यांत कांहीं अतिशयोक्ति नाहीं. कारण तशी या पर्वताची योग्यताच आहे.

सह्याद्रिपर्वताचें सौंदर्य अगदीं ऋतुमाहात्म्याप्रमाणें असतें. उन्हाळ्यांत त्यावरील ढगांचें आच्छादन नाहींसें होतें, व हिरव्या चार गवतांचें पांघरूणहि जातें, आणि त्यावरील असंख्य धोधे आटतात; तेव्हां त्याचा उजाडपणामुळें जेवढें त्याचें सौंदर्य जातें, तेवढें त्याचा उंचीचा महत्त्वानें येत नाहीं, आणि त्या वेळींहि त्याचा दोन्ही बाजूंस जीं मोठमोठ्या वृक्षांचीं अरण्यें असतात तीं पाहून मात्र मनास आनंद होतो दुसरा आनंदकारक पदार्थ त्या ऋतूंत तेथें नसतो.

शहरचा लोकांची कालक्रमणाची रीति, व सर्व वर्णांचा लोकांचे सण.

जसे गांवढ्यांतील गरीब लोक आपल्या शेताभातावर जातात, तसे शहरांतील गरीब लोक आपल्या दुकानांवर धंद्यांस जातात, आणि कर्मणूकेकरितां जाणें, तर बाजारांत जातात.

गांवढ्यांतील लोक कांहीं आंगचपळाईचे खेळ खेळतात, परंतु शहरांतील लोकांची घराबाहेरील कर्मणूक ह्मटली तर जत्रा व दुसरे सणाचे दिवस या वेळीं मात्र होत्ये. कित्येक लोक कसरत करितात, व कुस्ती खेळतात, परंतु त्यांची कसरतीची रीति बोजड आहे; शिवाय कांहीं ऋतूंमध्यें विवक्षित खेळ खेळावयाचे असतात, त्यांत सर्व प्रकारचे लोक मोठ्या उत्सुकतेनें सामिल होतात.

वर सांगितलेल्या खेळांपैकीं मुख्य होळी आहे, असें ह्मटलें असतां चालेल. हा सण वसन्तकालाचा प्रीत्यर्थ आहे, आणि यामध्यें साधारण लोक, व मुख्यत्वेंकरून

मुलगे, हे होळ्यांभोंवते नाचतात, बीभत्स व निंदापर गाणीं गातात, आणि आपल्या वरिष्ठांविषयीं पाहिजे तितकें घाणेरें बोलणें बोलतात, व ते वरिष्ठहि त्याविषयीं राग मानित नाहींत. एकमेकांवर रंग शिंपडणें व गुलाल फेंकणें, हा त्या वेळचा मुख्य खेळ असतो. तो रंग पिचकाऱ्यांनींहि उडवितात आणि केव्हां केव्हां गुलालाचे गोळे करून मारितात; ते असे केलेले असतात, कीं ते आंगाला लागल्या बराबर फुटतात. या खेळांत सर्व प्रकारचे लोक मोठ्या उत्साहानें मिसळतात, आणि तो खेळ चालतां चालतां, त्या रंगानें ते इतके चिंब होतात, व गुलालाचें एवढें कीट त्यांचा आंगावर बसतें, कीं त्यांस बहुधा ओळखतां येत नाहीं. मोठा संभावित मुख्य प्रधान असला, तरी तो आपल्या दरबारामध्यें आलेल्या परराज्यांतील वकीलास होळी खेळण्याकरितां आपल्या घरीं बोलावितो, आणि जसा एकादा शाळेंतील मुलगा त्या सणासंबंधीं अद्वातद्वा कृतींत मोठ्या उत्साहानें मग्न होतो, त्याप्रमाणें तोहि होतो.

होळीशिवाय दुसरे कमी गोंगाटाचे सण पुष्कळ आहेत; त्यांतून कांहीं सर्व हिंदुस्थानभर आहेत, व कांहीं एकदेशी ह्मणजे नियमित ठिकाणीं आहेत. जेव्हां बाजरीचा कणसांत दाणा धरूं लागतो, तेव्हां मराठे लोक त्याचा हुर्डा खाण्याकरितां एकमेकांस आपापल्या घरीं बोलावित असतात; ही चाल एकदेशी आहे. असा हुर्डा खाणें हें गांवढेकरी लोकांस एक सृष्टिजन्य पक्कान्नच मिळत असतें; परंतु ही चाल गरीबगुरीबांमध्येंच असत्ये असें नाहीं; मोठ्या लोकांतहि असत्ये. यास दृष्टान्तः— वऱ्हाडचा राजा आपल्या मुख्यमुख्य दरबारी लोकांस पुष्कळ दिवस लागोपाठ अशा मेजवानीस बोलावितो; त्या वेळीं तेथें प्रथम बाजरीचा हुर्डा वांटितात, व मागून नेहमींचा बेताप्रमाणें जेवण होतें.

दिवाळी, हा सर्वसाधारण सण आहे. त्यामध्यें प्रत्येक घरीं व देवालयांत, छपरांचा बाजूनें, खिडक्यांमध्यें, व

पोटमांडावणीचा गलथ्यांवर, आणि बांबूंचा परांचांवर, दिवल्यांचा हारी लावून आराश करितात. पूर्वीं या सणामध्यें, गंगेवरून काशी शहर पाहूं गेलें असतां मोठें भव्य दिसत असे. जा महिन्यांत दिवाळी पडत्ये त्यामध्यें, (ह्मणजे चान्द्रमानानें कार्तिक महिन्यामध्यें,) बांबूचा काठ्या पुरून त्यांवर आकाशदिवे लावतात. ते केव्हां केव्हां इतके उंच असतात, कीं ते क्षितिजाजवळ लहान तारेच आहेत असें दुरून पाहणारांस बहुत वेळा लटकेंच भान होतें.

जन्माष्टमी, हा एक सण आहे. या दिवशीं कित्येक मुलगे जमून, कृष्ण व गोपी यांचा सारखीं सोंगें घेऊन नाचतात, व आपापल्या विवक्षित सोंगांप्रमाणें गाणीं गातात.

धर्माचा व व्यापाराचा कामांत गुंतलेले असतील ते खेरीज करून, बाकी सर्व लढाऊ लोकांस लांडगे, हरिण, ससे, इत्यादींची कुत्र्यांनीं शिकार करण्याचा, व कुत्रे घेऊन तलवारी व भाले यांणीं रानडुकराची शिकार करण्याचा इषक असतो. ते हत्तीवर बसून वाघ मारितात, व केव्हां केव्हां घोड्यावर बसून व पायींहि ती शिकार करितात. केव्हां केव्हां एकाद्या खेड्यामध्यें आसपास वाघाचा उपद्रव होत असला तर गांवढेकरी लोक जमून त्यावर हल्ला करितात, आणि त्या वेळीं मोठी मर्दाई दाखवितात; परंतु जेथपर्यंत वाघ मनुष्यांचा वाटेस जात नाहीं, तेथपर्यंत ते त्यावर हात टाकित नाहींत.

कसरत इत्यादि व्यायाम.

लढाऊ लोक हे जरी स्वभाववृत्त्या आळशी असतात तरी ते मोठे चपळ व उत्कृष्ट घोडेस्वार असतात. घोड्यावर बसून भाला मारण्याचा सफाईविषयीं मराठे लोकांची मख्याति आहे. त्यांचा घोड्यांचा पावला आंखूड असतो, जेरबंद तंगदार असतो, आणि लगाम बारीक परंतु फार तीक्ष्ण असत्ये. त्यांचा पुठा जोरदार असतो, आणि भरधांव जात असतां अगदीं थोडक्या जाग्यांत त्यांस बाजूवर उलटायास, व एकदम उडी मारायास शिकवितात; तेणेंकरून समोर

लढणाऱ्या शत्रूस मारण्याचें अवसान सांपडण्यापूर्वीं त्यांस त्यावर जाऊन पडतां येतें.

हिंदुस्थानांतील दोन फौजा लढाईस उभ्या राहिल्या, ह्मणजे त्यांतील फुटकळ लढाई करणारे लोक एकमेकांत मिसळून भाल्यांनीं लढतात. तें लढणें एकाद्या युरोपीयनानें पाहिलें असतां त्यास बहुधा खेळासारखें वाटतें. पाहूं जातां, ते एकमेकांवाटोळे गिरक्या घालितात, आणि एकमेकांस ठकविण्याकरितां पट्टे करितात, आणि हमेशा जरी ते एकमेकांचा जवळजवळ असतात, तरी युद्धांत भिडण्याचा त्यांचा उद्देश दिसण्यांत येत नाहीं. जर वास्तविक पाहिलें, तर प्रत्येक आपला डाव साधण्याकरितां शर्त करित असतो, परंतु त्याचा समोरचा शत्रूचा कुशलतेचा फेरफटक्यानें याचें कांहीं साधत नाहीं. शेवटीं, दोघांतून एक घायाळ होऊन घोड्यावरून पडला, ह्मणजे ते दोघे खरेखुरेच लढत होते अशी जवळचा पाहणारांची प्रथम खातरी होत्ये.

हिंदुलोक घोड्यावर बसून तोड्याचा बंदुकेनें चांगलें निशाण मारितात; परंतु मुसलमान हे त्यांपेक्षां अधिक चांगलें निशाण धरितात.

या लोकांचा चपलतेचीं दुसरीं पुष्कळ उदाहरणें आहेत, त्यांमध्यें मोठे लोक हे केव्हां केव्हां आपण स्वतांच आपले हत्ती हाकतात, हें एक आहे. असें करण्यांत मोठेपणास दर्शनीं कांहीं कमीपणा येतो, असें ह्मटल्यास, ते असें प्रतिपादितात कीं जर कोणी सरदाराचा महात लढाईत मरण पावला तर त्यास आपला हत्ती स्वतः हाकतां येत असावा. प्राचीन काळीं हत्ती हांकण्याचा कलेचें सरदारांमध्यें मोठें मान असे.

पोशाक.

बंगाल्यांतील लोकांचा पोशाक जो पूर्वीं सांगण्यांत आला आहे तोच बहुधा हिंदूंचा नियमित पोशाक असावा, आणि तोच बहुधा सर्व बाणीदार ब्राह्मण वापरितात. हा पोशाक, कापसाचा सफेद

कापडाचा दोन धोतरांचा असतो; त्यांतून एक नेसून कांसोटा मारितात, व त्याचा चुण्या ढोंपरांखालीं पुष्कळ सुटलेल्या असतात. दुसरें अंगवस्त्र; तें खांद्यावरून टाकिलेलें असतें, व केव्हां केव्हां जर कोणाचा डोकीस कांहीं नसलें, तर डोकीवरूनहि पांघरतात. थोडी शेंडी ठेवून बाकी सर्व डोकीवरील व दाढीचे केंस काढून टाकितात; मिशा राखतात; (कदाचित् अति कडकडीत ब्राह्मण मात्र ठेवित नसतील.) हल्लीं, बंगाला खेरीजकरून बाकी सर्व प्रदेशांतील हिंदु ( जे कडकडीत नसतात ते ) नेसावयाचें धोतर लहान व घट्ट नेसतात, व त्यावर सफेद कापडाचा अथवा चिटाचा चोळणा आणि रंगित कांचा हे घालितात; आणि तशाच कापडाचा उपरणा त्यांचा खांद्यावरून टाकिलेला असतो, व डोक्यास पागोटें असतें. कांहीं लोक मुसलमानांसारख्या ढिल्या तुमानी घालितात.

सफेद पारदर्शक मलमलीचा लांब झगा अंगाबराबर घातलेला परंतु कमरेखालीं त्यास असंख्य चुण्या पडलेल्या असतात, असा तो झगा, व कमरबंद, आणि पागोटें व पोंचा, कंठ्या, व दुसरें जवाहीर आणि अलंकार, इतकें मिळून भरगच्ची पोशाक होतो. हा पोशाक कांहींसा मुसलमानांपासून घेतलेला आहे, ह्मणून तो फार प्राचीन असूं शकणार नाहीं. असें असून, मिश्र देशामध्यें थीब्स एथें जा कबरी आहेत त्यांवर राजांचा जा आकृति आहेत त्यांमधून कांहींचें रूप, अवयवांची स्थिति, व इतर सर्व प्रकार, हे, विलक्षण काकतालीय न्यायानें, ( कारण याहून अधिक संबंध असूं शकणार नाहीं, ) जसे साम्प्रतचा एकाद्या हिंदुराजाचे असतात त्याच प्रमाणें यथास्थित काढलेले आहेत, ही गोष्ट चमत्कारिक आहे.

जसा पुरुषांचा पोशाक वर सांगितला आहे, त्याप्रमाणेंच जवळजवळसा स्त्रियांचा असतो; परंतु त्यांचे कपडे अधिक मोठे व लांब असतात, आणि स्त्रिया.

सफेद असतात व रंगांचेहि असतात. पुरुष व स्त्रिया हीं दोन्हि पुष्कळ दागिने घालतात. कनिष्ठ वर्णाचे लोकहि कानांत, हातांत, व गळ्यांत भूषणें घालितात. केव्हां केव्हां आपणाजवळ जो ऐवज असेल तो चांगल्या रीतीनें ठेवितां यावा म्हणून त्याचे दागिने करून घालितात. केव्हां केव्हां रुद्राक्षांचा व केव्हां इतर वृक्षांचा लांकडांचें कांतीव मणी घेऊन त्यांचा माळा करितात, व त्यांत एक आड करून मध्यें सोन्याचे किंवा मवालाचे मणी घालितात. मान व पाय हीं उघडींच असतात, परंतु कोठें बाहेर जात्ये वेळीं बुटेदार व पुढें चोंच आलेले जोडे घालतात, व ते घरांत आल्यावर अथवा पालकींत बसल्यावर काढितात. मुलांचा अंगावर भाराभर सोन्याचे दागिने घालतात, तेणेंकरून दुष्टांस लोभ सुटून ते खून करण्यास वारंवार प्रवृत्त होतात.

प्राचीन काळचा हिंदूंचा स्त्रिया आमचा ( म्ह० इङ्ग्लिशांचा ) स्त्रियांपेक्षां विशेष एकलकोंड्या व पड्यांत राहणाऱ्या असत; परंतु त्यांस जनानखान्यांत अगदीं कोंडून ठेवण्याचा पाठ हा मुसलमानांनीं चालू केला आहे, आणि तोहि साम्प्रत क्षत्रियांत मात्र आहे. ती चाल ब्राम्हणांत मुळींच नाहीं. पेशव्याची स्त्री चालत देवळास जाई, आणि आपल्या पदवीप्रमाणें बराबर लोक घेऊन रस्त्यांतून अगदीं उघड रीतीनें घोड्यावरून अथवा पालकींत बसून जात असे.

असें आहे तथापि पुरुषांचा समाजांमध्यें स्त्रिया जात नाहींत,व त्यांची गणना बराबरीचा नात्यानें होत नाहीं. कनिष्ठ प्रतीचा लोकांत बायको स्वयंपाक करून वाढित्ये व नन्तर आपण जेवित्ये. जर पुरुष व बायका जमून जात असल्या, तर, जरी रस्ता चांगला प्रशस्त असला, तरी, पुरुषांचा मागून बायका चालतात. कनिष्ठ प्रतींचा लोकांमध्यें बायकोस मारणें हें विशेष लज्जास्पद आहे असें आमचा लोकांप्रमाणें समजत नाहींत. आतां भरी यांचा चालीचा क्रमानें स्त्रियांची पदवी नीच

झाली आहे, तरी मनुष्यांतील स्वाभाविक भीति व सदसद्विचारबुद्धि हीं त्यांस त्यांचे साहजिक, परंतु गेलेले, हक्क परत आणून देतात; त्यांचे नवरे त्यांवर भरवसा ठेवितात; आपल्या कामकाजाविषयीं त्यांस सला विचारितात; आणि इतर देशांप्रमाणेंच पुष्कळ ठिकाणीं त्यांचा छापेखालीं असतात.

गुलामगिरी.

बहुधा सर्व हिंदुस्थानदेशांत लोकांचा घरीं गुलाम असतात, परंतु ही गुलामगिरी सौम्य आहे. इकडील गुलाम धन्याचाच घरीं जन्मलेले असतात, अथवा दुकाळांत आईबापें आपलीं जीं मुलें विकतात तीं, अथवा धान्य विकणारे वणजारी ( जांविषयीं पूर्वीं उल्लेख आला आहे ते ), चोरून आणून जीं विकतात तीं, मुलें गुलाम होतात. हा विकण्याचा गुन्हा शिक्षेस पात्र आहे; परंतु तो प्रसंगवशात् मात्र घडतो; त्यामुळें, विलायतेंतील गुलामांचा व्यापारापेक्षां हा उमगणें कठीण पडतें. स्त्रियांचा पूर्वोक्त वाईट स्थितीपेक्षां हिंदूंचा सुधारणेस हा एक खचित अधिक मोठा डाग आहे, परंतु तो प्रथमदर्शनीं वाटतो तितका मोठा नाहीं. जे बंदे गृहदास असतात, त्यांस त्यांचे धनी इतर चाकरांप्रमाणें वागवितात; चाकरांमध्यें व त्यांमध्यें भेद इतकाच असतो, कीं त्यांस घरचे असें समजतात. त्यांस कधीं विकतात असें मला वाटत नाहीं, आणि त्यांमध्यें व साधारण स्वतंत्र लोकांमध्यें कांहीं दर्शनी भेद नसतो, म्हणून त्यांकडेस लोकांचें विशेष लक्ष लागत नाहीं; परंतु गुलामगिरीची चाल ही केवळ शापदग्धच आहे; ती या देशांत त्या शापापासून कांहीं सुटली आहे असें नाहीं. जा मुली चोरीस जातात, त्यांस ते चोर वेश्यागृहांचा धन्यांस विकतात व मग त्यांचा शरीरावर व्यापार करण्याचा उद्देशानें त्यांस वाढवितात: कित्येक ठिकाणीं त्यांचा सकाम धन्यांपासून त्यांस जाच होतो, व कित्येक ठिकाणीं त्यांचा धनीनींचा मत्सराचे दुष्ट परिणाम त्यांस भोगावे लागतात.

हिंदुस्थानांतील कित्येक प्रदेशांत मोठ्या व श्रीमान् लोकांकडेसच दास असतात असें नाहीं, साधारण कुणबी लोकांचा कुटुंबांमध्येंहि असतात, आणि तेथें त कुटुंबांतील इतर मनुष्यांप्रमाणें वहिवाटतात. मनुस्मृति वाचणारांचा लक्षांत येईलच कीं प्राचीन काळचा हिंदुलोकांमध्यें क्षेत्रदास नव्हते. पुढें ते लोक दक्षिणेस पसरत चालले, तसे तिकडे त्यांस किन्येक ठिकाणीं क्षेत्रदास आढळले. साम्प्रत किन्येक जंगली प्रदेशांत किन्येक बंदे विवक्षित जमिनीशीं बांधलेले असतात, ( म्हणजे ती जमीन जो घेईल त्याचें दास्य त्यांस करावें लागतें ); परंतु त्यांचें दास्य इतकें सैल आहे कीं त्यांस मजूरी द्यावी लागत्ये, आणि वास्तविक पाहूं जातां त्यांस कांहीं बंद असतो असें दिसत नाहीं. हिंदुस्थानाचा दक्षिणेकडील प्रदेशांत त्यांचा जमीनीशीं संबंध असून, जमीनीबराबर त्यांस विकतात. मलबारांतील गुलामांची स्थिति फार नातवानीची आहे, व तेथें जमीनीशिवायहि त्यांस विकतात. मलबारप्रान्त व हिंदुस्थानाचा अगदीं दक्षिणटोंकाचा प्रदेश, यांमध्यें एक लक्षापासून चार लक्ष पर्यंत गुलाम असावे असा सुमार करितात. बंगाला, व बहार यांमध्यें, व गुजराथेचा आग्नेयीकडे जसे डोंगराळ प्रदेश आहेत तशा प्रदेशांतहि असे गुलाम आहेत. हिंदुस्थानाचा एकंदर वस्तीशीं ताडून पाहिलें असतां, या गुलामांचें मान अगदीं थोडें आहे, आणि बहुतेक मुलूकामध्यें तर क्षेत्रदास हा शब्दहि माहीत नाहीं.

लग्नाचा संस्कार.

लग्नाचा वेळीं पुष्कळ संस्कार करितात, परंतु त्यांतून चित्तवेधक असे क्वचितच असतात; त्यांमध्यें नवरानवरीचा हातांत हात घालून दर्भानें बांधितात, हा एक संस्कार आहे; परंतु प्रत्येक पावलास एक एक मंत्र म्हणून सप्तपदी क्रमणें हा सर्व संस्कारांमध्यें आवश्यक आहे. सातवें पाऊल पडलें, म्हणजे मग तें लग्न फिरावयाचें नाहीं असें म्हणतात. पूर्वी लग्नाचे ८ प्रकार सांगण्यांत आले आहेत, त्यांपैकीं वरील प्रकार

मात्र साम्प्रत चालू आहे, बाकी सर्व रद्द पडले आहेत.

मुलीचा बापानें जांवयापासून कांहीं देणगी घेऊं नये म्हणून मनूमध्यें जो वारंवार निषेध केला आहे, तो त्या वेळांपेक्षां हल्लीं फार सक्तीनें चालू आहे. त्याविषयीं लोक इतके अभिमानास पडतात, कीं पुढें जन्मभर जांवयापासून किंवा मेहुण्यापासून कांहीं मदत घेणें हें बेअब्रूचें काम आहे असें समजतात. नवऱ्या मुलानें मुलगी मागण्याकरितां सासऱ्याचा घरीं अवश्य आलेंच पाहिजे; आणि लग्नहि तेथेंच झालें पाहिजे.

जांवई आला, म्हणजे नियमित रीतीप्रमाणें प्राचीन काळचा आदराचा प्रकारांनीं त्याचा स्वीकार करितात. त्या वेळचा पाहुणचाराप्रमाणें साम्प्रतहि मधुपर्काकरितां गाय पुढें आणितात; परंतु हल्लीं तिला जीवदान द्यावें असें जांवई मागतो, व मग तिला सोडून देतात.[२]

राजांचीं लग्नें व्हावयाचीं असतात तेव्हां नवरी अन्य देशांतून येत्ये, म्हणून तिचा बापाकरितां एक हंगामी घर बांधितात; परंतु त्यासाठीं मोठा खर्च करून आराश करितात. सर्व लग्नांमध्यें वरातेचा समारंभ मोठा असतो, व त्या वेळीं उभय पक्षांचा सामर्थ्याप्रमाणें जेवढा थाट करवेल तेवढा करितात.

बंगाल्यामध्यें हे समारंभ विशेष उमदे असतात, आणि त्या वेळीं लाखों रुपये खर्च होतो, हें प्रसिद्ध आहे. नवरा व नवरी हीं बहुधा लहान मुलें असतात. नवरी ही हमेशा अप्राप्तयौवन असावी असें त्यांचें मत आहे, व साधारण पाठ पाहतां उभयतां बहुधा दहा वर्षांचा आंत असतात. हीं उतावळीं लग्नें परस्परांत प्रीतिभाव उत्पन्न न करितां पुष्कळ ठिकाणीं लौकरच भिन्नभाव पाडितात, व मग त्या दोघांचे जन्मांचे जन्म तसेच जातात.

---

(२) हा लेख एकदेशी आहे, सर्व हिंदूंस लागू नाहीं. भा० क०

शिक्षा.

हिंदु आईबापांची प्रीति आपल्या लहान मुलांवर विशेष असत्ये, परंतु मुलें जाणतीं झालीं, म्हणजे त्यांचे तण्टे होतात; आपल्या मिळकतीची पाहिजे तशी व्यवस्था करण्यास बापास धर्मशास्त्रावरून बहुधा अटकाव असतो, त्यामुळें हे तण्टे उद्भवतात.

कुलीन घराण्यांतील मुलांस मोठ्या पुरुषांसारखे (लहान ढालतलवार इत्यादि सुद्धां) पोशाक देऊन सभेंत आणितात, व ते मुलगेहि प्रौढ लोकांप्रमाणें, यथायोग्य व आदरसत्कारपूर्वक वर्ततात.

हलक्या लोकांचीं मुलें रस्त्यांमध्यें लोळत असतात, एकमेकांवर धूळ फेंकतात, आणि विलायतेंतील मुलांपेक्षांहि विशेष अनावर असतात. या वयाचा सुमारास तीं बहुधा फार सुंदर असतात.

लिहिणें व साधे हिशेबठिशेब झाले, म्हणजे साधारण लोकांचें शिकणें आटोपलें. सर्व शहरांमध्यें, व कित्येक खेड्यांमध्यें शाळा असतात, त्यांमध्यें जाणाऱ्या मुलांस दरमाह कांहीं थोडें द्रव्य द्यावें लागतें. दक्षिणहिंदुस्थानामध्यें प्रत्येक मुलास ७ पासून ८ रुपये पर्यंत वर्षास खर्च येतो अशी अटकळ आहे; परंतु इतर प्रदेशांमध्यें हा खर्च फारच थोडा असावा. बंगाला व बहार यांमध्यें शिकविणारास कांहीं थोडें धान्य अथवा कच्चा भाजा देतात, म्हणजे झालें.

शाळांमध्यें गुरु हा काम शिक्षकांचा मदतीनें चालवितो; ही पद्धति मद्रासेच्या कित्ता पाहून इङ्ग्लंडांतील लोकांनीं घेतली आहे.

मद्रासचा गवरनर सरटामसमनूरो याणें असा अजमास केला आहे, कीं त्या इलाक्यांतील सरकारी शाळांतील विद्यार्थ्यांची संख्या सर्व इलाक्यांतील मुलांचा एकंदराचा एक तृतीयांशाहून कमी आहे. आतां हें मान जरी कमी आहे, तरी अगदीं अलीकडचा काळापर्यंत, युरोपांतील

बहुतेक देशांमधील मान याहूनहि कमी होतें; असें सरटा-मसानें लिहिलें आहे तें खरें आहे. मद्रास इलाक्यापेक्षां हिंदुस्थानांतील इतर इलाक्यांमधील मान विशेष अधिक नाहीं असें संभवतें: वरील सरासरीच जराशी फार मोठी आहे असा मला अंदेशा येतो. या सर्व देशांमध्यें स्त्रिया बहुधा अगदीं अशिक्षित असतात.

चांगले खातेजेवते लोक असतात ते बहुधा आपलीं मुलें शाळेंत पाठवित नाहींत, परंतु मुद्दाम ब्राह्मण ठेवून त्यांस घरीं शिकवितात. जा विद्या गहन आहेत, त्या त्यांतील निपुण गुरू असतात ते फुकट शिकवितात, व त्या अध्यापकांस राजांकडून आणि द्रव्यवान् लोकांकडून जा भेटी येतात त्यांवर ते आपला निर्वाह करितात, व बहुत ठिकाणीं आपल्या विद्यार्थ्यांसहि पोशितात.

साम्प्रत ब्राह्मणांखेरीज कोणाजवळ विद्या राहिली नाहीं, आणि त्यांचीहि विद्या खरजांत आली आहे:—

प्राचीन काळचा व्युत्पत्तिविद्येचे जे शेष राहिले आहेत, त्यांवरून, त्या काळीं या विषयांचा किती ऊर्जित काळ झाला होता, हें स्पष्ट दिसतें. त्या वेळीं ज्ञानाचा प्रसर विशेष झाला होता, याविषयीं तसा पुरावा नाहीं; परंतु त्या वेळीं चार वर्णांतून तिहींस वेदाभ्यास करण्यास उत्तेजन दिलेलें होतें, यावरून हल्लींचा पेक्षां ते लोक विशेष बहुश्रुत होते असें संभवतें.

नावें.

निरनिराळ्या इतिहासामध्यें जा लोकांचा नांवांचा उल्लेख आला आहे त्यांची चांगली ओळख होण्यास अडचण न पडावी, ह्मणून हिंदुस्थानांतील लोकांचा नांवांविषयीं सविस्तर वर्णन करितों; बाकी वास्तविक पाहूं जातां, या विषयाची एवढी योग्यता नाहीं.

हिंदुलोकांपैकीं थोड्याच जातींस आडनावें आहेत. जशीं मराठ्यांत आडनावें आहेत, तशींच युरोपखण्डांत आहेत. राजपूतांमध्यें खूमांचीं नावें लावतात; परंतु तीं फार

व्यापक असतात, त्यामुळें कुळांचा नावांचा ठिकाणीं तीं बराबर लागू पडत नाहींत. याचप्रमाणें हिंदुस्थानाचा उत्तरेकडील ब्राह्मणांची स्थिति आहे.

हिंदुस्थानाचा दक्षिणेकडील प्रदेशांत जो कोणी पुरुष ज्या गांवचा रहिवासी असतो त्या गांवाचें नाव तो आपल्या नावापूर्वीं ( अथवा पुढें ) जोडितो. यास उदाहरणः— कडपे कंडी राव ( कडप्यांचे कंडीराव ), व कृष्णराव विंचूरकर ( ह्मणजे विंचूरचे कृष्णराव ). जेथें कागदपत्रांमध्यें नाव घालावयाचें असेल तेथें आपल्या नावास बापाचें नाव जोडितातः हा पाठ एशियाखण्डाचा बहुतेक भागांत चालू आहे; परंतु तो इकडील लोकांनीं कदाचित् मुसलमानांपासून घेतला असेल.

कोणी युरोपीयन गृहस्थ असला, तर तो पहिल्या किंवा शेवटचा, अशा पाहिजे त्या नावानें कोणास हाक मारील, परंतु पहिलें नाव कदाचित् गांवाचें असेल, व शेवटचें त्या पुरुषाचा बापाचें अथवा त्याचा जातीचें असूं शकेल.

कित्येक लोक आपले किताब बदलतात, त्यामुळें नावांविषयीं दुसरी एक अडचण उत्पन्न होत्ये; परंतु ती मुख्यत्वें करून मुसलमानांमध्यें होत्ये. ब्रिटनदेशांतील उमरावहि आपलीं नावें अशींच पालटतात.

उत्तरकार्य. हिंदुलोक, साधारण रीतीनें, मेलेल्यांचीं शवें जाळितात; परंतु गोसावी, बैरागी, सन्याशी, वगैरे दीक्षा घेतलेल्या लोकांस आसनमांडी घालून बसलेलेच पुरतात. मरणासन्न मनुष्यास दरवाजाबाहेर दर्भाचा आसनावर ठेवितात. नंतर तेथें वेदसूक्तें व प्रार्थना म्हणतात, आणि तुलसीचीं पानें त्यावर टाकितात; जर गंगा तेथून नजीक असली, तर नेववल्यास गंगातीरीं नेतात. असे गंगातीरीं

(२) लोकांचा हुद्द्यांवरूनहि त्यांचीं आडनावें पडतात. ( जसे चिटणीसवाले, देशमुख, इ॰. मा॰ क॰)

नेलेले मनुष्य सावध झाल्यास ते पुनः परत आपल्या कुटुं-बांत येत नाहींत असें म्हणतात,आणि पाहूं जातां अशा लो-कांचा व त्यांचा वंशजांचा वस्तीनें भरलेले गांव गंगाकांठीं आहेत असें सांगतात; परंतु ज्यांस या विषयाची चांगली मा-हिती असावी, ते असें म्हणतात कीं असे गांव नाहींत, व अ-शी चाल नाहीं; यावरून, सावध झालेल्या मनुष्यास परत ये-ऊं देत नाहींत असें जें म्हणणें आहे, तें बहुधा गैरसमजुती-मुळें उत्पन्न झालें आहे. मेल्यानंतर मेतास स्नान घालिता-त, सुगंधि द्रव्यें लावितात, व त्यावर फुलें घालितात, आणि लागलाच सरणावर नेतात. त्याचा पुढें वाद्यें वाजवित न्या-वीं असें सांगितलें आहे, आणि हिंदुस्थानांतील दक्षिणेकडी-ल देशांत अद्यापि तसें करितात; व त्याच प्रदेशांत शव उघडें ठेवून तोंडास गुलाल लावितात. इतर प्रदेशांमध्यें शवावर कफ-न घालून तें तजवीजीनें आच्छादितात. दक्षिणेंतील पूर्वोक्त प्रदेश खेरीज करून, इतर ठिकाणीं वाद्यांशिवायच शव नेतात; तें नेणारे कांहीं दुःखप्रदर्शक शब्द म्हणत जातात.

साधारण मनुष्याचें सरण ३।४ हातांहून अधिक उंच नसतें; तें फुलें घालून शोभवितात, आणि ज्वाळेंत तूप व सुवासिक तेलें ओतितात. कोणी तरी संबंधी तें सरण पेटवितो; परंतु त्यापूर्वीं त्यास पुष्कळ संस्कार करावे लागतात. तो व दुसरे जे सुह्रत्संबंधी तेथें जमलेले असतात ते, कांहीं संस्कार करून, स्नानें करितात, आणि पाण्याचा तटीं बसून दहन होत अस-तें तें पाहत असतात. अशा प्रसंगीं ओलीं वस्त्रें पांघरून दुःखा-र्त्त मुद्रेनें ते दीनवाणे दिसत असतात, त्यांस पाहून कोणासहि दुःख वाटेल. आतां, तशा ओल्या वस्त्रांनिशीं राहणें अ-थवा तसा शोक करणें, हें त्यांचा धर्माप्रमाणें आवश्यक नाहीं; उलटें त्यांचा धर्मांत असें सांगितलें आहे, कीं अमुक मंत्र पढून आपलें दुःख शमवावें, व रडणें व शोक यांपासू-न दूर राहवें.

जे रणांत मरतात, अथवा जा विधवा सत्या जातात, त्यांखेरीज दुसऱ्या कोणाचीं थडीं हिंदुलोक विरळाच बांधतात. त्यांचीं थडीं लहान चौकोनी सिंहासनासारखीं असतात.

त्यांचा जा नियतकालिक उत्तरक्रिया करितात, त्यांविषयीं पूर्वी सविस्तर वर्णन केलें आहे. केव्हां केव्हां या क्रियांस अचाट खर्च करितात. इसवी सन १८२४ चा जून महिन्याचा वर्तमानपत्रांमध्यें कलकत्त्यांतील एका कुटुंबाची हकीकत लिहिली होती; तींत असें सांगितलें होतें, कीं त्या कुटुंबांतील मुख्यानें एका प्रसंगीं ब्राम्हणांस पुष्कळ व अति मोलवान् देणग्या देऊन शिवाय ५,००,००० रुपये गरीबांस वांटले; ( बंदिवान् कर्जदार लोकांस सोडविण्याकरितां जे २०,००० रुपये धर्म करण्याची चाल आहे, ती रकम बहुधा या पांच लक्षांत आली असेल असें वाटतें. )

सती. हिंदूंचा विधवा आपल्या नवऱ्यांचा शवांबरोबर केव्हां केव्हां आपणास जाळून घेतात, व अशा दहनास सत्या असें म्हणतात. ही क्रूर चाल केव्हां सुरू झाली, त्याचा निश्चय सांगवत नाहीं. सतीविषयीं मनूमध्यें उल्लेख नाहीं, आणि विधवा, आपल्या नवऱ्यांचा मरणानंतर, जीवंत राहवयाचा याविषयीं त्याचा मनांत संशयच नव्हता असें दिसतें; कारण नवऱ्याचा मरणानंतर त्याचा श्रद्धावान् व तत्पर विधवेनें कसें चालावें याविषयीं त्याणें लिहिलें आहे.[४] कांहींचा मतें सतीस प्राचीन ग्रंथांचा व मुख्यत्वेंकरून ऋग्वेदाचा आधार आहे; परंतु त्या वाक्यांचा अर्थ कांहीं तसा होत नाहीं असें दुसरे म्हणतात. डैडोरस या युनानी ग्रंथकारानें ख्रिस्तजन्मापूर्वी आपला ग्रंथ लिहिला आहे, त्यामध्यें इसवी सनापूर्वी ३०० वर्षांचा पलीकडे युमिनिसाचा फौजेंत कोणी सती गेल्याचें उदाहरण दिलें आहे, त्यावरून ही चाल पुष्कळ पुरातन आहे असें

(४) अ० ५ श्लो० १५६ इत्यादि.

ती जाण्याचा हक्क वडील बायकोचा आहे, व गर्भार स्त्रियांस वैधव्य आलें असतां त्यांस जाळूं नये असा नियम होता; या व अशाच दुसऱ्या गोष्टी त्याणें आपल्या बखरींत लिहिल्या आहेत, त्या हिंदूंचा चालींशीं चांगल्या मिळतात, आणि त्याणें संस्कारादिकांचें जें यथातथ्य वर्णन केलें आहे, त्यावरून त्याचा वृत्तान्त सप्रमाण आहे; आणि त्या वेळीं सती जाण्याची चाल (साम्प्रतचा इतकी जरी प्रशस्त नसली तरी) पुरी स्थापली गेली होती याविषयीं कांहीमात्र संशय नाहीं.

नवऱ्याचा मरणानंतर विधवेची स्थिति फार नीच होत्ये यामुळें हा सती जाण्याचा पाठ पडला, असें डैडोरस याचें मत होतें; आणि मिशनरी पाद्रीलोकांचें मतहि तसेंच आहे. आतां जर सती जाण्याचें कारण एवढें व्यापक असेल, तर हा पाठ इतका विरळा असणार नाहीं; म्हणून, सती गेलें असतां, स्वतांस व नवऱ्यास लागलेंच स्वर्गसुख प्राप्त होण्याची जी आशा असत्ये ती, व असा देहत्याग केल्यापासून होणारी जी कीर्ति ती, हीं दोन कारणें कांहीं थोड्या साक्षात्काराभासी विधवांचा मनांत प्रेरणा करून हें घोर दिव्य करण्यास त्यांस प्रवृत्त करितात, ही कल्पना विशेष संभवत्ये.

विधवेची मालमत्ता आपणास मिळावी म्हणून तिचे सगे तिला सती जाण्याविषयीं उत्तेजित करितात असें कोणाचें म्हणणें आहे; परंतु सर्वच ठिकाणीं विधवेची मत्ता असत्ये असें नाहीं, आणि जेथें असत्ये तेथेंहि कोणी लोक तिशीं अशी वर्तणूक करित असतील, असें म्हणणें हा साधारण मानवस्वभावाविषयीं फारच कठोर अभिप्राय आहे. वास्तविक पाहूं जातां बहुतेक प्रसंगीं, (किंबहुना सर्व प्रसंगीं,) तिचे सगे तिला सती न जाण्याविषयीं मनःपुरःसर सांगत असतात, आणि तिणें न जावें म्हणून, आपल्या सांगण्याचा पाठपुरावा जर तिचीं लहान मुलें असलीं तर

त्यांस आड आणितात; तसेच त्यांचा कुटुंबाचे जे दोस्त असतील त्यांस व सरकारचा अम्मलदारांस मध्यस्थीस घालितात. हा प्रकार सर्वांनीं भरवसा ठेवण्याजोगा आहे. जर सती मोठ्या कुळांतील असेल, तर तिची समजूत पाडून बुद्धि फिरविण्याकरितां खुद राजा जातो; कारण पुष्कळ सत्या गेल्या असतां राज्यास अपाय आहे असें समजतात. अशा भेटींमध्यें विधवेचें चित्त गुंतवून तितक्यांत संधि साधून शव नेऊन जाळून टाकितात, हीहि सती न जाऊं देण्याची एक साधारण युक्ति आहे.

सतीचें दहन करण्याचे प्रकार पुष्कळ आहेत. बंगाल्यांत शवास व त्याचा सजीव विधवेस सरणावर निजवितात, आणि तिला उठतां न यावें म्हणून टणक्या दोऱ्या व बांबूचा काठ्या वरून बांधून घेतात. औंध्या देशामध्यें जमीनींत खाडा खणून त्यांत सरण रचलेलें असतें, व ती विधवा त्यांत उडी टाकित्ये. दक्षिणेमध्यें ती सती जाणारी स्त्री सरणावर बसून आपल्या नवऱ्याचा मस्तक मांडीवर घेत्ये, आणि धुरानें दम कोंडून जाई पर्यंत, अथवा सरणाचा चारी कोनांस खांब पुरून त्यांवर मोठ्या लांकडांची छपरी केली असत्ये ती पडून तिचा चुराडा होई पर्यंत, ती तशीच असत्ये.

सतीचें दहन होतांना पाहणें, हें मोठें खेदकारक आहे; परंतु तें पाहणाराचा मनांत दया विशेष उत्पन्न होत्ये, किंवा आश्चर्य उत्पन्न होतें हा निर्णय करणें कठीण आहे. पाहूं जातां त्या विधवेची शान्तता अमानुषीय असत्ये, आणि तिचा आसमन्तात् तिचे लोक तिला सन्मान देत असतात; असें असून, तिची वृत्ति सौम्य असत्ये, आणि लोकांस जा शेवटच्या भेटी द्यावयाचा, व चालीप्रमाणें जवळचांचा सत्कार करावयाचा तो करण्यांत यत्किंचित्हि कमी न व्हावें म्हणून ती जपत असत्ये, त्यामुळें तिचा शान्ततेचा व सन्मानार्हतेचा प्रकाश विशेष पडतो; व इकडे तिचा समोर जो

दुष्ट मृत्यु ठाकलेला असतो, त्याची भीति तिचा गांवींहि नसल्ये असें उघड दिसतें, त्यामुळें तिचें मरण लोकांचा मनास दुष्पट द्रव आणितें. आतां या गोष्टीचा विचार जर करूं गेलें, तर बुद्धीचा ग्रह उलटा होतो, आणि अति विख्यात स्वदेशाभिमानी अथवा स्वधर्माभिमानी यांणीं जीं स्वदेहार्पणें केलीं तींहि जांहून श्रेष्ठ नाहींत, असें कर्म करण्यास एक अनाथ दुर्बल प्राणी भक्तिवेडाचा योगानें समर्थ होतो, हा विचार मनांत आला म्हणजे आमचा सर्व गर्व नाहींसा होतो. गुजराथेंत जा सत्या जातात, त्यांस अफीम देऊन बेसावध करितात, असें मी ऐकिलें आहे; परंतु दुसऱ्या बहुतेक प्रदेशांत असें खचित करित नाहींत. सती जाण्याचा वेळीं जे संस्कार करावयाचे ते कित्येक स्त्रिया स्वस्थचित्तानें व धैर्यानें करितात; तें पाहून आश्चर्यच वाटतें, आणि अशा प्रसंगीं सभोंवार ज्वाळा चालल्या असतां मध्यें खुल्या बसून ईश्वराची प्रार्थना करीत, आणि बहुधा अगदीं न डगमगतां, जशा नेहमीं देवसेवेचा वेळीं हात जोडून बसतात त्याप्रमाणें हात जोडून बसलेल्या, अशा स्त्रिया लोकांनीं पाहिल्या आहेत. परंतु कित्येक स्त्रिया सरण फोडून निघाल्या असतां, त्या ज्वाळांतून जवळचा लोकांनीं त्यांस आंत लोटून दिलें अशींहि भयंकर उदाहरणें घडलीं आहेत. अशी एक राक्षसी गोष्ट बंगाल्यांत घडून आली; त्या वेळीं तेथें एक इंग्रेज गृहस्थ होता त्याणें तिचा प्राणघाताचें निवारण केलें; परंतु दुसऱ्या दिवशीं त्या बाईनें त्यास अति कठोर भाषणें बोलून सांगितलें, कीं माझी अप्रतिष्ठा होण्यास तूं कारण आहेस, आणि जर तूं माझा आड आला नसतास, तर मी या वेळीं आपल्या भर्त्यासुद्धां स्वर्गवासाचें सुख भोगित असत्यें, आणि माझा मागें राहिलेले लोकहि माझें कल्याण चिंतिते.

सतीचा पाठ हिंदुस्थानामध्यें सर्वत्रच आहे असें नाहीं. कृष्णेचा दक्षिणेस केव्हांहि सती जात नाहीं, आणि पेशव्यांचा मुलूखासुद्धां सर्व मुंबई इलाक्यांत वर्षास ३२ सत्या होतात. [क] बाकी राहिलेल्या दक्षिणेकडील प्रदेशांत सती जाण्याचा प्रकार बहुधा याहूनहि विरळा आहे. उत्तर-हिंदुस्थानांत व बंगाल्यांत हा पाठ इतका साधारण आहे, कीं फक्त् ब्रिटिश सरकारचा राज्यांत प्रतिवर्षीं शेंकडों सत्या जातात, असे सरकारी रपोर्टांचे दाखले आहेत.

पुष्कळ पुरुषहि आत्मघात करून घेतात, परंतु जे असाध्य रोगांनीं पुष्कळ दिवस मरत पडलेले असतात, ते बहुधा अशा कर्मास प्रवर्ततात. हा घातकरणें तो आगींत उडी टाकून, अथवा सरणांत बसून जाळून घेऊन, अथवा नदींत उडी टाकून, अथवा जगन्नाथाचा पवित्र मानलेल्या रथाखालीं चुरडून जाऊन, किंवा अशाच दुसऱ्या रीतींनीं प्राण देतात.

मिस्टर स्टर्लिंग हा ४ वर्षें जगन्नाथास होता; तितक्या मुदतींत त्या गाडीखालीं ३ लोक मरण पावले; त्यांतून एक अदृष्टवशात् गाडीखालीं सांपडला, व दुसरे जे दोन होते ते अति वेदनाकारक पुष्कळ रोगांनीं ग्रस्त झाले होते.

वंशपरंपरेचे चोर.

हिंदुलोकांमध्यें कांहीं चमत्कारिक गोष्टी आहेत. त्यांचें वर्गीकरण करितां येत नाहीं. जशा सर्व धंदे करणाऱ्या जाती त्यांचा मध्यें आहेत, तशा चोरांचाहि जाती आहेत; त्यांतील लोक असें समजतात, कीं चोरी करणें हा आपला वंशपरंपरेचा धंदाच आहे. वसाहतीचा प्रान्तांचा सरहद्दींवर राहणारे जे पहाडी लोक आहेत, ते बहुधा या प्रकारचेच आहेत; आणि सपाट प्रदेशांमध्येंहि हलक्या व मोठ्या चोऱ्या करण्यामध्यें फार हुशार अशा जाती आहेत. युरोपामध्यें पूर्वीं या

(क) या दयाळु सरकारानें ही चाल साम्प्रत बंद केली आहे. भा० क०

असें म्हणतात.

या लोकांचा हा वंशपरंपरेचा धंदा झाल्यामुळें, त्यांची त्या कामांत विशेष प्रवीणता झाली आहे. ती इतकी, कीं हिंदुस्थानांतील चोर जितके हुशार आहेत, तितके इतर कोठेंहि नाहींत. सभोंवार पाहरे असतां, सगळ्यांचे डोळे बांधून, सावधगिरीनें, तत्परतेनें, व सफाईनें, ते कशा चोऱ्या करितात, आणि जेथें मोठी संकटाची जागा असत्ये तेथूनहि कशी लूट मारून नेतात, त्याविषयीं पान्थिक लोक पोटभर गोष्टी सांगत असतात. कित्येक, जमीनी खालून भूयारें खणून, बंदिस्तीचा घरांत उपटतात. दुसरे कोणीकडून तरी प्रवेश करितात, परत निसटून जाण्यासाठीं १।२ दरवाजे उघडतात, आणि लुटण्याचा कामास लागतात. केव्हां केव्हां ते नागवे असतात, अथवा अंगाला तेल लावून येतात, व कटाराहि घेऊन येतात, त्यामुळें त्यांस पकडणें हें भयावह असून पकडल्यावर धरून ठेवणेंहि कठीण पडतें.

यांतून एक जात आहे तिला ठग असें म्हणतात.—(ठग म्हणजे ठक). ते निरनिराळे वेष घेऊन सर्वकाळ देशभर फिरत असतात. वेष घेण्याचा कामामध्यें ते पुरे काबिल आहेत. कोणी मार्गस्थाजवळ विषय आहे असा त्यांस सुगावा लागला, म्हणजे ते त्याचा पोटांत शिरून त्याचा पतकांत मिळतात, आणि त्याबराबर जातां जातां संधि पाहून त्यास कैफ देतात, अथवा त्याचा गळ्यासभोंवती रुमालाची फांसकी अवचित घालितात, आणि रक्ताचा लेश न काढितां त्याचा प्राण घेऊन, त्यास अशा चतुराईनें पुरून टाकितात, कीं त्याचें काय झालें याचा संशय लोकांस येण्यापूर्वीं पुष्कळ वेळ निघून जातो. ठक लोक, भवानीचा स्तव करून आपल्या लुटीपैकीं अमुक हिसा तुला देऊं, असा तिला नवस करितात. धर्म आणि पाप यांचा मिश्रणाचा हा प्रकार, हाहि या लोकांमध्यें एक विशेषच आहे, असें म्हटलें



तरी चालेल; परंतु पश्चिमेकडील देशांतील चांचे व लुटारू लोक हेहि माडोना म्हणून युनानी देवतेस असे नवस करितात, आणि ठकांमध्यें बहुतेक मुसलमान असतात, ते सैतानाबराबर अशींच बोलणीं लावितात. युरोपामध्येंहि जा वेळा लोकांत शकुनपिशाचादिकांवर निष्ठा होती त्या वेळीं तेथेंहि अशीं बोलणीं मानित असत.

चोरांची जात फार दिवसांपासून निराळी राहिली आहे, त्यामुळें इतर लोक त्या लोकांची कीव करित नाहींत, आणि, त्यांस या जगांत व पुढचा जगांत अशी दोन्ही ठिकाणीं शिक्षा मिळेल असें मानितात. जसे काय या सर्वांचे पूर्वज अगदीं पुण्यवानच होते!

गांवचे रखवालदार हे बहुधा या जातीचे असतात, आणि ते विश्वासू व कामांत हुशार असतात. ते फक्त असल्यामुळें त्यांचा जातीचा चोरांपासून उपद्रव होत नाहीं, आणि त्यांचा हुशारीमुळें व दक्षतेमुळें परकी चोरांचें कांहीं चालत नाहीं. गुजराथेमध्यें या प्रकारची एक जात आहे, त्या लोकांस पगी म्हणतात; ते चोरांचा पावलांवरून त्यांचा माग लावितात, अशी त्यांची प्रख्याति आहे. जर अनवाणी पाय असले, तर शुष्क प्रदेशांत साधारण लोकांचा दृष्टीनें कांहीं पावला दिसत नाहीं; परंतु पगी असला, म्हणजे तो त्या पायांचा माग कोणत्याहि ठिकाणीं ओळखूं शकतो; आणि या चिन्हानें ते चोरांचा माग किती दूर पर्यंत लावितात हें जर सांगितलें, तर तें कोणी खरेंहि मानणार नाहीं.[५]

(५) एके वेळीं खेड्यास एक पलटण होती, तिचा जमातीचा जेवणाचा सामानाची चोरी झाली. तिचा पत्ता लावण्यास एक पगी आणिला त्याणें त्याचा पत्ता अहमदाबादेपर्यंत ६।७ कोश लाविला. मग त्या शहरचा रस्त्यांत माग मिळेनासा झाला, तरीं पुढें समोरचा दरवाजाबाहेर पुनः पावला उमगून काढून तो त्याचा मागें चालला. तो चोर एका ओहोळांतून पाण्यापाण्यांतून गेला होता, त्यामुळें यास फार वेळ थांग लागला नाहीं; तथापि याप्रमाणें १०।१५ कोश त्याचा पाठलाग करून याणें शेवटीं त्यास गांठलें, आणि चोरीचा माल आणिला.

दुसरी एक जात आहे ती केवळ मालाचें संरक्षण करित असत्ये; या जातीस भाट व चारण अशीं नावें आहेत. ते राजपूतलोकांमध्यें स्तुतिपाठक व राजांपुढें ललकारणी करणारे असतात, व त्यांस लोक मान देतात. त्यांचें राहणें हिंदुस्थानाचा पश्चिमेकडील प्रान्तांत आहे. राजपूतस्थानांमध्यें ते लमाणें घेऊन जातात. त्यांस चोरीची भीति तर नसत्येच, परंतु जकातीचीहि त्यांस सूट असत्ये. गुजराथेंत, ते पुष्कळ सोनें रुपें घेऊन जातात, व ते जा देशांतून जातात तेथें, जरी मजबूद पाहरा असला तरीहि चोरांपुढें त्याचें कांहीं चालत नाहीं, असें असून, अशाहि ठिकाणीं त्यांस कांहीं इजा होत नाहीं. तसेच रजवाडे आपसांत जे करार करतात व मुख्य सरकाराशींहि करितात, त्यांस हे जामीन असतात. त्यांचा स्वरूपाचा पवित्रतेमुळें, व कपाळफोड्ये निग्रहामुळें त्यांस विशेष सामर्थ्य येतें. जर कोणी भाट कांहीं द्रव्य घेऊन जात असला, आणि त्याजवळ कोणी चोर आला, तर तो अशी भीति घालितो, कीं जर तूं जवळ येशील तर मी त्रागा करीन; अथवा जर कोणी त्याजवळ करार केला असला आणि तो त्याप्रमाणें चालला नाहीं, तर तो तशीच भीति घालितो, व जर त्याचें ऐकिलें नाहीं, तर तो आपलें अंग कटारेनें भोसकूं लागतो; आणि जर बाकी सर्व उपाय नाहींसे झाले, तर तो आपल्या काळजांत कटार बोंचून मरून जातो. कित्येक ठिकाणीं तो आपल्या मुलाचें डोकें कापितो, अथवा जर त्या करारास पुष्कळ जामीन असले, तर सर्वांनीं मिळून कोणाचें डोकें प्रथम कापून टाकावें याचा चिठ्या घालितात. अशा कृत्यांपासून बदलौकिक होतो, आणि भाटचारणाचा जीव घेतल्याचा अभिश्राप येण्याची भीति असत्ये; त्या दोहों हेतूंनीं अतिशय हटेली लोक असतात तेहि वाटेवर येतात. यांचा विश्वासूपणा कित्ता घ्यावयाजोगा आहे. यांचा जातीचें महत्त्व जा छापेमुळें राहिलें आहे,

भाट व चारण.

ती राखण्याकरितां जीव देण्यासहि हे मागें पुढें पाहत नाहींत.

ब्राम्हणांमध्यें याच प्रकारची एक चाल आहे; ती अशी कीं ते एक कटार किंवा कांहीं विष घेऊन कोणी मनुष्याचा दरवाजावर बसतात, आणि त्याला सांगतात, कीं आमचें म्हणणें कबूल करण्यापूर्वीं जर तूं अन्नास शिवशील, तर आम्ही आपले प्राण देऊं. ज्यांचें कर्ज वसूल करावयाचें असतें, तेहि असेंच करितात; परंतु आत्मघाताची भीति मात्र ते घालित नाहींत. या लोकांचा बसण्यास ' धरणें ' असें म्हणतात. ते आपल्या रिणकोस त्याचा अन्नाची भीति घालितात, आणि बाहेरून घरांत अन्नसामग्री आणण्याचीहि बंद करितात. मिळून कोणत्या तरी उपायानें त्यास जेऊं देत नाहींत, आणि जितका वेळ ते रिणकोस जेऊं देत नाहींत तितका वेळ आपणहि उपोषण करितात. या प्रकारची जबरदस्ती राजांवरहि चालत्ये, आणि ती बंद करण्यास राजानें जबरदस्ती करून उपयोगीं नाहीं. लश्करचा पगार शिलक राहिला असतां, ते लोक सबनिसाकडे किंवा प्रतिनिधीकडे, अथवा खुद्द राजाकडे जाऊन धरणें धरितात.

जन्मपर्यंत मैत्री राखण्याचा परस्परें आणभाका करण्याची या देशांत चाल आहे. ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे; परंतु ही चाल हिंदूंतच विशेष आहे असें नाहीं. एकमेकांची दोस्ती राखण्याविषयीं व एकमेकांस मदत करण्याविषयीं जा अशा शपथा घेतात, त्या वेळीं कांहीं विधि करित असतात; आणि विश्वासूपणाविषयीं यांची सांगावयासारखी प्रख्याति नसून, अशी घेतलेली शपथ मोडणें हें फार दुष्कीर्तिकर आहे असें मानितात.

हिंदुस्थानाचा मध्यभागीं जे पर्वत व जीं रानें आहेत,

---

(६) या संस्कारांत भेल, म्हणजे भाजीचें कंवठ, फोडून प्रत्येक त्याचें एक अर्ध घेतो, आणि या गोष्टीमुळें अशा करारांस भेलभण्डार असें म्हणतात.

त्यांत जे लोक राहतात ते मैदानांतील वस्तीपासून अगदीं निराळे आहेत. ते ठेंगणे, काळे, व सडपातळ, परंतु चपळ आहेत. त्यांची दृष्टि तिखट व चंचळ आहे. त्यांचीं वस्त्रें थोडींच असतात; व हत्यारें म्हटलीं तर धनुष्यबाण असतात; चोरी करणें हा त्यांचा उघडा धंदा असतो, आणि जर सरकारचा जोर विशेष नसला, तर ते आपल्या शेजारचा लोकांबराबर हमेशा लढत असतात. जर कोणी त्यांवर स्वारी केली, तर ते गुप्ततेनें व चपळतेनें लढाई चालवितात, आणि शत्रु त्यांवर हल्ला करीत तों, अथवा बहुधा त्यांचा हे दृष्टीस पडण्यापूर्वींच खडपांतून व झाडांचा राहटींतून आपल्या शत्रूंवर बाणांचा पाऊस पाडून पळून जातात.

पहाडी व जंगली लोक.

त्यांचीं गांवढीं पसरलेलीं असतात, आणि तीं ते एका ठिकाणाहून काढून दुसऱ्या ठिकाणीं घेऊन जातात. त्यांचे लहान लहान जमाव असतात, आणि त्यांचे जे नाईक असतात, त्यांची सत्ता पुष्कळ असत्ये. ते थोडीबहुत शेतीक करितात, आणि तींतून जें उत्पन्न होतें त्यावर, व सपाटीवरील मुलूकांमध्यें लुटालूट करून, अथवा जिनसांची अदलाबदल करून, आपला निर्वाह करितात. ते केव्हां केव्हां मृगया करितात; परंतु त्यांचा निर्वाहाची भिस्त तिजवर नसत्ये. पुष्कळ प्रदेशांत मोहाचा झाडाचीं फळें खाऊन हे बहुतेक लोक आपला निर्वाह करितात.

ते हिंदूंचा देवांपैकीं दोहों तिहींस भजतात, परंतु त्यांशिवाय त्यांचीं दैवतें पुष्कळ आहेत तीं विवक्षित उपकार किंवा अपकार करितात. आंगचा देवींची जी कूम देवता आहे, तिची बहुतेक ठिकाणीं विशेष भीति बाळगितात.

ते त्या देवतांस कोंबड्याचे बळी देतात; जेवणापूर्वीं देवावर अभिषेक करितात; आंगांत वारें आणणाऱ्या भगतांचा आज्ञा मानितात; आपल्या ब्राम्हणांचें ऐकत नाहींत; व मेलेल्यांचीं शवें पुरतात; आणि मुलें झाल्यावर त्यांचा

जननाचे, व लग्नाचे, व उत्तरकार्याचे कांहीं संस्कार हिंदूंचे व त्यांचे सारखेच आहेत. ते सगळे गाळलेलीं मद्यें फार पितात, आणि त्यांतून बहुतेक गोवध करून तें मांस खातात. गंगेपासून गुजराथेपर्यंत पूर्वपश्चिम विंध्याचल नामें जो पर्वत लागलेला आहे तो, आणि अलाहबादेपासून मच्छलीपट्टणाचा अक्षवृत्तापर्यंत व पुढेंहि तुटक तुटक कन्याकुमारिकाकेपापर्यंत जो रुंद जंगली प्रदेश दक्षिणोत्तर आहे तो, हीं दोन त्यांचीं मुख्य ठिकाणें आहेत. कित्येक ठिकाणीं जंगल नाहींसें होऊन तेथें वसाहत झाली आहे, आणि तेथील राहणारे लोक हे सपाटीचा प्रदेशांत राहिले आहेत व गांवची चौकीपाहरा, शिकार, व त्यांचा स्वभावास अनुकूल असे दुसरे धंदे करित आहेत. कित्येक ठिकाणीं त्यांचा लुटालुटीनें सपाट देशाचें जंगल होऊन गेलें आहे, आणि कित्येक ठिकाणीं हिंस्र जनावरांचा राहण्याचा जागीं पूर्वीं गांवढीं होतीं अशा खुणा दिसतात.

वर जीं साम्यें सांगितलीं आहेत त्यांवरून कोणी असें म्हणतात, कीं हे सर्व रानटी लोक एकच आहेत; परंतु दुसऱ्या कांहीं गोष्टींमध्यें ते भिन्न आहेत, आणि प्रत्येकाचें नाव निरनिराळें आहे, त्यामुळें (जेथें निराळ्या भाषा राहिल्या असतील तेथें) त्यांची तुलना करून ते सर्व लोक एकच आहेत किंवा नाहींत, या गोष्टीचा निर्णय होईल तर होईल.

भागलपूर एथें जे रानटी लोक आहेत, त्यांस पहाडी म्हणतात. बंगाल व बहार यांचा पश्चिमेकडे जो मोठा जंगली प्रदेश आहे, त्यामध्यें जे जंगली लोक आहेत त्यांस कोळ लोक म्हणतात. ते मिर्झापुराजवळील विंध्यपर्वतापर्यंत पसरले आहेत. विंध्याचलाचा जो भाग त्या प्रदेशाजवळ आहे त्यामध्यें, आणि तेथें जें मोठें अरण्य आहे त्याचा मध्यभागीं व दक्षिणेस जे जंगली लोक आहेत, त्यांस गोंड असें म्हणतात. त्याचा पश्चिमेकडील जो विंध्याचलाचा भाग आहे, तेथील लोकांस भील म्हणतात, आणि

पश्चिमेकडील सगळ्या पहाडांतील लोकांस कोळी म्हणतात. पूर्वी बहारांतील कोळ म्हणून जे लोक सांगितले त्यांशीं या कोळी लोकांचा कांहीं थोडा संबंध आहे असें संभवतें, आणि हिंदुस्थानाचा दक्षिणटोंकास कोलाडी म्हणून जे लोक आहेत त्यांशींहि कदाचित् कांहीं संबंध असेल. गुजराथेमध्यें मोठ्या वैराणानजीक पश्चिमेकडे रानांतून व टेकड्यांवरून कोळी लोक पसरले आहेत, आणि दक्षिणेकडे सह्याद्रीचा कांहीं भागांत ते लोक आहेत.

या देशाचा दुसऱ्या भागांत वर सांगितलेले जंगली लोक निरनिराळ्या नावांनीं प्रसिद्ध आहेत, परंतु त्यांमध्यें वरील खूमांची प्रसिद्धि विशेष आहे.

या लोकांचा मूळचा हकीकतीविषयीं निश्चय नाहीं. हिंदुलोकांनीं दक्षिणेंत स्वारी केली त्या वेळीं ते हल्लींचा स्थितींतच होते, आणि जे कोणी त्यांतून रामाला सहाय झाले, त्यांची, दन्तकथा आणि कादंबरी यांणीं, एक वानरांची जातच बनाविली आहे.

प्राचीन काळीं हा सगळा देश ओसाड होता, आणि त्यांतील जा भागांत साम्प्रतचे लोक राहतात, तो अद्यापिहि लागवडींत आणिलेला नाहीं. या वैराणाचा मोठा प्रदेश, जास गोंडवण म्हणतात, तो वऱ्हाड व कटक या समृद्ध देशांचा मध्यें आहे, आणि त्यांत कोठें कोठें थोडथोडी लागवड झालेला असा मुलुकहि आहे; यावरून दक्षिणेंतील मूळची स्थिति, आणि तिची पुढील सुधारणूक, याविषयीं खुलासेवार धोरण बांधितां येतें.

उत्तरहिंदुस्थानांत जे रानट लोक होते, ते पूर्वीचा लोकांपैकीं जिंकल्याशिवाय राहिलेले लोक असावे: त्यांपासून शूद्रवर्ग झाला;-किंवा त्या ठिकाणींहि जर त्यांचा भाषेंत खरीखुरीच तमील भाषेची मिसळ असली, तर जांस पुढें हिंदुलोकांनीं जिंकिलें त्यांचाहि पूर्वीचा लोकांपैकीं शेष

उरलेले जे, ते हे असावे हें शक्य दिसतें.

वायव्येकडील डोंगरांमध्यें व हिमालयाचा खालचा शाखांमध्यें पहाडी लोकांचा दुसऱ्या जाती आहेत; परंतु त्या वर सांगितलेल्यांपासून फार भिन्न आहेत, आणि त्यांचें रूप व चर्या हीं, त्यांचा देश व चीन यांचा मधील जागचा लोकांचा सारखीं आहेत. पहाडी लोकांविषयीं युनानी लोकांनीं कोठें निराळें वर्णन लिहिलें नाहीं; परंतु प्लिनी नामें लाटिन ग्रंथकारानें यांविषयीं पुष्कळ वेळा लिहिलें आहे.

स्वभाव.

एतद्देशीय लोकांचा स्वभावाविषयीं निश्चय करण्यास हिंदुस्थानांत आलेल्या इंग्लिश लोकांस असावी तितकी सवड नाहीं. इंग्लंडामध्येंहि आपल्या मतीबाहेरील लोकांविषयीं थोडीच माहिती असत्ये, आणि तीहि वर्तमानपत्रांवरून व पुस्तकांवरून होत्ये; तशीं पत्रें व पुस्तकें हिंदुस्थानांत नाहींत. शिवाय, एतद्देशीय लोकांचा धर्म व रीतिभाती हीं आड येऊन त्यांचा आमचा निकट संबंध होत नाहीं; आणि त्याच कारणामुळें त्यांचे आमचे व्यवहारहि नियमित होतात, आणि एकमेकांचे अभिप्रायहि मन मोकळें करून एकमेकांस कळत नाहींत. या लोकांचा कुटुंबांत काय होतें, त्याविषयीं, वदंतेवरून मात्र, आपल्यास कायतें कळतें; त्याशिवाय कांहीं कळत नाहीं. संसारांतील जा असंख्य व्यवहारांमध्यें मनुष्याचा स्वभावाचें मार्दव विशेष दृष्टीस पडतें, त्यांमध्यें आम्ही एकमेकांत मिसळत नाहीं.

हिंदुस्थानामध्यें आमचे ( म्ह० इंग्रज ) लोक निरनिराळ्या स्वरूपांनीं येतात;— जसे ( अन्य धर्मांचे ) मिशनरी पाद्री, न्यायाधीश ( जड्ज ), पोलीस माजिस्त्रेट, महसूली व जकातीकडील कामगार, व राजकीय वकील. या सर्वांचा नजरेस जे लोक पडतात, ते अति सद्गुणी लोकांपैकींच असतात असें नाहीं; म्हणून, जर कोणास तसे लोक पाहण्याचा शोक असेल, अथवा स्वहितावर दृष्टि देऊन

पाहण्याची इच्छा होईल, तर मात्र ते दृष्टीस पडतात. दुसरें असें होतें कीं जें कांहीं आमचा नजरेस पडतें, त्यांतील गुण-दोष आह्मी आमचा देशांतील शिस्तीप्रमाणें काढितों. यास दृष्टान्तः— हिंदुस्थानांतील कोणी मनुष्य एकाद्या हलक्या प्रसंगीं जर लेंकरासारिखा रडूं लागला, तर तो साधारण मनुष्यपणाचा योग्यतेप्रमाणें कांहीं कामें करण्यास अथवा दुःखें सोसण्यास सर्व प्रसंगीं असमर्थ असावा, असा आह्मी लागलाच सिद्धान्त करितों; अथवा तूं लबाड आहेस, असें जर कोणी आपणास ह्मणूं दिलें, तर तो म्हणूं देणारा सर्व प्रकारचा नीचपणा करण्यास आशंकणार नाहीं असें आमचे लोक म्हणतात. तसेंच आमचे ग्रंथकार देशकालाचा गोंधळ करितात. यास दृष्टान्तः— मराठे व बंगाली, या लोकांचें एकसारखेंच वर्णन करितात, आणि महाभारतांतील योद्ध्यांनीं जीं पापें केलीं असतील, तीं साम्प्रतचा लोकांचा माथीं मारितात. पुष्कळ लोकांचे अभिप्राय हिंदूंचा विरुद्ध पडले आहेत, असें जर ह्मटलें, तर हिंदुलोकांशीं ज्यांचा सहवास अतिशय काल पर्यंत झाला आहे त्यांचा यांविषयीं अभिप्राय हमेशा उत्कृष्ट आहे असें कोणी उत्तर देईल; परंतु जरी असें झालें, तरी त्यांत हिंदुलोकांची कांहीं तारीफ समजावयाची नाहीं; कारण कोणत्याहि लोकांचा सहवास फार दिवस असला, म्हणजे त्यांविषयीं आपल्या मनांत असाच अभिप्राय उत्पन्न होत असतो, असा मनुष्याचा सहज स्वभावच आहे. आतां, जे इंग्लिश लोक हिंदुस्थान सोडून परत स्वदेशीं गेले आहेत, त्यांणीं, वास्तविक उत्कृष्ट तारीफ करण्यास योग्य अशा लोकांशींहि हिंदूंची तुलना करून, यांविषयीं जे अभिप्राय दर्शविले आहेत, ते, या देशांत असतांना दिलेल्या अभिप्रायांपेक्षां अधिक चांगले आहेतः ही गोष्ट मात्र यांस सयुक्तिक अनुकूल आहे.

या कारणांस्तव, जेव्हां आपल्या मनावर हिंदुलोकांविषयीं प्रतिकूल ग्रह उत्पन्न होतो, तेव्हां त्यांविषयीं एकदम

निश्चयात्मक बुद्धि करून उपयोगीं नाहीं. परंतु असें जरी आहे, तरी वास्तविक पाहतां हिंदुलोकांचा स्वभावांत कांहीं मोठीं व्यंगें आहेत हें खचित आहे. हीं व्यंगें मुख्यत्वेंकरून सदसद्विचारबुद्धीसंबंधीं कारणांपासून उत्पन्न होतात; परंतु त्यांचा शरीराचा बांधाहि कित्येकांस कारण आहे, व देशपरत्वें हवापाण्यापासूनहि कांहीं उद्भवतात.

या देशांतील कित्येक जातींचे लोक दुसऱ्यांहून खचित अशक्त आहेत, आणि क्षयी हवेमध्यें जे यांसारखे राहणारे लोक आहेत, त्यांची शक्ति दिवसेंदिवस क्षीण होत्ये, ही गोष्ट सहजच आहे.

जर एकाद्या देशांत नुसती उष्णता असली, तर तिचायोगानें मनुष्य कदाचित् निश्शक्त होणार नाहीं. जर ती उष्णता अनिवार्य व एकसारखी असली, तर थंडीचा कडाक्यापासून जसें शरीर घट्ट होतें, तसा तिजपासूनहि अंगीं रांकटपणा उत्पन्न होईल. जर अशी हवा असून देश नापीक असला, आणि, कठीण श्रम करून मिळविलेलें अन्न इतर लोकांपासून संरक्षणें, हें जर तेथील लोकांस अवश्य असलें, तर आरबांसारखें तेज व धैर्य उत्पन्न होईल. आतां हिंदुस्थानांतील हवा उष्ण असून एथील जमीन सुपीक आहे, त्यामुळें लोकांस फार श्रम करावे लागत नाहींत, आणि एथें इतकी जमीन आहे कीं वस्तीचें मान जरी बहुधा अपार वाढलें, तरी तितक्या लोकांचा निर्वाहास ती पुरण्याजोगी आहे. दुसरें, या देशांतील पर्जन्यामुळें उष्णतेचा जोर मोडतो; आणि एथें असंख्य वृक्ष व अरण्यें आहेत त्यांहींकरूनहि तिचें कांहीं निवारण होतें. या देशांतील सर्व वस्तु उदासीन सुस्ती उत्पन्न करण्यास कारणीभूत होतात. तिला निवारण्यास अन्यदेशीय लोकांसहि फार कठीण पडतें. हिंदुस्थानाचा निरनिराळ्या भागांतील लोकांचा प्रकृतींत जें निरनिराळ्या मानाचें अंतर आहे, तेणेंकरून वरील कल्पना सुदृढ होत्ये. यास दृष्टान्त;— उत्तरेकडील

रुक्ष प्रान्तांमध्यें हिंवाळ्यांत थंडी फार असल्ये, त्यामुळें तिकडील लोक, तारतम्यानें, अधिक शूर व चपळ आहेत; डोंगराळ व नापीक देशांत राहणारे मराठे, हे रांकट व मेहेनती आहेत; असें असून बंगालची हवा ओलसर आहे; तेथें भाताचीं दोन पिकें येतात; आणि तालवृक्ष व बांबू यांचीं झाडें पुष्कळ असल्यामुळें घरें बांधायास कारागिरीचें कारण लागत नाहीं; त्यामुळें हिंदुस्थानांतील इतर सर्व लोकांपेक्षां तेथील लोक फार नामर्द आहेत. आतां, या लोकांमध्यें उद्योग अगदीं नाहींसा झाला नाहीं, व प्रसंगवशात् श्रम करण्याची इच्छाहि यांस होत नाहीं असें नाहीं; परंतु साधारणरीत्या या सर्व लोकांस विश्रान्तीची प्रीति आहे, हा एक त्यांचा विशिष्ट गुण आहे. या लोकांमध्यें जसा आळस भरला आहे, तसाच भित्रेपणाहि आहे; आणि या दोन मूळ व्यंगांपासून त्यांचे बाकीचे सर्व दुर्गुण निर्माण होतात. या लोकांमध्यें जो भित्रेपणा आहे, तो शरीरसामर्थ्याचा अभावामुळें विशेष आहे असा नाहीं; परंतु मेहेनत, व अडचणी यांमध्यें आपणास पडावें लागेल अशी जी यांस भीति असल्ये, तिजपासून तो उत्पन्न होतो. राजाचा जुलूम व धर्मसंबंधीं खोट्या समजुती यांपासून पूर्वोक्त आळस व भित्रेपणा हे कदाचित् उत्पन्न झाले असतील. मूळप्रकृती ही कांहीं यांस कारण असेल, असें कोणास वाटे; परंतु जर असा स्वभाव होण्यास पूर्वोक्त दोन कारणें पुरे होतीं, तर चीन व रूस हे लोकहि असेच झाले असते, परंतु ते तसे नसून, पहिले अत्यन्त उद्योगी आहेत, व दुसरे नित्यशान्त आहेत. विचार करून पाहतां, हीं दोन व्यंगें यांचा पूर्वोक्त स्थितीपासून झालीं असतील, अथवा त्यांपासून यांची पूर्वोक्त स्थिति उत्पन्न झाली असेल; या दोन्ही गोष्टींचा सारखाच संभव आहे.

खरेपणाचा अभाव हा हिंदूंचा अति मोठा दुर्गुण आहे. पूर्वेकडील लोकांमध्यें लबाडी विशेष बोलतात, परंतु

त्यांमध्येंहि, हिंदूंनीं बाकीचा लोकांस मागें टाकिलें आहे. कोणी लबाडीचा आरोप आणिला असतांहि, त्यांस राग येत नाहीं. कांहीं मानलेल्या गोष्टींमध्यें आपलें लवमात्र बद्नाम झालें असें वाटलें असतां जो एकादा हिंदु प्राण घ्यावयास चुकणार नाहीं, तोच, जर कोणी त्याचा खरेपणाविषयीं संशय घेतला, तर "मला लबाडी सांगून काय मिळावयाचें आहे ?" असें म्हणतो.

खोटी शपथ वाहणें, हा एक लबाडीचाच विशेष प्रकार आहे. हीहि दुसऱ्या लबाडीचा गुन्ह्यांप्रमाणें या लोकांमध्यें सहजच चालत्ये; परंतु एशियाखण्डांतील इतर देशांपेक्षां हिंदुस्थानांत खोट्या शपथेचा गुन्हा विशेष आहे असें नाहीं. भूतकाळचा हकीकतींविषयीं इतकें दुर्लक्ष्य करणारे असे जे हे हिंदु ते भविष्यकाळचा वचनांविषयीं एवढे किंतु मनांत आणितील हें अशक्य आहे. खासगी व्यवहारामध्यें विश्वासघाताचे गुन्हे जेवढे हिंदुस्थानांत होतात, तेवढे इंग्लंडांत होत नाहींत; परंतु असें जरी आहे, तरी, हिंदुस्थानामधील पुष्कळ हिसे लोक आपलें वचन पाळणारे आहेत. सर्वांपेक्षां सरकारी संबंधाचा लोकांमध्यें लबाडी अतिशयित आहे, व हिंदुस्थानामध्यें अशा लोकांचा विस्तर मोठा आहे, आणि जमिनीचा महसूलसंबंधीं जी शिस्त आहे, तिजमुळें रयतेवर जुलूम होऊन, अति नीच गांवढेकऱ्यासहि आपला बचाव, पुष्कळ वेळ, लबाडीनें करावा लागतो.

कित्येक ठिकाणीं जर सरकारामध्यें कांहीं दोष असले, तर रयतेमध्यें उलटे चांगले गुण उत्पन्न होतात. हिंदुस्थानामधील मोठे सावकार व सराफ हे आपलीं वचनें एकनिष्ठेनें पाळितात. असें जर नसतें, तर एथें, इनसाफ इतका अनियमित होत असल्यामुळें, व्यापार चालूं शकला नसता. जेथें कारण पडेल, तेथें कपट व हुशारी हीं हिंदूंमध्यें स्वभावतः नाहींतशीं नाहींत. ते, सोसक, आर्जवी, व लाघवी

आहेत. त्यांचें जाशीं काम पडेल त्याचें मनोगत ते उमगून काढितील; त्याची तबियत पाहून चालतील; त्याचा वृत्ति मृदु किंवा क्षुब्ध करितील; आपल्या उद्देशांस योग्य अशा स्वरूपानें स्वहिताचा गोष्टी दाखवितील; आणि दुसऱ्यांचा मनांत नसतांहि त्यांणीं यांचा कार्यास सहाय व्हावें असें हे परोक्ष युक्तींनीं करितील; परंतु इतर एशियाखंडस्थांपेक्षां, अथवा हिंदुस्थानांतीलहि मुसलमानांपेक्षां हिंदुलोकांचीं फंदफितुरें बहुधा कमी साहसी व कमी दुष्ट असतात; हिंदुस्थानांतील मुसलमान हे हिंदुलोकांत राहून त्यांजवळ व्यवहार ठेवित असल्यामुळें जरी त्यांची मिझाज नरम झाली आहे, तरीहि ते अद्यापि हिंदूंपेक्षां विशेष साहसी व दुष्ट आहेत.

हिंदुस्थानांत जे राजे झाले त्यांचा सदोष व्यवस्थांमुळें हे लोक गुणभ्रष्ट झाले आहेत असें बहुधा दिसतें. चांगल्या कामांत लांच घेणें हें यांचा मतें बहुधा प्रशंसनीय आहे; आणि वाईट कामांत लांच घेणें हा विशेष मोठा अपराध आहे असें ते मानित नाहींत, क्षमार्ह आहे असें समजतात. पैक्याचा बाबदींत दगा करणें हें मोठें लाजिरवाणें काम आहे असें ते मानित नाहींत, आणि सरकारचा पैका खाणें हें तर तसें आहे असें बहुधा अगदींच समजत नाहींत.

याचप्रमाणें मुखस्तुति व लोंचटपणा हे दोष जे यांमध्यें आहेत, तेहि त्यांचा सरकारापासूनच झाले आहेत. निरनिराळ्या लोकांमध्यें आदरसत्काराचा बोलण्याची ठेव निराळी असत्ये, व कोठें कमी व कोठें अधिक बोलतात; परंतु जरी तशा तारतम्यदृष्टीनें पाहिलें, तरी हे जी मुखस्तुति करितात, ती अगदीं अव्यवस्थित असत्ये. यांमध्यें जो लोंचटपणा आहे, तो त्यांचा राजांचा धरसोडीपासून उत्पन्न झाला आहे. जरी कसाहि जबाब मिळाला, तरी तो शेवटचा असें ते कधींहि समजत नाहींत; आणि त्यांचे नाना प्रकारचे कुतर्क संपून, अथवा जितक्या गोष्टी अनुकूल

होण्यास शक्य असतील त्या घडून, अथवा इनसाफ करणारास त्रास येऊन, आपला अर्थवाद तडीस जाण्याची आशा सुटे पर्यंत, तण्टा चालविण्यास ते कधींहि लाजत नाहींत.

जे लोक प्रत्यक्ष झोंबी घेण्यास लवकर धजत नाहींत, ते फार खळवादी असतात, व त्यांचा भांडण्याचा जोर शब्दपाण्डित्यावर फार असतोः असेच हिंदु आहेत. हे धुळीस मिळत पर्यंत दिवाणी तण्टे सांगतात; आणि कित्येक प्रसंगीं वाद करित असतां तापून जातात. त्या वेळीं त्यांची चर्या साधारण स्थितीहून इतकी निराळी होत्ये, कीं त्यांशीं अपरिचित मनुष्यास असें वाटतें, कीं हे आतां हातघाईवर येऊन एकमेकांची रक्तेंच काढितील.

हिंदूंचा लोकोपकर्तेपणा ह्मटला, तर काय तो त्यांचा जातीमध्यें अथवा गांवांमध्यें मात्र असतो; परंतु तेथें अतिशय असतो असेंहि पुष्कळ वेळा होतें. जे सरकारचे कारभारी अथवा आश्रित असतात, ते त्या राज्याचा सत्तेविषयीं उत्सुकता दाखवितात, त्यापलीकडे या लोकांचा लोकार्थीपणाची धांव जात नाहीं. केव्हां केव्हां लढाईमध्यें, व जेथें तिचा संबंध धर्माशीं असतो तेथें मुख्यत्वेंकरून, हे लोक मोठी लोकोपकारी बुद्धि दाखवितात; परंतु यांचा मनांत विशेष राजाज्ञाभक्ति नसत्ये. कोणी रयत असला, तर तो जसा आपल्या जन्मभूमिकेचा पक्षानें भांडतो, तसाच दुसऱ्या राजाचा चाकरीस राहून आपल्या देशचा राजाशींहि लढतो; आणि जा देशांत तो मनुष्य उत्पन्न झाला त्या देशावर जी त्याची प्रीति असत्ये, त्याहून जाचें अन्न तो खातो त्यावर हमेशा अधिक असत्ये.

हिंदु हे, नीतीचे कित्येक मोठे नियम तोडितात, हें जरी वर पाहण्यांत आलें आहे, तरी ते अगदीं सत्त्वरहित आहेत असें त्यावरून कोणी समजूं नये. जा गोष्टी वर लिहिल्या त्या खेरीज करून, बाकी सर्व नीतिसंबंधी नियम ते पाळितात; आणि त्यांतून जे कांहीं नियम त्यांचा दृष्टीनें

विशेष महत्त्वाचे आहेत, ते यांणीं सोडावे असे प्रवर्त्तक पाश जरी यांस मोहित करित असतात, तरीहि हे ते नियम पाळितात. यास उदाहरणें:- कोणी ब्राह्मण आपला प्राण सोडील, परंतु निषिद्ध अन्न खाणार नाहीं; जर एकाद्या जुलमी राजानें अथवा चोरांचा टोळीनें गांवकऱ्यांवर देणें बसविलें, तर तें कबूल न करण्याकरितां पाटील सर्व प्रकारचे हाल सोशील: जो चाकर देवघेवाचा हिशेबांत धन्यास ठकवून कांहीं पैसा खातो, त्याजवळच पाहिजे तितकें द्रव्य जर ठेवावयास दिलें तर कांहीं भीति नाहीं. वाईट कामांमध्येंहि, जांणीं दुसऱ्यांस लाच दिली असेल, त्यांस उघडे न करण्याबद्दल लोक शिक्षाहि भोगितील.

त्यांमध्यें मर्दपणा नाहीं हें मोठें व्यंग आहे. त्यांचा राज्याची रचना गुलामगिरीची आहे; त्यांचे आचार अंध आहेत; त्यांचें कथाभारूड अद्वातद्वा आहे; त्याचा तत्त्वदर्शनांमध्यें उगाच बारीक भेद व शब्दपाण्डित्य हीं आहेत; त्यांचा काव्यांत ग्लानीचें मार्दव आहे; त्यांची रीतभात नामर्दीची आहे; मसलती करणें व वेळ घालविणें यांची त्यांस प्रीति आहे; त्यांचा स्वभाव आर्जवी आहे; आपली स्थिति बदलण्यास ते भीत असतात; क्षुल्लक कादंबऱ्यांत ते आनंद पावतात; सदसद्विचारबुद्धीस अनुसरणाऱ्या इतिहासाची ते हयगय करितात; या सर्व प्रमाणांवरून या लोकांमध्यें, साधारणरीत्या, स्वभाव व बुद्धि यांचे जे विशेष बळकट गुण ते नाहींत असें दिसतें.

जर इतर देशांतील लोकांशीं यांची तुलना केली, तर हा दोष त्यांस साधारणरीत्या लागू होतो; परंतु सर्व प्रकारचा लोकांस हा सारखा लागत नाहीं, व कोणासहि सर्वच प्रसंगीं लागतो असें नाहीं. या देशांतील मजूर लोक हे उद्योगी व निरोगी असतात; आणि दुसऱ्या वर्णांचाहि लोकांस कांहीं सबळ हेतु असला तर, अथवा केव्हां केव्हां केवळ

कर्मणूकेकरितांहि ते मोठे श्रम भोगितात व पुष्कळ वेळपर्यंत तसदी सोशितात.

कोणी यांवर निकरानें हल्ला केला असतां, तो हट-विण्याची यांस सवई नाहीं; पुष्कळ दिवस निराशा झाली व आपत्ति आली असतां यांचानें टिकाव धरवत नाहीं; असें असून यांणीं जें शौर्य पुष्कळ ठिकाणीं दाखविलें आहे, त्या-हून अतिशय लढाऊ लोकांनींहि अधिक दाखविलें नाहीं. आपला धर्म किंवा आपलें सत्त्व राखण्याकरितां ते सर्व प्रसं-गीं जीव देतील. विलायतचा इंग्रेजी फौजेनें माघार घेत-ल्यावर आमचा तैनातींतील हिंदु लश्कर दोन वेळा पुढें स-रसावून गेलें आहे; आणि त्यांतून एका वेळीं त्यांचा समोर लढण्यास फ्रेंच लश्कर होतें. कित्येक वेळीं लश्कराचा सग-ळ्याचा सगळ्याच टोळ्या एकदम पुढें सरकून मृत्यूचा तोंडीं गेल्या, अशीं उदाहरणें पुढील इतिहासांत येतील. खासगत व्यवहारांत आपल्या सत्त्वास कांहीं बट्टा लागला असें एक-दां त्यांचा मनांत आलें तर, ते अति नीच वर्णांतील लोक अ-सले तरीहि, आत्मघात करण्यास मागेंपुढें पाहत नाहींत.

हलक्या संकटांस हे फार भीतात; असें असून, ते मृ-त्यूस तुच्छ मानितात, ही गोष्ट विलक्षण आहे. आतां आ-पलें अरिष्ट चुकत नाहीं अशी खातरी झाली ह्मणजे, अति नीच हिंदूहि फार थंडपणानें त्याचा सन्मुख होतो; आपल्या मित्रांशीं आनंदानें भाषण करितो; आणि आपल्या नेहेमीं-चा शान्ततेंत अगदीं उणीव होऊं न देतां मृत्यूचा येण्याची वाट पाहत असतो. त्यांचा पूर्वोक्त थंडपणा युरोपांतहि तारीफ करण्याजोगा आहे.

हिंदूंचा स्वभावाचा उत्कृष्ट नमूना राजपूतांमध्यें व गंगाकांठचा दुसऱ्या लोकांमध्यें सांपडतो; त्याच लोकांमधून आमचा लश्करांतील पुष्कळ शिपाई ठेवलेले असतात. या लोकांचा स्वभावांत पूर्वीचा हिंदूंचे विशेष गुण असून, त्यां-तील पुष्कळ व्यंगें नाहींशीं झालीं आहेत. मोठें तेज,

आवेशपूर्वक शौर्य आणि उदार एकनिष्ठा, हीं या लोकांमध्यें असून, यांचा रीतिभाती सौम्य व अंतःकरण सदय आहे, आणि यांचा स्वभाव मुलांसारखा आनंदी व केवळ अर्भकांसारखा सरळ आहे.

सर्व गांवढ्यांमध्यें राहणारे जे लोक आहेत, ते सालस व प्रियगुणी आहेत; त्यांचा कुटुंबांतील मनुष्यें परस्परांवर प्रीति करितात, शेजाऱ्यापाझाऱ्यांवर माया ठेवितात, व, सरकाराखेरीज बाकी, सर्वांशीं प्रमाणिकपणानें व मोकळ्या मनानें वागतात.

शहरी लोकांचा स्वभाव यांहून जरा हरभांस असतो; परंतु तेहि निरुपद्रवी व बेतबाती असतात; त्यांचा हातून लोकांमध्यें फसाद विरळा होत्ये व आप्सांमध्येंहि कलागती थोडक्या होतात. एकंदराखालीं विचार करून पाहतां, सरकारचा संबंधाचे लोक जर वेगळे ठेविले, तर इंग्लंडांतील शहरी लोकांशीं यांचें बरेंच साम्य आहे. इंग्लंडांतील धर्माचा व राज्यरीतीचा कारणामुळें तेथील मध्यम प्रतीचा लोकांची स्थिति इकडील मध्यम प्रतीचा लोकांचा स्थितीहून स्पष्ट रीतीनें चांगली आहे, आणि तिकडील मजूर लोकांमध्येंहि पुष्कळ लोक असे आहेत, कीं त्यांसारिखे तशा स्थितीचे लोक हिंदुस्थानांत नाहींत; परंतु अशी जरी तिकडील स्थिति चांगली आहे, तरी तिकडील मोठमोठ्या शहरांचा जो गाळ आहे, त्यासारिखे दुष्ट लोक हिंदुस्थानामध्यें कोठेंहि नाहींत; तसेंच धूर्त, फसव्ये, व सर्व प्रकारचे धुतारे, या प्रकारचा लोकांचे थवे जसे इंग्लंडामध्यें मोठ्यालोकांत मिसळून अथवा हलक्या लोकांचें रक्त शोषून, दगाबाजीवर आपली उपजीविका चालवितात, त्यांचें नावहि हिंदुस्थानांतील लोकांस माहीत नाहीं. हिंदुस्थानामध्यें कित्येक पातकें होतात तशीं दुष्ट पापें इतर देशांत होत नाहींत. ठक लोकांविषयीं व्याख्यान पूर्वीं[७] केलें आहे; विचारपूर्वक

(७) पृष्ठ ३४३ पाहा.

विश्वासघाताविषयीं जसे ते अतिद्वेषार्ह आहेत, तसेच क्रौर्याविषयीं डांके लोक हे आहेत.

लूट करण्याकरितां लोकांचे जमाव एकत्र होतात त्यांस डांके म्हणतात. ते रात्रीस जपून कोणाचा ध्यानींमनीं नसतां एकाद्या गांवावर जाऊन पडतात; जे लोक आड येतात त्यांस ठार मारितात; आणि जांणीं द्रव्य लपवून ठेविलें आहे असें त्यांस वाटतें, त्यांचे हालहाल करितात; इतकें करून दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं ते गांवचा वस्तींत मिळून जातात, आणि लोक त्यांस इतके भीतात कीं, जरी त्यांस कोणीं ओळखिलें, तरी कोणीं पुढारी होऊन त्यांजवर तोहमत आणण्यास बहुधा धजत नाहींत. असे गुन्हे ऐर्लण्डामध्येंहि केव्हां केव्हां बरेच होत असत, परंतु त्यांमध्यें कांहीं राजकीय कारण असे; तसें यांत नसतें, व ते यांइतके दुष्ट नसतात. हिंदुस्थानामध्यें मागील ३०० वर्षांमध्यें जा कारकीर्दी झाल्या त्यांमध्यें सरकारचा अम्मल ढिला असल्यामुळें असे दंगे होत असत; परंतु ब्रिटिश सरकारचा कडक अमलाखालीं ते लवकर नाहींसे होत चालले आहेत. ठक व डांक्ये या लोकांमध्यें हिंदूंचा बराबरीनें तरी मुसल्मान आहेत. अशा महापातकांपासून जी शिसारी उत्पन्न होत्ये, तिजवरून, जा देशांत अशीं पापें होतात तेथील लोकांमध्यें विशेष कुबुद्धि असेल, अशी कल्पना प्रथमदर्शनीं मनांत येत्ये; परंतु अधिक शोध केला असतां, हा ग्रह उडून जातो. ठक हे बहुधा एक निराळेच लोक आहेत; आणि डांक्ये हे जीवावर उदार झालेले काटक असतात: त्यांचा कायम टोळ्या असून ते आपलें आयुष्य लुटालुटींत घालवितात. बाकी राहिलेल्या लोकांपैकीं देशांत अस्वस्थता उत्पन्न करण्याजोग्या वृत्तींचे असे लोक बहुधा थोडेच असतात. इ० स० १८३२ त "हौस् आफ् कामन्स्" या सभेपुढें कित्येक रपोर्ट हजर झाले होते, त्यांवरून इंग्लंड व वेल्स् यांमध्यें दर २,०३,२८१ मनुष्यांस एक

मनुष्य वर्षास फांशीं गेला होता, आणि बंगाल इलाक्यांत दर१,०४,१८२ लोकांस एक फांशीं गेला होता; व इङ्गलण्डांत दर ६७,१७३ मध्यें एक काळ्या पाण्याची जन्मठेप पावला होता; व बंगाल इलाक्यांत दर ४,०२,०१० मनुष्यांस एक पावला होता.

इङ्गलण्डापेक्षां बंगाल्यामध्यें पत्ता न लागलेले गुन्हे पुष्कळ असतात असें जरी कबूल केलें, तरी या दोन देशांमध्यें सारखे गुन्हे होतात असें म्हणण्यास अचाटच तर्क केला पाहिजे.

या देशांत जे खून होतात, ते मत्सर, अथवा कांहीं दुसऱ्या तशा हेतूनें होतात, लाभाचा आशेनें विशेष होत नाहींत; यामुळें एथें मालमत्तेविषयीं विशेष धास्ती नसत्ये. युरोपीयन लोक सगळे दरवाजे उघडे टाकून निजतात; व त्यांची चीजवस्त दिवसाप्रमाणेंच जिकडे तिकडे पसरलेली असत्ये; असें असून त्यांचें नुकसान झाल्याचें गाऱ्हाणें विरळाच कानीं येतें. प्रत्येक गृहस्थाचा घरांत पुष्कळ चाकर असतात, परंतु कुलुपकिल्ली बहुधा थोड्याच वस्तूंना असत्ये; यावरून त्यांचा एकमेकांवर हमेशा भरवसा असतो हें चांगलें सिद्ध होतें.

हिंदुस्थानांतील लोकांमध्यें कृतज्ञता नाहीं, असा आरोप त्यांजवर वारंवार येतो; परंतु जे ही तोहमत आणितात, त्यांणीं, लोकांमध्यें कृतज्ञता उत्पन्न होण्याजोगें, कांहीं केलेलें असतें असें दिसत नाहीं. जे धनी खरेखुरे मायाळू व जाण असतात, त्यांचे हिंदुस्थानांतील चाकर तशाच रीतीनें वागतात, व या गोष्टीमध्यें पृथ्वींतील कोणत्याहि

(८) इङ्‌लण्डांत १२३२ स फांशींची शिक्षा ठरून ६४ फांशीं गेले, व बंगाल्यांत ५४ स ती शिक्षा ठरून सर्वांची अम्मलांत आली. या वर्णनांत इंग्लण्डाची वस्ती १,३०,०६,००० व बंगालची ६,००,००,००० धरिली आहे.

लोकांशीं ते बरोबरी करितील; आणि आजारांमध्यें, अथवा अडचणीचा व संकटांचा प्रसंगीं जांणीं जांणीं यांचा अनुभव घेतला आहे, ते ते, बहुधा सर्व, यांचा निष्ठेविषयीं, व कनवाळूपणाविषयीं साक्षी देतात. त्यांचा सरदारांवर जी त्यांची भक्ति असत्ये, ती तर न्यायप्रसिद्धच होऊन गेली आहे. ती बहुधा कृतज्ञतेपासूनच उत्पन्न होत्ये; परंतु कोठें कोठें जातिपरत्वेंहि असत्ये. आम्ही परदेशस्थ असतां, आमचा शिपायांचा विश्वासूपणाचीं जीं उदाहरणें घडून आलीं आहेत, त्यांचा बरोबरीचीं इतर देशांमध्यें तत्तद्देशीय फौजांमध्येंहि मिळणें कठीण पडेल.

याप्रमाणें कृतज्ञता कनिष्ठ प्रतीचा लोकांतच आहे असेंहि नाहीं. जांणीं अधिकारावर असतां जा लोकांस आश्रय दिले होते, ते, त्या देणारांचे अधिकार जाऊन अप्रतिष्ठा झाल्यावरहि, त्यांशीं एकनिष्ठेनें वागले आहेत, आणि त्यांचा निराश्रित कुटुंबांसहि त्यांणीं सोडून दिलें नाहीं.[१]

हिंदुलोकांमध्यें परदेशीय लोकांची मिसळ झाल्यापासून त्यांचा स्वभाव बदलला आहे; तरी अद्यापिहि ते स्वभावानें गरीब व नम्र आहेत. त्यांचा जा लढाया मुसलमानांबराबर झाल्या त्यांमध्यें जा क्रूर कतली घडल्या, त्यांचा सूड घेण्यास हे प्रवृत्त झाले असावे; आणि मनूमध्यें

(१) या प्रकारचें एक पुरें सप्रमाण उदाहरण घडून आलें तें येणेंप्रमाणें.- एक इंग्रेज गृहस्थ बंगाल्यांत मोठ्या हुद्यावर होता; तो बर्तर्फ होऊन आपल्या देशास गेल्यावर एका समयीं मोठ्या आगंतुक अडचणींत पडला. त्या गृहस्थानें पूर्वीं एका मोठ्या पदवीचा एतद्देशीय गृहस्थावर उपकार केले होते, त्याणें या प्रसंगीं त्या इंग्रेजास १,००,००० रुपयां वर द्रव्य दिलें, आणि तें तो परत घेईना; व त्या इंग्रेजाचा हातून पुढें कांहीं त्याचें काम व्हावयाचें होतें असेंहि मुळींच नव्हतें. हा उदार दोस्त जातीचा महाराष्ट्र ब्राम्हण होता. या जातीचा लोकांस दुसऱ्या जातींची बहुधा अगदीं अल्प दया असत्ये, आणि अधिकार आल्यावर हे अति निर्दय व खराब होत असतात. असें असून हें उदाहरण त्यांमधील आहे.

लढाईविषयीं जे उदार बुद्धीचे नियम इतके प्रख्यात आहेत, ते हे लोक साम्प्रत पाळित नाहींत. असें आहे तथापि, दुसऱ्या एशियास्थांपेक्षां अथवा हिंदुस्थानांतीलच मुसलमानांपेक्षां हिंदुलोक लढाईतील बंदिवानांशीं विशेष सदय रीतीनें वागतात. ब्रिटिशांचा लश्कराबराबरील बाजारबुणग्यांतील जे लोक टिपू सुल्तानाचा हातीं सांपडत, त्यांचे उजवे हात व त्यांचीं नाकें तो कापित असे. असें असून, अशा प्रकारचा लोकांस आपल्या लश्करानें लुटल्या नंतर, त्यांस आपल्या घरीं मूळचा धंदा करण्यास परत जातां यावें, म्हणून शेवटला बाजीरावसाहेब पेशवा हा दर नफ्रीस थोडीशी पोटगी व एक एक रुपया देत असे. अधिकारावर आलेल्या ब्राह्मणांनीं पडलेल्या शत्रूचा रक्तांत आपले हात विटाळले आहेत, असा त्यांवर आरोप आला आहे खरा, आणि सूड घेण्याचे जे स्वाभाविक मार्ग ते बंद असल्यामुळें अशा कर्मांस ते बहुधा प्रवृत्त झाले असतील; परंतु त्यांत जे अति दुष्ट आहेत, तेहि कोणाचा प्राण घेण्यास, (व तोहि त्यावर शस्त्र टाकून घेण्यास,) नाखुश असतात. साधारणरीत्या हिंदू हे दयावान् व परोपकारी आहेत; परंतु त्यांमध्यें उद्योगपुरःसर उपकार करण्याची बुद्धि कमती आहे. याचें कांहीं कारण जातिभेद हा आहे, व त्यांचा बुद्धीमध्यें जें कांहीं जडत्व आहे तेंहि कारण आहे; यांतून पहिल्या कारणामुळें त्यांमध्यें फूट पडत्ये, व दुसऱ्या कारणामुळें त्यांस आपलीं व लोकांचीं संकटें द्रव आणित नाहींत.

हे लोक भिकारी लोकांशीं जा रीतीनें वागतात, तिजवरून त्यांचा स्वभावांतील पूर्वोक्त व्यंग दिसून येतें. सर्व लोक ब्राह्मणांस अन्नदान करितात, व बैरागी आदिकरून धर्मांचा सोंगानें भीक मागणारांस भिक्षा घालितात; परंतु एशियाखंडाचा बहुतेक भागांतील लोकांची पात्रापात्र विचार न करितां धर्म करण्याची जी रीति आहे, तिजमुळें शुद्ध

दरिद्रानें पीडलेल्यांचें दैन्य दूर होत नाहीं; व याच प्रमाणें युरोपामध्येंहि त्यांचा समाचार कोणी घेत नाहीं.

गरीब लोक, साधारणरीत्या, अल्पदृष्टीमुळें फार खर्च करितात, आणि विवक्षित प्रसंगीं श्रीमान् लोक डौलाकरितां पैका उधळितात; असें आहे तथापि हिंदु हे मितव्ययी, व किंबहुना लोभीहि असतात. त्यांचा नेहेमींचा खर्च थोडा असतो, आणि आपला शिलकी पैसा वाढविण्याकरितां आपली शिल्लक परभारी व्यापारांत लावून अथवा भारी व्याजानें कर्जी देऊन आपला कुणगा वाढविण्यास, सर्व प्रकारचे लोक मागेंपुढें पाहत नाहींत.

युरोपस्थांचा मुलांपेक्षां हिंदूंचीं मुलें अधिक चपळ व बुद्धिमान् असतात. बाराचौदा वर्षांचा हिंदु मुलांची मानसशक्ति आश्चर्यकारक असत्ये; आणि ते मोठे झाल्यावर त्यांचा त्या शक्ति बोंथट होतात, तीहि गोष्ट तशीच आश्चर्यकारक आहे.

आतां, लहानापासून मोठ्यापर्यंत हे सर्व लोक चांगले जाणते असतात; आणि हा जाणतेपणा कनिष्ठ प्रतीचा लोकांमध्यें आपल्या नजरेस विशेष पडतो. त्यांची बातबेताची वर्तणूक व त्यांची भाषा, हीं त्यांचा वरिष्ठांचापासून ( आमचा सारिखीं ) विशेष भिन्न नसतात.

या लोकांमध्यें मोठीं दुर्व्यसनें नाहींत, व याविषयींच कायती हिंदूंची विशेष वाहवा करण्यासारखी आहे. त्यांचा देशांतील हवा व तिचा आनुषंगिक दुसऱ्या वस्तु या पाहिल्या असतां, इतर देशांतील लोकांहून हे कमी व्यसनी असावे अशी अटकळ बहुधा कोणी करणार नाहीं; आणि या लोकांमध्यें मद्यपीपणा आमचा इतका नसतो, व इतर दुर्व्यसनांमध्येंहि हे आमचा इतके निलाजरे नाहींतः या गोष्टींची तुलना करून पाहिली असतां, हिंदूंचा रीतिभाती विशेष शुद्ध आहेत असें त्यांचें श्रेष्ठत्व सिद्ध होऊन, आमचा गर्वाचें नाक बरेंच पुरडतें.

याप्रमाणें जी त्यांची स्तुति केली आहे, तिशीं त्यांची संभाषणाची चाल जुळत नाहीं; कारण त्यांचा भाषणामध्यें अतिशय अपशब्द येतात, आणि ते त्यांविषयीं कांहीं शंका मनांत आणित नाहींत. परंतु हीं त्यांची वर्तणूक त्यांचा सरळ स्वभावापासून उत्पन्न होत्ये, कारण "जी वस्तु असण्यांत दोष नाहीं, तिचें नाव घेतलें तरी दोष नाहीं, असें त्यांचा सरळतेमुळें त्यांचा मनांत येतें;" असें कोणी विद्वान् या आरोपाचें चांगलें निराकरण करितात, आणि या लोकांची इतर प्रकारें वर्तणूक चांगली मर्यादाशील असत्ये, त्यावरून वरील अभिप्रायास पाठबळ मिळतें.

हे लोक स्वभावानें स्तब्ध, व मननशील आहेत, तरी मंडळीमध्यें आले असतां, हे आनंदवृत्ति असतात. यांस संभाषण व कर्मणूक आवडत्ये, आणि गोष्टी सांगण्यामध्यें व थट्टेबाजीमध्यें यांस फार आनंद होतो; परंतु एकाद्या वेळीं ही थट्टामस्करी शुद्ध तमासगिरांसारखी होऊन जात्ये. यांचें भाषण बहुधा क्षुल्लक असतें, असें पूर्वीं सांगण्यांत आलें आहे; परंतु हा क्षुल्लकपणा साधारणरीत्या त्यांचा स्वभावांतच आहे, आणि शिवाय गर्व व डामडौल करणें यांकडेहि यांचा कल आहे.

साधारण रीतीनें युरोपस्थांपेक्षां हिंदुस्थानचे लोक ठेंगणे आहेत; आणि आंगानें तर त्यांपेक्षां विशेष शाहाड्डी आहेत.[१०] आमचापेक्षां त्यांची चाल चांगली आहे, व सौंदर्य विशेष आहे; व त्यांचें बळ जरी कमी आहे, तरी ते आंगानें आमचा पेक्षां विशेष सुडसुडित असतात.

त्यांचा वर्ण पिंगट आहे; त्यांचे केश लांब, बहुधा पातळ, व हमेशा काळे कुळकुळित असतात. त्यांचा दाढ्यामिशा लांब व बळकट असतात, ( परंतु यांतील थोडेच लोक दाढ्या बाळगतात ). त्यांचा स्त्रियांचें सौंदर्य व लावण्य

(१०) उत्तरहिंदुस्थानांतील लढाऊ लोक साधारण इंग्लिश लोकांहून पुष्कळ उंच आहेत.

बरेंच असतें, आणि त्यांमध्यें मर्यादा व साधेपणा हीं असतात, त्यामुळें पूर्वोक्त दोन गुणांचें तेज अधिकच पडतें.

हिंदुलोकांचा शरीराची स्वच्छता, ही न्यायप्रसिद्ध होऊन गेली आहे. ते वारंवार स्नानें करितात, आणि जरी प्रत्येक स्नानानंतर वस्त्रान्तर करित नाहींत, तरी दुसऱ्या कोणत्याहि लोकांमधील कनिष्ठ प्रतीचा लोकांपेक्षां यांचा मधील कनिष्ठ प्रतीचा लोकांचे कपडे अधिक स्वच्छ असतात. त्यांचा घरांतील नजरेसमोरचे भाग फार नीट रीतीनें ठेविलेले असतात; परंतु इंग्रेज लोक जशा बारकाईनें नजरेबाहेरचा जागाहि व्यवस्थित ठेवितात, तशी बारकाई हिंदूंमध्यें मुळींच नाहीं.

प्राचीन व अर्वाचीन काळचा हिंदूंचा स्वभावाचें तारतम्य.

वरील वर्णनामध्यें हिंदूंविषयीं दोन प्रकार सांगण्यांत आले आहेत; एक, आपणाजवळ त्यांविषयीं जे अति प्राचीन काळचे लेख विद्यमान आहेत त्यांवरून त्यांची त्या वेळची स्थिति; आणि दुसरी त्यांची साम्प्रत पाहण्यांत येत आहे ती स्थिति. आतां, मध्यन्तरीय कालामध्यें त्यांची स्थिति कशी होती हें जर समजेल, तर उत्तम होईल; आणि सुदैवेंकरून युनानी लोकांनीं त्यांविषयींचा जा हकीकती लिहून ठेविल्या आहेत, त्या, ही मध्यवर्त्ती हकीकत जाणण्यास, चांगल्या साधनीभूत आहेत. जा कांहीं विशेष मतांनीं आमचे अभिप्राय सविकृत आहेत, त्या मतांपासून ते युनानी लोक विकार पावले नव्हते; आणि असें असून, ते लोक असे होते, कीं त्यांचे विचार आपणास चांगले समजतां येतात; व त्यांणीं जो निर्णय केला आहे त्यांतील खुबी आपण काढूं शकतों.

या प्रकरणाचा सविस्तर विचार अन्यत्र करण्यांत आला आहे,[११] यास्तव त्यापासून केलेला निर्णय मात्र एथें

(११) पुरवणी अङ्क ३ रा पाहू.

सांगितला म्हणजे झालें.

त्या (म्ह० वरील) हकीकतींवरून पाहतां, मनुस्मृतीपासून सिकंदर पादशाहापर्यंत हिंदूंचा स्थितीमध्यें फेरफार झाले होते, ते येणेंप्रमाणें:—(१) शूद्रांची दास्यत्वापासून पुरी मोकळीक होऊन ते स्वतन्त्र झाले होते; (२) विधवांनीं सती जाण्याचा पाठ प्रथम पडला, अथवा या मुदतींत तो प्रकार अधिक वारंवार तरी होऊं लागला; (३) निरनिराळ्या जातींचे शरीरसंबंध होणें बंद झाले; (४) ब्राम्हण शिपायगिरी करूं लागले, व स्वतः निराळ्या गांवांत वस्ती धरूं लागले; आणि (५) बैरागी लोकांचे पंथ होण्याचा आरंभहि कदाचित् याच वेळांत झाला असावा.

मनूपासून साम्प्रत काल पर्यंत जे फेरफार झाले, ते मागेंच सविस्तर वर्णिले आहेत; आणि (प्राचीन व अर्वाचीन काळापैकीं दोन विवक्षित मुदती न घेतां जर एकंदरांचें) तारतम्य विशेष दूर दृष्टि देऊन केलें, तर या लोकांमध्यें जे फेरफार झाले ते बहुधा वाईट झाले आहेत, असें आपल्या दृष्टीस पडतें.

शूद्रांची चाकरपेशाची स्थिति अगदीं नाहींशी झाली, ही एक निःसंशय सुधारणा झाली असें जर कोणी म्हणेल, तर तें खरें आहे; परंतु ती गोष्ट खेरीज करून इतर प्रकरणीं हिंदुधर्म बिघडून गेला आहे; त्यांचा जातींचा यत्ता विशेष कठीण झाल्या आहेत, (जेथें ब्राह्मणांचें स्वहित होतें तेथें मात्र तसें झालें नाहीं); जमीनीवरील जाहीर देणें दुप्पट झालें आहे; न्यायाचीं कोडतें मजित झालीं आहेत; स्त्रियांविषयीं धर्मशास्त्राची दृष्टि अधिक क्षुद्र झाली आहे; लोकांमध्यें समाधानी राहण्याचीं साधनीभूत (कालवे आदिकरून) लोकोपयोगी कृत्यें कोणी हातांत धरित नाहीं, आणि युद्धासंबंधीं सौजन्याचा तर बहुधा विसर पडून गेला आहे. हिंदूंचे कांहीं ग्रंथ विद्यमान आहेत त्यांवरून कित्येक विद्यांमध्यें व कलांमध्यें ते उत्कृष्ट निपूण होते असें दिसतें; असें असून त्या

विषयांवर लिहिण्याचा ते साम्प्रत यत्न करित नाहींत; तसेंच शौर्य, सत्य, सरळपणा, व सचोटी, या त्यांचा गुणांविषयीं परदेशीय लोकांचा मनांत पूर्वीं चांगला ग्रह होऊन ते यांस मान देत असत; तेच गुण त्यांमध्यें आतां अगदीं कमी आहेत, असें आम्हांस दिसतें.

या सर्वांवरून पूर्वीं कोणा एका काळीं हिंदुलोक हे साम्प्रतचा पेक्षां बुद्धीनें व नीतीनें अधिक चांगले होते, असा सिद्धान्त न करणें हें अशक्य आहे. साम्प्रत जरीं त्यांची स्थिति खरजांत आली आहे, तरीहि ते युरोपाबाहेरील कोणत्याहि लोकांचा बराबरीला अद्यापि आहेत; यावरून असें दिसतें, कीं त्यांची स्थिति एका काळीं इतकी चांगली सुधारलेली होती, कीं प्राचीन काळचा अथवा अर्वाचीन काळचा कांहीं थोड्या दैवशाली लोकांची मात्र यांचाहून विशेष चांगली स्थिति होती, बाकी कोणाचीहि नव्हती.

जा कारणांनीं त्यांची उतरती कळा आली, त्यांविषयीं उल्लेख पूर्वीं निरनिराळ्या जागीं आले आहेत. मनुष्यानें अचेष्ट असावें, असें त्यांचा धर्मांत सांगितलें आहे; व त्यांचा क्षय होण्यास हें पहिलें कारण आहे. दुसरें, जातींचा नियमांमुळें त्यांचा देशांत सुधारणूक उत्पन्न होत नाहीं, व बाहेरूनहि येऊं शकत नाहीं: याच जातिनियमांमुळें मुसलमान व हिंदु हे वेगळे राहिले आहेत, आणि, तारतम्यानें पाहिलें असतां यांचाहून शुद्ध असा जो महम्मदाचा धर्म, तोच सरकारचा धर्म असून, त्याचा हाताखालील मूर्त्तिपूजक रयतेचा धर्म कायम राहिला असा हा हिंदूंचा धर्म मात्र आहे. या लोकांमध्यें एकसत्ताक राज्य होतें; तें अनिर्बंधक असल्यामुळें त्याणें लोकांचा सुधारणुकेची गति कांहीं कुंठित केली असेल हें निःसंशय आहे; परंतु एशियेंतील बहुतेक देशांपेक्षां एथील एकसत्ताक राज्य कमी जुलूमी व कमी इजतखाऊ होतें, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

इस्टेटीचे अगदीं सूक्ष्म पोटहिसे करण्याची चाल या

लोकांत आहे; परंतु यांतच ती विशेषेंकरून आहे असें नाहीं. असें असून, हिंदुलोकांपैकीं बहुतेकांची जी लाचारीची दशा आली आहे तिचीं कारणें शोधूं लागलें असतां, हें दायभागाचें प्रकरण प्रथम लक्षांत येतें. या चालीमुळें अतिशय मोठ्या जमीनदाराचे वंशजहि कालेंकरून मोडकळीस येऊन त्यांची स्थिति साधारण शेतकरी लोक व मजूर, यांचा मधील स्थितीप्रमाणें होत्ये; परंतु त्या दोन्ही वर्गांपेक्षां यांस स्वातंत्र्य कमी असतें, आणि द्रव्यसंचय करून आपली पूर्वीची अवस्था पुनः प्राप्त करून घेण्याचें संधानहि त्यांस सांपडत नाहीं. सराफ व मोठे व्यापारी, हे मोठे श्रीमान् होऊन आपल्या सर्व मुलांस पुष्कळ द्रव्य ठेवोत, परंतु मृत्युपत्र करून आपल्याचानें आपल्या मिळकतीची व्यवस्था करवणार नाहीं अथवा मोठ्या वंशाचा पायाहि घालवणार नाहीं, हें प्रत्येक धन्यास माहित असतें; म्हणून आपण त्या मिळकतीचे भाडेकरी आहों असें समजून, डामडौलाकरितां जेवणावळी व अनुष्ठानप्रसंग करून, जितका आनंद व जितकी अब्रू मिळववेल तेवढी मिळविण्याचा यत्न करितो; आणि तशाच हेतूनें, देवालयें, तलाव, व उपवनें करण्याचा आरंभ करितो; परंतु पुढें त्याचे वंशज दरिद्री झाल्यामुळें, त्यांस तीं पुरीं करितां येत नाहींत; अथवा पुरीं झालीं असल्यास, दुरुस्त करितां येत नाहींत.

याप्रमाणें इस्टेटीचे सम भाग करण्याची चाल असल्यामुळें जसा त्यांचा संपत्तीचा बिघाड होतो तसाच बुद्धीचाहि होतो. युरोपांतील प्राचीन काळचा कित्येक लोकसत्ताकराज्यामध्यें लोकांत ऐशआरामाची वृद्धि न व्हावी आणि नव्या रीति न लागाव्या म्हणून, असा पाठ घातलेला होता. या चालीनें हे पूर्वोक्त उद्देश हिंदुस्थानामध्यें पुरे साधले आहेत; कारण आपली निरंतरची स्थिति सुधारण्याचा धांवेनें जा चंचल वृत्ति उत्पन्न व्हावयाचा त्या या चालीनें कोंडून मारल्या गेल्या आहेत. जे आपल्या कष्टानें

संपत्ति मिळवितात, त्यांस व्युत्पत्तिविद्येची अथवा इतर नाजूक कलांची बहुधा अभिरुचि नसत्ये; व कदाचित् असली, तर ते मेल्यानंतर त्यांचा संग्रह वाताहत होतो, आणि त्यांचा मुलांस आरंभापासून पुनः मेहेनत करावी लागत्ये; यामुळें, एकापुढें एक अशा परंपरेचा वंशजांस एकसारखी उत्तम शिक्षा मिळाल्यापासून मनुष्याची जी रसिकता सुधारत्ये, व मनोवृत्तींस जी मौढी येत्ये, ते गुण येण्यास अवकाशच राहत नाहीं.

या कारणास्तव, जरी युरोपापेक्षां हिंदुस्थानामध्यें लोक लौकर वाढतात व एकदम श्रीमान् होतात, तरी त्यांपासून एकंदर लोकांचा स्थितींत जाथूचा बदल होत नाहीं; यामुळें सगळे सारख्या भावानें विकतात; लोकांनीं अनुसरावें असे स्पष्ट दिसण्याजोगे कोणी पुढारी नसतात; आणि राजाचा अव्यवस्थित इच्छेचा आड येण्यास कांहीं आडकाठ्या नसतात.[१२]

अशीं हिरमोडकरणारीं कारणें असल्यामुळें, हिंदूंची सुधारणा जागचा जागीं कोंडलेली राहून कमी होत चालली आहे, यांत कांहीं आश्चर्य मानायाजोगें नाहीं. या कारणांजवळ तिणें इतके दिवस कशी टकर मारिली, व ती साम्प्रत आहे इतक्या उच्च स्थितीस तरी कशी आली, हें आश्चर्य आहे.

---

(१२) जे मोठमोठे लश्करी सरदार आहेत त्यांचे मुलुक बहुधा तसेच त्यांचा वंशजांस मिळतात, म्हणून वरील नियमास ते अपवाद आहेत; परंतु इस्टेटींचा सुधारणुकेविषयीं म्हटलें, तर त्यांहून अधिक खराब असे कोणीच लोक नाहींत. त्यांचा अधिकाराचा सगळा टेंका पगारदार लश्कराचा बळावर असतो त्यामुळें त्यांस रयतेची मदद मागणें जरूर पडत नाहीं; आणि प्रत्येक सरदार आपल्या संस्थानांत राहतो, व तेथें त्यास समान पदवीचा लोकांचा सहवास नसतो, त्यामुळें त्यांचें परस्परांशीं दळणवळण होऊन सलोखा वाढत नाहीं, व त्यांचा परस्परांविषयीं मनमिळाउ वृत्तीचा कित्ता पाहून तसा उतरण्याची संधि त्यांचा कनिष्ठांस मिळत नाहीं.

या सुधारणेचा उत्कर्ष केव्हां झाला, त्या कालाचा निश्चय करणें कठीण आहे. एथील लोकांची नीतिसंबंधीं स्थिति, व एथील स्थापित कारखाने, हीं सिकंदर पादशाह येण्यापूर्वी नुकतींच आपली उत्कृष्ट दशा पावलीं होतीं, असें कदाचित् म्हटलें असतां चालेल; परंतु एथील विद्येचा उत्कर्ष होण्यास आणखी बराच काळ लागला होता. इसवी सनारंभाचा जरासा पूर्वी, विक्रमादित्य राजाचा कारकीर्दींत व्युत्पत्तिविद्येचा भर झाला होता असें हिंदूंचीं पुराणें सांगतात; परंतु कांहीं ग्रंथकार जे त्याचा सभेंतील रत्नें असे मख्यात आहेत, ते अलीकडचा काळचे आहेत असें दिसतें, आणि जा चांगल्या ग्रंथकारांचे ग्रंथ विद्यमान आहेत, ते इसवी सनाचा दुसऱ्या शतकापासून आठव्या शतकापर्यंतचा वेळांतले आहेत. इसवी सनाचा पांचव्या शतकांत हिंदूंचा गणितविद्येचा उत्कर्ष झाला; परंतु व्युत्पत्तिविद्या व गणितादि शास्त्रविद्या, या दोहींमध्यें सरस ग्रंथ, मुसलमान हिंदुस्थानांत प्रथम स्वारी करून आले त्या काळानंतरहि कांहीं वेळ पर्यंत, होत होते.



# पुरवणी अङ्क पहिला.

## मनूचा व वेदांचा काल.

मनुस्मृति हा ग्रंथ मोठा उपयोगी आहे, कारण हा ग्रंथ झाला त्या वेळचा लोकांची स्थिति यामध्यें वर्णिली आहे; परंतु हा फार प्राचीन काळीं झाला असें जें म्हणणें आहे, तें जर खरें असेल, तर मात्र कायती याची किम्मत आहे.

आतां, मनुस्मृतीमध्यें वारंवार वेदांवर हवाले दिले आहेत. यास्तव तिचा कालाचा निर्णय करण्यापूर्वीं वेदांचाचा करणें अवश्य आहे. वेद, या दैविक ग्रंथांविषयीं त्या स्मृतींत जा रीतीनें लिहिलें आहे, तिजवरून असें दिसतें, कीं वेदांची प्रवृत्ति पुष्कळ काल पर्यन्त व अशा स्वरूपानें झाली होती, कीं कोणी संशय न घेतां ते सप्रमाण मानित असत, व ते सर्वांस पूज्य होते.

वेदांचा काल.

वेदांतील बहुतेक सूक्तांची भाषा खडबडीत आहे; तिजवरून असें सिद्ध होतें, कीं इतर दैविक काव्यांचा भाषेची पुरी रचना होण्यापूर्वीं तीं सूक्तें लिहिलीं असावीं. दुसरीं कित्येक आहेत, तीं जरी जुनाट आहेत, तरी त्यांची भाषा उजळलेली आहे. यावरून बहुतेक वेद रचल्यापासून सर्वांचें समाहरण ( म्हणजे जुळणी ) होईपर्यंत मध्यें बराच वेळ गेला असावा. समाहरणाचा काळ निश्चित होण्याची आशा मात्र आपण बाळगली तर चालेल.

यजुर्वेदांतील सिद्धान्त मतांची परम्परा पराशरापासून चाळीस पिढ्यांपर्यंत जा ऋषींनीं तोंडानें चालविली, त्यांचा आयुष्याची गणती करून तिजवरून यजुर्वेद केव्हां रचला तो काळ निश्चित करण्याचा यत्न सर्विलियम् जोन्सानें केला आहे; आणि कांहीं खस्थांचा वेध घेऊन खुद्द पराशराचा काळ ठरविला आहे; परंतु त्याणें जो तर्क केला आहे तो खातरी होण्याजोगा नाहीं. ख्रिस्तापूर्वीं १५८० व्या वर्षीं

यजुर्वेद लिहिला अशी अटकळ त्याणें केली आहे. त्या वेदाचें समाहरण ( म्हणजे संहिता ) ख्रिस्तापूर्वी १२ व्या शतकांत झाली, असें त्याणें ठरविलें आहे. वेदांचा संग्रह करणारा व्यास हा ख्रिस्तापूर्वी १२ व्यापासून १४ व्या शतकाचा दरम्यान होता,असें,जा दुसऱ्या युरोपियन ग्रंथकारांनीं या गोष्टींचा विचार केला, त्यांणीं निर्णित आहे. ख्रिस्तापूर्वी निदान ३००१ वर्षांवर व्यास नांदत होता असें सर्व हिंदु म्हणतात.

कोलब्रूक साहेबानें एक लेख शोधून काढिला आहे त्यावरून, या विषयप्रकरणीं युरोपियन लोकांचा जो अभिप्राय, तो एतद्देशीय लोकांचा अभिप्रायापेक्षां विशेष अनुकूल आहे असें दिसतें. त्या लेखाचा प्रकार.— प्रत्येक वेदामध्यें एक ज्योतिषसंबंधीं निबंध आहे, आणि धर्मसंबंधीं क्रिया करण्यास योग्यायोग्य कालाचें ज्ञान व्हावें म्हणून पञ्चाङ्ग कसें नीट करावें हें दाखविणें, हा त्याचा उद्देश आहे. जा पुरुषानें हे ग्रन्थ सरशेवटीं शोधिले, त्याणें, जे वेध त्या वेळीं लोक विशेष सप्रमाण धरित असत, ते धरून, ग्रन्थ शोधिले असावे;आणि त्या वेळचा वाचणारांस उत्कृष्ट समज पडे अशी जी कालगणनाची रीति होती ती त्याणें योजिली असावी; या गोष्टींविषयीं बहुधा संशय नाहीं. या ज्योतिषग्रन्थांमध्यें चान्द्र मासांचा ५ वर्षांचें एक युग धरिलें आहे, आणि त्यांत अनाडी विभाग पाडून, दिनवृद्धि व मासवृद्धि व दुसरे संस्कार केले आहेत; हें जें कालगणनाचें माप आहे त्यावरूनच हे ग्रन्थ फार प्राचीन काळीं झाले असें सिद्ध होतें; साम्प्रत सर्व हिंदुस्थानभर जें कालमान लोकांनीं स्वीकारिलें आहे, त्याचीं मुळें या वरील कालमानांत आहेत. आतां वरील उहतर ठीकच आहे; परंतु ख्रिस्तापूर्वीचा १४ व्या शतकामध्यें अयनबिंदूंचीं जीं स्थानें होतीं तींच स्थानें पूर्वोक्त ग्रन्थांत त्या बिंदूंस दिलीं आहेत; यावरून त्या कालाविषयीं अगदीं साफ निर्णय होतो: ( या स्थानांविषयीं कोलब्रूक साहेबानें सविस्तर वर्णन केलें आहे ). कोलब्रूक साहेबानें या लेखाची जी परिभाषा केली आहे, तिजविषयीं

अद्यापि कोणी संशय घेतला नाहीं असें मला वाटतें; आणि तो मूळ ग्रन्थच असल खरा नाहीं असा संशय घेण्यास कांहीं हेतु शोधून काढणें कठीण पडतें; आणि यांचा पश्चाङ्गाची प्राचीन रचना आहे तशी नवीन बनावण्याची शक्ति हल्लींचा हिंदूंत नाहीं, व जो ग्रन्थ ख्रिस्तापूर्वी ३१ व्या शतकांत लिहिला असें सर्व हिंदूंचें मत आहे, त्या ग्रंथांत इसवी सनापूर्वीचा १४ व्या शतकांतील असा आरोपित लेख नवा करून घालण्यास कांहीं हेतु दिसत नाहीं.

कोलब्रूक साहेबानें वरील अभिप्राय जा निबंधांत लिहिला आहे, त्याचा पूर्वी त्याणें दुसरा एक निबंध लिहिला होता, आणि त्यांत, वेदांतील दुसऱ्या एका लेखाचा आधारावरून असें दाखविलें होतें, कीं हिंदूंचा महिन्यांचा व ऋतूंचा मेळ आहे, म्हणून वरील कलमांत सांगितल्याप्रमाणेंच अयनांशांची स्थिति असावी; आणि या आधारावरून त्याणें वेदांचा समाहरणाचा जो काळ ठरविला होता, तोच पुढें विशेष प्रत्यक्ष प्रमाणानें त्यास निश्चित करितां आला.

आतां, वर सांगितल्याप्रमाणें वेदांचा संग्रहाचा जो काळ ठरला, त्यावरून मनुस्मृतीचा काळ शोधून काढण्याचा प्रयत्न केला पाहिजे. या दोन्ही ग्रंथांचा भाषेंत जो भेद आहे तो पाहून, आणि लाटिन भाषेंत तितका फेरफार होण्यास किती वेळ लागला याचा विचार करून, वेदांचें समाहरण झाल्यानंतर ३०० वर्षांनीं मनुस्मृति झाली असावी, असें अनुमान सर् विलियम् जोन्स साहेबानें केलें आहे; परंतु हा ऊह खातरी होण्याजोगा नाहीं; कारण सर्व भाषांचा सुधारणेची गति एकसारख्या वेगानें होत्ये असें मानण्यास कांहीं आधार नाहीं. संस्कृत भाषेंत कांहीं ओबडधोबड रूढि आहेत, व कांहीं त्यांहून विशेष उजळलेल्या आहेत. या दोन प्रकारचा रूढि निरनिराळ्या काळीं वहिवाटींत आल्या असाव्या व त्या काळांमध्यें बरेंच अन्तर असावें असें प्रमाणावांचून कल्पून घेतलें पाहिजे. पूर्वोक्त रूढींचें कालान्तर, हें मनुस्मृतीचा काळ ठरविण्यास एक साधन आहे; परंतु त्याशिवाय मनुस्मृतीमध्यें जे नियम व ज्या रीतिभाती वर्णिल्या आहेत

मनुस्मृतीचा काल.

त्यांमध्यें, आणि अर्वाचीन काळचां मध्यें, जें अन्तर आहे, तें, मनुस्मृतीचा कालाचा निर्णय करण्यास दुसरा आधार आहे. हें नियमादिकांमधील अन्तर पुष्कळ आहे, असें पूर्वीं दाखविण्यांत आलें आहे; आणि हिंदुस्थानांत सिकंदराचें येणें होण्यापूर्वीं जे फेरफार झाले, त्यांचा मानावरून, सिकंदराचा पूर्वीं पुष्कळ दिवसांवर मनुस्मृतीची रचना झाली असावी, असें अनुमान केलें असतां चालेल. या प्रतिज्ञांवरून सिकंदराचा काळ, व वेदांचा काळ, यांचें मध्यप्रमाण जो काळ, तो मनु नामें जो लुप्त स्मृतिकार त्याचा काळ, असें ठरविलें असतां चिंता नाहीं; व यावरून ख्रिस्तापूर्वीं ९००· वर्षांवर तो स्मृतिकार नांदत होता असें होईल.

त्या स्मृतींतील प्रतिपादित धर्म व रीतिभाती, हीं साम्प्रतचांहून भिन्न आहेत त्यावरून, व त्या ग्रन्थाची शैलीहि गतकालिक आहे यावरून, ही स्मृति फार प्राचीन आहे असें सिद्ध होतें.

हा ग्रन्थ अर्वाचीन बनावट नाहीं असें दिसतें; कारण तसा असता तर त्या ग्रन्थकारास मागचा पुढचा मेळ राखणें कठीण पडतें: कारण युनानी लोकांचा हकीकतींवरून या ग्रन्थाचा ताळा पाहण्याचें साधन आपणाजवळ आहे. तशांत असा ग्रन्थ बनावण्यास कांहीं हेतुहि दिसत नाहीं; म्हणून हा ग्रन्थ तसा अर्वाचीन बनावट नाहीं असें निगमन करणें हेंच बहुधा योग्य आहे.

जर कोणी ब्राम्हणास नवी स्मृति बनाविणें असती, तर त्याचा कारकीर्दींत स्थापलेल्या क्रमास आधार देण्याकरितां तो तिची प्रवृत्ति करिता; आणि तो ब्राम्हण जर सुधारणेच्छु असता, तर तो आपल्या मतांस अनुकूल अशीं प्रमाणवाक्यें घालिता; परंतु त्या वेळीं जे अति लोकप्रिय फेरफार झाले होते ते सोडून देणें, व अर्वाचीन लोकांचा विचारांस प्रतिकूल असे आचार उपदेशणें, हें त्या दोघांतून एकाचानेंहि झालें नसतें. असें असून, पाहूं जातां मनूनें प्रतिपादित जो धर्म तो वेदोक्तच आहे. मनूंत, राम, कृष्ण, व अर्वाचीन काळचे दुसरे लोकप्रिय देव, यांची स्तुति नाहीं, व निंदाहि नाहीं; आणि त्यांविषयीं व दुसऱ्या

प्रकरणांबाबद जे मतवाद पुढें सुरू झाले, त्यांविषयीं चुणूकहि दाखविलेली नाहीं. गोसावी वगैरे नियमित पंथांचा लोकांविषयीं, अथवा विधवांनीं सती जाण्याविषयीं, या ग्रन्थांत उल्लेख नाहीं. ब्राम्हण हे गोमांस व इतर प्रकारचें मांस खात असत, आणि कनिष्ठ वर्णांचा स्त्रियांशीं लग्नें करित असत; या व अर्वाचीन हिंदूंस ज्यांचा त्रास येतो अशा दुसऱ्या चालीहि त्या काळीं होत्या, असें त्या ग्रन्थांत वर्णित आहे; आणि त्यांतील वर्णन सूक्ष्म आहे, म्हणून, तें बनावट असेल असा अंदेशा घेण्याचें कारण नाहीं.

मनुस्मृतीचा काळाची अटकळ करण्यास, वर सांगीतलीं एवढींच प्रमाणें आहेत. मनूचा काळाचा निश्चय करण्याचें कांहीं कारण नाहीं; कारण जसा भगवद्गीतेंत कृष्ण आहे, त्याप्रमाणें या ग्रन्थांत, नाटकांतील पात्राचा स्वरूपानें, मनू आला आहे. या ग्रन्थाची जुळणी करणारा कोण, याविषयीं त्या ग्रन्थांत दिक्प्रदर्शन केलें नाहीं, व यावरील प्राचीन टीकाकार जो कुल्लूकभट्ट, त्याचा शकाचाहि कांहीं माग लागत नाहीं. कुल्लूकानें आपल्या टीकेंत मनूचा कांहीं मतांस उजळा देण्याचा व कांहीं मतांतील बाधित भागाचा दोष उडविण्याचा प्रयत्न केला आहे; यावरून असें दिसतें, कीं कुल्लूकाचा वेळींच लोकांचे अभिप्राय बदलूं लागले होते. मनुस्मृतीवरील कित्येक टीकाकार असें म्हणतात, कीं मनूंतील नियम चांगल्या युगांस मात्र लागू होते, आमचा काळास लागू नाहींत, व असें म्हणणारांमधून कांहीं ग्रंथकार फार जुनाट आहेत; असें असून, मनुस्मृतीविषयीं अशी यत्ता कुल्लूकाचा ग्रन्थांत एकदांहि आलेली नाहीं; यावरून असा सिद्धान्त करणें येतो, कीं कुल्लूक हा जरी मनूहून बराच अर्वाचीन आहे, तरी जा दुसऱ्या टीकाकारांचा अभिप्रायांविषयीं उल्लेख वर आला आहे, त्यांपेक्षां हा पुष्कळ प्राचीन आहे.

मनुस्मृति नीट वाचून पाहिली असतां, तिचा जो काळ सांगितला आहे, तो विलग आहे असें दिसत नाहीं. अशा धर्मशास्त्रसंबंधी ग्रंथाची रचना करणें, व तीहि इतक्या बेतबातानें करणें, ही गोष्ट फार प्राचीन काळास

साजत नाहीं असें कोणी कदाचित् म्हणेल; आणि अशी स्मृति करण्याची शक्ति येण्यापूर्वी कांहीं दिवस लोक स्थिर-स्थावर झाले पाहिजेत, व त्यांणीं कांहीं नियम व चाली ठरविल्या पाहिजेत, हें खचित आहे. परंतु युनानी व दुसऱ्या जा लोकांचा इतिहास आपणास माहीत आहे, त्यांणीं आपल्या राज्यांचा अवेलीसच आपल्या लोकांस कायदा बांधून दिला होता असें आहे. आतां मनुस्मृतीची रचना व तींतील विषय, यांवरून, ती झाली त्या वेळीं हिंदुलोक बरेच सुधारलेले होते,असें दिसतें; तथापि यावरून तिचें मूळ अर्वाचीन आहे असें सिद्ध होत नाहीं, व तसेंच ओबडधोबड भाषा असल्यामुळें ग्रंथाचें प्राचीनत्वहि सिद्ध होत नाहीं. यास दृष्टान्तः— एस्किमो लोक हे जितके साम्प्रत सुधारलेले आहेत, व बहुधा २००० वर्षांपुढेंहि कदाचित् होतील, त्यांहून रोमन लोक हे २००० वर्षांपूर्वी अधिक सुधारलेले होते.

---

# पुरवणी अङ्क दुसरा.

## जातींमधील फेरफारांविषयीं.

---

सिथियन् म्हणजे स्कुथी लोकांतून कांहीं लोक क्षत्रियजातींत आले, असें कर्नेल टाड याचें म्हणणें आहे, आणि ऑरिएण्टल् मागाझीन यामध्यें एका ग्रंथकारानें तें म्हणणें कांहीं अंशीं कबूल केलें आहे. पूर्वी जातींमधील फेरफारांचें वर्णन करित असतां, वरील फेरफाराविषयीं मी कांहीं लिहिलें नाहीं; परंतु जर हा फेरफार शाबीद होईल तर इतरांपेक्षां हा फार मोठा आहे. आतां कर्नेल टाड यास पूर्वेकडील देशांमकरणीं ज्ञानसम्पादनाची हौस आहे, व त्याचा कारकीर्दीपर्यन्त जा देशांविषयीं लोकांस विशेष माहिती नव्हती अशा राजस्थान नामें देशाविषयीं त्याणें पुष्कळ वर्तमान प्रसिद्ध केलें आहे, यास्तव त्याचा बोलण्याचा सत्कार करणें योग्य आहे; व ऑरिएण्टल् मागाझीना मधील पूर्वोक्त ग्रंथकारहि प्रतिपादित

राजपूतांतून कांहीं खुम परदेशांतून आले, हें म्हणणें संशयग्रस्त आहे.

विषयांत निपुण आहे, ह्मणून परदेशस्थ लोक हिंदूंचा जातींत आल्याचीं उदाहरणें माझा माहितींत आलीं नसून त्यास कळलेलीं असतील; परंतु असें शाबीद होई पर्यन्त मला त्या गोष्टीचा अंदेशा आहे; आणि या गोष्टीविषयीं एकंदराखालीं विचार करून पाहतां मला असें दिसतें, कीं राजपूतांमध्यें जात ह्मणून जो खूम आहे तो खेरीज करून, बाकी सर्व राजपूत शुद्ध हिंदु आहेत.

( पुरवणी अङ्क चौथा याचा समाप्तीस टीप लिहिली आहे ती पाहू. भा० क० )

## पुरवणी अङ्क तिसरा.

### हिंदुस्थानाविषयीं युनानी लोकांनीं लिहिलेली हकीकत.

सिकंदरपादशाह हिंदुस्थानांत आला तो बीयानदी पर्यन्त आला, आणि नन्तर दक्षिणेकडेस वळून सिधुनद व त्याचा पूर्वेकडील वैराण यांचा मधून कूच करून परत गेला. त्याणें या देशांत राज्य मिळविण्याचा प्रयत्न केला नाहीं; परंतु त्याचा इरादा हिंदुस्थानांत परत येण्याचा होता, ह्मणून त्याणें अहमदशाह दुराणी याचा प्रमाणें, कित्येक रजवाड्यांचा मुलुक घेऊन त्यांचा प्रतिस्पर्ध्यास दिला, आणि त्यांची दोस्ती जोडून ठेविली. या कारणामुळें, व सिकंदराचें थोडेंसें लश्कर या देशीं मागें राहिलें होतें व शिवाय इराणांतहि कांहीं होतें त्यामुळें, पौरस व दुसरे रजवाडे त्याचा पक्ष धरित असत, यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

त्या वेळीं हिंदुलोकांत जाती होत्या, हें त्या युनानी लोकांस माहित होतें; परंतु त्यांणीं "चोहोंचा" अथवा मिश्रजाति धरून पांचांचा" सात जाती केल्या आहेत, व त्यांमधून शूद्र मुळींच गाळून टाकिले आहेत.

त्या वेळीं तीन प्रकारचे गोसावी होते असें वर्णन आहे, परंतु ते वानप्रस्थस्थ व संन्यस्त ब्राह्मण होते, किंवा नियमित मठांतील गोसावी होते, हें स्पष्ट समजत नाहीं. सिकंदरानें कांहीं असल्या लोकांस बोलावणें पाठविलें, परंतु

ते त्याकडेस येतना ह्मणून त्याणें त्यांशीं संभाषण करण्या-करितां एका सरदारास पाठविलें. तो गेला तेव्हां शहराबाहेर एका कोशावर नागवे व उन्हांत तापत, असे १५ जण त्याचा दृष्टीस पडले; त्यांतून कांहीं बसले होते, कांहीं उभे होते, व कांहीं निद्रित होते, परंतु, जीं त्यांचीं आसनें होतीं तीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत हाललीं नाहींत. प्रथम त्याणें त्यांपैकीं एकास विचारिलें, परंतु त्याणें त्याशीं धट्टाईनें भाषण केलें, व त्यास सांगितलें, कीं जर मजजवळ भाषण करण्याची तुझी इच्छा असेल, तर तूं आपले कपडे काढून टाकून या दगडांवर येऊन नागवा बस. (कित्येक गोसावी असा दांडगाईचा आव अद्यापिहि घालित असतात.) इतक्यांत त्यांचा मठाचा मुख्य तेथें आला, आणि त्या पहिल्या गोसाव्यास छेडून सिकंदराचा सरदाराशीं सौम्य भाषण करून, आपला वाग्व्यवहार होण्याचें साधन अपुरें आहे तथापि मला जेवढें सांगतां येईल तेवढें मी हिंदुतत्त्वविद्येविषयीं सांगेन, असें सांगता झाला. त्या मुख्यानें आपणाबरोबर मित्राचा नात्यानें यावें म्हणून त्यास कबूल करण्याविषयीं सिकंदरानें यत्न केला; परंतु त्याणें तें बोलणें नाकारून उत्तर दिलें, कीं या मृत्तिकेचा देहांत माझा वास आहे पर्यंत जें कांहीं मला पाहिजे तें हिंदुस्थानांत मिळत आहे; आणि हें शरीर सुटलें म्हणजे या सोबतीची कटकटच मिटली.

पहिला जो उद्धट बैरागी सांगितला, त्याचा लोभ दुर्जय होऊन, तो, आपल्या बंधुवर्गाचें बोलणें न ऐकतां, सिकंदराचा बराबर गेला. त्याणें ईश्वरास सोडून दुसऱ्याची चाकरी पत्करिली म्हणून दुसऱ्यांनीं त्याचा निषेध केला. युनानी लोकांनीं त्याचा फार सन्मान केला. पुढें तो इराणांत गेल्यावर आजारी पडला, आणि तेथें जें पथ्य त्यास करावयास सांगितलें तें, बहुधा जातीचा कारणानें, नाकबूल करून, त्याणें अग्निकाष्ठें भक्षण्याचा निश्चय केला. त्यास सिकंदर प्रथम आडवा आला, परंतु त्याचें कांहीं चालेना, तेव्हां, त्या शेवटचा प्रसंगीं त्या गोसाव्याचा मोठा सन्मान करावा, असा सिकंदरानें हुकूम केला, आणि त्यास उमाप देणग्या दिल्या; त्या त्याणें सरणांत जाण्याचा पूर्वीं

आपल्या दोस्तांस वांटिल्या. जेव्हां त्यास श्मशानांत नेला, तेव्हां त्याचा डोक्यास तुरे होते, व तो हिंदुस्थानचा भाषेंत गीतें गात होता. नंतर लांकडें व दुसऱ्या ज्वालाग्राही पदार्थांचें जें सरण रचिलें होतें, त्यावर जाऊन त्यास आग लावण्याविषयीं त्याणें आज्ञा केली,आणि कांहीं न डगमगतां तो मरून गेला; ती त्याची शान्तता पाहून युनानी लोकांचा मनांवर त्याविषयीं चांगला ग्रह उत्पन्न झाला.

त्या वेळीं कित्येक गोसावी रस्त्यांमधून जात असत, आणि सांपडतील तेथलीं, अंजीर, द्राक्षें, घेऊन खात; तेल मिळाल्यास आंगास लावीत; श्रीमानांचा घरांत शिरत; पात्रें वाढलेलीं असल्यास तेथेंच जेवीत; आणि कोणी संभाषण करित असल्यास त्यांत तोंड घालीत; सारांश, कांहीं असले लोक जा अनावरपणाचा साम्प्रत आव घालितात, त्यांसारिखे ते सर्व असत. हिंवाळ्यांत व उन्हाळ्यांत ते नागवे फिरत; आणि वडांचा वृक्षांखालीं बसून आपला काळ घालवीत; त्यांतून कित्येक वडांचा विस्तार सुमारें ५ बिघे होता, आणि त्यांखालीं १०,००० लोक बसण्याजोगी छाया असे, असें वर्णन आहे.

साम्प्रत एका जातीचे गोसावी डोकीचा केशांचा जटा पाडून त्या पागोट्यासारख्या बांधतात, त्याप्रमाणें पूर्वीं सगळे करित असत, असें एका ग्रन्थकारानें लिहिलें आहे.

आजारी पडणें हें अप्रतिष्ठेचें काम आहे असें ते समजत, आणि कोणी आजारी पडला असतां, तो आत्मघात करून आपल्या आयुष्याचा शेवट करी, असें सांगितलें आहे. जे तत्त्ववेत्ते होते ते आत्मघात करणें पसंत करित नसत, आणि असें करणें हें लघुत्वाचें काम आहे असें समजत; परंतु एकंदराखालीं पाहतां या बाबदींत त्या वेळचा विद्वानांचीं मतें व त्यांचा प्रसंगोपात आचार, हीं दोन्हीं बहुधा साम्प्रतचां प्रमाणेंच होतीं, असें दिसतें.

त्या वेळीं, निरनिराळ्या जातींचा शरीरसंबंध होऊं शकत नव्हता, आणि एका जातीचांस दुसऱ्या जातीचांचा धंदा करण्याची परवानगी नव्हती, परंतु कोणाचा जन्म कोणत्याहि कुळांत असला, तरी त्यास तत्त्ववेत्ता होण्यास

हरकत नाहीं, याप्रमाणें वर्णन आहे.

साम्प्रतचा बैराग्यांमध्येंहि सर्व जातींचा लोकांस जाण्यास आडकाठी नाहीं; परंतु सिकंदराचा वेळींहि ते तसेच होते, किंवा (गृहस्थ, मंत्री, व न्यायाधीश, हे तीनहि धंदे करून, प्रसंगवशात् लढाई करण्यास, व दुसरे धंदे चालविण्यासहि ब्राह्मणांस परवानगी होती या गोष्टींचें ज्ञान नसल्यामुळें,) तसे धंदे करणारे ब्राह्मण, पुढें वानप्रस्थ अथवा संन्यस्त होऊन तशा मेळ्यांत आले होते, व त्यांचें स्वरूप न ओळखून सर्व धंदे करणारे लोक या मेळ्यांमध्यें होते, असें म्हणून त्या युनानी लोकांनीं घोंटाळा केला असेल किंवा नाहीं, या गोष्टीचा संशय आहे.

दुसऱ्या वर्णाविषयीं विशेष कांहीं सांगावयाचें नाहीं, परंतु शूद्रांचा वर्णाची चाकरपेद्याची शिस्त त्या वेळींच सुटली होती असें दिसतें.

दुसऱ्या काळीं जशीं पुष्कळ स्वतंत्र संस्थानें हिंदुस्थानांत होतीं, तशींच त्या वेळींहि होतीं असें दिसतें. त्या वेळचा हिंदुस्थानांतील राजांजवळ जें लश्कर होतें असें सांगितलें आहे, ती बहुधा अतिशयोक्ति आहे; यास दृष्टान्तः— त्या वेळीं पंजाबांत पुष्कळ राज्यें होतीं; त्यांत पोरस म्हणून एक राजा होता; त्याजवळ २०० हत्ती, ३००रथ ४००० घोडेस्वार, व ३०,००० उभें पायदळ, याप्रमाणें लश्कर होतें; असें असून (जर रथांचा बदल तोफा धरिल्या तर) सगळा पंजाब जाचा ताब्यांत असून दुसऱ्या पुष्कळ देशांवर जाची सत्ता होती असा जो रंजितसिंग, त्याचें लश्करहि तेवढेंच होतें, असें सरअलेक्झाण्डरबर्नस् साहेबानें लिहिलें आहे.

त्या वेळीं हिंदुस्थानांतील रजवाड्यांनीं जे नजराणे दिले त्यांवरून, हा देश त्या वेळीं श्रीमान् होता असें दिसतें.

जहिलम व चिनाब या नद्यांमध्यें १५०० शहरें होतीं, असें एका ग्रंथकारानें सांगितलें आहे; त्यांपैकीं त्याचा अतिशयोक्तिबदल वरील अङ्कास जरी संस्कार दिला, तरी बाकी राहिलेल्या शहरांचा संख्येवरून तो देश श्रीमान् होता असें दिसतें. पाटलिपुत्र शहर चार कोश लांब व

पाऊण कोश रुंद होतें, आणि त्यासभोंवता खोल खंदक व उंच तट होता, आणि त्यास ५७० बुरूज व ६४ दिंडीदरवाजे होते असें वर्णन आहे.

लोकांचा स्थितीचें जितकें ज्ञान व्यापारावरून होतें, तितकें दुसऱ्या कोणत्या गोष्टीनें होत नाहीं. या न्यायानें पाहूं जातां, सिकंदरानंतरचा एका ग्रंथकारानें परदेशसंबंधीं व्यापाराचीं शहरें व बंदरें पुष्कळ सांगितलीं आहेत, त्यावरून त्या काळीं या लोकांची स्थिति बरीच सुधारलेली होती असें दिसतें.

त्या वेळीं पोलिसाचा बंदोबस्त उत्तम होता असें वर्णन आहे; यास दृष्टान्तः— चन्द्रगुप्ताचा छावणींत सुमारें ४००,००० लोक होते, तेथें दर रोज ३० रुपयांहून अधिक किमतीचा मालाची चोरी होत नसे.

त्या काळीं मनूंत सांगितल्याप्रमाणें कांहीं मंत्र्यांस मदतीस घेऊन राजा इनसाफ करित असे; परंतु याविषयीं युनानी लोकांस विशेष माहिती नव्हती असें दिसतें. या लोकांजवळ लेखी धर्मशास्त्र नव्हतें असें सर्व युनानी लोकांचें मत होतें. यांस लीपिहि मुळींच माहीत नव्हती असा कित्येकांचा अभिप्राय होता, व कित्येक ग्रन्थकार यांचा लीपीची तारीफ करितात असेंहि आहेः याप्रमाणें मतभेद आहे.

जमिनीवर, मजूरलोकांवर, व व्यापाऱ्यांवर कर बसविलेले होतेः हा त्या वेळचा सरकारचा महसूल असे. (मनूप्रमाणेंच) उत्पन्नाचा एक चतुर्थांश जमिनीचा साऱ्याबद्दल घेत असत असा लेख आहे; परंतु सर्व जमीन राजाची, व तो, वरील साऱ्याचा बोलीनें, ती कसणारांस देतो, असें तेथें स्पष्ट लिहिलें आहे. हल्लीं प्रमाणेंच त्या वेळीं कित्येक ठिकाणीं सर्व गांवांतील लोक मिळून जमातीनें शेती करित असत. हल्लीं प्रमाणेंच त्या वेळीं पाटील होते असें दिसतें.

सर्व वस्तूंस आरंभ आहे, व शेवट आहे; पृथ्वी वाटोळी आहे, व जाणें ती उत्पन्न केली, व जो तिचें पालन करितो, तो तींत सर्वत्र आहे; सर्व वस्तूंचीं मुळें निरनिराळीं आहेत; जग पाण्यापासून झालें आहे; पहिल्या चार महत्तत्त्वांखेरीज एका पांचव्या महत्तत्त्वापासून स्वर्ग व

नक्षत्रमण्डल हीं उत्पन्न झालीं आहेत; आणि सर्व ब्रम्हाण्डाचा मध्यास पृथ्वी आहे: याप्रमाणें हिंदूंचीं मतें होतीं, असें वर्णन आहे.

आमचा सारखे संवाद तुमचा देशांत करित असतात काय? असें कित्येक ब्राह्मणांनीं सिकंदराबराबरील एका गृहस्थास विचारिलें. यावरून असें दिसतें, कीं युनानी लोकांचा शास्त्रांविषयीं व मतांविषयीं हिंदुलोकांस त्यापूर्वी कांहीं कळलें नव्हतें. हिंदूंचा शिल्पाविषयीं युनानी लोक कांहीं लिहित नाहींत, त्यावरून ते जा देशांत गेले होते तिकडे हल्लीं प्रमाणेंच त्या वेळीं देवालयें वगैरे चांगलीं नव्हतीं असें दिसतें. हिंदुलोकांची गायनविद्या चांगली नव्हती असें त्यांणीं लिहिलें आहे. पखवाज, झांजा, व करताल, यांखेरीज वाद्यें त्यांजवळ नव्हतीं असें कोठें लिहिलेलें आहे.

बाकीचा कला हल्लींचाच स्थितींत त्या काळींहि होत्या असें दिसतें. लढाईचा वेळीं रथांस घोडे लावित असत, व कूच करण्याचा वेळीं बैल लावित असत. या कामास केव्हां केव्हां उंटेंहि लावित असतः हीं साम्प्रत रेतीचा मुलुखांत मात्र लावितात. मोठ्या डौलाकरितां हत्तींचे रथहि असतः साम्प्रतकाळीं तसे दोन रथ माझा ऐकण्यांत आले आहेत. हत्ती धरण्याची व शिकवण्याची चमत्कारिक रीति, हल्लीं प्रमाणेंच, त्या लोकांस माहीत होती.

त्या वेळीं या लोकांजवळ मोठे उमदे रंग होते, आणि हस्तकौशल्यानें कारीगरीचें काम करण्यामध्यें व परदेशांतील पदार्थ पाहून त्यांप्रमाणें करण्यामध्यें हे लोक फार चतुर होते.

हल्लीं जशीं तांब्याचीं भांडीं साधारणरीत्या सर्व कामांस लावितात, तशींच तेव्हांहि लावित असत; परंतु हल्लीं तांब्यापेक्षां पितळेचीं भांडीं फार वापरितात, परंतु पितळ हीं तांब्याहून अधिक ठिसूळ असें समजून त्या वेळीं ती कमी वापरित असत. त्या वेळीं मोठे मोठे राजरस्ते होते व दर अर्ध कोशास एक पुरलेला दगड,असे दगड होते;असे लेख आहेत.

हिंदुस्थानांतील सणांचा शोभेविषयीं एका ग्रन्थकारानें पुष्कळ वर्णन केलें आहे. त्या वेळचा समारंभांत

पाळलेले सिंह व बिबळ्ये वाघ नेत असत; आणि गाड्यांत झाडें घालून त्यांवर बसविलेले गाणारे पक्षीहि नेत असत. अशीं झाडें नेण्याची चाल बंगाल्यांतील लग्नसमारंभांमध्यें पूर्वीं होती, व बहुधा अद्यापिहि आहे.[1] त्या वेळींहि ते पितरांची स्तुति करित असत, व त्यांस विशेष मान देत; परंतु मेलेल्यांचा मोठ्या गर्ता बांधित नसत: याप्रमाणें हल्लींहि विलक्षण चाल आहे.

लग्नाचा कार्यांत ते पैसा घेत नसत व देत नसत: ही चाल मनूस अनुसरून होती, व हल्लींहि पाठ तसा आहे.[2]

त्या वेळचा स्त्रिया पवित्र होत्या, आणि विधवांनीं सती जाण्याचा पाठ नुकताच सुरू झाला होता. कांहीं पण करून तो सिद्धीस नेईल त्यास मुलगी देण्याची चाल त्या काळीं साधारण होती. त्या वेळचा राजांजवळ दासी असत, व त्या मनूचा वेळचा प्रमाणें अंतःपुरामध्यें तर त्यां भोंवत्या असतच; परंतु त्यांबराबर शिकारीसहि जात असत, व तेथें त्यांची अदब राखण्याकरितां मुसलमानलोकांप्रमाणें तजविजा केलेल्या असत; परंतु राजांचा दरबारांमध्यें जी गुलामगिरीची रीत मुसलमानांनीं अर्वाचीन काळीं सुरु केली, ती त्या वेळीं नव्हती. हिंदुस्थानांतील लोक आपल्या राजाकरितां ईश्वराजवळ दुवा मागत असत, परंतु इराणी लोकांप्रमाणें त्यापुढें साष्टांग नमस्कार घालित नसत.

यांचा पोशाक सगळा दोन धोत्रांचा असे असें सांगितलें आहे. कर्णभूषणें, व नकूशीदार जोडे, हीं घालित असत. त्यांचे कपडे सफेद कापसाचे असत; व त्यांतून पुष्कळांचे चिटाचे असत. सोन्याचे दागिने व जवाहीर हीं घालित असत; आणि जरी इतर गोष्टींत ते मितव्ययी होते, तरी वस्त्रप्रावरणाचा खर्च फार मोकळ्या हातानें करित असत. मोत्यें व उंची रत्नें हीं त्यांमध्यें साधारण होतीं. हल्लींप्रमाणेंच मोठ्या लोकांचा डोकीवर छत्र्या धरित असत.

(१) मुंबईमध्येंहि अशा बागा नेत असतात, त्यांस वाड्या म्हणतात. भा० क०

(२) हल्लीं चाल सर्वत्र तशी नाहीं. भा० क०

ते हल्लींप्रमाणेंच मेंदीनें व निळेनें आपली दाढी रंगवित असत, व ती लावण्यामध्यें व करण्यामध्यें कांहीं चुक्या झाल्यामुळें हल्लींसारिख्याच तेव्हांहि त्यांचा दाढ्या केव्हां केव्हां हिरव्या, निळ्या, व गुलाबी रंगांचा होत असत. हल्लीं काळा व केव्हां केव्हां लाल, यांखेरीज दुसरा रंग कोणी आणित नाहीं. त्यांचा हल्लींचा एकलकोंड्या वहिवाटीप्रमाणेंच, तेव्हांहि प्रत्येक आपापलें जेवण पाहिजे तेव्हां निराळें करून जेवित असे. त्या वेळचे लोक बहुधा दारू पीत नसत, आणि जी पीत, ती तांदुळांपासून करित असत.

त्या लोकांचा रूपाचें वर्णन यथास्थित केलें आहे. दक्षिणेकडील लोक काळे व उत्तरेकडील गोरे, असें त्या काळचें वर्णन आहे.

त्यांविषयीं साधारण वर्णन केलें आहे, तें येणेंप्रमाणें:— हिंदु हे आंगानें काळसर परंतु फार उंच, सुंदर, पातळाङ्गी, व चपळ आहेत; त्यांचें शौर्य हमेशा विशेष आहे. इतर एशियाखंडस्थांपेक्षां युद्धाचा कामांत हे अधिक हुशार, असें वारंवार सांगितलें आहे. हे लोक विचारी, मर्यादेचे, व शान्त आहेत. हे चांगले शिपाई आहेत; उत्कृष्ट शेती आहेत; यांचा सरळपणा व यांची सचोटी हीं प्रख्यात आहेत; हे इतके मार्गाचे लोक आहेत, कीं ते कधीं कोडतांत फिर्याद करावयास जात नाहींत; आणि हे इतके प्रामाणिक आहेत, कीं यांचा दारांस कुलूपें नाहींत, व खतांपत्रांस साक्षी नाहींत; आणि कोणी हिंदु केव्हांहि असत्य बोलला असें झाल्याचें ऐकण्यांत नाहीं असें सांगितलें आहे.

आतां, हिंदूंचाच प्राचीन लेखांवरून असें समजतें, कीं त्यांचा परस्परांवर विश्वास असे अशीं जीं प्रमाणें वर सांगितलीं, तीं चुकलेलीं आहेत; आणि त्यांचा सत्यवादीपणाचें जें वर्णन आहे तेंहि असेंच चुकलेलें आहे, असें म्हणण्यांत कांहीं प्रत्यवाय नाहीं. परंतु असें जरी आहे, तरी युनानी लोकांनीं केलेलें पूर्वोक्त वर्णन मोठें उपयोगाचें आहे; कारण या लोकांचा कोणत्या गुणांनीं युनानी लोकांचा मनावर विशेष ग्रह केला, हें यावरून दिसतें, आणि तेव्हांपासून या लोकांचा स्वभाव अगदीं बदलून गेला असावा

असेंहि त्यावरून सिद्ध होतें. साम्प्रत जर कोणी परदेशस्थ या देशांत आला, तर एथील लोकांची वादबुद्धि व खोटेपणा, हीं प्रथम त्याचा समजुतींत येतात, अशी यांची स्थिति बदललेली आहे.

---

टीप. पुरवणी अङ्क चौथा याचा अखेरीची टीप पाहू. भा० क०

## पुरवणी अङ्क चौथा.

### बाक्ट्रिया म्हणजे बल्ख प्रान्तांतील युनानी राज्य.

टीप.— पुढील इतिहासाशीं या पुरवणीचा संबंध विशेष नाहीं म्हणून ही मुळींच घातली नाहीं, आणि दुसऱ्या व तिसऱ्या अङ्कांचा पुरवणींत जेथें लाटिन् व ग्रीक ग्रंथांवर हवाले असल्यामुळें तो मजकूर मराठी वाचणारांस विशेष समजावयासारिखा नाहीं असा दिसला, तो सर्व गाळून त्या प्रकरणीं ग्रंथकाराचा अभिप्रायाचें दिक्प्रदर्शन केलें आहे, व बाकीचा थोडा थोडा मतलब सांगितला आहे. भा० क०.

---

## पुरवणी अङ्क पांचवा.

### महसूली बंदोबस्ताविषयीं टिप्पणें.

(अ.)— या देशाचा निरनिराळ्या भागांमध्यें सहस्रग्रामाधिपति पूर्वीं होते अशा कांहीं खुणा राहिल्या आहेत, व त्या ठिकाणीं कित्येक कुटुंबांस त्या हुद्यांसंबंधीं किताब व वेतनाचा कांहीं अंशहि मिळत आहे, परंतु त्या हुद्याच्या कांहीं अधिकार बहुधा कोठें कोणासहि नाहीं.

(दक्षिणेंत व दक्षिणहिंदुस्थानाचा दुसऱ्या भागांत मनूनें सांगितलेले देशाचे भाग बहुधा तसेचातसेच राहिलेले आहेत; व तेथें या अधिकाऱ्यांस देशमुख म्हणतात, आणि त्यांचा प्रदेशास सरकार अथवा प्रान्त असें म्हणतात. जेथें सरदेशमुखीचा हुद्याचा अगदीं लोप झाला आहे तेथेंहि हे देशविभाग हमेशा वहिवाटींत आहेत. सरदेशमुखांचा वंशपरंपरेचा चिटणीस सरदेशपाण्डे या नावानें अद्यापि वहिवाटत आहे.)

याखालचा देशविभागास सगळ्या हिंदुस्थानाभर परगणा, या नावानें अद्यापि लेखितात, परंतु त्यांतील काम करणाऱ्या अम्मलदारांस कांहीं वंशपरंपरेचा जमीनी अथवा हक एवढेंच कायतें मिळतें, त्यावरून त्यांस ओळखावयाचें, अथवा याहून विशेष म्हटलें तर त्यांजवळ जमीनीसंबंधीं

सर्व नोंदणीबुकें व इतर कागदपत्र असतात. हल्लीं सर्व परगण्यांमध्यें शंभर गांव नसतात, व पूर्वींहि कागदांत मात्र असतील, वहिवाटींत होते असें दिसत नाहीं. बहुतेकांमध्यें १०० हून कमी गांव असतात; कित्येक ठिकाणीं त्या यत्तेहून फार अधिक किंवा अति कमी संख्या असत्ये, परंतु अशीं उदाहरणें विरळा.

शुद्ध हिंदूंचा कारकीर्दींमध्येंहि परगण्याचा मुख्य अम्मलदाराकडे पोलीसाचा व महसूलाचा मात्र अम्मल होता असें सम्भवतें. त्याचा हाताखालीं त्याचा प्रमाणेंच वंशपरंपरेचा एक हिशेब राखणारा अम्मलदार असे, आणि साम्प्रत, पूर्वोक्त मुख्य अम्मलदारापेक्षां या दुसऱ्या अम्मलदाराकडे त्याचें नेमलेलें काम विशेष राहिलें आहे.

(दक्षिणेंत परगण्यांचा मुख्य अम्मलदारांस देशमुख किंवा देसाई म्हणतात, व त्यांचा हाताखालचांस देशपाण्डे म्हणतात. हिंदुस्थानाचा उत्तरेकडील प्रान्तांमध्यें या अम्मलदारांस चौधरी व कानेङ्गो असें म्हणतात.)

परगण्यांचा खालचा जो विभाग त्याचें नाव मात्र आतां राहिलें आहे.

(नाईकवाडी, तर्फ, इत्यादि त्याचीं नावें आहेत.)

मनूमधील दशग्रामाधिपति, व विंशग्रामाधिपति, यांचा बराबरीचा हा हुद्दा आहे. या विभागांचा मालिकेचा शेवटीं गांव अथवा गांवढीं हे विभाग येतात.

(ब.)— दक्षिणेंत व उत्तरहिंदुस्थानाचा पश्चिमेकडील व मधील भागांमध्यें, यास पाटील असें म्हणतात; बंगाल्यांत, मण्डल असें म्हणतात; आणि दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं, (व त्यांतूनहि मुख्यत्वेंकरून जेथें गांवढ्यांतील वंशपरंपरेचे जमीनदार हल्लीं आहेत, अथवा नुकतेच होते तेथें,) मुकादम असें म्हणतात.

(क.) — यास उत्तरहिंदुस्थानांत, पटवारी; दक्षिणेंत, कुळकरणी; दक्षिणहिंदुस्थानांत, करनम्; व गुजराथेंत, तलाटी अशीं नावें आहेत.

(ड.)— उत्तरहिंदुस्थानांत, पासबान, गोरायत, पैक, दौडाह, इत्यादि; दक्षिणेंत, म्हार; दक्षिणहिंदुस्थानांत, तिलारी; आणि गुजराथेंत, पगी; अशीं नावें आहेत.

( ई. )— शुद्ध बंगाला, व ( कदाचित् ) रोहिलखण्ड हे प्रान्त खेरीज करून, सर्व बंगाल इलाक्यांत गांवढ्यांतील जमीनदार म्हणून निराळे लोक आहेत. राजपूतस्थानाचा कांहीं भागांत ते आहेत, व कदाचित् त्या सगळ्या देशामध्येंहि थोडया काळापूर्वीं त्यांची स्थिति होती. गुजराथेंत त्यांचा जमाव पुष्कळ आहे; महाराष्ट्रांतील शेतकरी लोकांपैकीं निम्यांहून अधिक ते आहेत; आणि तामिळदेशांमधील शेती लोकांतहि त्यांची संख्या पुष्कळ आहे. साम्प्रत जा देशांत यांची संख्या थोडी आहे, व जा दुसऱ्या कांहीं देशांत हे मुळींच नाहींत, त्या सर्व देशांमध्यें हे पूर्वीं एका काळीं साधारण होते, असें मानण्यास चांगला आधार आहे. नर्मदेचा दक्षिणेकडील मुलूकापैकीं जे प्रदेश पूर्वीं सांगितले ते खेरीज करून, त्या देशांत या लोकांचें निर्मूळ झालें आहे. मद्रासेचा उत्तरेकडील, सर्व मद्रासइलाक्यांत, निजामाचा राज्यांत, व नागपूरसंस्थानचा बहुतेक मुलूकांत, खानदेशचा पुष्कळभागांत, व महाराष्ट्रदेशाचा पूर्वेकडील भागांत, असे लोक नाहींत. तैलंगण, ओढ्यादेश, व कानडाप्रान्त, या तीन जुन्या देशांचा बहुतेक भाग वरचा वाक्यांतील प्रदेशांत समाविष्ट आहे. परंतु त्या देशांचा सरहद्दींशीं या प्रदेशाचा सरहद्दी इतक्या तंतोतंत मिळत नाहींत, म्हणून, त्या त्या देशांतील प्राचीन शिस्तीमुळें तेथें गांवढ्यांतील जमीनदार नाहींत, असें म्हणण्यास विशेष आधार सांपडत नाहीं; माळव्याजवळील प्रदेशांत हे जमीनदार साधारण आहेत. असें असून, हल्लीं माळव्यांत हे माहीत आहेत, असें दिसत नाहीं.

( फ. )— उत्तरहिंदुस्थानांत, यांस बहुधा गांवचे जमीनदार अथवा बिसूवेदार म्हणतात; बहारांत, मालिक; गुजराथेंत, पटेल; आणि दक्षिणेंत व दक्षिणहिंदुस्थानांत, मिराशी किंवा मिरासदार, म्हणतात.

" वंशपरंपरेनें चालत आल्यामुळें, अथवा विक्रीपासून, अथवा दानापासून, जमिनीवरील सत्तेचा हक्क साम्प्रतचा शेती करणाऱ्या लोकांकडे स्पष्ट आहे " असा एका ग्रन्थकाराचा अभिप्राय आहे.

मूळ ग्रन्थामध्यें लिहिल्याप्रमाणें, गांवचा जमीनदारांचा हक्कांविषयीं उल्लेख, पश्चिमप्रान्तांसंबंधीं बंगालसरकारचे जे लेख छापले आहेत, त्यांत वारंवार आले आहेत.

या देशांतील जमिनीवरील सत्ता इंग्लंडाप्रमाणें पुरी व अनिर्बद्ध नाहीं, असें जरी लार्ड मेट्काफ् याचें मत आहे, तरी ती सत्ता कोणाकडेस आहे, याविषयीं त्याचा मनांत संशय नाहीं. " गांवचे जमीनदार, म्हणजे बिसवेदार, हे मात्र जमिनीचे बहुतकरून मालक आहेत; बाकी सर्वांचे दावे प्रथम दर्शनींच संशयग्रस्त आहेत. मद्रासचा गवर्नर् सरटामसमनरो,याचा मतें, लोकांनीं मिरासदारांचें माहात्म्य विशेष वाढविलें आहे, व त्यांची जमीन विशेष फायद्याची आहे असें नाहीं; तथापि ती विकण्याजोगी आहे असें तो कबूल करितो. महाराष्ट्रदेशाविषयीं कप्तान राबर्ट्सन् नामें एका कलेक्टरानें कित्येक बेचनपत्रें रुजु केलीं आहेत, त्यांत कित्येक गांवकऱ्यांनीं आपले मिराशीचे हक्क पेशव्यास दिल्याचें खत आहे. शिवाय, दुसऱ्या एका गांवांत एका कुळाचा निर्वंश झाला होता, त्याची जमीन त्या गांवकीचा सर्व लोकांनीं पेशव्यापासून कांहीं रुपये घेऊन त्यास दिली, आणि मागील मालकांचा हक्कांबाबद आम्ही जबाब देऊं असा त्यास करार करून दिला, असा एक लेख आहे.

मिरास म्हणून जो शब्द वर घातला आहे त्याचा जो अर्थ होतो त्यांतील, व जमिनीवरील दुसऱ्या जातीचा हक्कांतील, भेद ध्यानांत ठेविला पाहिजे; कारण वरील शब्दाचा अर्थ वंशपरंपरेची सत्ता असा होतो, आणि, या अर्थानें सर्व प्रकारचा वंशपरंपरेचा हक्कांस हा शब्द लागू पडतो.

( ग. ) — फॉर्टेस्क साहेब, कप्तान राबर्ट्सन्, वगैरे, यीं लोकांनीं केलेल्या ग्रन्थांत याविषयीं हकीकत आहे

( ग अ. ) — गांवांतील जमीनीचे हिसे करत्ये वेळीं प्रथम जमीनदारांचा एकंदर कुटुंबांकडे जमीन वांटून देतात; नंतर त्या कुटुंबांचा जमिनीचे हिसे पाडितात; नंतर हिंदुधर्मशास्त्रांतील दायभागाचा नियमांप्रमाणें त्या हिशांचे पोटहिसे पाडितात. त्याचप्रमाणें गांवसंबंधीं इतर फायद्याचेहि हिसे, पोटहिसे वगैरे पाडितात; अथवा उत्पन्नाचे आणे, रेस इत्यादि देशपरत्वें विभाग करून प्रत्येक मनुष्यास त्याचा हक्काप्रमाणें हिसा मिळे अशी वांटणी करितात.

याचप्रमाणें सरकारचा देण्याचेहि हिसे व पोटहिसे पाडून वांटणी करितात; त्यामुळें प्रत्येक हिसेदारास व पोटहिसेदारास, आपणावर बोजा किती आहे, हें समजतें; व तेणेंकरून त्यास आपला शेतभाताचा व पैक्यारुक्याचा

व्यवहार दुसऱ्यांचे तनखे सोडून स्वतः चालवितां येतो. यास दृष्टान्त;— महाराष्ट्रदेशांत जमीनीचे हिसे पाडून देण्याचें जोखम सर्व हिसेदारांवर जतीमतीनें ठेविलें आहे; परंतु त्यांमध्यें मुख्य म्हणून कोणी नाहीं; प्रत्येक हिसेदार आपापला कारभार पाहतो, व गांवचा पाटील बाकी सर्व कारभार करितो. हिंदुस्थानाचा इतर भागांमध्यें या शिस्तींत फेरपालट झाला आहे; परंतु हिंदूंचा मूळचा रीतीपासून तो वेंगळा आहे, म्हणून त्याविषयीं मी एथें लिहित नाहीं.

( ह. )— जमीनदार लोकांस जे हक्क मिळतात, ते येणेंप्रमाणेंः— आपल्या एकंदर उत्पन्नांतून सरकारचा हिसा देण्यापूर्वी कांहीं अंश वजा करण्याचा हक्क यांस आहे, आणि त्यांचा खूमाचा बाहेरील लोकांचा उत्पन्नावर त्यांस कांहीं हक्क मिळतात; या हक्कांस तामिळ देशांत "स्वामिभोग्य" ( म्हणजे धन्याचा हिसा ) म्हणतात; आणि "मालिकां रसूम" अथवा "जमीनदारी रसूम," असें उत्तरहिंदुस्थानांत म्हणतात. उत्तरहिंदुस्थानामध्यें जमीनदारांस शेंकडा दहा टक्के जो हक्क मिळतो, त्यामध्यें पूर्वोक्त दोन्ही हक्क बहुधा असतात; आणि बहुधा त्यांचा बाकीचा सर्व हक्कांसंबंधीं झालेली नुकसानी भरून देण्याकरितां हा त्यांस करून दिला असावा असें दिसतें; जेथें कोणी जमीनदाराचा जमीनीचें भाडें येत असेल, तेथें या हक्कानें त्यांत कांहीं बदल होत नाहीं. कित्येक ठिकाणीं ( जसें गुजराथ व उत्तरहिंदुस्थान यांमध्यें ) शेतकी न करणाऱ्या लोकांपासून त्यांस कांहीं हक्क मिळत असतात, आणि जेथें गांव वसलेला असतो त्या जाग्याचे ते मालक असतात असा सर्वत्र प्रकार आहे, म्हणून गांवांत राहणाऱ्या सर्व लोकांपासून जमिनीचें भाडें अथवा त्याऐवजीं कांहीं चाकरी ते घेऊं शकतात.

जेथें त्यांचे कांहीं हक्क सरकार खाऊन गेलें असें झालें आहे, तेथें त्यांना आपल्या जमीनी दुसऱ्यांस देतां येऊन नफ्याबद्दल कांहीं सारा मिळे असें होण्याकरितां, पुष्कळ ठिकाणीं, त्यांवर कमी धारा बसविलेला असतो. कित्येक ठिकाणीं ( जसें तामीळ देशचा कांहीं भागांत व उत्तरहिंदुस्थानांत, जेथें त्यांस शेंकडा १० टक्के नेमणूक मिळत नाहीं तेथें, ) त्यांस त्यांचे हक्क मिळत असतात; आणि, जेथें हे हक्क अगदीं थोडे असतात तेथें, इतर गांवकऱ्यांस जे द्यावे

लागतात ते त्यांस माफ असतात. गांवचा जमीनदारांचे हक्क व त्यांस मिळालेल्या माफ्या, हीं, व मुकादम आणि दुसरे अम्मलदार यांस, नेमलेलीं कामें करण्याबद्दल, जे हक्क दिले असतात ते, या दोन्ही बाबी निरनिराळया आहेत; त्यांच्या समावेश एका ठिकाणीं करितां कामास नये. कदाचित् वरील वाक्यांतील दोन्ही प्रकारचे हक्क कित्येक ठिकाणीं एकाच लोकांकडे असूं शकतील; परंतु असें झालें तरी त्यांचें रूप निरनिराळें आहे; त्यांतील पहिले हक्क हे जमिनीचा स्वत्त्वापासून उत्पन्न झाले आहेत, व दुसरे केवळ बदलमुशाहिरा आहेत, म्हणून जाची चाकरी करावयाची त्याचा मर्जीप्रमाणें, ती चाकरी व नेमणूक, हीं दोन्हीं एका मनुष्याकडून काढून दुसऱ्यास देतां येतात.

( ऐ. )— रयत हा अरबी शब्द आहे; व अरबी भाषेंत त्याचा उच्चार " रऐय्यत ", असा होतो, व त्याचा अर्थ प्रजा असा होतो; आणि याच अर्थानें सर्व मुसलमानदेशांत याची प्रवृत्ति आहे. कित्येक देशांमध्यें याचा अर्थ याहून कमी व्यापक असतो. हिंदुस्थानांत याचें गौण अर्थ पुढें लिहिल्याप्रमाणें होतात; —१. महसूल भरणारा मनुष्य.— २. साधारण शेती करणारा.-३. मूळग्रन्थांत लिहिल्याप्रमाणें कूळ.— रयतलोक हे जा मनुष्यांचा जमीनी करितात, त्यांचा संबंधानें या लोकांस त्यांचे " असामी " असें म्हणतात.

( के. )— बंगाल इलाक्यांतील प्रान्तांमध्यें या वर्गांतील लोकांस " खुदकाश्त रयत " म्हणतात; " खुद " म्हणजे " स्व " आणि " काश्तन् " म्हणजे " कृषि करणें, " असा या शब्दाचा अर्थ होतो; आणि या अर्थावरून हे लोक त्या देशांतील जमीनीचे मालक आहेत असें शाबीद होतें असें म्हणतात. राम मोहनराय हा भरवसा ठेवण्याजोगा ग्रन्थकार आहे; त्याणें, "स्वतांचा गांवांतील जमीनींत शेती करणारे " असा "खुदकाश्त" या शब्दाचा अर्थ केला आहे, व हा अर्थ खरा दिसतो; कारण " पैकाश्त " म्हणजे " दुसऱ्या गांवची शेती करणारे " या शब्दाचा विरुद्ध हमेशा पहिल्या शब्दाचा उपयोग करितात.

( ल. )— तामिळ देशांत व गुजराथेंत मिरासदारांचे

हक्क चांगले स्थापलेले आहेत.

तामिळ देशांत त्यांकडे जमीनीचें भोग्य वंशपरंपरेनें असतें, व त्याबद्दल त्यांस कांहीं सरकारचा सारा, व गांवचा जमीनदारांचे हक्क द्यावे लागतातः हे ठराविलेले असतात, व केव्हां केव्हां एक मिरगोंडाहून अधिक नसतात; परंतु जरी वर सांगितल्याप्रमाणें रयतेचा हक्क जमिनदाराचा हक्काप्रमाणेंच जवळजवळ मजबूद आहेत, तरी रयत तो हक्क विकूं शकत नाहीं, देऊं शकत नाहीं, अथवा गाहाण ठेवूं शकत नाहीं. गुजराथेमध्यें या लोकांचा भोगवटा या सारखाच जवळजवळ आहे; परंतु जर गांवचा जमीनदारावरील सरकारचें देणें वाढलें, तर त्यांचा सारा वाढविला जाईल असा स्पष्ट ठराव असतो. तामिळ देशामध्येंहि त्या उभय वर्गांमध्यें अशीच समजूत असल्ये असें संभवतें; परंतु तिजविषयीं छापी रपोर्टांत उल्लेख नाहीं. या लोकांस वंशपरंपरेचा भोगवट्याचा अधिकार आहे, आणि भोंवरगांवचा वहिवाटीपेक्षां यांजवरील सारे अधिक वाढवूं नये असा उत्तरहिंदुस्थानामधील लोकांचा समज आहे; परंतु हा त्यांचा हक्क किती अपुरा आहे हें पुढील मजकुरावरून लक्षांत येईल.

इ० स० १८१८ मध्यें, बंगाल इलाक्यांतील जा प्रान्तांमध्यें कायम जमाबंदी ठरलेली नव्हती, त्यांतील दाइमचा रयतेचा हक्कांविषयीं रपोर्ट करावा, असा त्या सरकारानें त्या त्या प्रान्तांचा कलेक्टरांस हुकूम केला. ते कलेक्टर चौदा होते; त्यांतून अकरांचा मतें आपल्या मर्जीप्रमाणें सारा वाढविण्यास, व दुसरें अधिक फायदेवार कूळ मिळत असल्यास कसणाऱ्या कुळाकडून जमीन काढण्यास, जमीनदारास अखत्यार आहे; इतावा व शारणपूर, एथील दोघां कलेक्टरांचा मतें; सरकारचें देणें वाढल्याशिवाय जमीनदाराचा सारा वाढूं नये, असें होतेंसें दिसतें. खुदकाश्त रयतेचा हक्क, जा जमीनदाराची जमीन तो कसतो, त्याचा साखा मजबूद आहे, असा बुन्देलखण्डाचा कलेक्टराचा मात्र एकट्याचा अभिप्राय होता. हा रपोर्ट सरकारांत पाठविल्ये वेळीं 'रेव्हिन्यू कमिशन' कडील अधिकाऱ्यांनीं आपला अभिप्राय दिला, कीं, कुळें काढून टाकण्याचा अधिकार

आपणास आहे असें जमीनदार लोक समजतात; परंतु रयत लोकांचा खप पुष्कळ असतो, म्हणून ते हा अधिकार वारंवार अमलांत आणित नाहींत.

हीं मतें बरोबर नाहींत, असा त्या वेळचा सरकारास संशय येऊन, त्यांणीं या बाबदींत पुनः रपोर्ट मागितले; त्यांवरून याविषयीं पुष्कळ अधिक खुलासा झाला, परंतु वरील निर्णयांत विशेष बदल झाला नाहीं.

बंगाल इलाक्यांतील, बुन्देलखण्ड प्रान्त खेरीज करून बाकी, सर्व प्रान्तांपेक्षां दिल्ली प्रान्तांतील कायमचा कुळांचे हक्क बरेच शाबीद राहिले आहेत; त्या प्रान्ताविषयीं मिस्टर फॉर्टेस्क याणें रपोर्ट केला आहे; त्यांत असें लिहिलें आहे, कीं पुरातन व वंशपरंपरेचे भोगवटेदार "हे आपल्या हिशाचें सरकारी देणें भरित असतील तेथपर्यन्त, " त्यांस कोणी काढूं शकत नाहीं. होल्ट माकेंझी साहेबानें निरनिराळ्या जिल्ह्यांतील पुष्कळ गांवांमकरणीं तफ़सीलवार रपोर्टांचा सारांश काढिला आहे, त्यावरून जमीनदारांस आपले धारे वाढवितां येणार नाहींत असें निष्पन्न होत नाहीं. एका खटल्याचा निवाड्याची मिनिट लिहित असतां, कोलब्रूक साहेबानें असें लिहिलें आहे, कीं "जमीनदार व कुळें यांचा हक्कांची तोड पाडून बंदोबस्त करणारा एक अति बुद्धिमान् सरकारी अम्मलदार पुष्कळ सावध चित्तानें चौकशी करित असतांहि, त्यास कांहीं नियम सांपडेना; आणि इनसाफाचा कोडतांत जे दुसरे पुष्कळ कज्जे चुकले आहेत त्यांचा हकीकतीवरूनहि रयत व जमीनदार यांचा साम्बन्धिक स्थितीविषयीं असाच निर्णय होतो:" ही मिनिट इ० स० १८१२ त लिहिली असावी असें दिसतें.

मुख्य कोडतांतील रास्स नामें एका जड्जानें एक फार विचाराची मिनिट, इ० स० १८२७ चा २२ मार्चाची, लिहिली आहे; तींत त्याणें असें लिहिलें आहे, कीं बंगाल्यांतील वरील प्रान्तांतील स्थाईक व ओंवडेकरी कुळांनीं आमचा धारा कायम ठराविलेला आहे असा दावा कोठेंहि केलेला नाहीं. दुसरें, असा कायम धारा केव्हां चालू होता, व जमिनीची किम्मत कशीहि बदलली असतां हा धारा कायम

राहवयाचा होता कीं काय? याविषयीं त्याणें वाटाघाट केली आहे; आणि शेवटीं असें लिहिलें आहे, कीं:— देशरिवाजाविषयीं जर कोणी म्हणेल, तर तो रयतेचा अशा हक्कास हमेशा प्रतिकूल आहे, आणि जमीनदार व त्यांहून मोठे मुलुकदार, हे रयतेचानें जेवढें देववेल तेवढें तिजजवळून हमेशा काढित आले आहेत, अशी त्यांची चाल मशूर आहे.

( म. )— उत्तरहिंदुस्थानांत, पैकाश्त; गुजराथेंत, गाणवट्टी; महाराष्ट्र देशांत, उपरी; आणि मद्रास इलाक्यांत, पैकारी व पारकुडी; अशीं यांचीं नावें आहेत.

( न. )— या लोकांस उत्तरहिंदुस्थानांत अश्राफ म्हणतात, आणि दक्षिणेंतील कांहीं प्रान्तांत पांढरपेशे म्हणतात.

( ओ. ) — कित्येक ठिकाणीं सर्व कायमचा कुळांवर एक प्रसिद्ध अटक असत्ये, त्यामुळें गांवचा मालकाचा जमिनीशिवाय दुसरी जमीन त्यांस कसतां येत नाहीं; व जी त्यांची शेतकीची व घरबंदाची जमीन असत्ये, तिजवर कांहीं कायम सारा जमीनदारास द्यावा लागतो. कित्येक ठिकाणीं एका गांवांतील कायमचीं कुळें व त्या गांवचे जमीनदारहि, प्रसंगवशात्, दिगर गांवीं उपरी कुळांप्रमाणें जमीन करितात. हिंदुस्थानाचा कित्येक भागांमध्यें, महसूली जमिनीवरील मिरासदार कुळांपासून सरकार धारा घेतें; व तीं कुळें माफीवाल्या लोकांपासून त्यांचा जमीनीहि मक्त्यानें करितात. कित्येक ठिकाणीं सरकारचे अम्मलदार, अशा कुळांवर कसाहि प्रसंग पडला तरी, त्यांचा धान्याचा जमिनीचा वेदावा देण्याची त्यांस मनाई करितात; परंतु ही केवळ जुलूमजबरदस्ती असें लोक समजतात.

( प. ) — ही शिस्त चांगली समजण्याकरितां कच्छचें जें लहान संस्थान आहे त्याची पुढील हकीकत सांगतों; कारण हें अलीकडे झालेलें आहे, त्यामुळें त्याचें मूळचें रूप जशाचें तसेंच राहिलें आहे. “ या सर्व देशाचा महसूल पन्नास हजार कोरी ( म्हणजे सुमारें सोळा हजार रुपये ) आहे, आणि यांतून सुमारें तीस लक्षांहून कांहीं कमी तेथील राजा, ( जास राव म्हणतात ) यास मिळतो; व बाकी राहिलेल्या वीस लक्ष कोरींचा मुलुक राजाचा शाखासंबंधी दायादांकडेस आहे: तो जसजसे राजे मरून गेले तसतसा त्यांचा मागें त्यांचा प्रत्यक्ष कुटुंबांतील लोकांस

देणग्या मिळून, त्यांस लवाजिम्याबद्दल प्राप्त झाला आहे.

"या राजांचा वंश अलीकडचा काळांतच सिंध देशांतून ठट्टा शहराहून आला. या सर्वांचा मूळपुरुष हमीरजी; त्याचा मुलगा राव खेंगार; त्याणें इसवी सनाचा सोळाव्या शतकाचें पूर्वार्ध संपण्या पूर्वी कच्छचें राज्य संपादिलें.

"या दायादांची संख्या हल्लीं (म्हणजे इ० स० १८२१ मध्यें) २०० आहे, व सर्व कच्छदेशांत यांचा जातीचे लोक १०,००० किंवा १२,००० आहेत. यांचा खूमास जाडेजे असें म्हणतात. ही राजपूतांची एक जात आहे. एथील राजाचा साधारण अधिकार त्याचा स्वतांचा मुलूकांत मात्र आहे. प्रत्येक दायादसरदार आपल्या हद्दींत स्वेछेप्रमाणें सत्ता चालवितो. लढाईचें कारण पडल्यास जाडेजे लोकांवर तलब करण्याचा अधिकार राजास आहे; परंतु ते त्याचा लश्करांत असत पर्यंत त्यांस नियमित दरानें पगार द्यावा लागतो. साऱ्या देशांत स्वस्थता राखण्याचा अधिकार राजाचा आहे, म्हणून त्या नात्यानें सर्व चोर व दुसरे देशाचे साधारण द्वेष्टे, यांस तो शिक्षा करितो. दायादांचा आपसांतील लढाया बंद करणें, व तंटे चुकविणें हींहि कामें त्याणें करावीं असें दिसतें; परंतु हा अधिकार जरी एथील राजे वारंवार चालवितात, तरी त्यांचे दायाद तो निमूटपणीं कबूल करित नाहींत. राजाप्रमाणेंच प्रत्येक मुख्य मुख्य दायादांचे दुसरे शाखासंबंधी असतात; त्यांकडेस कुटुंबांतील मूळ वतनाचा कांहीं हिस्सा असतो, आणि जसा राजाशीं मुख्य सरदारांचा संबंध नावाचा परतंत्रपणाचा असतो, तसा त्या सरदारांशीं यांचा असतो. या शाखासंबंध्यांस त्या सरदारांचे भायाद (म्हणजे भाईबंद) म्हणतात, व त्या मुख्य सरदारांस राजाचे भायाद म्हणतात."

सर्व राजपूतदेशामध्यें कांहीं फेरफार करून हाच पाठ चालू आहे.

राजपूतांचा संस्थानांमध्यें मेवाडाची पायरी पहिली आहे. त्यांत, एका वेळीं, सर्व राज्यांतील तीन चतुर्थांशाहून अधिक मुलुक अशा भायादांकडे होता; आणि त्याच संस्थानांतील अलीकडील एका राजाचा अल्पदृष्टीमुळें भायादांचा मुलुक त्याहून अधिक झाला होता.

(क्यु.) — २०० वर्षांचा अलीकडे सर्व राजपूत

सरदार ( निदान मेवाडांतील तरी ) मुदतीमुदतीनें आपल्या मुलूकाची अदलाबदल करित असत, त्यामुळें त्यांस एका ठिकाणीं,आपले संबंध जोडून अथवा किल्ले बांधून, आपला मुलुक बळकट करण्यास हरकत आली असेल; व या शिस्तीनें या लोकांचा स्वतंत्रतेचा ईर्षेवर कांहीं पाणी पडलें असेल.

या तोडून दिलेल्या नेमणूका फार लौकर वाढत चालल्यामुळें बाकी राहिलेल्या देशाचा ग्रास न व्हावा म्हणून, या राजांस कांहीं युक्ति काढण्याची जरूर पडली असेल. मारवाड देश मूळचा राजानें घेतल्यावर, थोडक्याच पिढ्यांनंतर राजाचा खासगत मुलुक इतका लहान झाला, कीं एका राजाचा मुलांस त्यांचा लवाजिम्यासाठीं देण्यास विशेष कांहीं न राहिल्यामुळें त्यांस आपल्या संस्थेकरितां परदेशांवर स्वाऱ्या कराव्या लागल्या; आणि मेवाडामध्यें, पूर्वींचा एका राण्याचा कांहीं वंशजांस एका पुढचा पिढींतील पुरुषांनीं माजी पाडून त्यांचा कांहीं मुलुकहि घेतला होता,असें सम्भवतें.

( र. ) — पुढील वर्णन दोन्ही प्रकारचा जाहगिऱ्यांस लागू आहे.

लश्करी चाकरीबदल जा जमीनी दिलेल्या असतात, त्यांची वहिवाट करणारा मेला असतां, त्याचा पोटचा वंशजांस कांहीं रसद भरावी लागत्ये, आणि जर वारीस दत्तक असला, तर त्याहूनहि भारी रकमा भराव्या लागतात. शिवाय, राजास प्रसंगवशात् जरूर पडल्यासहि कांहीं देणीं द्यावीं लागतात. त्या जमिनींची नेमणूक जितक्या मुदतीची असेल, तिचा पलीकडे त्या विकतां अथवा गाहाण ठेवतां येत नाहींत. मूळ जाहगिरींचा पोटजाहगिरी पाडून देण्याची चाल राजपूतांखेरीज इतरांमध्यें साधारण नाहीं ; परंतु त्या लोकांत, ही शिस्त सर्वत्र आहे.

जेव्हां या नेमणूका प्रथम तोडून दिल्या, त्या वेळीं चाकरीची यत्ता नव्हती, व चाकरीबदल शिवाय देणग्याहि नव्हत्या.

चाकरीबदल, अथवा चाकरीचें कारण पडेल तेव्हां ती न केल्या बदल, ठरावाप्रमाणें जाहगीरदारानें रसद भरावी, अशी मराठे लोकांत साधारण चाल होती, आणि राजपूतांमध्यें अशाच प्रसंगीं मनःपूत दंड घेत असत.